




# किबुट्झ

नवसमाज
निर्मितीचा
एक प्रयोग



लेखक : मेलफर्ड ई. स्पिरो
अनुवादक : स. ह. देशपांडे
कुसुम देशपांडे





भाषांतर माला क्र. ६७




# किबुट्झ :

## नवसमाज निर्मितीचा एक प्रयोग

मेलफर्ड ई. स्पिरो लिखित

KIBBUTZ:
VENTURE IN UTOPIA

या ग्रंथाचा अनुवाद

अनुवादक

स. ह. देशपांडे

कुसुम स. देशपांडे




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : १९७९ शके १९०१

प्रकाशक :

सचिव,

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२



मुद्रक :

यशवंत श्री. रणदिवे,

महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय,

९१५/१, शिवाजीनगर, फर्ग्युसन कॉलेज रोड,

पुणे ४११ ००४



किंमत : रुपये १७

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृति मंडळाने वाङमयनिर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, मराठी वाङमयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती, विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना मंडळाच्या या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगत स्वरूप व दर्जा देण्याकरिता मराठीत विज्ञान, तत्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्ययावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङमय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात, तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला परावलंबित्व राहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही, एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील त्याचप्रमाणे, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटिन इत्यादी पश्चिमी भाषांतील अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांची भाषांतरे किंवा सारांश अनुवाद अथवा विशिष्ट विस्तृत ग्रंथांचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा मंडळाच्या भाषांतरमालेचा उद्देश आहे.

४. भाषांतर योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्त्य व भारतीय भाषांतील सुमारे ३०० पुस्तके निवडली आहेत. एस्किलस, ॲरिस्टोफिनीस, युरिपिडीस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, टॉमस ॲक्वाइनस, न्यूटन, डार्विन, रूसो, कांट, हेगल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपीयर, टॉलस्टॉय, दोस्तोएवस्की, कॅसिरेर, गॉर्डन व्ही. चाईल्ड इत्यादिकांचा भाषांतरमालेत समावेश केला आहे. संस्कृतमधील वेद, महाभारत, रामायण, भरताचे नाट्यशास्त्र, संगीत-रत्नाकर, ध्वन्यालोक, प्राकृतातील गाथासप्तशती, त्रिपीटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही भाषांतरमालेत समावेश केला आहे.

५. भाषांतर योजनेखाली मंडळाने आतापर्यन्त ५६ अभिजात ग्रंथांची भाषांतरे प्रकाशित केली आहेत. जॉन स्टुअर्ट मिलचे " On Liberty ", रूसोचे

" Social Contract ", एम्. एन्. रॉयचे " Reason, Romanticism and Revolution ", व " Letters from Jail ", स्तानिस्लावस्कीचे " An Actor Prepares ", व " Building a Character ", तुर्गिनेव्हचे " Fathers and Sons ", रायशेन्बाखचे " Rise of Scientific Philosophy ", गन्नर मिर्दालचे " Economic Theory and Underdeveloped Regions ", पां. वा. काणे यांचे " History of Dharmashastra ", कोपलॅंडचे " Music and Imagina-on ", बर्ट्रान्ड रसेलचे " Religion and Science ", व " The Problems of Philosophy ", तेरझाघीचे " Theoretical Soil Mechanics ", विशाखदत्तचे 'मुद्राराक्षसम्', भरतमुनीचे 'भरतनाटचशास्त्र' (अध्याय ६ व ७ आणि अध्याय १८ व १९), निकोलाय मनुचीचे " Storia Do Mogor ", ए सी. पिगूलिखित " Socialism Vs. Capitalism ", इझाडोरा डंकनचे " My Life ", स्ट्रॅविन्स्कीचे " Poetics of Music ", सी. ए. आर. क्रॉसलंडचे " The Future of Socialism " इत्यादी ग्रंथांची भाषांतरे मंडळाने प्रकाशित केली आहेत.

६. इस्रायलमधील 'किबुट्झ'संबंधी प्रस्तुत ग्रंथ मेलफर्ड ई. स्पिरो ह्या लेखकाने १९५५ साली लिहिलेल्या "Kibbutz : Venture in Utopia" ह्या इंग्रजी ग्रंथाचा मराठी अनुवाद आहे. इस्रायलच्या विकासासाठी तेथील शेतीवर आधुनिक विज्ञानावर आधारलेले व सामाजिक दृष्टीने प्रगत असे जे प्रयोग करण्यात आले त्यात 'किबुट्झ'चा प्रयोग अत्यंत महत्त्वाचा आहे. 'किबुट्झ' हा सामुदायिक शेतीचा प्रयोग असून तो शेतीतून जास्त उत्पन्न काढण्याच्या दृष्टीने यशस्वी तर ठरला आहेच, पण त्यापेक्षाही अधिक म्हणजे समाजप्रणवतेच्या दृष्टीने त्याला मोठे यश प्राप्त झाले आहे. सामूहिक जीवनाची इतिहासातील एकमेवाद्वितीय अशी ही चळवळ असून तिच्यायोगे समाजवादाकडे वाटचाल करणे सोपे जाईल अशी इस्रायली राष्ट्रनिर्मात्यांची दृढ श्रद्धा आहे. 'किबुट्झ'संबंधी अनेक ग्रंथ इस्रायलमध्ये व बाहेर प्रसिद्ध झाले असून त्यातून 'किबुट्झ'च्या प्रयोगाची तात्त्विक व व्यवहारतः यशस्वीता आजमाविण्याचे प्रयत्न झाले आहेत. स्पिरोचा ग्रंथ त्यापैकीच एक महत्त्वाचा ग्रंथ आहे. या ग्रंथाचा मराठी अनुवाद डॉ. स. ह. देशपांडे, व सौ. कुसुम देशपांडे मुंबई यांनी समर्थपणे केला असून त्याला प्रा. देशपांडे यांनी स्वतःची एक विवेचक प्रस्तावनाही जोडली आहे. सदर ग्रंथाचे मराठी भाषांतर प्रकाशित करण्यास शॉकेन बुक्स, ६७, पार्क अॅव्हेन्यु, न्यूयॉर्क सिटी, १६ या प्रकाशन संस्थेने मंडळास परवानगी दिल्याबद्दल मी संस्थेचे आभार मानतो.

वाई–४१२८०३
दिनांक : २७ जून, १९७९

**लक्ष्मणशास्त्री जोशी,**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ,
मंत्रालय, मुंबई–४०० ०३२

किबुट्झ : नवसमाज निर्मितीचा एक प्रयोग

# अनुक्रमणिका

# अनुवादकाची प्रस्तावना

इस्रायली किबुट्झ हा समाजवादाचा एक वेगळ्या धर्तीचा प्रयोग आहे. रशिया, चीन, क्यूबा, पोलंड इत्यादी देशांना आपण समाजवादी म्हणतो; पण किबुट्झच्या समाजवादाचा आशय अधिक समृद्ध असून त्याचे तंत्रही अधिक प्रभावी आहे. त्याने एक नवी संस्कृतीच जन्माला घातली आहे. इस्रायलमध्येसुद्धा किबुट्झची व्याप्ती नगण्य म्हणण्याइतकी लहान आहे; तरीही खराखुरा समाजवाद किंवा साम्यवाद कधीकाळी भूतलावर अवतीर्ण होणार असेल तर तो किबुट्झच्या मार्गानेच येईल असे अनेक विचारवंतांना वाटते. इस्रायल राष्ट्राच्या उभारणीत तर किबुट्झचा एवढा वाटा आहे की किबुट्झशिवाय इस्रायलचा विचार करणेही अशक्य आहे. ह्याशिवाय किबुट्झने आर्थिक व्यवहार, सामाजिक रचना, शिक्षण इत्यादी क्षेत्रांमध्ये इतके नवीन प्रयोग केलेले आहेत की समाजशास्त्रज्ञ, मानवशास्त्रज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ, शिक्षणशास्त्रज्ञ, संस्कृतिशास्त्रज्ञ, ह्यांनी त्यांचा हरतऱ्हांनी अभ्यास केला आहे.

मराठी वाचकांना ह्या प्रयोगाची ओळख व्हावी हा प्रस्तुत अनुवादाचा हेतू आहे. भारतातात इस्रायलविषयी अमाप कुतूहल आणि बरीचशी सहानुभूती असली तरी इस्रायलविषयक वाङ्मय देशी भाषांत फारच थोडे निर्माण झालेले आहे. मराठीतल्या अत्यल्प वाङ्मयात ना. ह. पालकर यांच्या 'इस्राएल : छळाकडून बळाकडे' (अपर्णा प्रकाशन, मुंबई, १९६६) ह्या ग्रंथाचा विशेषत्वाने उल्लेख केला पाहिजे. 'मोशे दायान' हा चरित्रग्रंथ श्री. रा. य. ओलतीकर यांनी लिहिलेला आहे. किबुट्झविषयी प्रस्तुत लेखकाच्या माहितीत उपलब्ध असलेले एकमात्र मराठी पुस्तक म्हणजे जोसेफ बराट्झ ह्यांच्या 'ए व्हिलेज बाय द जॉर्डन' ह्या: आत्मकथेचा सौ. कुसुम पटवर्धन यांनी केलेला अनुवाद ('जॉर्डन नदीच्या तीरावर', साधना प्रकाशन, पुणे, १९६५). वाङ्मयविषयक ही उणीव ह्या अनुवादाने काहीशी भरून निघेल अशी आशा आहे.

इंग्रजीत किबुट्झविषयक अनेक पुस्तके असताना अनुवादासाठी मेलफर्ड ई. स्पिरो ह्यांच्या 'किबुट्झ : व्हेंचर इन युटोपिया' ह्या ग्रंथाची निवड करण्याचे कारण असे की तो निव्वळ वर्णनात्मक नाही. त्यात समाजशास्त्रीय व मानसशास्त्रीय दृष्टिकोणातून केलेले मूलग्राही विवेचन आहे. किबुट्झ प्रयोगाच्या शक्यता व त्याच्या मर्यादा यांचा बराचसा यथातथ्य उमज पडावा अशा प्रकारचे विश्लेषण त्यात आहे. अनुवादाच्या निमित्ताने तपास घेताना प्रस्तुत लेखकाच्या ध्यानात आले की किबुट्झ वर्तुळांमध्ये स्पिरो ह्यांचा ग्रंथ वादग्रस्त समजला जातो. ह्या विषयावर काही मत देण्याइतपत लेखकाची निपुणता नाही. पण स्पिरो ह्यांनी केलेले विवेचन सहानुभूति-

शून्य आहे असे त्याला जाणवले नाही. ते स्पष्टवक्तेपणाचे आहे हे मात्र खरे. पण अभ्यासकाच्या दृष्टीने हा एक लाभच समजला पाहिजे. पुस्तकाचे स्वरूप खरे म्हणजे शास्त्रीय ग्रंथाचे आहे. तो एक शोध-प्रबंधच आहे. तरीही ह्या प्रयोगातून जे अनंत प्रश्न निर्माण होतात त्यांची वाचकाला पुरेपूर जाणीव होण्याच्या दृष्टीने हाच ग्रंथ उपयुक्त वाटला.

स्पिरो ह्यांचा ग्रंथ, त्यांनीच म्हटल्याप्रमाणे, एक 'प्रकरणाभ्यास' आहे; म्हणजे त्यात एकाच किबुट्झचा तपशीलवार व सूक्ष्म अभ्यास आहे. शिवाय हा किबुट्झ प्रातिनिधिक म्हणता येणार नाही; कारण तो मार्क्सवादी विचारसरणीचा आहे आणि किबुट्झ चळवळीत मार्क्सवादी किबुट्झ काही बहुसंख्येत नाहीत. म्हणून ग्रंथाचा अनुवाद वाचण्यापूर्वी एक पार्श्वभूमी म्हणून एकूण किबुट्झ चळवळीची वाचकाला माहिती व्हावी व तिचे अनेकविध महत्त्व त्याच्या ध्यानात आणून द्यावे म्हणून ही प्रस्तावना जोडीत आहे. ह्या प्रस्तावनेच्या निमित्ताने आधुनिक काळातील ज्यूंच्या पुनरुत्थानाच्या एका विशेष महत्त्वाच्या अंगावर प्रकाश पडेल असेही वाटते.

इस्रायलमध्ये सहकारी तत्त्वावर आधारलेल्या तीन प्रकारच्या ग्रामीण वस्त्या अस्तित्वात आहेत. त्यातील **मोशॅव्ह ऑव्हदिम** ( – ह्याला बहुधा नुसते **मोशॅव्ह** म्हटले जाते -).हा विस्ताराच्या दृष्टीने,सर्वांत महत्त्वाचा प्रकार आहे. अशा गावात प्रत्येक कुटुंब आपली जमीन स्वतंत्रपणे कसते व आपल्या उत्पन्नाचा स्वतंत्रपणे उपभोग घेते, पण इतर सर्व गरजा सामूहिकरीत्या भागविल्या जातात. म्हणजेच कर्ज, शेतीची उत्पादनसाधने, खरेदी-विक्री व नागरी सुविधा सहकारी रीतीने संघटित केलेल्या असतात. मोशॅव्हमधला सहकारी व्यवहार खाजगी जीवनाला पूरक असा आहे, खाजगी जीवन नष्ट करणारा नाही. सहकारी आणि ग्रामीण वस्तीचा व्याप्तीने सर्वांत लहान असा प्रकार म्हणजे **मोशॅव्ह शितुफी**. मोशॅव्ह ऑव्हदिम व किबुट्झ ह्या दोहोंच्यामध्ये पडेल असा हा प्रकार आहे. यात मोशॅव्ह ऑव्हदिममधले सहकारीकरण तर असतेच; शिवाय जमीन एकत्ररीत्या कसली जाते. केवळ उपभोग तेवढा खाजगी असतो.

किबुट्झ हा ग्रामीण वस्तीचा असा प्रकार आहे की ज्यात सहकाराचे अंतिम टोक गाठलेले आहे. ह्यात मोशॅव्ह शितुफीप्रमाणे एकत्र कसली जाणारी शेती असतेच; पण त्याहून पुढचे एक निर्णायक पाऊल घेतलेले असते ते म्हणजे उपभोगही सामुदायिक असतो. सर्वजण सामूहिक जेवणघरात जेवतात. मुलांचे संगोपन व शिक्षणही सामूहिक-रीत्या होते. कपडेसुद्धा पूर्वी सामूहिक मालकीचे असत व सामूहिक भांडारातून रोजच्या रोज ज्याला जो मिळेल तो कपडा अंगात घालावा लागे. ( आता ही पद्धत बंद झाली आहे. ) खाजगी जीवन इतकेच की प्रत्येक कुटुंबाला राहायला स्वतंत्र जागा असते. ( अर्थात तीही किबुट्झच्या मालकीची असते ). पण कुटुंब याचा अर्थ बहुधा पति-पत्नी एवढाच असतो कारण मुले आईबापांव्यतिरिक्त राहतात आणि शिकतात. अशा रीतीने सहकारी जीवन सर्वार्थाने व पूर्णपणे जगणे व शक्य तितके जीवनव्यवहार

सामूहिकरीत्या पार पाडणे हे किबुट्झच्या सहकाराचे मूलभूत वैशिष्ट्य आहे. आर्थिक रचनेच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट अशी की 'खाजगी मालकी' या संस्थेला, काही लहानसहान अपवाद सोडता, किबुट्झमध्ये स्थान नाही. बहुतेक गरजा समूहच भागवीत असल्यामुळे सदस्यांना पैशाचा वापर बहुधा करावा लागत नाही. किबुट्झ-किबुट्झ-मध्ये तपशिलाचे फरक आहेत पण सर्वसाधारण घडी वर वर्णन केल्याप्रमाणे आहे. अलीकडच्या काळात ही उग्र स्वरूपाची सामूहिकता काहीशी सौम्य होत असलेली दिसते – पण ह्या बदलाचा विचार पुढे होईल. ह्या तीन प्रकारच्या सहकारी वस्त्यांची १९७१ ची आकडेवारी पुढीलप्रमाणे आहे. एकूण किबुट्झ २३५ असून त्यांची लोकसंख्या १०२६५४ किंवा इस्रायलच्या लोकसंख्येच्या सुमारे ३ टक्के आहे. मोशॅव्ह ऑव्हदिमची संख्या ३४७ व लोकसंख्या १२८५०० (सु. ४ टक्के) आहे. मोशॅव्ह शितुफी एकूण २८, लोकसंख्या ५८०० म्हणजे एकूण लोकसंख्येच्या ०.२ टक्के. इस्रायलमधील ग्रामीण लोकसंख्या ५३८००० किंवा एकूणाच्या सुमारे १६ टक्के आहे; तीपैकी साधारणपणे निम्मी लोकवस्ती या तीन प्रकारच्या सहकारी खेड्यांमध्ये राहात असे म्हणता येईल.

सामुदायिक उत्पादन व सामुदायिक उपभोग ह्या किबुट्झच्या आर्थिक रचनेचा अर्थ नीट समजावून घेतला तर असे दिसेल की ह्या रचनेची उभारणी एका अगदी वेगळ्या आर्थिक तत्त्वावर झालेली आहे. ते तत्त्व म्हणजे 'काम शक्तीप्रमाणे व धन गरजेप्रमाणे'. तथाकथित समाजवादी देशांतही हे तत्त्व अवलंबिले जात नाही; 'धन कामाप्रमाणे' हे तत्त्व तेथे पाळले जाते. मार्क्सवादाप्रमाणे समाजवादामध्ये असेच असणार, म्हणजेच विषमता राहणार. समाजवाद पुढच्या अवस्थेत परिणत झाला म्हणजेच 'काम शक्तीप्रमाणे व धन गरजेप्रमाणे' अशी 'साम्यवादी' स्थिती येणार. पण ही अवस्था प्राप्त होण्यासाठी मार्क्सवाद्यांच्या मते धनाचे वैपुल्य आवश्यक आहे. किबुट्झचे वैशिष्ट्य हे की ही अंतिम अवस्था वैपुल्याच्या अभावीच किंबहुना बहुतांश काळ दारिद्र्याच्या स्थितीतच, त्याने प्राप्त करून घेतलेली आहे.

किबुट्झ प्रयोगाचे अनन्यसाधारणत्व मनात ठसण्यासाठी सहकारी शेतीच्या इतर प्रयोगांशी थोडक्यात तुलना करू या. रशियात सामुदायिक शेती आहे ती ह्या अर्थाने की सहकारी संस्थेची शेती एकत्र कसली जाते. म्हणजे उत्पादन सामुदायिक असते, मात्र उपभोग खाजगी घरगुती स्वरूपाचा असतो. उत्पादनही पूर्णपणे सामुदायिक नाही कारण प्रत्येक सभासदाला जमिनीचा एक लहानसा तुकडा खाजगी कसणुकीसाठी दिलेला असतो. शिवाय सामुदायिक उत्पादनातील धनही गरजेप्रमाणे न वाटले जाता 'कामाप्रमाणे' वाटले जाते. ह्याचा अर्थ असा की रशियन सामुदायिक शेतीतला सहकार किबुट्झच्याच नव्हे तर मोशॅव्ह शितुफीच्या मानानेही खालच्या पातळीवरचा आहे. सर्वांत मूलभूत फरक म्हणजे रशियन सामुदायिक शेती सक्तीची आहे, उलट किबुट्झच नव्हे तर इस्रायलमधील इतर प्रकारही सदस्यांनी स्वेच्छेने अंगीकृत केलेले आहेत.

थोडक्यात किबुट्झची रचना कोऑपरेटिव, कलेक्टिव यांच्याहीपुढची म्हणजे 'कम्यून'ची ('समवाया'ची) आहे.

'कम्यून' म्हणताच चिनी कम्यून्सची आठवण होणे साहजिक आहे. चिनी समवायांची अलीकडच्या काळातील तपशीलवार हकीकत उपलब्ध नाही. प्रारंभीच्या काळी जी वर्णने येत त्यावरून पाहता रचनेच्या दृष्टीने चिनी समवाय व किबुट्झ ह्यांमध्ये सामुदायिक उत्पादन व सामुदायिक उपभोग ह्या दोन मुख्य बाबी समान दिसतात. मात्र दोन फरक लक्षात घेतले पाहिजेत. एक, चिनी समवाय विस्ताराने फार मोठे आहेत (किंवा, होते). दोन, रशियाप्रमाणेच चिनी सहकारीकरण सक्तीचे आहे, स्वयंस्फूर्तीचे नाही. ह्या दोन्ही देशांमधील सक्तीच्या सहकारीकरणाचा अर्थ आपण लक्षात घेतला पाहिजे. तो असा की ह्या रचना सत्ताधाऱ्यांनी कल्पिलेल्या काही राष्ट्रीय गरजा भागविण्याची साधने म्हणून निर्माण झालेल्या असतात, त्यांत सहकाराची व समाजवादाची विशुद्ध भावना जगविण्याचा प्रयत्न नसतो.

वरील विवेचनावरून ध्यानात येईल की उत्स्फूर्त सहकाराची परिसीमा किबुट्झने गाठलेली आहे. ह्याच अर्थाने त्याने ह्या स्पर्धात्मक व विषम जगात सहकार्याची व समतेची अभिनव संस्कृती निर्माण केली आहे, 'युटोपिया' निर्माण केला आहे. म्हणूनच स्पिरो यांनी किबुट्झला 'व्हेंचर इन युटोपिया' असे म्हटले आहे.

पण एका लहानशा परिसरात आपणाला हव्या त्या आदर्शाप्रमाणे जगून जीवन कंठणे एवढेच किबुट्झने केलेले नाही. त्याने इस्रायली जीवनाच्या अनेक शाखांत कर्तृत्व गाजविलेले आहे. या अर्थाने किबुट्झ विलक्षण गतिमान् आहे. त्याच्या कर्तृत्वाची थोडक्यात माहिती करून घेणे जरूर आहे.

प्रथम आर्थिक बाजूवर दृष्टिक्षेप टाकू. शक्तीप्रमाणे काम आणि गरजेप्रमाणे धन अशी व्यवस्था असली किंवा अशी व्यवस्था नसूनही उत्पादन सामुदायिक असले म्हणजे खायला सगळे आणि कामाला कोणी नाही अशी अवस्था होणे हा जगाचा अनुभव आहे. म्हणून वैयक्तिक उपक्रम व लाभप्रेरणा या गोष्टी आर्थिक कर्तृत्वाला आवश्यक समजल्या जातात. स्पर्धात्मक भांडवलशाहीचा हा नियम किबुट्झने उलटविलेला आहे, एवढेच नव्हे तर नेत्रदीपकपणे उलटविला आहे. शेती हा किबुट्झच्या अर्थव्यवस्थेचा मूलाधार. १९५५–५८ या वर्षात एकूण इस्रायली शेतीचे उत्पादन दरसाल ८·५ टक्क्यांनी व १९५८–६३ या वर्षात ४·९ टक्क्यांनी वाढत गेले. (म्हणजे इस्रायली शेतीच्या उत्पादनाच्या वाढीचा वेग इतर अनेक देशांच्या तुलनेने मोठा होता.) पण किबुट्झच्या शेती उत्पादनवाढीचा वेग एकूण इस्रायली शेतीपेक्षाही मोठा राहिलेला आहे. १९४९–६० या काळात तो दरसाल १० टक्के होता, त्यानंतरच्या काळात बहुधा त्याहून जास्त आहे.[३] तरीही उत्पादनवाढीच्या आकडेवारीवरून किबुट्झच्या कृषि-कर्तृत्वाची पुरेशी कल्पना येत नाही. ती येण्यासाठी हे ध्यानात घेतले

पाहिजे की किबुट्झच्या तरुण संस्थापकांनी दलदलीच्या जमिनी कोरड्या केल्या, रेताड आणि मुरमाड जमीन उपजाऊ केली व झाडांची आच्छादने टाकून वाळवंटे हिरवी केली. हे सर्व त्यांनी मलेरियाने फणफणत असताना व अरबांचे हल्ले झेलीत-झेलीत केले. त्याशिवाय त्यांनी शेतीच्या नव्या उत्पादनपद्धती पॅलेस्टाईनमध्ये प्रविष्ट केल्या व ह्या भागात पूर्वी कधीही घेतली न गेलेली पिके, फळे, भाज्या ही काढून दाखविली. दूधदुभत्याचा व्यवसाय हा त्यांच्या ' अभिमानाचा विषय ' ठरला तर कुक्कुटपालनात व अंडोत्पादनात त्यांची ख्याती ' सान्या मध्य पूर्वेत ' पसरली. [२] किबुट्झ ही नुसती शेतीवसाहत नसते; आधुनिक उद्योग आणि शेती ह्या दोहोंचा संगम त्यांच्या अर्थ-व्यवस्थेत झालेला असतो. १९६७ च्या आकडेवारीप्रमाणे एकूण १०० किबुट्झतर्फे १५७ औद्योगिक व्यवसाय आणि २० विश्रांतिगृहे चालविली जात होती. किबुट्झमधील एकूण श्रमशक्तीपैकी २० टक्के श्रमशक्ती खाणी, हस्तव्यवसाय, उद्योगधंदे ह्यांत गुंतलेली होती.

अरबांच्या हल्ल्यांचा उल्लेख वर आलाच आहे. उन्हातान्हात शेतीचे काबाडकष्ट करण्याची जशी ज्यूंना सवय नव्हती तशीच हातात शस्त्र धरण्याचीही त्यांची परंपरा नव्हती. पण स्वसंरक्षणासाठी किबुट्झ सदस्यांनी ' हॅशोमर ' नावाची संस्था स्थापन केली. ब्रिटिश विश्वस्ततेच्या काळात ' हॅगाना ' नावाची भूमिगत लष्करी संघटना चालू केली. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात शेकडो किबुट्झनिकांनी ब्रिटिश लष्कराच्या ज्यूइश ब्रिगेडमध्ये नावे नोंदवून लढाईत भाग घेतला. मे १९४८ मध्ये इस्रायलने स्वातंत्र्य पुकारल्याबरोबर अरबांच्या भयानक हल्ल्यांना व कत्तलींना तोंड द्यावे लागले ते किबुट्झनाच. ब्रिटिशांची नजर चुकवीत हजारो ज्यूंना परदेशातून आणून पॅलेस्टाईनमध्ये वसविण्याची धोक्याची कामगिरी त्यांनीच केली. पूर्व युरोपातील, विशेषतः जर्मनीतील ज्यूंच्या हत्याकांडात बचावलेल्या हजारो निर्वासित स्त्रीपुरुषांचे पुनर्वसन प्रामुख्याने किबुट्झ चळवळीनेच केले.

नवोदित इस्रायल राष्ट्राच्या प्रारंभीच्या काळात निरनिराळ्या क्षेत्रांतले नेतृत्व किबुट्झ सदस्यांनीच केले. इस्रायली लोकसभा ( नेसेट ) व मंत्रिमंडळ ह्यांत असणाऱ्या किबुट्झ सदस्यांची संख्या त्यांच्या लोकसंख्येतील प्रमाणापेक्षा नेहमीच ४ पट किंवा ५ पट असे. बेन गुरियन, मोशे दायान, गोल्डा मीअर हे व इतर अनेक नेते किबुट्झचेच. मापाम, मापाई या राजकीय पक्षांचे पुढारीही किबुट्झ-सदस्यच, हिस्ताद्रुत ही मजूर संघटना व इस्रायलमधील सहकारी चळवळ यांचे पुढारीपणही किबुट्झ सदस्यांकडेच. लष्कराच्या सर्व शाखांचे, विशेषतः विमानदल व हवाई छत्रीदल ह्यांचे वरच्या श्रेणीचे अधिकारी किबुट्झवाले. १९६५ मध्ये अरबांविरुद्ध जी सहा दिवसांची घनघोर लढाई झाली तीत धारातीर्थी पडलेल्या जवानांपैकी २५ टक्के जवान किबुट्झमध्येच जन्माला आलेले होते.[३]

किबुट्झच्या वैशिष्ट्यपूर्ण शिक्षणपद्धतींचा उल्लेख पुढे येणारच आहे. येथे एवढेच सांगितलेले पुरे की किबुट्झचे तीन संघ संयुक्तरीत्या इस्रायलमधील सर्वांत मोठे प्रशिक्षण महाविद्यालय चालवितात. इस्रायलमधील शिक्षणपद्धतीवर ह्या महाविद्यालयामुळे किबुट्झचा मोठा प्रभाव पडलेला आहे. कारण २५ टक्के प्राथमिक शिक्षक ह्या महाविद्यालयातून बाहेर पडलेले आहेत. संगीत आणि नाट्य ह्यातही किबुट्झचे सदस्य मागे नाहीत.

कर्तृत्वाचा हा सगळा बहर संपूर्ण लोकशाहीच्या व नुसत्या आर्थिकच नव्हे तर सामाजिक समतेच्या वातावरणात बहरून आलेला आहे. खरा वर्गविहीन समाज पृथ्वीच्या पाठीवर कुठे असेल तर किबुट्झमध्ये, असे छातीठोकपणे म्हणता येईल. किबुट्झच्या जेवणघरात वाढण्याचे काम करणारा माणूस एखादा मंत्री असेल किंवा उच्च सहकारी अधिकारी असेल. एका मंत्र्याला भेटण्यासाठी किबुट्झच्या स्मशानात जावे लागल्याची आठवण स्पिरो यांनीच दिली आहे—या मंत्र्याकडे स्मशानाच्या देखरेखीचे काम होते. इस्रायलचे पहिले पंतप्रधान बेन गुरियन निवृत्त झाल्यावर आपला वृद्धापकाळ आपल्या जुन्या किबुट्झमध्ये काही वेळ मेंढ्यांची लोकर कापण्यात व बाकीचा वेळ ज्यू राष्ट्राच्या इतिहासलेखनाच्या कामात घालवीत. किबुट्झ लोकशाही ही 'प्रत्यक्ष' लोकशाही आहे. किबुट्झच्या ग्रामसभेत सर्व व्यवहारविषयक निर्णय घेतले जातात आणि ज्यूंच्या स्वभावाला अनुसरून तीत खडाजंगी चर्चा आणि वादविवाद होतात. स्त्रीपुरुष समानता आणि राष्ट्रस्थापनेनंतर देशोदेशांहून आलेल्या निरनिराळ्या संस्कृतीच्या स्तरांवरील ज्यूंचे ऐकात्म्य साधण्याचा प्रयत्न ह्यातही किबुट्झने मोठा वाटा उचललेला आहे.

किबुट्झचे हे अनेकविध कर्तृत्व इतर समाजवादी किंवा समवायस्वरूप वसाहतींच्या पार्श्वभूमीवर अधिक उठावदारपणे ध्यानात येते. किबुट्झ हेच काही समवायपद्धतीचे जगातले एकमात्र उदाहरण नाही. जुन्या कालापासून धार्मिक मठांमध्ये ह्याच प्रकारची जीवनरीती अवलंबिली जात असे. ख्रिस्त आणि त्याचे अनुयायी ह्याच पद्धतीने राहात असत असे बायबलमधील उल्लेखांवरून ध्यानात येते. मध्ययुगात ख्रिस्ती धर्माच्या विकृत स्वरूपाला कंटाळून अनेक बंडखोर पंथांनी आपल्या वेगळ्या वसाहती स्थापन केल्या व त्यात ख्रिस्तप्रणीत सामवायिक जीवनाची प्रतिष्ठापना केली. अमेरिका खंडाचा शोध लागल्यावर युरोपातील अनेक पाखंडी धर्म-मतांच्या अनुयायांनी तिकडे स्थलांतर केले व समवाय-स्वरूप वसाहती उभारल्या.[४] हटेराइट, दुखोबार, शेकर, रॅपाइट, इन्स्पिरेशनिस्ट ही त्यांपैकी काहींची नावे. एकोणिसाव्या शतकात रॉबर्ट ओवेनची न्यू हार्मनी ( १८२५ ), कॅबेटची इकॅरिया ( १८४८ ), चार्लस् फूरिअर ह्या फ्रेंच रोमँटिक समाजवाद्याच्या अनुयायांनी व इतर अनेकांनी स्थापन केलेल्या वसाहती इत्यादींचे पेवच फुटल्यासारखे झाले. ह्या वसाहती

धार्मिक नसून इहवादी होत्या आणि समाजवादी तत्त्वांवर समाजाची नवी रचना करणे हे त्यांचे मुख्य उद्दिष्ट होते. ह्या सर्व साम्यवादी वसाहतींचा थोडक्यात इतिहास सांगायचा तर असा की बहुतेक इहवादी वसाहती थोडक्याच काळात कोसळल्या; उलट धार्मिक पंथांच्या वसाहती अधिक दीर्घजीवी व अधिक यशस्वी ठरल्या. हटेराइटांचा उगम मध्य युरोपात सोळाव्या शतकाच्या प्रारंभी झाला व ते १८७४ साली अमेरिकेत व तेथून पहिल्या जागतिक युद्धाच्या काळात कॅनडात गेले. साम्यवादी स्वरूपातली त्यांची राहणी आजतागायत चालू असून सुमारे १२० गावांमध्ये त्यांच्या वसाहती पसरलेल्या आहेत. शेकर समाज १७७८ पासून १९४० पर्यंत म्हणजे १६८ वर्षे सामवायिक स्वरूपात जगला. रॅपाइटांची कारकीर्द १८०५ ते १९०५ पर्यंत म्हणजे शंभर वर्षे आणि अमानाची १८४२ ते १९३२ म्हणजे नव्वद वर्षे झाली.

ह्या पार्श्वभूमीवर किबुट्झचा विचार करायचा आहे. पहिला किबुट्झ 'डेगानिया' हा १९१० साली स्थापन झाला. म्हणजे किबुट्झ चळवळीला प्रारंभ होऊन आता ६७ वर्षे झाली. या अवधीत ह्या चळवळीने संपादन केलेल्या यशाचे वर्णन वर केलेले आहे. येथे एवढेच दाखवायचे आहे की किबुट्झने मिळविलेले यश त्यातल्या त्यात यशस्वी अशा धार्मिक वसाहतींपेक्षाही अधिक अभिनंदनीय आहे. एकतर किबुट्झ-सारखे चौफेर कर्तृत्व कोणत्याही धार्मिक वसाहतीने गाजविलेले नाही. दुसरे म्हणजे धार्मिक वसाहतींना जे अनेक प्रकारचे आनुकूल्य होते ते किबुट्झच्या वाट्याला आले नाही. धार्मिक वसाहतींचे सदस्य बहुधा शेतकरी किंवा कारागीर अशा स्तरांवरील होते; उलट किबुट्झ स्थापन करणाऱ्या ज्यू युवकांना शेती, कारागिरी व कोणतेही कष्टाचे काम ह्यांचा गंधही नव्हता. बहुतेक धार्मिक वसाहतींनी 'दारिद्र्याचा वसा' (व्हाउ ऑफ पॉव्हर्टी) घेतलेला होता. त्यामुळे सुबत्तेतून जन्म पावणाऱ्या समस्या त्यांच्या नशिबी आल्या नाहीत. किबुट्झ-संस्थापक दारिद्र्यात व कष्टात राहिले हे खरे पण दारिद्र्य किंवा किमान गरजा हा त्यांच्या निष्ठेचा विषय नव्हता. त्यांना उच्च जीवनस्तर हवा होता व क्रमाक्रमाने त्यांनी तो मिळविलाही. अनेक धार्मिक समुदाय ब्रह्मचर्याचे बंधन पाळीत; उलट विवाहसंस्था व कुटुंबसंस्था ज्यूंना इष्ट वाटत होती. किबुट्झने कुटुंब-संस्थेचे स्वरूप बदलले पण तिचा नायनाट केला नाही. धार्मिक वसाहतींचे अंतर्गत प्रशासन एकचालकानुवर्ती असे. एक साक्षात्कारी नेता किंवा गुरू व बाकीचे त्याचे अनुयायी ही व्यवस्था त्यांच्या वसाहतीत असे व सुसूत्र आणि संघटित व्यवहाराला ती नेहमीच पोषक ठरते. किबुट्झ-संस्थापक मात्र पूर्ण लोकशाहीवादी व अनेक रूढ बंधनांविरुद्ध बंड करणारे उसळत्या रक्ताचे तरुण होते. धार्मिक वसाहतींमध्ये 'सांस्कृतिक' जीवन असा काही प्रकार नसे. उलट किबुट्झमध्ये ज्ञान, विज्ञान, कला, नृत्य, नाट्य इत्यादींना हेतुतः उत्तेजन देण्यात येते. 'एक हात नांगरावर (किंवा बंदुकीवर) व दुसऱ्या हातात पुस्तक' अशी किबुट्झ सदस्याची प्रतिमा आहे. सर्जक आविष्कारांना वाट मोकळी ठेवून सामवायिक राहणी चालू ठेवण्याची अवघड किमया

किबुट्झने करून दाखविली आहे. कदाचित् सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही की धार्मिक वसाहती जगापासून तुटून राहात. बाह्य जगाशी संबंध न येता आपली विशिष्ट उपासनापद्धती व जीवनरहाटी निर्वेधपणे चालू ठेवावी एवढाच त्यांचा मर्यादित हेतू असे. स्पिरो यांनी म्हटल्याप्रमाणे किबुट्झ चळवळ परावर्तनशाली ( विथड्रॉईंग ) नाही, ती आक्रमक ( मिलिटंट ) आहे. म्हणजेच तिला किबुट्झबाह्य जगापासून दूर राहायचे नाही, उलट जगावर आपल्या विचारसरणीचा प्रभाव पाडायचा आहे. म्हणूनच जगाशी फटकून न वागता त्याच्या व्यवहारात सररा होऊनच किबुट्झने आपला मार्ग आक्रमिला आहे. किबुट्झने राष्ट्रीय प्रपंचात भाग घेतला. एवढेच नव्हे तर नवजात राष्ट्राच्या अठरा कारखान्यांचे नेतृत्वही केले. पण बाह्य जगाशी अशी सतत घसट होत असतानाही किबुट्झची आपल्या मार्गावरील निष्ठा शाबूत राहिली.

किबुट्झ हा ' चमत्कार ' गणला जातो तो ह्या अर्थाने. जगात आजपर्यंत जे कुणीही केलेले नाही ते किबुट्झने करून दाखविलेले आहे.

किबुट्झच्या आर्थिक रचनेचे मागे जे वर्णन केले आहे त्यावरून ध्यानात येईल की ज्याला आपण ' आर्थिक प्रलोभन ' ( इन्सेंटिव ) म्हणतो त्याचा किबुट्झमध्ये जवळ जवळ संपूर्ण अभाव आहे. सर्वसाधारणपणे असे गृहीत धरले जाते की माणूस मुख्यतः स्वार्थप्रेरणेने काम करतो: जर अधिक धनलाभ होण्यासारखा असेल तरच तो अधिक काम करील किंवा अधिक कौशल्याचे काम करील. समाज आर्थिकदृष्ट्या गतिमान ठेवायचा असेल तर अशी प्रलोभने अस्तित्वात असलीच पाहिजेत असे समजले जाते. पण ही प्रलोभने असणे ह्याचा अर्थ विषमता असणे असा आहे. समाजवादाचा अर्थ समता असेल तर त्यात प्रभावी आर्थिक प्रलोभने राहणार नाहीत हे स्पष्टच आहे. मग स्थितिशीलता, अकार्यक्षमता हेच समाजवादाचे परिणाम राहणार काय ? म्हणजेच प्रगतीची किंमत देऊनच समता विकत घ्यावी लागणार काय ? समाजवादी अर्थव्यवस्थेचा हा मध्यवर्ती प्रश्न आहे. आणि समाजवादी देशांचा आजपर्यंतचा इतिहास तरी असे सांगतो की आर्थिक प्रलोभने व त्यामुळे येणारी काही किमान विषमता स्वीकारल्याशिवाय आर्थिक प्रगती करून घेणे शक्य नाही.

मात्र किबुट्झने या पेचातून सुटका करून घेतली आहे ह्यात शंका नाही. जवळजवळ आदर्श स्वरूपाची समता आणि अत्यंत प्रवाही प्रगतिशाली जीवन ह्यांचा त्यांनी समन्वय साधलेला आहे. काही विशिष्ट परिस्थितीत माणसे स्वार्थेतर प्रेरणांनी काम करू शकतात, एवढेच नव्हे तर उत्कृष्ट काम करू शकतात हे त्यांनी सिद्ध केले आहे. ही विशिष्ट परिस्थिती कोणती आणि ती कशी निर्माण होते हेच आता पाहायचे आहे.

कोणतेही मानवी घटित साध्यासुध्या कार्यकारणसंबंधाने स्पष्ट करणे अशक्य असते कारण त्यात अनेक हेतू, प्रेरणा व आकस्मिक घटक ह्यांचे मिश्रण झालेले

असते. किबुट्झबद्दलही असेच म्हणता येईल. तरीही त्यामागची प्रधान प्रेरणा कोणती आणि दुय्यम कोणत्या ह्याचा अंदाज करता येतो आणि त्या अनुरोधाने किबुट्झच्या घडणीचे विश्लेषण करता येते.

धार्मिक समवायांना समाजसुधारणा घडवून आणणाऱ्या समवायांपेक्षा अधिक यश मिळाले आहे ह्याचा उल्लेख मागे आलेलाच आहे. समतेचे केवळ इहवादी ध्येय नजरेसमोर ठेवून ज्यांनी नव्या समाजरचनेचे प्रयोग केले ते एकोणिसाव्या शतकातील सर्व समूह अयशस्वी झाले. उलट ज्यांची ध्येये ऐहिक नसून पारलौकिक होती ते साम्यवादी समूह तुलनेने अधिक यशस्वी ठरले. त्यातील काही तर शेकडो वर्षे जिवंत राहिले; काही अजूनही जिवंत आहेत. ह्या सर्व समूहांचा आढावा घेऊन समारोप करताना मार्के हॉलोवे यांनी म्हटले आहे, “ ज्यांचा साम्यवाद साध्यरूप होता ते अयशस्वी झाले; ज्यांचा साम्यवाद साधनरूप होता ते यशस्वी झाले. ” म्हणजे साम्यवादी समूहांच्या चिवटपणाचे, यशस्वितेचे रहस्य ते धार्मिक आहेत का नाहीत यावर अवलंबून नसून त्यांचा साम्यवाद हा एक व्यावहारिक ध्येय म्हणून आचरिला जात होता की एखाद्या त्याहून वरच्या उद्दिष्टासाठी साधन म्हणून आचरिला जात होता ह्यात आहे. किबुट्झ वसाहतींमध्ये धार्मिक वसाहतींचा एक छोटासा गट आहे पण बहुसंख्य गट धार्मिक नाहीत, इतकेच नव्हे तर त्यातील काही धर्मविरोधीही आहेत. तरीसुद्धा किबुट्झ चळवळ ही सर्वसाधारणपणे यशस्वी ठरलेली चळवळ आहे. तेव्हा ‘ साध्यरूप साम्यवाद ’ व ‘ साधनरूप साम्यवाद ’ ह्या संकल्पनाभेदांवरून किबुट्झच्या यशस्वितेवर काही प्रकाश पडतो का हे पाहूया.

किबुट्झ चळवळीच्या इतिहासावरून स्पष्टपणे ध्यानात येते की साम्यवाद प्रत्यक्षात आणणे हा तिचा मुख्य उद्देश नव्हता; मुख्य उद्देश नव्या ज्यू राष्ट्राची उभारणी करणे हा होता आणि ह्या अर्थाने तिचा साम्यवाद साध्यरूप नसून साधनरूप होता. अर्थात् साम्यवादी ध्येयवाद किबुट्झ संस्थापकांच्या मनात अजिबात नव्हता असे नाही. एकोणिसाव्या शतकातील समाजवादी विचारप्रणालींचा परिणाम किबुट्झ संस्थापकांवर झालेलाच होता. किबुट्झचे प्रारंभीचे बव्हंश प्रणेते रशिया व पोलंडसारख्या पूर्वयुरोपीय देशांत जन्माला आले होते आणि या देशांतून त्या काळी चाललेल्या सामाजिक विचारमंथनाचा त्यांच्यावरही संस्कार झाला होता. हे सर्व खरे असले तरी त्यांचे ध्येय कोणते म्हणून जर प्रश्न केला तर ‘ पॅलेस्टाइनच्या भूमीत नवे ज्यू राष्ट्र उदयास आणणे ’ याहून वेगळे उत्तर असणार नाही.

आणि हे ध्येय जरी ‘ धार्मिक ’ नसले तरी त्याची प्रेरणा धर्मासारखीच बळकट होती. एकोणिसाव्या शतकात समाजवादासारखीच राष्ट्रवादाचीही प्रबळ लाट आलेली होती आणि ज्यूंचा राष्ट्रवाद मूलतः इतरांच्या राष्ट्रवादासारखाच असला तरी त्याचे एकूण स्वरूप इतरांच्या मानाने अधिक उग्र होते ह्यात शंका नाही. मातृभूमीचे प्रेम हा सर्वच राष्ट्रवादाचा मूलाधार असतो हे खरे पण ज्यूंचे मातृभूमिप्रेम तिच्यापासून

दुरावल्यामुळे की काय शतगुणित झालेले होते. ही ताटातूट सुमारे दोन हजार वर्षांची ( नेमकेपणाने सांगायचे तर इ. स. ७० मध्ये रोमन लोकांनी पॅलेस्टाइन जिंकला तेव्हा-पासूनची ) आहे आणि ह्या सर्व कालखंडात देशोदेशी विखुरलेले ज्यू आपल्या 'पवित्र भूमी'ची आठवण करीत जगत होते. 'भूमी' या संकल्पनेचेच ज्यूंना विलक्षण आकर्षण होते कारण केवळ त्यांच्या 'पवित्र भूमी'वरूनच नव्हे तर एकूणच 'भूमी' वरूनच त्यांचा उच्छेद झालेला होता. ज्यूंनी ज्या ज्या देशात वस्ती केली त्यापैकी बहुतेक देशांत त्यांना जमीन विकत घेण्याची बंदी होती. त्यामुळे राष्ट्रवादामध्ये भूमीविषयी जी एक स्वप्नरंजनात्मक प्रीती असते तिचा प्रकर्षच ज्यूंच्या मनामध्ये झालेला होता. मातृभूमीला 'पुनरागमन' ( 'एक्झोडस', 'इनगॅदरिंग ऑफ दि एक्झाइल्स' ) होणार अशी भविष्यवाणी अनेक ज्यू प्रेषितांनी केलेली होती, व श्रद्धाळू ज्यू तिच्यावर शतकानुशतके विश्वास ठेवून जगत होते. देशोदेशींचे ज्यू एकमेकांना भेटल्यावर 'पुढच्या वर्षी जेरुसलेम' ( 'नेक्स्ट इयर इन जेरुसलेम' ) ह्या शब्दांनी हजारो वर्षे एकमेकांना अभिवादन करीत होते. इस्रायल स्वतंत्र झाल्यावर जेव्हा इस्रायलच्या भूमीत प्रथम खनिज तेल सापडले तेव्हा त्याचा एक लहानसा थेंब पत्र्याच्या लहानशा डबीत घालून आणि डबी गोफात अडकवून त्याचा ताईत ज्यू मुले आपल्या गळ्यात घालीत असत अशी एक आठवण रसबुक – विल्यम्स ह्यांनी दिलेली आहे. स्वप्नरंजनात्मक भूमिप्रेमाचीच ही उदाहरणे आहेत. ज्यूंच्या राष्ट्रवादातला दुसरा महत्त्वाचा घटक म्हणजे धर्म आणि इतिहास ह्यांची ज्यू परंपरेत पडलेली सांगड. ज्यूंचे धार्मिक ग्रंथ म्हणजे एका अर्थाने त्यांच्या बखरी आहेत आणि त्यांत ज्यू व त्यांचे आक्रमक ह्यांच्या संघर्षांचा इतिहास आहे. "ज्यूंचा इतिहास वगळला तर ज्युडाइझममध्ये काही शिल्लक राहाणार नाही" असे बेन गुरियनने म्हटले आहे. ज्यूंच्या राष्ट्रवादातली तिसरी प्रमुख प्रेरणा म्हणजे वंशश्रेष्ठत्वाची तीव्र जाणीव. सर्वच राष्ट्रवादी विचारप्रणाली कमीअधिक प्रमाणात समाजाच्या अस्मितेचा उद्घोष करीत असतात, पण ज्यूंच्या बाबतीत तिची पाळेमुळे ऐतिहासिक आणि धार्मिक परंपरेत खोल गेलेली आहेत. आपण 'ईश्वराचे लाडके' ( 'चोझन पीपल' ) आहोत असे त्यांचा धर्म त्यांना सांगतो. इसाया ह्या प्रेषिताने 'जगाला तुम्ही प्रकाश द्या' ( 'लाइट अन्टु द नेशन्स' ) असा आदेश त्यांना दिला होता आणि धर्म, विज्ञान, कला, क्रीडा, तत्त्वज्ञान इत्यादी क्षेत्रात ज्यूंनी नुसतीच सर घातलेली नसून अनेकदा इतिहासाला निर्णायक वळण देणारी सर घातलेली आहे हे ध्यानात घेतले म्हणजे ज्यूंचा हा स्वाभिमान रास्तही होता असे म्हणण्यावाचून गत्यंतर दिसत नाही. अशा रीतीने भूमिप्रेम, ऐतिहासिक परंपरेचा अभिमान, वंशश्रेष्ठत्वाची जाणीव ह्या राष्ट्रवादाच्या मूलभूत घटकांनी ज्यूंचा राष्ट्रवाद विशेष रीतीने प्रभावित झालेला होता. किबुट्झची संस्थापना करणारी तरुण मुले हा वारसा घेऊन आली होती आणि राष्ट्रस्थापनेसाठी कोणताही स्वार्थत्याग करण्याची व कोणतीही संकटे सोसण्याची त्यांची तयारी होती.

अशा रीतीने किबुट्झचे संस्थापक हे प्रखर देशभक्त होते हे लक्षात घेतले म्हणजे त्यांच्या साम्यवादी राहणीचाही काही प्रमाणात उलगडा होऊ लागतो. क्रांतीची ज्योत धगधगती ठेवायची तर क्रांतीला वचनबद्ध असलेल्यांनी सारखे एकमेकांत वावरले पाहिजे, एकमेकांच्या खांद्याला खांदा देऊन लढले पाहिजे, परस्परांविषयी बंधुभाव मनात बाळगला पाहिजे, स्वार्थप्रेरणा काबूत ठेवल्या पाहिजेत आणि सर्व निष्ठा क्रांतिकारक ध्येयावर वाहिली पाहिजे. सर्वस्वाची मागणी करणारे ध्येय जेथे असते तेथे संकुचित स्वार्थाला अवकाश राहात नाही आणि ही स्वार्थप्रेरणा गौण झाली म्हणजे समवायस्वरूप राहणीतला सर्वांत मोठा अडसर नाहीसा होतो.

ज्यूंचा विशिष्ट ध्येयवाद आणि सहकारी किंवा सामूहिक जीवनसरणी ह्यांचा आणखीही एक संबंध ध्यानात घ्यावयास हवा. ज्यूंच्या राष्ट्रवादाच्या चळवळीचा इतिहास इतर देशांच्या तुलनेने वेगळ्या भौतिक परिस्थितीत घडून आला आहे. भारतासारख्या देशातील राष्ट्रवादी चळवळींना आपल्याच भूमीत आपली शक्ती वाढवून स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यायचे होते; उलट ज्यूंना पॅलेस्टाइनमध्ये, म्हणजे एका नव्या आणि अपरिचित देशात जाऊन, स्वतंत्र राष्ट्र उभे करायचे होते. ह्यात मुख्य गरज पॅलेस्टाइनमध्ये ज्यूंची संख्या वाढवीत जाणे ही होती. ( आजही ती आहे. संबंध इस्रायलची लोकसंख्या सुमारे ३० लक्ष म्हणजे मुंबईपेक्षाही कमी आहे. ) हे करण्यासाठी शेतजमिनीवर वसाहत करणे अटळ होते. पण त्याहून महत्त्वाची गोष्ट अशी होती की मजूर लावून भांडवलशाही पद्धतीची शेती करण्याचा पर्याय त्यांना उपलब्धच नव्हता कारण स्वस्त मजुरीत काम करण्यास हजारो अरब मजूर तयार होते. त्यांच्याकरवी शेती केली असती तर ज्यूंच्या संख्येहून अनेकपटींनी अरबांची संख्या वाढली असती. युरोपातून आलेल्या ज्यू तरुणांतील काहींनी मालक व इतरांनी मजूर होणे हेही शक्य नव्हते. म्हणून मजूर लावून केलेली खाजगी भांडवलशाही शेती हा पर्यायही उपलब्ध नव्हता. राहता राहिली कुटुंबशेती व सामुदायिक शेती. ज्यू तरुणांना शेतीचा अनुभव नव्हता. ( जगातल्या एकूण ज्यू लोकसंख्येपैकी २-३ टक्केच लोक शेतीवर अवलंबून होते. ) ते सुशिक्षित मध्यमवर्गीय तरुण होते. त्यामुळे एकमेकांच्या सहकार्याशिवाय काहीही करणे त्यांना शक्य नव्हते. म्हणून पॅलेस्टाइनमधील ज्यू शेतीचा विकास सहकाराचा फार मोठा अंश असलेली कुटुंबशेती ( मोशॅव्ह ) व सामुदायिक शेती ( किबुट्झ ) या दोन ठळक मार्गांनी झाला.

सामुदायिक शेती व सामूहिक राहणी अवश्य करणारे इतरही घटक पॅलेस्टाइनच्या भौतिक परिस्थितीत होते. घरांपासून हजारो मैल दूर राहणाऱ्या कोवळ्या तरुणांना एकमेकांचा सहवास हाच दिलासा होता. त्यातून मलेरियासारख्या जीवघेण्या रोगांच्या साथींशी त्यांना झगडावे लागे. अशा अवस्थेत शेतीची कामे पार पाडायची तर सर्वच श्रमशक्ती एकत्ररीत्या संघटित करण्याखेरीज उपाय नव्हता. जमीन नापीक आणि अपार कष्ट केल्यावरच फळ देणारी. शिवाय पैशाची सततची चणचण. काटकसरीने

राहायचे तर एकत्रच राहिले पाहिजे. हे सर्व प्रश्न सामुदायिक संघटनेशिवाय सुटण्यासारखे नव्हते.

पण भौतिक परिस्थितीतला सर्वांत निर्णायक घटक संरक्षणाच्या जरूरीचा म्हटला पाहिजे. पॅलेस्टाइनच्या सीमांवर मोक्याच्या ठिकाणी वसाहती स्थापून पॅलेस्टाइनच्या भूमीचे संरक्षण करणे हे ज्यू राष्ट्रवाद्यांचे वसाहतविषयक धोरण होते आणि बहुतेक किबुट्झ अशा ठिकाणीच हेतुपूर्वक स्थापन करण्यात आले होते. या वसाहतींवर अरब लोक अचानक हल्ले चढवीत. त्यासाठी वसाहतींना पूर्णपणे स्वसंरक्षणक्षम आणि प्रतिकारक्षम असावे लागे. एकूण किबुट्झ म्हणजे एका अर्थाने रणांगणावरची छावणीच असे आणि लष्करी जीवन समूहजीवनाकडे झुकते ह्याची साक्ष स्पार्टापासून आजतागायत इतिहासात अनेक ठिकाणी मिळण्यासारखी आहे.

एकूण भौतिक परिस्थितीचा विचार करता ह्या राष्ट्रवादी वसाहतवाल्यांना अनेक प्रसंगी किबुट्झशिवाय पर्यायच नव्हता, दुसऱ्या कोणत्याही तत्त्वावर आपल्या जीवनाची उभारणी करणे त्यांना शक्य नव्हते असाच निष्कर्ष काढावा लागतो. किंबहुना ह्याचा निर्वाळा किबुट्झ चळवळीशी संबद्ध असलेल्या अनेकांनी दिला आहे. प्रारंभीच्या काळी वसाहतींबाबतचे नियोजन डॉ. रूपिन यांच्याकडे होते. १९२१ साली झिऑनिस्ट संघटनेच्या लंडन कचेरीला लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात, “ आम्हाला दोन गोष्टींतून एकीची निवड करायची होती : काही न करता स्वस्थ बसायचे. किंवा किबुट्झचा विलक्षण प्रयोग पुढे रेटायचा.”[४] ‘डिगानिया ए’ ह्या पहिल्या किबुट्झचा संस्थापक जोसेफ बराट्झ आपल्या आत्मकथेत म्हणतो, “ ह्या नव्या देशातल्या कठीण परिस्थितीत कोणीही माणूस किंवा कुटुंब एकाकी जीवन जगू शकला नसता हे आम्हाला ठाऊक होते आणि म्हणूनच आम्हांला एकमेकांची सततची मदत हवी होती. आम्ही एकत्रपणे काम केले तरच अधिक उत्पादन करू शकू हेही आमच्या ध्यानात आले.”[५] मरे वेनगार्टेन ह्या एका किबुट्झचे चिटणीस असलेल्या गृहस्थांनी “ किबुट्झमधील जीवन ” ह्या पुस्तकात म्हटले आहे, “ झिऑनवादी वसाहती करण्याच्या व्यावहारिक गरजांच्या दृष्टीने पाहिले तर किबुट्झ हा एकमेव संघटनाप्रकार यशस्वी ठरण्यासारखा होता.”[६] सर्वांत महत्त्वाचा निर्वाळा ‘डिगानिया बी’ या दुसऱ्या किबुट्झचे एक संस्थापक काडिश लुझ यांनी दिलेला आहे : “ त्याकाळी मी किबुट्झचीच निवड का केली हा प्रश्न मी माझा मलाच विचारला तर असे उत्तर मिळते की मी जगाची सुधारणा करायला निघालो होतो किंवा समाजवादी होतो म्हणून असे झाले नाही. मुख्य कारण म्हणजे मी झिऑनवादी होतो आणि झिऑनवादी ध्येय मला इस्रायलच्या भूमीत साकार करायचे होते.”[७] पॅलेस्टाइनमधील तत्कालीन परिस्थितीत किबुट्झसारखीच संघटना कशी स्वाभाविक होती याचा अप्रत्यक्ष पडताळा स्पिरो यांनीच या ग्रंथात दिलेल्या

एका उदाहरणावरून येतो — किर्यात येदिदिमची, म्हणजे प्रस्तुत ग्रंथात वर्णिलेल्या किबुट्झची जेव्हा स्थापना झाली तेव्हा त्याच्या संस्थापकांना इतर किबुट्झ अस्तित्वात आहेत हेही माहीत नव्हते!

ज्या प्रकारच्या माणसांनी किबुट्झ निर्माण केला त्यांच्याविषयीही थोडेसे लिहिले पाहिजे. रशिया व पूर्व युरोपमधून आलेली ही ज्यू मुले ( मुलगे आणि मुली ) बहुधा विशीच्या आसपासची असत. त्यांचे शिक्षण चांगले झालेले असे. इन्फील्डने फार पूर्वी केलेल्या एका पाहणीप्रमाणे त्यांतील सुमारे ५७ टक्के मुलांचे उच्च शालेय किंवा महाविद्यालयीन शिक्षण पुरे झालेले होते. पण याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे अगदी प्रारंभीचा काळ सोडला तर किबुट्झमध्ये प्रवेश करण्यापूर्वी इच्छुकाला विशेष शिक्षण घ्यावे लागे. युरोपातील निरनिराळ्या झिऑनवादी स्वयंसेवक संघटना बऱ्याच्या आठव्या वर्षापासून मुलांना राष्ट्रवाद, ज्यू धर्म व समाजवाद यांचे धडे देत. विशेषतः किबुट्झप्रमाणेच सामवायिक पद्धतीने एकत्र कसे राहायचे याचे शिक्षण त्यांना देण्यात येत असे. याशिवाय पॅलेस्टाइनमधील प्रत्यक्ष परिस्थिती ज्यात कृत्रिमपणे निर्माण केलेली आहे अशा वस्त्या तयार करून तेथे त्यांना शेतीचे व इतर शिक्षण देण्यात येई. हे शिक्षण सुमारे एक वर्षाचे असे. पण ब्रिटिश विश्वस्तांनी पॅलेस्टाइनमध्ये देशांतर करणारांवर बंदी घातल्यावर अनेक इच्छुकांना जास्त काळ आपापल्या देशातच थांबावे लागले व त्यामुळे त्यांना हे पूर्वशिक्षणही अधिक काळ— कधीकधी ५-६ वर्षेसुद्धा—मिळाले. शिवाय या इच्छुकांना पॅलेस्टाइनमध्ये आल्यावरही उमेदवार म्हणून एखाद्या किबुट्झमध्ये काम करावे लागे. इतके करूनही किबुट्झमध्ये प्रवेश आपोआप मिळत नसे. जुन्या किबुट्झ सदस्यांनी निवड केली तरच नवा इच्छुक सदस्य होऊ शकतो. आजही किबुट्झमध्ये जन्मलेल्या व वाढलेल्या मुलांना सुद्धा आपोआप सदस्यत्व मिळत नाही; त्यांची निवड व्हावी लागते.

तरीही सामवायिक जीवन सुसूत्रपणे व प्रगतिशाली रीतीने पार पडण्यास एवढीच सामग्री पुरेशी असते असे दिसत नाही. या लोकविलक्षण प्रकारच्या जीवनरहाटीस सातत्य लाभायचे तर आणखीही काही विशिष्ट प्रकारच्या यंत्रणा उभ्या कराव्या लागतात असे किबुट्झच्या त्याचप्रमाणे इतर अनेक समवायांच्या इतिहासावरून दिसून येते.

किबुट्झच्या अर्थव्यवस्थेत जड धनाची प्रलोभने नाहीत, स्वार्थप्रेरणा नाही असे मागे सांगितलेले आहेच. अशा अवस्थेत अर्थव्यवहाराचा गाडा चालू राहण्यासाठी सर्वांना काम करण्याची प्रेरणा देणाऱ्या काही गोष्टी अस्तित्वात असणे आवश्यक आहे.

किबुट्झने ह्यासाठी शोधून काढलेले उत्तर म्हणजे शरीरश्रमाचे एक स्वतंत्र तत्त्वज्ञान. ह्या तत्त्वज्ञानाप्रमाणे ' श्रम ' हे एक धार्मिक कार्यच आहे. ह्या तत्त्वज्ञानाचा उद्गाता ॲरॉन गॉर्डन नावाचा एक रशियन हिशेब तपासनीस होता. ४६ व्या वर्षी

तो पॅलेस्टाइनमध्ये आला आणि श्रम या घटिताभोवती त्याने एक आकर्षक व गूढरम्य तत्त्वज्ञान विणले. किबुट्झ संस्थापकांच्या पहिल्या काही पिढ्यांवर गॉर्डनचा विलक्षण प्रभाव होता. श्रमधर्माचा दुसरा प्रवर्तक म्हणजे कॅप्टन जोसेफ ट्रंपेलडॉर. ह्याने तर ज्यू श्रमधर्मीयांची आंतरराष्ट्रीय संघटना उभारली. या संघटनेतील सदस्यांनी पॅलेस्टाइनमध्ये रस्ते बांधणे, पाणथळ भागातील पाण्याचा निचरा करणे, जमिनीची मशागत करणे, इत्यादी कामे करायची होती. माणूस श्रमामधूनच निसर्गाच्या सन्निध जातो, पुनीत होतो, त्याला आत्मिक तेज प्राप्त होते इत्यादी गूढरम्य कल्पना-विलासाने शरीरश्रमाची कल्पना नटलेली आहे. किबुट्झ वातावरणातला हा सांस्कृतिक अंश त्यांच्या अर्थव्यवस्थेच्या दृष्टीने फार महत्त्वाचा ठरलेला आहे.

या गूढरम्यतेच्या खालोखाल महत्त्वाची असलेली गोष्ट म्हणजे श्रमाला असलेली ' प्रतिष्ठा '. किबुट्झमध्ये माणूस त्याच्या श्रमावरून आदरणीय ठरतो; जितके अधिक कष्टाचे वा अवजड काम, तितका मान अधिक. म्हणून किबुट्झमध्ये कामासाठी अहमहमिका असते. जे काम करू शकत नाहीत त्यांच्यामध्ये अपराधीपणाची भावना उत्पन्न होते. स्पिरो यांनी स्वतःच आपणामध्ये ही भावना कशी उत्पन्न झाली याचे वर्णन केले आहे.

समवायात राहायचे तर स्वार्थप्रेरणा नियंत्रित केल्या पाहिजेत. आपला बराचसा ' स्वार्थ ' हा आपल्या बायकामुलांसाठी म्हणजे कुटुंबासाठी असतो; खरे म्हणजे तो ' स्वार्थ ' असण्यापेक्षा ' स्वकुटुंबार्थ ' असतो. किबुट्झपद्धतीचे गटजीवन जगायचे तर कौटुंबिक स्वार्थाच्या प्रेरणा मर्यादित ठेवणे अवश्य ठरते कारण कुटुंब हे नागरिकांचे निष्ठाकेंद्र झाले की समूहावरची निष्ठा दुबळी ठरण्याचा संभव असतो. म्हणून बहुतेक सर्व समवायांनी कुटुंबनिष्ठेला आवर घालण्याचे प्रयत्न केलेले आहेत. शेकर्स ( १७७५–१९२५ ), एफ्राटन्स (१७३५–१७८६), रॅपाइट्स् (१८०५–१९०९) हे धार्मिक समवाय तर ब्रह्मचर्यवादीच होते. झोआर येथे वसाहत करणारे 'सेपेरेटिस्ट' ( १८१८–१८९८ ) प्रारंभी ब्रह्मचारी होते पण हळूहळू त्यांनी विवाहाला मोकळीक दिली––मात्र फारसे उत्तेजन दिले नाही. अमाना येथील ' इन्स्पिरेशनिस्ट ' ( १८४२–१९२९ ) यांचीही भूमिका अशीच होती. ब्रह्मचर्य पाळणाऱ्या समवायांपुढे दोन प्रकारचे प्रश्न उभे राहतात. एक, त्यांच्या अनुयायांची संख्या वाढण्यावर फार मोठी मर्यादा पडते. दोन, कामवासना दडपून टाकण्याचे अवघड काम करण्याची जबाबदारी त्यांच्यावर पडते. ओनीडा येथील ' परफेक्शनिस्ट ' ( १८४८–१८८० ) ह्या समवायाने ह्यावर तोड काढली ती ' व्यामिश्र विवाहा' ची ( कांपाउंड मॅरेज ). " प्रत्येक स्त्री-सदस्याचे सर्व पुरुष-सदस्यांशी व प्रत्येक पुरुष-सदस्याचे सर्व स्त्री-सदस्यांशी लग्न " असे ह्या पद्धतीचे वर्णन ओनीडाच्या समवायाचे संस्थापक जॉन हंफ्रे नोयेज यांनी केले आहे. थोडक्यात अर्थ असा की एकमेकांच्या संमतीने

कोणत्याही जोडीने लैंगिक सुख घ्यावे. नोयेज यांचा उद्देश असा होता की ह्या पद्धतीने कामेच्छा तृप्त होईल पण कौटुंबिक जिव्हाळ्याचे बंध निर्माण होणार नाहीत. समवायाला मारक काय असेल तर कौटुंबिक प्रेम, कामेच्छा नव्हे. कामसंबंधांतूनही प्रेमसंबंध निर्माण होऊ नयेत अशी काळजी नोयेज घेत. लैंगिक संबंधात अनुनयाला वाव नसे. अनुमती तिऱ्हाइतामार्फत मिळविली जावी असा नियम असे. एखादे युगुल भावनिक दृष्ट्या एकमेकांत गुंतत आहे असे दिसले तर नोयेज त्यांना कठोरपणे दूर करीत. अर्थात् सर्वच समवायांचा विवाह व कुटुंबसंस्थेला विरोध होता असे नाही. मागे उल्लेखिलेले हटराइट्स ( १५२६– ), बेथेल ( १८४४–१८८० ) आणि ऑरोरा ( १८५६–१८८१ ) ह्या धार्मिक समवायांचा विवाह व कुटुंबसंस्था यांवर विश्वास होता; पण अनेक समवायांना ही समस्या भासत होती यात शंका नाही.

अगदी प्रारंभीच्या काळी किबुट्झ संस्थापक तरुण वयाचे असल्याने अविवाहित होते. बऱ्याच किबुट्झचे संस्थापक केवळ पुरुषच होते. अशा अवस्थेत समूहनिष्ठा बळावण्याला फारसे अडसर नव्हते. पुढे विवाह होऊ लागले. मात्र विवाह व कुटुंब-संस्था यांना किबुट्झचा विरोध कधीच नव्हता. किबुट्झ चळवळ धार्मिक समवायां-सारखी परावर्तनशाली नाही, ती विस्तारशाली आहे हे लक्षात घेतले तर हे साहजिकच म्हणावे लागेल कारण ज्यूंची अधिकात अधिक लोकसंख्या त्यांना पॅलेस्टाइनमध्ये हवी होती. मात्र पारंपरिक कुटुंबसंस्थेचे स्वरूप किबुट्झने पार बदलून टाकलेले आहे. किबुट्झमधील कुटुंबाला इतर समाजातल्यासारखे आर्थिक प्रयोजन नसते, कारण आर्थिक जबाबदारी समवायानेच आपल्या शिरावर घेतलेली असते. शिवाय सामुदायिक शिक्षणाच्या पद्धतीमुळे आईबाप व मुले यांचा सहवासही फार थोडा होतो.

सदस्यांची स्वार्थप्रवणता नियमित करून त्यांची समूहप्रवणता वाढविण्यासाठी इतरही काही उपाय योजणे अवश्य पडते असे दिसते. जवळ जवळ सर्वच यशस्वी समवायांचा इतिहास असे सांगतो की त्यांमध्ये व्यक्तीला खाजगी आयुष्य असे नसेच. एकांताची आवड, स्वतःमध्येच रममाण होण्याची प्रवृत्ती, या गोष्टी समूहाच्या दृष्टीने धोक्याच्या समजल्या जातात. समवायाच्या क्षुण्ण मार्गावरून सदस्याने ढळू नये व समवायाखेरीज इतर विचार त्याच्या मनात येऊ नये ह्यासाठी केल्या गेलेल्या उपाय-योजनात ‘ टीका ’ व ‘ कबुलीजबाब ’ ( कन्फेशन ) यांना महत्त्वाचे स्थान असलेले दिसते. पॅरॅग्वेचे जेझुइट कबुलीजबाबावर भर देत. शेकर समाजात सभासदांच्या रोज बैठकी घेतल्या जाऊन त्यात समाजाचे नेते आपल्या अनुयायांची निर्घृण उलट तपासणी करीत. ह्याशिवाय कबुलीजबाब असत व आदेशयुक्त परिपत्रकांचाही सभासदांवर वर्षाव केला जात असे. एखाद्या समवायातील सदस्यांना दर आठवड्याला एक निबंध लिहून आपल्या ‘ पापांचा ’ पाढा वाचावा लागत असे. रॅपाइट समाजात सदस्यावर टीका करण्याचे काम समाजाचा नेता जॉन रॅप स्वतः करीत असे. हटराइट समाजात अशा काही यंत्रणा नसल्या तरी कुणालाही एकांत फारसा मिळू नये अशी दक्षता घेतली

जात असे. कोणीही कुणाच्याही निवासस्थानी कोणत्याही वेळी दारावर टकटकही न करता आत शिरावे असा हटराइटांचा रिवाज आहे.

किबुट्झमध्ये अभियोग, टीका, आत्मशोधन असे अनुशासनाचे औपचारिक मार्ग अवलंबिले जात नाहीत, पण एकांताच्या अभावावर फार भर दिला जातो ही गोष्ट अनेक अभ्यासकांनी उल्लेखिली आहे. स्वतः किबुट्झचे चिटणीस असलेले बेनगार्टेन ह्यांनी एकांताच्या व खाजगी जीवनाच्या अभावातून व्यक्तिविकासावर कशी बंधने पडतात व या पद्धतीच्या अतिरेकामुळे काही सदस्यांना विशिष्ट प्रकारची मनोरुग्णता कशी अनुभवावी लागते ह्याचे वर्णन केले आहे. नेड ऑकिवा ह्या किबुट्झ-मध्ये तर पोस्टाने आलेली कुणाचीही पत्रे कुणीही वाचू शकेल असा काहीकाळ नियम होता ![१०]

किबुट्झचे रसायन तयार होण्यात जे जे घटक एकत्र घुसळले गेले त्यांचा विचार वर केला आहे. ह्या विवेचनातून व त्याअगोदर केलेल्या वर्णनावरून किबुट्झच्या स्वरूपाविषयी जी कल्पना होते ती आजच्या घडीला तितकीशी लागू नाही. किबुट्झ बदलतो आहे आणि बदललेलाही आहे. खरे म्हणजे हे बदल स्वातंत्र्यप्राप्तीबरोबरच होऊ लागले व त्यानंतर एकूण चित्र बरेच झपाट्याने बदलू लागले. आज किबुट्झ चळवळीचे भवितव्य काय असा मोठा प्रश्न उभा राहिला आहे. तेव्हा हे काय बदल झाले आहेत ते पाहणे अवश्य आहे. ते कळल्याशिवाय आपण किबुट्झचे यथायोग्य मूल्यमापन करू शकणार नाही.

नव्या परिस्थितीतले काही घटक निराशादायक तर काही आशादायक आहेत. त्यांचा त्याच क्रमाने विचार करू.

इस्रायल राष्ट्राची स्थापना झाल्यानंतर किबुट्झविषयीचा उत्साह बराच ओसरलेला आहे. १९४८ ते १९६४ या काळात किबुट्झ वसाहतींची संख्या १३५ पासून २३० पर्यंत वाढली; ही वाढ ७० टक्क्यांची आहे. पण याच काळात मोशॅव्ह वसाहतींची संख्या ७८ पासून ३४६ पर्यंत म्हणजे सुमारे ३४३ टक्क्यांनी वाढली. लोकसंख्या वाढीची तुलना केली तर दोघांच्या वाढीतला फरक अधिक स्पष्टपणे ध्यानात येतो. वरील काळात किबुट्झ वसाहतीतील लोकसंख्या ६१,५२८ पासून ८०,९३९ पर्यंत, म्हणजे ३१ टक्क्यांनी वाढली, उलट मोशॅव्ह वसाहतीतील लोकसंख्या २६,८७२ पासून १,१९,९२३ पर्यंत म्हणजे ३४७ टक्क्यांनी वाढली. प्रस्तुत ग्रंथाला १९६२ साली लिहिलेल्या प्रस्तावनेत स्पिरो यांनी म्हटले आहे : " किबुट्झ चळवळीची वाढ आता जवळ जवळ पूर्णपणे थांबली आहे. "

रशिया व पूर्व– आणि मध्ययुरोपीय देश ह्यांमधून बव्हंश किबुट्झ संस्थापकांचा पुरवठा होत असे. युद्धकाळात ह्या देशातील ज्यूंचा झालेला विनाश आणि विशेषतः जर्मनांनी नियोजनबद्ध रीतीने केलेला लक्षावधी ज्यूंचा संहार

त्यामुळे युरोपीय देशांमधून इस्रायलला येऊ इच्छिणारे ज्यू आता फारसे उरलेले नाहीत. रशियामध्ये ज्यूंची मोठी संख्या आहे पण रशिया त्यांना स्थलांतर करण्याची परवानगी देत नाही. ब्रिटन, फ्रान्स, अमेरिका येथील ज्यूंची सांपत्तिक स्थिती खूप चांगली आहे व त्यांना ज्यूविरोध फारसा सहन करावा लागत नाही म्हणून त्यांना इस्रायलचे किंवा किबुट्झचे फारसे आकर्षण नाही. आफ्रिका, मध्यपूर्व व आशिया यांतून आलेल्या स्थलांतरितांचा ओढा मोशॅव्हकडे आहे.

अशा बाह्य कारणांमुळे किबुट्झच्या वाढीचा वेग मंदावला तर त्यात फारसे नवल नाही. खरी चिंताजनक गोष्ट अशी की किबुट्झ रहिवाशांमध्येच काहीशी चलबिचल सुरू झालेली आहे. किबुट्झबाहेरच्या इस्रायलमधील जग हे इतर जगासारखेच स्पर्धेवर आधारलेले आहे. आणि त्या जगाचा विस्तार इतका वाढला आहे की किबुट्झची अवस्था विशाल समुद्रातल्या लहानशा बेटासारखी म्हणावी लागेल. हुषार व कर्तबगार किबुट्झनिकांना ह्या बाहेरच्या जगात आपला वैयक्तिक उत्कर्ष साध्य करून घेण्याचा अधिकाधिक मोह होऊ लागला आहे. केवळ १९५३ पर्यंत संस्थापकांच्या पिढीतील एक-अष्टमांश सदस्य बाहेरच्या नोकऱ्या धरण्यासाठी सोडून गेले. दरसाल किबुट्झ सोडून जाणारांचे प्रमाण १९४९ पर्यंत लोकसंख्येच्या सुमारे २ ते २॥ टक्के होते ते १९४९ ते १९५९ या काळात ५॥ टक्क्यांहून अधिक झाले.

आणि एकूणच असे दिसते की सदस्यांच्या किबुट्झच्या तत्त्वांवरील श्रद्धा शिथिल झालेल्या आहेत. सामूहिक जेवणघरांचा सदस्यांना कंटाळा येऊ लागला आहे; सामूहिक स्नानगृह, सामूहिक भांडार इत्यादींना विरोध वाढू लागला आहे. स्वतःच्या मालकीच्या वस्तू घेता याव्या म्हणून दरमाणशी काही रोकड भत्ता किबुट्झने द्यावा अशा मागण्या होत आहेत. सामूहिक शिक्षणपद्धतीमध्ये मुलांना निद्रागृहात स्वतंत्र रीत्या झोपाविण्यात येते त्याऐवजी त्यांना आईबापांच्या घरीच झोपू देण्याची प्रवृत्ती वाढत चाललेली आहे. आपण जिवापाड कामे केली, आता थोडे स्वास्थ्य हवे, चैनीच्या वस्तू हव्या, सुट्या हव्या असे अनेकांना वाटू लागले आहे. स्वश्रमाचे तत्त्व मागे पडू लागले आहे आणि भाडोत्री मजूर लावून कामे करून घेण्याचे प्रमाण वाढले आहे. ह्या वाढत्या सुखासीन प्रवृत्तीचा किबुट्झच्या आर्थिक स्थितीवर दुष्परिणाम होऊ लागला आहे. बाहेरून येणाऱ्या आर्थिक मदतीवरचे अवलंबन वाढले आहे. एलियाहू कानोवस्की ह्यांनी दिलेल्या माहितीप्रमाणे सुमारे १०० नवे किबुट्झ ज्युइश एजन्सीच्या वसाहत खात्याने आपल्या व्यवस्थापनाखाली घेतले आहेत[११]. जुने किबुट्झही आर्थिक ताण अनुभवीत आहेत.

सर्वसाधारण किबुट्झच्या आकारमानात झालेला विस्तार, किबुट्झ चळवळीचे वाढते औद्योगीकरण आणि सदस्यांची सैल होत चाललेली तत्त्वनिष्ठा ह्यांचा किबुट्झ लोकशाहीवरही परिणाम होऊ लागला आहे. ही लोकशाही पूर्वीसारखी जागरूक

राहिलेली नाही. व्यवहाराच्या वाढत्या व्यामिश्रतेमुळे निर्णय घेण्याला तांत्रिक ज्ञानाची आवश्यकता वाढू लागली आहे आणि हे तांत्रिक ज्ञान फारच थोड्यांना अवगत असल्याने व्यवस्थापनाची कामे अधिकाधिक आकसून जात असलेल्या वर्तुळात फिरत आहेत. 'ग्रामसभेचा निर्णय' ही शब्दसंहती काहीशी पोकळ भासू लागली आहे. एवढेच काय पूर्वी ग्रामसभेमध्ये सदस्य जसे हिरिरीने भाग घेत असत तसे आता घेत नाहीत. किर्यात येदिदिमच्या ग्रामसभेतील उपस्थिती ५० टक्क्यांहून खाली आल्याचे स्पिरो ह्यांनी सांगितले आहे.

नव्या चित्राची ही एक बाजू झाली. दुसरी बाजू दिलासा देणारी आहे. ती म्हणजे किबुट्झमध्ये जन्म पावलेल्या व वाढलेल्या मुलांची ('सात्रां'ची) पिढी. जुन्यात जुन्या किबुट्झला (डेगानिया ए, १९१०) आता ६५ वर्षे होऊन गेली. आज विद्यमान असलेल्या किबुट्झमधील निम्मे तरी १९४८ साली अस्तित्वात होते. म्हणजे या जुन्या किबुट्झमध्ये सात्रांची पहिली किंवा दुसरी पिढी बहुसंख्येने अस्तित्वात आहे असे म्हटले पाहिजे. त्यामुळे किबुट्झचे भवितव्य संस्थापकांपेक्षा सात्राकडून घडविले जाणार हे स्पष्ट आहे. हे सात्रा कसे आहेत?

बहुतेक निरीक्षकांचे मत असे दिसते की सात्रा हे किबुट्झ चळवळीचे आशास्थान आहे. किबुट्झनिष्ठेच्या अभावाचे सर्वांत महत्त्वाचे प्रत्यंतर म्हणजे किबुट्झ-त्याग. आकडेवारीवरून असे दिसून येते की सात्रा सहसा किबुट्झ सोडत नाहीत. कित्येकदा आईबाप किबुट्झ सोडून जातात पण मुले मागेच राहतात. खरे म्हणजे सर्व सात्रांना सुमारे अडीच वर्षे सैन्यात आणि एक वर्ष युवक चळवळीत म्हणजे साडेतीन वर्षे किबुट्झबाहेरच्या जगात काढावी लागतात; आणि तेसुद्धा वयाच्या सर्वांत अधिक मोहवश अशा अवस्थेत. पण त्यांच्या किबुट्झनिष्ठा तीव्र आहेत. खाजगी मालमत्तेकडे सदस्यांची प्रवृत्ती अधिकाधिक झुकत असल्याचा मागे उल्लेख आलेला आहे, पण ह्या प्रवृत्तीला सात्रांचा विरोध आहे हे ध्यानात घेतले पाहिजे. प्रस्तुत ग्रंथाचे लेखक स्पिरो यांनी Children of the Kibbutz ह्या नावाचा किर्यात येदिदिमवरच आधारलेला दुसरा ग्रंथ लिहिला आहे. त्यात सात्रांच्या समूहनिष्ठेची अनेक उदाहरणे दिली आहेत. आपली मुले रात्री आपणाजवळ झोपावी असे सात्रा मातांना फार तीव्रतेने वाटत नाही, किबुट्झचा उत्तम सदस्य होणे ह्यापलीकडे सात्रांना कसलीही वैयक्तिक महत्त्वाकांक्षा नाही, श्रम हे सात्रांच्या मते जीवनातले सर्वोच्च मूल्य आहे—इत्यादी गोष्टी संशोधनांती त्यांच्या ध्यानात आल्या. जेरुसलेमच्या हिब्रू विद्यापीठाच्या समाजशास्त्र विभागाने केलेल्या पाहणीतूनही असेच निष्पन्न झाले की किबुट्झच्या मूलभूत तत्त्वांवर संस्थापकांपेक्षा सात्रांची निष्ठा अधिक तीव्र आहे. वेनगार्टन यांनी म्हटले आहे, "एकूण किबुट्झ चळवळ पुढच्या पिढ्यांबाबत समाधानी आहे."

संस्थापक आणि त्यांची तरुण मुले ह्यांच्या स्वभावरचनेतला हा फरक गमतीदार वाटला तरी मानसशास्त्रीय दृष्ट्या विचार करता आश्चर्य वाटण्यासारखा नाही.

युरोपीय देशांतील व रशियातील ज्यू वसाहतींत जन्माला आलेल्या तरुण संस्थापकांना डोळ्यांपुढे कोणतेही भवितव्य दिसत नव्हते. त्यांना स्वातंत्र्यात जगायचे होते व त्यासाठी स्वतंत्र राष्ट्राच्या पायाभरणीचे काम करायचे होते. हे नवे जीवन कितीही कष्टप्रद असले तरी त्याचा स्वीकार आनंदाने करण्याइतकी पराकोटीची ध्येयनिष्ठा त्यांच्याजवळ होती. नवे राष्ट्र निर्माण करायचे तर ज्यू जमातीचे म्हणून जे स्वभाव-गुण होते, त्यांच्या ज्या सनातन कल्पना होत्या, त्यांच्या ज्या हाडीमासी खिळलेल्या सवयी होत्या त्यांचा संपूर्ण त्याग करणे जरूर आहे याची जाणीव त्यांना होती. थोडक्यात, त्यांना एक नवी मूल्यश्रेणी, सर्वस्वी नवीन अशी मानसिक संस्कृती निर्माण करायची होती. हे करणे याचा अर्थ स्वतःतच एक आमूलाग्र क्रांती घडवून आणणे असा होता. आणि ही क्रांती या विशीतल्या किंवा त्याहूनही लहान अशा मुला-मुलींनी स्वतःत घडवूनही आणली. पण लहानपणी स्वतःवर झालेल्या संस्कारांतून स्वतःची सुटका करून घेणे ही फार कठीण गोष्ट असते. आपला बुद्धिनिश्चय कोणत्याही प्रकारचा असो, आपण आपल्या संस्कारांचे दास असतो. किबुट्झचे संस्थापक क्रांतिकारक खरे पण लहानपणी स्पर्धात्मक, व्यक्तिवादी, नागरी, मध्यवर्गीय मूल्यांवरच त्यांचे पोषण झालेले होते. समाजवाद, सहकार्य, श्रमप्रतिष्ठा ही मूल्ये त्यांनी विचारपूर्वक अंगीकारलेली होती, ती त्यांच्या रक्तात भिनलेली नव्हती.

ह्याउलट साब्रांची गोष्ट आहे. ते नव्या संस्कृतीतच जन्माला आले आहेत.[१२] किबुट्झची मूल्ये त्यांना जाणीवपूर्वक अंगी बाणवावी लागली नाहीत; त्यांच्या पहिल्या श्वासोच्छ्वासापासूनच ते नवी संस्कृती आत्मसात् करीत आले आहेत. म्हणून त्यांना किबुट्झ ही एक स्वाभाविक जीवनपद्धती वाटते. वर उल्लेखिलेल्या ' चिल्ड्रेन ऑफ दि किबुट्झ ' ह्या ग्रंथात स्पिरो ह्यांनी म्हटले आहे की, " सर्वांत उत्तम अशी समाज-रचना कोणती ? " ह्या प्रश्नाला एकूणएक मुलांनी उत्तर दिले, " किबुट्झची ".

पण साब्रांची ही घडण केवळ किबुट्झमध्ये जन्माला आल्याने आपाततः झालेली नाही. नव्या मूल्यांचे संस्कार जाणीवपूर्वक त्यांच्यावर करण्यात आले. ह्यात त्यांच्या सामूहिक शिक्षणपद्धतीचा फार मोठा वाटा आहे. किर्यात येदिदिममधल्या सामूहिक शिक्षणपद्धतीचे प्रस्तुत ग्रंथात स्पिरो ह्यांनी विस्तृत विवेचन केलेलेच आहे. फक्त काही ठळक गोष्टींचा येथे उल्लेख केला म्हणजे पुरे.

किबुट्झचा नवा नागरिक तयार करण्यासाठी अगदी लहानपणापासून-- वयाच्या चवथ्या दिवसापासून—मुलांवर निःस्वार्थीपणा, समता, सहकार्य, श्रम-प्रतिष्ठा इत्यादींचे जाणीवपूर्वक संस्कार करण्यात येतात. खेळणी सर्वांनी वाटून घ्यायची, प्रत्येकाचे कपडे सारखेच, अशा लहानसहान बाबींतून हे शिक्षण दिले जाते. वयाच्या सहाव्या वर्षापर्यंत मुलांना कपडे दिले जातात तेसुद्धा ' त्यांचे ' असत नाहीत; म्हणजे मागच्या वेळचाच कपडा पुढच्या वेळी दिला जाईल असे नाही. अशा पद्धतशीर

शिक्षणाचा अगदी लहान मुलांवर काय परिणाम होतो हे दाखविताना इनफील्ड ह्यांनी सांगितलेली एक गोष्ट उल्लेख करण्यासारखी आहे : " एकदा आम्ही किबुट्झमधील एका पाच वर्षांच्या मुलाला घेऊन जेरुसलेमला गेलो व त्याला मिठाईची पेटी घेऊन दिली. बालसुलभ अधीरतेने त्याने ती लगेच उघडली पण त्यातला फक्त एक तुकडा घेऊन त्याने ती पेटी परत किबुट्झमध्ये आल्यावर परिचारिकेच्या हवाली केली. परिचारिकेने ती सर्व मुलांपुढे फिरविली तेव्हा प्रत्येकाने एकएक तुकडा घेतला. फिरत फिरत पेटी आमच्या ह्या मुलाकडे पुन्हा जेव्हा आली तेव्हा तो म्हणाला, 'मी अगोदरच मिठाई खाल्ली आहे.' आम्हाला या गोष्टीचे फार कौतुक वाटले, पण किबुट्झमध्ये कुणालाच याचे काही विशेष वाटले नाही. त्यांच्या दृष्टीने ती एक अगदी स्वाभाविक गोष्ट होती. "[13]

अशा रितीने किबुट्झचे भवितव्य घडविणाऱ्या कोणत्या प्रधान प्रवृत्ती ह्या क्षणी दृग्गोचर होत आहेत त्या आपण पाहिल्या. भविष्यात नेमके काय होईल हे सांगणे कठीण आहे पण अंदाज होतो तो असा : नवे किबुट्झ निर्माण होण्याचे आता जवळजवळ थांबलेलेच आहे हे आपण पाहिले. ह्यामुळे येथून पुढे होणारी वाढ किबुट्झ-अंतर्गत कारणांनीच नियमित होईल. अगदी नवे म्हणजे स्वातंत्र्योत्तर काळात स्थापन झालेले किबुट्झ अस्थिर आहेत आणि ते आजच्याच संख्येने फार काळ टिकाव धरतील असे वाटत नाही आणि जुन्यांच्या बाबतीतही बाह्य जगाचे संभाव्य परिणाम दुर्लक्ष करण्यासारखे असणार नाहीत. त्यामुळे अंतर्गत ताण वाढण्याची शक्यता आहे. किबुट्झची संस्कृती आजच समुद्रातल्या एखाद्या बेटाप्रमाणे आहे असे मागे म्हटले आहे; बेटाचेच स्वरूप किबुट्झला अधिकाधिक येणार हे अटळ दिसते.

किबुट्झ चळवळीच्या ह्या संक्षिप्त आढाव्यावरून दोन निष्कर्ष मनात ठसतात ते पुढे ठेवून हे विवेचन संपवू.

प्रथमतः किबुट्झ समाजवादाकडे दृष्टिक्षेप टाकू. रशिया, चीन इत्यादी देशांत झालेल्या 'शास्त्रीय' समाजवादाच्या प्रयोगांचा इतिहास आपणापुढे आहेच. दलितांचे राज्य आणण्यासाठी या देशांतून प्रचंड उलथापालथी झाल्या, रक्तरंजित क्रांत्या झाल्या, क्रांतिविरोधकांच्या प्रचंड प्रमाणावर हत्त्या झाल्या. मूलभूत स्वातंत्र्ये नामशेष झाली. एवढेच नव्हे तर मानवी मूल्ये बरबाद झाली. अनिर्बंध दंडसत्ता प्रतिष्ठापित झाल्या. इतके करूनही समता आली नाही आणि शोषणही संपले नाही. (चीनचे चित्र रशियाइतके उग्र व भयानक नाही एवढाच फरक.) किबुट्झमध्ये आदर्शवत् आर्थिक व सामाजिक समता, मानवी मूल्यांचा आदर, लोकशाही व्यक्तिस्वातंत्र्य, आणि उच्च प्रतीचे सांस्कृतिक जीवन ह्यांनी समृद्ध असलेला समाजवाद उभा राहिला. लहान समवायांमधून नव्या समाजाची निर्मिती करण्याच्या ह्या प्रयोगांना एक फार मोठी वैचारिक व प्रायोगिक परंपरा आहे; तिचाच आधुनिक आविष्कार म्हणजे किबुट्झ

होय. ही परंपरा म्हणजे प्रूधाँ, सॉ-सिमाँ, ओवेन, फुरिए, लँडॉ, क्रोपॉटकिन इत्यादींनी समृद्ध केलेली पण मार्क्स व मार्क्सवादी यांनी जिची निष्ठुर अवहेलना केलेली आहे ती तथाकथित ' स्वप्नाळू ' किंवा ' युटोपियन ' समाजवादाची परंपरा.

ज्या शास्त्रीय समाजवादामुळे सहृदय आणि विवेकशाली माणसांचा भ्रमनिरास झालेला आहे, त्याला पर्याय म्हणून हा युटोपियन समाजवाद उभा राहू शकतो की नाही असा प्रश्न किबुट्झच्या निमित्ताने साहजिकच मनात उत्पन्न होतो. मार्टिन ब्यूबर-सारख्या तत्त्ववेत्त्यांनी तर यूटोपियन समाजवादाच्या बाजूनेच आपले मत दिले आहे. पण ह्या प्रयोगाची परीक्षा आपण फार कसोशीने केली पाहिजे.

तात्त्विकदृष्ट्या पाहता समाजवादाचे खरे रहस्य युटोपियन समाजवादाने जेवढे जाणले आहे तेवढे शास्त्रीय समाजवादाने जाणलेले नाही हे चहूदिशी प्रत्ययास येते. युटोपियन, विशेषतः किबुट्झ समाजवादाच्या दोन प्रमुख धारणा ह्या बाबतीत विशेष लक्षणीय आहेत असे वाटते. पहिली अशी की केवळ मालकी-हक्काचे सामाजिकीकरण झाले की माणसात परिवर्तन घडून येत नाही. खरा समाजवाद यायचा तर स्पर्धा नष्ट केली पाहिजे व स्वार्थप्रेरणांऐवजी परार्थप्रेरणा बलिष्ठ केल्या पाहिजेत. ह्यासाठी समाज हा प्रेमावर जरी नाही तरी इतरांविषयीच्या आस्थेच्या तत्त्वावर उभारला पाहिजे. मोठा समूह हेच कुटुंब ही दृष्टी समाजाच्या घटकांना प्राप्त झाली पाहिजे. तथाकथित समाजवादी देशांत मालकीहक्काचे सामाजिकी-करण झाले आहे पण इतर जीवनाचे तत्त्व स्पर्धा व विषमता हेच आहे. ( किंबहुना ते तसेच असले पाहिजे असा शास्त्रीय समाजवादाचा आग्रह आहे. )

ही कुटुंबभावना हा जर समाजवादाचा मूलाधार असेल तर ती साध्य होण्यासाठी एक भौतिक अट पुरी व्हावी लागेल हे आपण लक्षात घेतले पाहिजे. ही भौतिक अट म्हणजे लहान समूहाची किंवा समाजशास्त्रज्ञ ज्याला प्राथमिक समूह ( ' प्रायमरी ' किंवा ' फेस-टू-फेस ' कम्युनिटी ) म्हणतात त्याची आहे. प्रेम, जिव्हाळा, बंधुभाव ह्या भावना ह्या प्रत्यक्ष सहवासावर अवलंबून असतात आणि असा निकटचा सहवास प्राथमिक समूहातच शक्य असतो. किबुट्झने व तत्पूर्वीच्या साम्यवाचिकांनी जो समाजवाद साध्य केला आहे तो अशा लहान गटांमध्ये.

यूटोपियन समाजवादाची आणखी एक वैचारिक देणगी अशी की खरीखुरी लोकशाही लहानशा समूहातच जिवंत राहू शकते कारण ती तेथे ' प्रत्यक्ष ' लोकशाही या स्वरूपात वावरू शकते. सबंध राष्ट्राची मालमत्ता सामाजिक मालकीची केल्यावर लोकप्रतिनिधींच्या मार्फत लोकशाही स्वरूपाचे अंकुश सत्ताधाऱ्यांवर ठेवणे अशक्यप्राय आहे. एवढेच नव्हे तर ही व्यवस्था अनियंत्रित दंडसत्तेलाच जन्म देते हे समाजवादी देशांच्या इतिहासाने सिद्ध केलेलेच आहे. किबुट्झने मात्र असे दाखवून दिलेले आहे की लहानशा समूहात सामूहिक मालकी निर्माण केली तर त्यात शक्य असलेल्या प्रत्यक्ष लोकशाहीमुळे सत्ता केंद्रित होत नाही.

मात्र ह्या प्रकारचा समाजवाद आजच्या काळातही वर्तविता येईल ह्या मताचा स्वीकार करणे कठीण आहे. स्वायत्त लहान समूहांचे जग काळाच्या उदरात नष्ट झालेले आहे. विस्ताराने प्रचंड अशी राष्ट्रीय राज्ये हे एक कठोर वास्तव आहे आणि अशा राष्ट्रातली लोकशाही प्रत्यक्ष न राहता प्रातिनिधिक राहावी हे अनिवार्य आहे. युटोपियन समाजवादाचे सर्व प्रयोग ग्रामीण भागात आणि शेतीच्या आधारावर झालेले आहेत. पण औद्योगीकरणाबरोबर नागरीकरण वाढते आणि लक्षावधी लोकसंख्येचे समूह एकत्र येऊन शेतीवरील ग्रामीण लोकसंख्येचे प्रमाण कमी होत जाते. इंग्लंडमध्ये ग्रामीण लोकसंख्येचे प्रमाण सुमारे ३॥ टक्के व अमेरिकेत सुमारे ६ टक्के आहे. अशा राष्ट्रांतून ग्रामीण भागात समवाय स्वरूपाचा समाजवाद अस्तित्वात आला तरी एकूण राष्ट्रीय जीवनाच्या दृष्टीने त्याला काही महत्त्व नाही. ह्यावर ग्रामीण भागातच शेती व उद्योगधंदे ह्यांची सांगड घालावी असे सुचविले जाते व अनेक युटोपियन समाजवाद्यांनी हा विचार मांडलेलाही आहे. किबुट्झनेही ह्या प्रकारचा प्रत्यक्ष प्रयोग बऱ्याचशा यशस्वी प्रमाणावर केलेला आहे. पण अशा प्रयोगांचा एकूण व्याप लक्षात घेता त्यातून फार काही सिद्ध होते असे दिसत नाही. ह्या बाबतीत मुळातला प्रश्न औद्योगिक तंत्राचा आहे आणि विकेंद्रित उत्पादन व मोठे उत्पादनसामर्थ्य ह्या दोहोंचा मेळ घालणारे तंत्र आज तरी विद्यमान नाही हे स्पष्ट आहे. किबुट्झमध्ये औद्योगिक उत्पादन वाढत आहे हे खरे पण त्यामुळे किबुट्झच्या मूलतत्त्वांना धक्का पोचत आहे हेही खरे. (ह्याचा उल्लेख मागे आलेलाच आहे.) मोठ्या राष्ट्रातल्या लहान लहान समूहांनी सामवायिक स्वरूपाचा समाजवाद व्यवहारात आणला तरी सर्वंच राष्ट्रीय व्यवहारासाठी प्रातिनिधिक लोकशाहीची जरूरी संपत नाही. फरक एवढाच होईल की हे प्रतिनिधी व्यक्तींचे असण्यापेक्षा सामवायिक समूहांचे असतील. पण त्यामुळे लोकशाही अधिक जागरूक व बलवान राहील असे मानणे कठीण आहे. शिवाय समवायांच्या अंतर्गत समता व बंधुभाव वास करीत असला तरी समवायांच्या परस्परसंबंधात तो तसाच राहील ह्याची खात्री नाही. महात्मा गांधी, विनोबा भावे, जयप्रकाश नारायण ह्यांच्या विचारांचे युटोपियन समाजवादी विचारांशी अनेक बाबतीत नाते दाखविता येते. ह्या विचारप्रणालींची उपयुक्तता पारखतानाही युटोपियन समाजवादाविषयीचे वरील प्रश्न मनात ठेवणे अगत्याचे आहे.

ज्या परिस्थितीत किबुट्झचा जन्म झाला व ज्या वातावरणात ते टिकले त्याचा मागे जो आपण विचार केला आहे तो लक्षात घेता सर्वसामान्य माणसाच्या दृष्टीने ही गोष्ट किती अवघड आहे हे स्पष्ट व्हावे. ज्यूंनी एका नव्या अपरिचित भूमीवर जाऊन अक्षरशः पहिल्या रेषेपासून सुरुवात केली; उलट जगातल्या इतर समाजांना हजारो वर्षांच्या दृढ परंपरांनी बांधलेल्या जुन्या समाजांमध्ये परिवर्तन घडवून आणायचे आहे हा फरक विसरता येणार नाही. शिवाय समूहनिष्ठा व व्यक्तीचे खाजगी जीवन व विकास यांचा सुयोग्य मेळ किबुट्झला घालता आला आहे असे दिसत नाही.

किबुट्झमधील व्यक्तिस्वातंत्र्यावरील बंधने सदस्यांना टोचत आहेत असे आपण पाहिलेच आहे. सर्व जीवनाच्या सामुदायिकीकरणाचा त्यांना कंटाळा आलेला आहे. शेवटी उत्पादनातले सहकारीकरण तेवढे शिल्लक राहून उपभोगातली सामुदायिकता नष्ट होईल आणि बऱ्याचशा किबुट्झ मोशॅव्ह शितुफीच्या मार्गाने जातील असे भाकित स्पिरो यांनी ह्या ग्रंथात केलेले आहे. पण असे होणे म्हणजे युटोपियन समाजवाद्यांना अभिप्रेत असलेला आणि नव्या समाजरचनेसाठी अनिवार्य वाटणारा ' संपूर्ण ' सहकार जाऊन त्या ठिकाणी ' आंशिक ' सहकार येणेच होय.

पण किबुट्झचा एकूण युटोपियन समाजवाद व्यवहार्य आहे का नाही याबाबत मुळात मागे उपस्थित केलेला प्रश्न विसरता येणार नाही. तो म्हणजे यशस्वी झालेले समवाय साध्यरूप की साधनरूप ? ह्या प्रश्नाचे मागे दिलेले उत्तर ' साधनरूप ' असे आहे. ऐहिक पातळीवर नव्या स्वरूपाचे सामाजिक न्यायावर व बंधुभावावर आधारलेले मानवी संबंध प्रत्यक्षात आणू इच्छिणाऱ्या यशस्वी समवायांचे उदाहरण इतिहासाला ज्ञात नाही असेच म्हटले पाहिजे.

तरीही नवसमाजरचनेच्या विचारात किबुट्झने घातलेली भर दुर्लक्षिता येणार नाही. ( १ ) शक्य त्या प्रमाणावर लहान लहान समूहांतून माणसांचे जिवंत संबंध निर्माण करून आधुनिक जगात झपाट्याने होणाऱ्या निर्व्यक्तीकरणाला ( डीपर्सन-लायझेशन ) पायबंद घालणे, ( २ ) सत्तेचे विकेंद्रीकरण व प्रत्यक्ष लोकशाही यांना शक्य त्या परिसरात अवकाश देणे व ( ३ ) लहान प्रमाणावर यशस्वी होतील अशा तंत्रांचा हेतुतः उपयोग करणे व अशा प्रकारच्या तांत्रिक संशोधनाचा आग्रह धरणे. हे विचारधन कोणत्याही सहृदय व मानवी अर्थाने समृद्ध अशा संस्कृतीला उपयुक्त ठरेल यात शंका नाही.*

सोव्हिएत पद्धतीचा सर्वभक्षक समाजवादही नको आणि युटोपियन समाजवादही व्यवहार्य नाही अशा अवस्थेत भारतासारख्या देशातील समाजवादी म्हणविणाऱ्या व त्या बिरुदात अभिमान बाळगणाऱ्या मंडळींनी आपल्या समाजवादाची काळजीपूर्वक मांडणी केली पाहिजे यात शंका नाही. हा विषय अर्थातच येथे विस्ताराने मांडायचा नाही. ह्या विवेचनावरून एक निष्कर्ष प्राप्त होतो तो इतकाच की प्रातिनिधिक लोकशाहीवाचून गत्यंतर नाही आणि ही लोकशाही जिवंत व कार्यशील राहायची असेल तर सर्व संपत्तीचे राष्ट्रीयीकरण करून चालणार नाही. काही मर्यादित अशा ( लोकशाही ) समाजवादाला खाजगी मालमत्तेचा हक्क शिरोधार्य

---

* ह्या विचारप्रणालीतील पहिल्या अंशावर समूह विकासाच्या ( कम्युनिटी डेव्हलपमेंट ) तत्त्वज्ञानाचा जोर आहे. दुसऱ्या अंशावर स्थानिक स्वराज्य व पंचायती राज्य यांची उभारणी झालेली आहे. तिसरा अंश तंत्रविज्ञानाकडे मानवी दृष्टिकोणातून पाहणाऱ्या विचारवंतांनी पुरस्कारिलेला आहे: उदाहरणार्थ ई. एफ. शुमाकर, Small is Beautiful.

मानावा लागेल. भारतासारख्या देशापुढील समस्येचे हे संपूर्ण उत्तर नव्हे पण संपूर्ण उत्तराला प्रारंभ तरी ह्या विचारापासूनच करावा लागेल.

किबुट्झच्या इतिहासाचा प्रस्तुत लेखकाच्या दृष्टीने मुख्य अर्थ समाजवादी असण्यापेक्षा राष्ट्रवादी आहे. किबुट्झ हा एकोणिसाव्या शतकात निर्माण झालेल्या ज्यू राष्ट्रवादाचा एक परिस्थितिसापेक्ष पण उत्कट आविष्कार आहे. राष्ट्रउभारणीसाठी काय करावे लागते ह्याचे उत्तर मिळते ते इस्रायलच्या व त्यातही किबुट्झच्या इतिहासातून. "तानाजिचा समरवीर तसा पवाडा। गावा चितोडगड वा शनवारवाडा।" असे सावरकरांनी म्हटले. कारण त्यांच्या मते ती देशभक्तीची स्फूर्तिस्थाने होती. राष्ट्र-उभारणीचे काम स्वातंत्र्यप्राप्तीबरोबर संपत नाही; एका अर्थाने सुरू होते. आजही राष्ट्ररचनेची व त्यासाठी आवश्यक असलेल्या उत्स्फूर्त प्रयत्नांची आवश्यकता उरलेली नाही असे नाही. अशा स्थितीत कोवळ्या वयाच्या ज्यू मुलां-मुलींनी सतत पन्नास वर्षे राष्ट्ररचनेचे प्रयत्न ज्या किबुट्झच्या माध्यमातून केले त्याचे पवाडे आपल्यालाही स्फूर्तिदायक ठरतील ह्यात शंका नाही.[५५]

– स. ह. देशपांडे

## संदर्भ टीपा


१. किबुट्झ शेतीविषयक माहितीसाठी, Eliyahu Kanovsky, *The Economy of the Israeli Kibbutz*, Harvard University Press, Cambridge, Mass, 1966, आणि इस्रायलच्या शेतीसाठी, Raanan Weitz and Avshalom Rokach, *Agricultural Development : Planning and Implementation (Israel Case Study)*, D. Reidel Publishing Company, Dordrecht -Halland, 1968 ही पुस्तके पाहावी.

२. Henrik F. Infield, *Co-operative Living in Palestine*, Kegan Paul, Trench, Trubner and Co., London, 1946. pp. 35–37.

३. *Encyclopaedia of Zionism and Israel*, Mc-Graw Hill, New York, 1971.

४. अमेरिका खंडातील साम्यवादी वसाहतींच्या माहितीसाठी पुढील ग्रंथांचा उपयोग केला आहे: S. H. Noyes, *History of American Socialisms* (First published J. B. Lippin-

cott, 1870 ), Dover Publications, New York, 1966; Charles Nordhoff, *The Communistic Societies of the United States* ( First published Harper & Brothers, 1874 ), Dover Publications. New York, 1966; Charles Gide, *Communist and Co-operative Colonies*, George Harrap and Co., London, 1930; Mark Holloway, *Heavens on Earth*, Turnstile Press, London, 1951; Henrik F. Infield, *Co-operative Communities at Work*, London, 1947; Albert Fried (Ed.), *Socialism in America : A Documentary History*. Doubleday & Co., New York 1970.

५. L. F. Rshbrook-Williams, *The State of Israel*, Faber and Faber, 1957. ज्यू राष्ट्रवादासाठी Hugh Trevor-Roper, *Jewish and Other Nationalisms*, Weidenfield and Nicolson, London, 1962; David Ben-Gurion. *Recollections* (ed. Thomas R. Bransten), London, 1970; Norman Bentwich, *The Jews in Our Time*, Penguin, 1960, ही पुस्तके पाहावी.

६. Haim Darin-Drabkin, *The Other Society*, Victor Gollancz, 1962, p. 66.

७. Joseph Baratz, *A Village by the Jordan*, The Harvill Press, London, 1954, p. 44.

८. Murray Weingarten, *Life in a Kibbutz*, The Reconstructionist Press, New York, 1955, p. 13.

९. Harry Viteles, *A History of the Co-operative Movement in Israel*, Valentine-Mitchell, London (Book Two), 1967, p. ७.

१०. वरील ग्रंथाचा तिसरा खंड, पृ. ५८८.

११. Eliyahu Kanovsky, *op. cit.*, pp. 22-23.

१२. Bruno Bettelheim, *The Children of the Dream*, The Macmillan Company, London, 1969 ह्या ग्रंथात किबुट्झच्या शिक्षणपद्धतीचा अभ्यास केला आहे. विशेषतः प्रकरण ५ पाहावे. बेटेलहाइम ह्यांची मते अनेक बाबतीत स्पिरो ह्यांच्यासारखीच असली तरी त्यांचे चित्र काही बाबतीत निरुत्साह करणारे आहे.

१३. Henrik F. Infield, *op. cit,*, p. 79.

१४. Martin Buber, *Paths in Utopia*, (Tr. R. F. C. Hull) Routledge & Kegan Paul, London, 1949.

१५. वरच्या संदर्भ टीपांत आणि ह्या पुस्तकाच्या शेवटी स्पिरो ह्यांनी दिलेल्या संदर्भसाहित्याच्या यादीत किबुट्झविषयक काही ग्रंथ आहेत. ह्याशिवाय अभ्यासूंनी पुढील ग्रंथ पाहावे. : Haim Darin–Drabkin, *Patterns of Co-operative Agriculture in Israel*, Tel Aviv, 1962; A Granott, *Agrarian Reform and the Record of Israel*, London, 1956; Haim Halperin, *Changing Patterns in Israel Agriculture*, London, 1957; Henrik F. Infield, *Co-operative Communities at Work*, London, 1947; Henrik F. Infield, *Co-operative Group Living*, New York, 1950; Henrik F. Infield, *Utopia and Experiment*, New York, 1955; Moshe Kerem, *The Kibbutz*, Jerusalem, 1965; Yaakov Morris, *Pioneers from the West; A History of Colonization in Israel by Settlers from English-speaking Countries*, Jerusalem, 1955; Miloslav Moulis and Vetvicka Milos, *The Co-operative Village*, Prague, 1963; Maurice Pearlman, *Adventure in the Sun*, London, 1947; Moshe Pearlman and David Ben-Gurion, *Ben-Gurion Looks Back*, London, 1965; Walter Press, *Co-operation in Israel and the World*. Jerusalem, 1960; Esther Tauber, *Molding Society to Man, Israel's New Adventure in Co-operation*, New York, 1955; Alex Weingrod, *Reluctant Pioneers—Village Development in Israel*, New York, 1966; Reuven Cohen, *The Kibbutz Settlement*, Hakibbutz Hameuchad Publishing House, 1972; Mordechai Amitai, *Together : Conversations about the Kibbutz*. English Speaking Department, World Hashomer Hatzair, 1966.

# ऋणनिर्देश आणि एक सूचना

अनुवादकाच्या प्रस्तावनेसाठी वाङ्मयीन सामग्री मिळण्यात मुंबई विद्यापीठाच्या ग्रंथालयाचा फार उपयोग झाला. शिवाय मुंबई येथील इस्रायली कॉन्सुलेटच्या ग्रंथपालिका श्रीमती रोशनी सिनोर ह्यांनीही हरप्रकारचे साहित्य देऊन मदत केली. स्वतः एका किबुट्झचे सभासद असलेले भूतपूर्व कॉन्सल श्री. याकोब मॉरिस ह्यांची मुलाखत घेण्याची संधी मिळाली. जेरुसलेमच्या हिब्रू विद्यापीठातील समाजशास्त्राचे प्राध्यापक आणि पूर्वीचे एक किबुट्झचे सदस्य रुहेन काहाने ह्यांनी मुंबई विद्यापीठाला भेट दिली असताना त्यांच्याशी विस्तृत चर्चा करण्याचा योग आला. श्री. एझरा अबूदी हा मुंबईचा एक ज्यू युवक स्कार ब्लम ह्या किबुट्झमध्ये काही महिने राहिला होता, त्याच्याकडूनही काही महत्त्वाची माहिती मिळाली. हिब्रू शब्दांच्या उच्चारांची निश्चितीही त्याच्याच साहाय्याने केली. ( अर्थात् ह्या बाबतीत झालेल्या चुकांची जबाबदारी मात्र आम्हांवरच आहे. ) वर उल्लेखिलेल्या सर्व संस्था व व्यक्ती ह्यांचे आम्ही मनापासून आभारी आहोत. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ व त्याचे भाषांतर संचालनालय ह्यांनी हा ग्रंथ मराठी वाचकांपुढे आणण्याची आम्हास संधी दिली ह्याबद्दल आम्ही त्यांचे कृतज्ञ आहोत. विशेषतः भाषांतर संचालनालयाचे भूतपूर्व प्रमुख श्री. बा. रं. सुंठणकर व हल्लीचे प्रमुख प्रा. अ. के. भागवत ह्यांचे आम्ही फार ऋणी आहोत. महाराष्ट्र सहकारी मुद्रणालयाचे श्री. अंबूटकर ह्यांनी तर आमच्याशी फारच जमवून घेतले ह्याबद्दल त्यांचे खास आभार मानणे जरूर आहे.

**सूचना :** पहिल्या आवृत्तीत लेखकाने ज्या क्रमाने भर घातली आहे त्याच क्रमाने वाचकांनी ती वाचणे सोयीचे होईल. त्यासाठी लेखकाची पहिल्या आवृत्तीला प्रस्तावना, नंतर प्रकरणे ५ ते ८, नंतर लेखकाची १९६३ च्या आवृत्तीला प्रस्तावना व त्यानंतर प्रकरण ९–" १९७० मधील किबुट्झ " असा क्रम ठेवावा.

अनुवादक

# लेखकाची पहिल्या आवृत्तीला प्रस्तावना

इस्रायलमधल्या किर्यात येदिदिम ह्या काल्पनिक नावाच्या एका सामूहिक वसाहतीचा ( किबुट्झचा ) हा मानववंशशास्त्रीय अभ्यास आहे. किबुट्झच्या संस्कृतीचे एक लहानसे संशोधन असे ह्या पुस्तकाचे स्वरूप असले तरी सामाजिक सहकार्याच्या शक्यतांचा एक प्रकरणाभ्यास करण्याचा हेतूही त्याच्यामागे आहे. मायक्रोनेशिया-मधल्या सेंट्रल कॅरोलिन प्रवाळ बेटांमधल्या इफालुक लोकांच्या सहकारमय संस्कृतीत प्रत्यक्ष काम करीत असताना लेखकाचे या विषयामधले कुतूहल प्रथम जागे झाले. ह्या " आदिम " अवस्थेतील समाजाचे संशोधन करीत असताना सहकार आणि आक्रमण ह्यांबाबत जी अस्फुट प्रमेये त्याच्या मनात तयार झाली त्यांचा अधिक शोध एका आधुनिक समाजाच्या संदर्भात घ्यावा असे त्याला वाटू लागले. अशा प्रकारच्या प्रकल्पासाठी योग्य जागा म्हणून किबुट्झ तात्काळ डोळ्यासमोर आला. सामाजिक सहकार आणि आक्रमण ह्याबद्दलची आपली जिज्ञासा त्यामुळे तृप्त होईल एवढेच नव्हे तर सामाजिकीकरणाच्या एका अभिनव संदर्भात—म्हणजे सामूहिक शिक्षणपद्धतीच्या संदर्भात—आक्रमण आणि सहकारी वर्तणुकीचा अभ्यास करण्याची एक आगळीच संधी मिळेल असे त्याला वाटले. प्रकरणाभ्यास ह्यादृष्टीने हे पुस्तक म्हणजे किर्यात येदिदिमचे एक यथातथ्य चित्रण तर असेलच पण कोणताही उपयुक्त प्रकरणाभ्यास विशिष्टाच्या अभ्यासातून सामान्यावर प्रकाश टाकतो तसाच ह्यानेही टाकला जाईल अशी लेखकाची अपेक्षा आहे.

इस्रायली राजकारण किंवा इस्रायली सरकार ह्यांविषयी ह्या पुस्तकात जे निर्देश आले आहेत ते १९५५ च्या राष्ट्रीय निवडणुकांपूर्वीच्या परिस्थितीला अनुलक्षून आहेत. त्यानंतर नवी राजकीय नातीगोती जुळली आहेत आणि नवे सरकार स्थापन झाले आहे.

ज्यावर प्रस्तुत पुस्तक आधारलेले आहे ते प्रत्यक्ष निरीक्षण किर्यात येदिदिम-मध्ये फेब्रुवारी १९५१ पासून डिसेंबर १९५१ पर्यंत करण्यात आले. सोशल सायन्स रिसर्च कौन्सिलने पी. एच. डी. नंतरच्या संशोधनासाठी दिलेल्या शिष्यवृत्तीमुळेच प्रस्तुत अभ्यास शक्य झाला ह्याबद्दल लेखक कौन्सिलचा ऋणी आहे. प्रोफेसर जेम्स. एच. बार्नेट, प्रोफेसर व सौ. ए. आयर्व्हिंग हॅलोवेल, प्रो. ज्यूल्स हेन्री, प्रो. एलिहू काट्झ, प्रो. राफेल पाटाई आणि प्रोफेसर इव्हान झेड्. व्होग्ट, ज्यूनियर, ह्यांनी हस्तलिखित वाचून महत्त्वाच्या सूचना केल्या व टीका केली ह्याबद्दल त्यांनाही धन्यवाद देणे आवश्यक आहे. याशिवाय प्रोफेसर पाटाई यांनी झिऑनवादी चळवळीचा इतिहास

आणि इस्रायली संस्कृती ह्याबद्दलच्या आपल्या सूक्ष्म ज्ञानाचा मला मोठ्या उदारपणे लाभ करून दिला. लेखकावर सर्वांत मोठे ऋण आहे ते श्री. विल्यम झेव ब्रिनर आणि ऑड्रे गोल्डमन स्पिरो ह्यांचे. ब्रिनर म्हणजे सर्वसामान्यपणे किबुत्झ चळवळ आणि विशेषतः किर्यात येदिदिम: ह्यांची संरचना व इतिहास ह्याबद्दलच्या माहितीचे भांडारच आहे. त्यामुळे प्रत्यक्ष निरीक्षणाचे वेळी आणि हस्तलिखितावरील टीकेच्या बाबतीत त्यांचे मला बहुमोल साह्य झालेले आहे. ऑड्रे गोल्डमन स्पिरो ह्यांनी बहुतांश माहिती गोळा केली आणि किबुत्झमधील आंतर-व्यक्तिसंबंधांबाबत अनेक महत्त्वाच्या सूक्ष्मच्छटा माझ्या ध्यानात आणून दिल्या. शेवटी कृतज्ञता व्यक्त करावयाची ती किर्यात येदिदिमच्या सभासदांबद्दल. ते तर अनेक कारणांमुळे लेखकाचे व्यक्तिगत मित्रच ( किंवा किबुत्झच्या भाषेत बोलायचे तर ' साथी ' ) झाले आहेत.

नोव्हेंबर १९५५ मेल्फर्ड ई. स्पिरो

# लेखकाची १९६३ च्या आवृत्तीला प्रस्तावना

बदल हा जो जगाचा सर्वसाधारण नियम आहे त्याला फार थोडे अपवाद आहेत, आणि त्यांपैकीच एक अपवाद म्हणजे ग्रंथ--किंवा थोड्या रेखीव भाषेत बोलायचे तर ग्रंथातील विचार आणि वर्णने. ह्या पुस्तकात ज्या वस्तूचे विवेचन आहे त्या वस्तूत बदल घडून आल्याचे लेखकास माहीत असल्यामुळे ग्रंथात बदल होऊ शकत नाही ही गोष्ट त्याला जरा गोंधळात टाकणारी ठरली आहे. ह्या पुस्तकात ज्याचे वर्णन केलेले आहे त्या किबुट्झला--म्हणजे किर्यात येदिदिमला--मी १९६२ च्या उन्हाळ्यात एक धावती भेट दिली. पण तेवढ्या अवधीतही माझ्या ध्यानात आले की त्याची मूलभूत समाजरचना जशीच्या तशीच राहिलेली असली तरी १९५२ साली मी किबुट्झचा निरोप घेतल्यापासूनच्या दहा वर्षांच्या काळात बरेच बदल घडून आलेले आहेत. ह्या पुस्तकात १९५१ च्या किबुट्झचे चित्रण आहे, १९६२ च्या नव्हे; त्यामुळे वाचकाला असे मुद्दाम सांगणे जरूर आहे की किबुट्झच्या ऐतिहासिक विकास-क्रमातील फक्त एका कालखंडाचे – आणि एका निर्णायक कालखंडाचे – ह्यात वर्णन आहे. म्हणून माझ्या तीन दिवसांच्या भेटीत जे बदल माझ्या दृष्टीस पडले त्यांची नोंद करणे उचित होईल. ह्या दहा वर्षांच्या काळात आणखी काही आणि कदाचित् अधिक महत्त्वाचेही बदल घडून आले असणे अशक्य नाही. पण त्याबद्दल मी काही सांगू शकणार नाही, कारण किर्यात येदिदिमला मी परत आलो होतो तो जुन्या मित्रांना भेटण्यासाठी, नवी सामग्री गोळा करण्यासाठी नव्हे. जुन्या आठवणी काढीत असताना अनुषंगाने मिळालेली ही माहिती आहे आणि त्यामुळे अर्थातच ती अपुरी आहे.

सर्वांत नाट्यमय बदल हे जड स्वरूपाचे आहेत. किबुट्झमध्ये प्रवेश करताक्षणीच नवे भोजनगृह दृष्टी आकर्षून घेते. जुन्या काळच्या अंधाऱ्या आणि अनाकर्षक भोजनगृहाशी तुलना करता ही इमारत विस्तृत आणि देखणी आहे आणि किबुट्झच्या राहणीमध्ये घडत असलेल्या बदलांचे एक प्रतीकच ठरली आहे. किर्यात येदिदिमच्या इतिहासातील प्रारंभीच्या काळी जी विरक्त वृत्ती अस्तित्वात होती तिचा आता शेवट झाला आहे हे सूचविण्यास ही इमारत पुरेशी आहे. मात्र ही गोष्ट किबुट्झचे जीवनमान वाढविणाऱ्या आणि त्याच्या सभासदांचे जीवन जास्त सुखावह आणि प्रसन्न करणाऱ्या ज्या अनेक गोष्टी घडल्या आहेत त्यातली फक्त एक आहे. नवीन बांधलेली घरे दीड खोल्यांची, न्हाणीघर-नळ वगैरेंनी युक्त असून मोठ्या कल्पकपणे एका यांत्रिक साधनाने थंड राहतील अशी बनविलेली आहेत. ही घरे तूर्त संस्थापक-सभासदांना पुरतील इतकीच आहेत—पण हळूहळू सर्वांनाच तशी

मिळणार आहेत. शिवाय ह्या सोयींबरोबरच विजेचे पंखे आणि रेडिओ सार्वत्रिक झालेले असल्यामुळे १९५१ साली मी पाहिलेल्या परिस्थितीशी असणारा विरोध तीव्रत्वाने ध्यानात येतो. ह्या बदलांचे समाजशास्त्रज्ञांच्या दृष्टीने महत्त्व म्हणजे किबुट्झच्या उत्पादनशक्तीमुळे ते साध्य झाले आहेत एवढेच नाही – आणि ही समाजवादी अर्थव्यवस्था उत्पादनक्षम आहे यात कसलीच शंका नाही––तर किबुट्झमधल्या परंपरावाद्यांनाही आता ते इष्ट नसले तरी स्वीकार्य वाटू लागावेत अशा रितीने एकूण विचारसरणीच बदलत आहे. विरक्तपणा हा आता आदर्श उरलेला नाही.

विचारसरणीतील बदल हा माझा मुख्य विषय असला तरी हे सांगितले पाहिजे की किर्यात येदिदिममधल्या उपभोग्य वस्तूंच्या प्रकारात जे बदल घडत आहेत ते एका विशिष्ट संदर्भात. १९५१ च्या आर्थिक स्थितीच्या मानाने इस्रायल आज फारच मोठी भरभराट अनुभवीत आहे. इस्रायलमधली सर्वसाधारण सामाजिक–आर्थिक परिस्थिती व किबुट्झ सभासदांच्या बदलत्या वृत्ती ह्यांत फार घनिष्ठ संबंध आहे. एका बाजूने इस्रायलच्या आर्थिक भरभराटीचा परिणाम म्हणून १९५१ साली उपलब्ध नव्हत्या अशा अनेक उपभोग्य वस्तू आता बाजारात आल्या आहेत. त्याचबरोबर त्यांच्या उपलब्धतेमुळे अनेक किबुट्झ सभासदांच्या आर्थिक गरजाही वाढलेल्या आहेत. ह्यातून त्यांच्या आकांक्षा आणि सिद्धी ह्यांमधील अंतर वाढत गेलेले आहे आणि सभासदांच्या सिद्धी व इस्रायली समाजातील इतर विभागांच्या सिद्धी ह्यांमधीलही अंतर वाढत गेले आहे. किबुट्झच्या विरक्तपणाच्या परंपरेतील बदलांची कारणमीमांसा करताना हा घटक अनेकांमधील एक घटक म्हणून लक्षात घेतला पाहिजे.

विचारसरणीतले इतर बदल पुढीलप्रमाणे आहेत. किर्यात येदिदिमची आर्थिक व्यवस्था पूर्वीप्रमाणेच समाजवादी आहे आणि त्याच्या ध्येयवादातही पूर्वीप्रमाणेच अजूनही समाजवादाचा आविष्कार होत आहे. खरे म्हणजे समाजवादी नसलेला किबुट्झ हा एक वदतोव्याघातच आहे. तरी सुद्धा पूर्वी समाजवादी तत्त्वप्रणालीला मध्यवर्ती म्हणून समजल्या जाणाऱ्या अनेक विचारांचा किबुट्झने त्याग केलेला आहे. उदाहरणार्थ, सोव्हिएत यूनियनकडे समाजवादी देशांचे नेतेपण आहे असे आता समजले जात नाही किंवा समाजाने त्याचा आदर्श आपल्या डोळ्यांपुढे ठेवला पाहिजे असे समजले जात नाही. ह्या नव्या विचाराला काही सनातनी प्रवृत्तीच्या सभासदांचाच अपवाद आहे आणि त्यांच्याकडे पाहण्याचा इतरांचा दृष्टिकोणही काहीसा अनुकंपेचा व काहीसा तिरस्काराचा झालेला आहे. विसाव्या कम्युनिस्ट काँग्रेसच्या प्रसंगी क्रुश्चॉव्हने जी गुपिते उघड केली त्यामधून ही निःस्तालिनीकरणाची त्याचप्रमाणे निःसोव्हिएतीकरणाची प्रक्रिया सुरू झाली. मे–दिनाच्या समारंभाच्या समयी आता भोजनगृहाच्या भिंतीवर स्तालिन व लेनिन यांची चित्रे लावली जात नाहीत. किबुट्झच्या समाजवादी श्रद्धेच्या संदर्भात सोव्हिएत यूनियनचे एवढे महत्त्व आहे की सोव्हिएत यूनियनवरील श्रद्धा

नष्ट झाले तर किबुट्झच्या स्वतःच्या समाजवादी प्रयोगाला "मोठा हादरा बसेल" असे मी लिहिले होते पण हे माझे विधान उघड उघड चुकीचे आहे असे आता ध्यानात आले आहे. जाताजाता हेही सांगावयास हवे की किबुट्झ ज्या राजकीय पक्षाशी संलग्न आहे तो पक्ष एक जबाबदार पक्ष म्हणून काम करण्यास उत्सुक नसल्यामुळे संयुक्त सरकारात फार दिवस टिकणार नाही, ह्या आशयाचे माझे भाकितही चुकीचे ठरले आहे. कारण तो पक्ष नंतर सुमारे दहा वर्षे सरकारात राहिला.

किबुट्झ समाजवादाच्या स्वरूपात इतरही बदल घडून आले आहेत आणि सध्या असे वाटते की सोव्हिएत यूनियनबाबतच्या बदललेल्या दृष्टिकोणाचाच परिणाम म्हणून ते घडून आलेले आहेत. किर्यात येदिदिमचे "पंथ" म्हणून जे रूप होते ते आता कमी झाले आहे आणि जे काही शिल्लक आहे ते "आक्रमक" असण्यापेक्षा "पराङ्मुख" प्रकारचे अधिक आहे. म्हणजे असे की किबुट्झला जगात बदल घडवून आणायचा आहे हे खरे असले तरी बाह्य जगातील व्यवहारांऐवजी अंतर्गत व्यवहारांकडे त्यांचा मोहरा अधिक वळलेला आहे. उर्वरित जग "आपणांसारिखे" करण्याऐवजी किबुट्झची समाजवादी राहणी आपल्या सभासदांच्या दृष्टीने अधिक आकर्षक कशी बनेल ह्याकडे त्यांचे अधिक लक्ष आहे. उर्वरित जगात परिवर्तन घडवून आणणे हा आता केवळ आदर्श म्हणून डोळ्यांसमोर आहे. थोडक्यात, आंतरराष्ट्रीय क्रांतिकारक चळवळीतील एक क्रियाशील घटक ह्या भूमिकेवर दिलेला भर किर्यात येदिदिमने बराचसा कमी केला असून अंतर्गत स्वास्थ्य व उत्कर्ष ह्यांवरील भर वाढविला आहे. जगाचे प्रश्न सोडविण्याऐवजी स्वतःचे घरगुती प्रश्न सोडविण्याकडे त्यांचा कल वळलेला आहे.

ह्या प्रवृत्तीचे प्रतिबिंब सभासदांच्या राहणीमानाबद्दलच्या वाढत्या व्यवधानात प्रामुख्याने पडलेले आहे. शिवाय माझ्या गेल्या वर्षीच्या धावत्या भेटीत नजरेस आलेल्यांपैकी आणखी तीन महत्त्वाच्या गोष्टींतही हे प्रतिबिंब पडलेले दिसून येते-- "समूहाचे गतिशास्त्र" या तत्त्वाचा जोर कमी झाला आहे; व्यवसाय व वैयक्तिक उत्कर्ष याकडे पाहण्याची दृष्टी बदलली आहे; त्याचप्रमाणे औद्योगिकीकरणाकडे बघण्याची दृष्टीही बदलली आहे.

किबुट्झच्या प्रारंभीच्या समूहवादामध्ये तीन वेगवेगळ्या पण किबुट्झच्या दृष्टीने संलग्न अशा निष्ठांचा समावेश झालेला होता त्या निष्ठा म्हणजे : सर्व आर्थिक वस्तूंची सामूहिक मालकी, वैयक्तिक हितसंबंधापेक्षा सामूहिक हितसंबंधाची श्रेष्ठता आणि सामूहिक अनुभवाचे स्वयंसिद्ध मूल्य. ( ह्या शेवटच्याचा उल्लेख मी "सामूहिक गतिशास्त्राच्या" संदर्भात केलेला आहे. ) सामूहिक अनुभवाबद्दलचे हे गूढरम्य आकर्षण म्हणजे युवक आंदोलनाला परिपुष्ट करणाऱ्या व त्यात आविष्कृत झालेल्या स्वप्नरंज-

नात्मक विचारधारांचा परिपाक होता. पण हे आकर्षण व किबुट्झ जीवनाच्या वास्तवात सभासदांना वाटणारी एकांताची अतिशय तीव्र गरज यांमधला संघर्ष हे १९५१ मधल्या किर्यात येदिदिममधील अंतर्गत तणावाचे महत्त्वाचे कारण होते. आज मात्र सामूहिक राहणीच्या प्रश्नाचा विचार युवक आंदोलनाच्या काळच्या स्फूर्तींच्या संदर्भात करण्याऐवजी चालू सामाजिक वास्तवाच्या संदर्भात करण्याकडे किर्यात येदिदिमचा कल वळलेला आहे. एकांताची मागणी न्याय्य आहे हा विचार मान्य झाल्यासारखा दिसत आहे.

बिगरशेती उद्योगांकडे पाहण्याच्या दृष्टिकोनातील बदल हाही आणखी एक महत्त्वाचा बदल आहे. आमच्या अभ्यासाच्या वेळची परिस्थिती अशी होती की किबुट्झ बुद्धिवादी असूनही त्यात शेतीकामाला एक गूढरम्य प्रतिष्ठा होती आणि तिचा परिणाम म्हणून जमिनीवरचे श्रम ज्यात नाहीत अशा शिक्षकादी पेशांचे महत्त्व कमी लेखले जात असे. शिवाय समूहाच्या श्रेष्ठत्वाच्या कल्पनेमुळे समूहापासून अलग पाडणाऱ्या व्यवसायांत रस घेणाऱ्या सभासदांना " करिअरिस्ट " म्हणून संबोधण्यात येत असे. " करिअरिस्ट " हा किबुट्झ शब्दकोशातील फार विषारी शब्द आहे. पण गेल्या वर्षी ज्या शिक्षकांशी मी बोललो त्यांनी असे सांगितले की पूर्वी सभासदांची त्यांच्याकडे बघण्याची जी द्विधा मनःस्थिती होती ती आता राहिलेली नाही; पूर्वीच्या शिक्षकांना आपण शारीरिक श्रमात व कौशल्यात कमी नाही हे सिद्ध करण्याची जशी गरज वाटत होती तशी गरज आता नवीन जे शिक्षक झाले आहेत त्यांना वाटत नाही.

सगळ्यात आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे दोन सभ्य काही विशेष प्रकारच्या तांत्रिक व्यवसायात किर्यात येदिदिमच्या बाहेर काम करीत असूनही किर्यात येदिदिमने त्यांना पटावरून काढून टाकलेले नाही. यांपैकी एकाशी माझे बोलणे झाले. त्याने सांगितले की या प्रश्नाच्या चर्चेसाठी ग्रामसभेच्या अनेक बैठकी घेण्यात येऊन मग त्याचे सभासदत्व चालू ठेवण्याचा निर्णय घेण्यात आला होता. " किर्यात येदिदिम हे आपले घर आहे व घराने आपल्या मुलांना नेहमीच आसरा दिला पाहिजे; सर्वांनी शेतीतच रस घेतला पाहिजे असा आग्रह धरला तर किबुट्झचे भवितव्य काही सुरक्षित नाही; व्यवसाय कोणताही असो किबुट्झच्या मूलभूत झिऑनवादी व समाजवादी ध्येयप्रणालीवर ज्याची निष्ठा आहे अशा प्रत्येकालाच त्यात स्थान मिळाले पाहिजे, " इत्यादी गोष्टी सांगून आपण आपली बाजू कशी मांडली व मोठ्या बहुसंख्येला आपले मत कसे पटवून दिले हे त्याने मला सांगितले.

शेती हा किबुट्झचा एकमेव व्यवसाय किंवा त्याच्या मिळकतीचे एकमेव साधन असता कामा नये ही जाणीव किबुट्झच्या नव्या कारखान्यात साकार झाली आहे. किर्यात येदिदिमच्या दृष्टिकोणातून पाहिले तर औद्योगिकीकरणाबद्दलच्या

त्यांच्या पारंपरिक वृत्तीत हा एक क्रांतिकारक बदल झालेला आहे. माझ्या १९५१ च्या अभ्यासापूर्वीच काही किबुट्झनी विविध औद्योगिक व्यवसाय सुरू केलेले होते तरी आपल्या काही महत्त्वाच्या मूल्यांना त्यामुळे बाध येईल म्हणून किर्यात येदिदिमने औद्योगिकीकरणाला विरोध केला होता. आज कारखान्याने आर्थिक यश संपादन केले आहे एवढेच नव्हे तर वृद्ध सभासदांना आरामात करता येण्यासारखे काम उपलब्ध करून देऊन वयोवृद्धीने निर्माण होणाऱ्या प्रश्नांचीही अंशतः सोडवणूक केली आहे.

ह्या पुस्तकात 'संकटावस्थे'ची म्हणून जी चिह्ने सांगितली आहेत त्यांत वयोवृद्धीमुळे निर्माण होणारे मानसिक प्रश्न हे एक चिह्न नमूद केलेले आहे (प्रकरण७). बाकीचे निर्वाणीचे प्रश्न कितपत सुटले आहेत हे सांगणे कठीण आहे. किबुट्झने स्वतःच राहणीचे मान वाढविल्यामुळे खाजगीरित्या उपभोग्य वस्तू जमा करण्याची प्रवृत्ती कमी झाली असावी असे समजण्यास जागा आहे. "स्त्रीच्या समस्ये" पैकी काही समस्या सुटलेल्या असाव्यात असे वाटते. कारण शेती कामगारांतील त्यांचे प्रमाण कमी झाले आहे, वेशभूषा आणि प्रसाधन यांकडे अपराधीपणाची भावना मनात येऊ न देता लक्ष देणे त्यांना शक्य झाले आहे, कामाच्या परिसरातल्या, विशेषतः पाकगृहातल्या, सोयी वाढल्या आहेत आणि एकूणच शारीरिक जीवन अधिक सुखावह झाले आहे. पण ह्या प्रश्नांची उत्तरे अधिक संशोधनाअंतीच देता येतील.

तरीही किर्यात येदिदिममध्ये संकटावस्थेचे वातावरण आहेच आणि माझ्या मते त्याचे मुख्य कारण विशाल इस्रायली समाजाच्या अंतर्गत किबुट्झ चळवळीचे स्थान काय असावे हा प्रश्न आहे. किबुट्झ रहिवाशांची इस्रायली संस्कृतीतील वीर पुरुष ही प्रतिमा तर विरून गेलेलीच आहे. पण मुख्यतः आशियाई व आफ्रिकाई देशांमधून येणाऱ्या नव्या स्थलांतरितांमुळे किबुट्झ चळवळीची सापेक्ष शक्ती उत्तरोत्तर कमी होत चाललेली आहे. कारण हे नवे स्थलांतरित मुख्यतः नागरी राहणी पसंत करतात आणि त्यातले जे कोणी शेतीत प्रवेश करतात त्यांची पसंती मोशॅव्ह वसाहत ही असते. एक गोष्ट स्पष्ट आहे की किबुट्झ चळवळीची वाढ आता जवळ जवळ थांबलेली आहे. १९५४–५९ या पाच वर्षांच्या काळात एकूण किबुट्झ चळवळीतील लोकसंख्या फक्त २००० ने वाढली आणि या काळात फक्त दोनच नवे किबुट्झ अस्तित्वात आलेले आहेत हे लक्षात घेतले तर ही वाढ जवळ जवळ संपूर्णपणे अंतर्गत लोकसंख्येची वाढ आहे हे स्पष्ट आहे. पुढे भवितव्यात आणखी काय घडेल हे सांगता येत नाही पण किबुट्झ चळवळीचा पन्नासावा वाढदिवस—पहिला किबुट्झ "देगानिया" १९०९ साली स्थापन झाला— आणि तिच्या विस्ताराची समाप्ती ह्या दोन्ही गोष्टी एकाच वेळी घडून येत आहेत असे म्हणावे लागते. ह्या घटनेचा किबुट्झच्या आत्मप्रतिमेवर आणि तिच्या भवितव्यावर परिणाम होणार हे निश्चित आहे. एवढे तरी कमीत कमी म्हणता येईल की चांगल्या जीवनाविषयी आपली जी

कल्पना असते तीच इतरांचीही असावी यासाठी खूप मोठा प्रयत्न करूनही ते ती धिक्कारतात ही जाणीव आपल्याला अधिक वास्तववादी बनविते.

पण किबुट्झचे भवितव्य बाहेरून नवीन सभासद करून घेण्यावर जसे अवलंबून आहे तसे अंतर्गत सभासदभरतीवरही अवलंबून आहे. वेगाने वाढणाऱ्या इस्रायली लोकसंख्येबरोबर प्रमाणशीर वाढ व्हायची तर बाहेरून भरती व्हायला पाहिजे; उलट किबुट्झची तग धरून राहण्याची शक्ती आपल्याच युवकांना टिकवून धरण्यावर आणि जुन्या पिढीने धारण केलेली पदे व बजावलेल्या भूमिका युवकांनीही पार पाडाव्यात यासाठी त्यांना प्रेरित करण्यावर अवलंबून आहे. थोडक्यात सभासद-भरतीचा प्रश्न हा जीवशास्त्रीय अर्थाने रिकाम्या पडलेल्या जागा भरण्याचा किंवा संख्या वाढविण्याचा प्रश्न नसून *सामाजिक* सभासद भरतीचा व संस्कृतीच्या संक्रमणाचा आहे. यादृष्टीने पाहिले तर इतर अनेक किबुट्झ वसाहतींपेक्षा किर्यात येदिदिम अधिक यशस्वी झाल्याचे दिसते.

किबुट्झची मुले ( *Children of the Kibbutz* हार्वर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, १९५८ ) ह्या पुस्तकात मी असे म्हटले आहे की किबुट्झच्या " सामूहिक शिक्षण " पद्धतीच्या यशापयशाचे मूल्यमापन करण्याच्या कोणत्याही कसोट्या असोत, ज्या प्रमाणात तिने आपली उद्दिष्टे साध्य केली आहेत ते प्रमाण ही त्यांपैकी सर्वांत महत्त्वाची कसोटी मानली पाहिजे. १९५१ साली किबुट्झमध्ये जन्म पावलेली सर्वांत मोठी व्यक्ती फक्त अठ्ठावीस वर्षे वयाची असल्यामुळे " किबुट्झची मुले " नागरी वातावरणात प्रवेश करण्याऐवजी किर्यात येदिदिममध्येच राहण्याचे ठरवितील की नाही, खाजगी मालमत्तेवर आधारलेल्या अर्थव्यवस्थेत राहण्याचे पसंत करतील की सामुदायिक मालकीच्या—आणि या दोन प्रश्नांचे उत्तर होकारार्थी असेल तर—" वाळवंटातील पिढी "ने खाली केलेल्या नेतृत्वाच्या जागा ती जबाबदारीने पेलतील की नाही, ह्या प्रश्नांची उत्तरे निश्चयाने देणे कठीण होते. आजही आत्मविश्वासाने ह्या प्रश्नांची उत्तरे देणे कठीण आहेच; पण आताच्या माहितीच्या आधारे असे म्हणता येते की एक दृश्य घटना व त्याचप्रमाणे एक सामाजिक व सांस्कृतिक पद्धती ह्या रूपांनी किर्यात येदिदिम चिरंतन राहील.

किबुट्झविषयक संशोधन अजून बाल्यावस्थेत आहे आणि इतर किबुट्झविषयीची तुलनात्मक माहिती फारच तुटपुंजी आहे. १९६२ च्या उन्हाळ्यात मला असे सांगण्यात आले की शहरांकडे आकृष्ट होत असणाऱ्या मुलांची टक्केवारी " वाढती " आहे आणि किबुट्झ चळवळीच्या भवितव्याविषयी लोक साशंक झाले आहेत. या वार्तांची सत्या-सत्यता पारखून घेण्यास मला सवड मिळाली नाही. पण त्या खऱ्या आहेत असे समजले तरी किर्यात येदिदिमचा त्या बाबतीत आणि त्यावरून निघणाऱ्या निष्कर्षांच्या बाबतीत अपवाद केला पाहिजे हे निश्चित. माझ्या अभ्यासाच्या काळानंतर किर्यात येदिदिममधील

मुलेही किबुट्झ सोडून गेली आहेत पण त्यांची संख्या एवढी लहान आहे की सर्वसाधारणपणे "काळजी करण्याचा स्वभाव असलेल्या" ह्या समाजालाही त्यामुळे फारशी काळजी वाटली नाही. ह्याहून कदाचित अधिक महत्त्वाची गोष्ट ही की सोडून गेलेल्यांपैकी काही मुले पुन्हा परत आली कारण किबुट्झ् बाह्य जीवनपद्धती त्यांना रुचली नाही.

माझ्या छोट्या भेटीत माझ्या मनावर सर्वांत महत्त्वाचा ठसा उमटला तो ह्या गोष्टीचा की साब्रांनी किबुट्झ जीवनाच्या बहुतेक अंगांची प्रमुख जबाबदारी घेतलेली आहे. स्थानिक प्रशासन, शिक्षण, मध्यवर्ती आर्थिक कार्ये, सांस्कृतिक व्यवहार ह्यामध्ये नव्या पिढीने जुनीची जागा घेतलेली आहे आणि ज्यांच्याशी बोलण्याची संधी मला मिळाली ते तरी आपली कामे दक्षतेने व अभिमानपूर्वक करीत आहेत. काही साब्रांशी झालेल्या संभाषणात त्यांची जी वृत्ती मला दिसून आली तिचा माझ्या मनावर फारच परिणाम झाला. त्यांपैकी शाळेत कला हा विषय शिकविणाऱ्या एका तरुण शिक्षिकेने निरनिराळ्या माध्यमांतून कला शिकणाऱ्या आपल्या विद्यार्थ्यांना स्वतंत्र व सर्जक कलाविष्कार करण्यास प्रवृत्त केले होते हे स्पष्टपणे ध्यानात आले; त्याचबरोबर आपल्या कार्याच्या सामाजिक आणि आरोग्यविषयक अंगांचीही तिला जाणीव होती. तिच्या चित्रशाळेला छोटीशी भेट देण्यासाठी म्हणून मी गेलो पण जवळ जवळ सर्व दुपार या भेटीतच गेली इतका मी तेथे रमलो. दुसरा एक तिशीच्या उत्तरार्धात असलेला साब्रा आपले स्वीकारलेले काम करीत राहण्याचा निश्चय मला बोलून दाखवीत होता आणि आपण किबुट्झखेरीज इतरत्र कोठेही कसे राहू शकणार नाही, किबुट्झमध्ये आपली मुले कशी गुंतली आहेत हे अत्यंत शांतपणे व सहजपणे सांगत होता. बोलणे झाल्यावर त्याने रजा घेतली कारण तो नेमणूक समितीचा सभासद असल्याने त्याला समितीच्या बैठकीसाठी जायचे होते. तिसरे उदाहरण एका साब्रा स्त्रीचे—तीही तिशीच्या उत्तरार्धात आहे. बारा वर्षांपूर्वी ती असमाधानी आणि अस्थिर अशी मला वाटायची. बाहेरच्या जगाचा मोह टाळणे तिला फार कठीण होई आणि आपल्या लहानग्या मुलाबद्दलच्या तिच्या महत्त्वाकांक्षा इस्रायलच्या एका कोन्यातल्या ह्या लहानशा खेड्याच्या सीमा उल्लंघून पलीकडे उडी घेत असत. मात्र काही महिन्यांपूर्वीच ती आपल्या कामाबद्दल व कियीत येदिदिममधील समाधानी जीवनाबद्दल माझ्याशी जे बोलली त्यामुळे मी हलून गेलो. माझ्या अभ्यासाच्या काळी तिने माझ्याजवळ असमाधान व्यक्त केल्याची आठवण मी तिला केली तेव्हा तिला आश्चर्य वाटले. किबुट्झमध्ये मिळणारे सौहार्द आणि बौद्धिक प्रेरणा दुसरीकडे कशी काय मिळू शकेल असे तिने मला विचारले. सद्यःकालीन आर्थिक संकट समजावून घ्यायचे तर आपण साथी क्ष कडे जातो; एखाद्या नव्या पुस्तकाची चर्चा करायची तर साथी य कडे जातो, वगैरे गोष्टी ती मला सांगत होती. तिच्या बोलण्यात प्रचिती आणि परिपक्वपणा होता आणि ती जे काय सांगत होती त्यावर माझा विश्वास बसत होता. या तीन संभाषणांवरून काही निश्चित स्वरूपाचे

निष्कर्ष काढणे अविवेकीपणाचे होईल. कारण ही संभाषणे छोटी होती आणि तिन्ही सात्रांचे खरेखुरे विचार त्यात व्यक्त झाले होते असे समजले तरी हे सात्रा संबंध समूहाचे प्रातिनिधिक समजावेत की नाही हे सांगता येत नाही. येथेही पुन्हा उत्तर मिळण्यासाठी अधिक संशोधन जरूर आहे.

मॅक्स वेबरने म्हटल्याप्रमाणे सर्व सामाजिक चळवळी " संमोहना " च्या अवस्थेतून " नित्यक्रमाच्या " अवस्थेत विकसित होतात. " संमोहनाच्या नित्यक्रमी-करणा " चे अनेक संभाव्य परिणाम असू शकतात. त्यातला एक म्हणजे चळवळीचा विनाश आणि दुसरा म्हणजे एका नव्या समतोलावर स्थिरीकरण. किबुट्झच्या नित्य-क्रमीकरणाचे परिणाम काय होतील हे आज सांगणे अपरिपक्वपणाचे ठरेल. पण येत्या पाच किंवा दहा वर्षांनी सामान्यपणे किबुट्झ चळवळीच्या व विशेषतः किर्यात येदि-दिमच्या भविष्यकाळाबद्दल विचारपूर्वक काही अनुमान करणे शक्य होईल. कारण त्यावेळी " फेराहो माहित नसलेली " पिढी म्हणजेच किबुट्झ चळवळ असेल. सामूहिक जीवनाची इतिहासातील एकमेवाद्वितीय अशी ही जी चळवळ आहे तिच्यातून अनेक व्यावहारिक आणि तात्त्विक प्रश्न निर्माण होतात. ह्या मध्यंतरीच्या काळात समाजशास्त्र अशा प्रश्नांची उपेक्षा करणार नाही अशी आपण आशा करू या.

जानेवारी, १९६२

**-- मेलफर्ड ई. स्पिरो**



प्रकरण : १ :

# विषय प्रवेश

अधिक परिपूर्ण अशा समाजाचा शोध घेत राहावे ही मानवाची प्रेरणा जवळजवळ मानवजातीइतकीच पुरातन आहे. हा शोध मुख्यतः दोन प्रकारांनी घेतला गेला आहे. ज्यांनी आपली आदर्श समाजाची स्वप्ने साहित्याच्या माध्यमातून मांडली पण स्वतः प्रत्यक्षात उतरविली नाहीत असे समाजशास्त्रज्ञ आणि तत्त्वज्ञानी यांचा एक प्रकार. याउलट दृढ निष्ठा आणि प्रखर ध्येयवाद यांनी प्रज्वलित होऊन आदर्श समाज प्रत्यक्षात उतरविण्यासाठी एकत्र आलेले स्त्री-पुरुष यांचा दुसरा प्रकार. स्वप्नदर्शी आणि प्रयत्नवादी या दोघांच्या दृष्टिकोणात अनेक भेद असले तरी त्यांची बहुतेक स्वप्ने आणि प्रयत्न यांमध्ये एक समान गृहीतकृत्य दडलेले आढळते : नैसर्गिक मनुष्यस्वभावाची " योग्य " त्या वातावरणात जोपासना केली गेली तर स्वतःच्या सर्वोच्च प्रतिमेच्या निदान जवळ-पास तरी पोचणारा मानव त्यातून आकाराला येईल हे ते गृहीतकृत्य होय. हा दृष्टिकोण भाबडा म्हणा किंवा वास्तववादी म्हणा, तो हेच दर्शवितो की माणूस जे केवळ वास्तव आणि प्राप्त आहे त्यातच गुंतून राहतो असे नसून, अनेकदा जे आदर्श आणि अपूर्व आहे त्याच्याकडेही त्याचे मन ओढ घेते. हेच दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर असे म्हणता येईल की माणसाचे हेतू ठरीव जीवशास्त्रीय किंवा सामाजिक रचनांनी मर्यादित झालेले नसतात तर नव्या रचना निर्मिण्यासाठी त्यांना वळण देता येते. अशा प्रकारची नवी रचना निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा मनाशी बाळगणाऱ्या लोकांनी उभारलेल्या एका समाजाचे वर्णन करण्याचा प्रयत्न या ग्रंथात केला आहे. ज्या वेळी इतर लोक भूतकाळा-तील संस्कृतीचा वारसा चिरस्थायी करण्यातच समाधान मानीत होते त्या वेळी हे लोक एका नव्या संस्कृतीची स्थापना करण्याच्या हेतूने प्रभावित झालेले होते. **किबुट्झ** ही ती नवी संस्कृती होय.

किबुट्झ म्हणजे इस्रायलमधल्या सहकारी शेती करणाऱ्या खेड्यांच्या तीन प्रकारांपैकी एक प्रकार. सामूहिक राहणी आणि सामुदायिक मालकी ही तत्त्वे कोणत्या मर्यादेपर्यंत पाळली जातात यावरून या तीन प्रकारांची भिन्नता ठरते. **मोशॉव्ह ऑव्हादिम** किंवा कामगारांची वसाहत हा एक प्रकार आहे; यातील सर्व जमीन ज्यू राष्ट्रीय निधीच्या[1] मालकीची आहे पण यातील प्रत्येक कुटुंब आपल्या वाट्याला

१ ज्यू राष्ट्रीय निधी ( ज्यूइश नॅशनल फंड ) म्हणजे ज्यूइश एजन्सीची एक शाखा आहे. ती ज्यू लोकांच्या नावावर वसाहतीसाठी जमीन विकत घेते आणि वसाहत करू इच्छिणारांना दीर्घ मुदतीच्या कराराने नाममात्र खंडाने देते.

आखलेल्या जमिनींची स्वतंत्रपणे मशागत करते आणि त्याचे उत्पन्न आपल्यासाठी राखून ठेवते. मात्र कोणत्याही कुटुंबाला पगारी, मजूर ठेवण्याची परवानगी नसते. मोशॅव्हचा शेतमाल सामुदायिकरीत्या विकला जातो आणि वैयक्तिक किंवा शेतीविषयक गरजेच्या ग्राहकोपयोगी वस्तूही सामुदायिकपणेच खरेदी केल्या जातात.[२] थोडक्यात इन्फील्डने ज्याला " आंशिक सहकार " हे नाव दिले आहे, त्याचे मोशॅव्ह ऑव्हदिम हे एक उदाहरण आहे. " आंशिक सहकार " प्रत्यक्षात आणला जातो तो " विशिष्ट आर्थिक हेतू अधिक चांगल्या रीतीने साध्य करण्यासाठी..." आणि त्यातून काही आर्थिक लाभ पदरात पडतो तेव्हाच.[३]

किबुट्झ ( अनेकवचन किबुट्झिम् ) या शब्दाचा अर्थ समूह किंवा समुदाय असा आहे. या नावावरून सूचित होते त्याप्रमाणे पारंपरिक व्यक्तिगत शेतीपेक्षा आमूलाग्र भिन्न अशी ही शेतीची पद्धत आहे. किबुट्झ ही एक अशा प्रकारची शेती-वसाहत असते की तीत काही थोडे अपवाद वजा करता सर्व मालमत्ता सामुदायिक मालकीची असते, कामाची व्यवस्था सामुदायिक असते आणि राहण्याची व्यवस्था— मुले वाढविण्याची सुद्धा– पुष्कळशा अंशी सामुदायिकच असते. त्यामुळे किबुट्झ म्हणजे " व्यापक सहकार " असे म्हणता येईल. कारण, " जीवनातील महत्त्वाच्या गरजांची पूर्तता [ त्यात ] सहकारी पद्धतीने केली जाते ... [ येथे ] सहकार म्हणजे एक नवा जीवनमार्ग बनतो. "[४]

वसाहतीचा तिसरा प्रकार, **मोशॅव्ह शितुफी** म्हणून ओळखला जातो. हा प्रकार थोडा नवीन आहे आणि किबुट्झ व मोशॅव्ह यांचा समन्वय साधणारा असा आहे. यात किबुट्झमधले सामूहिक काम आणि सामूहिक मालकी यांच्याशी मोशॅव्हमधल्या खाजगी राहणींची सांगड घातलेली असते. मोशॅव्ह शितुफी हा एक नवा संघटनाप्रकार असल्याने या तऱ्हेच्या वसाहती थोड्याच आहेत पण पुष्कळसे किबुट्झ शेवटी याच संघटनाप्रकारात परिणत होतील अशी शक्यता आहे.

किबुट्झ– किबुट्झमध्ये अर्थातच महत्त्वाचे फरक आहेत. १९५४ मध्ये एकूण ७६०००[५] लोकसंख्या असलेल्या २२७ किबुट्झ-वसाहती होत्या-आणि त्यांचे तीन मुख्य संघ ( फेडरेशन ) आणि चार लहान गट अशी विभागणी झालेली होती. सगळ्या किबुट्झ वसाहतींनी सर्वसाधारण तत्त्वे आणि सामाजिक रचना यांचा साचा स्थूलमानाने

२ मोशॅव्हच्या वर्णनासाठी पाहा, Dayan, **Moshav Ovdim.**

३ Infield, पृ. ३०

४. तत्रैव.

५. न्यूयॉर्कमधील इस्रायल माहिती कचेरीने ही आकडेवारी लेखकास पुरविल्या-बद्दल तो तिचा ऋणी आहे. मोशॅव्ह चळवळ किबुट्झ चळवळीपेक्षा फार मोठी आहे हे ध्यानात ठेवावे. तिची एकूण सभासद संख्या ११२००० आहे.

सारखाच असला तरी त्यांच्यात महत्त्वाचे अंतर्गत फरक आहेत. हे जे फरक आहेत ते अधिक स्पष्ट करणे योग्य होईल, कारण किर्यात येदिदिम या नावाने ज्या एका किबुट्झचे वर्णन या ग्रंथात केलेले आहे तो किबुट्झ काही महत्त्वाच्या सांस्कृतिक वैशिष्ट्यांच्या दृष्टीने पाहता किबुट्झ वसाहतींच्या एका अल्पसंख्य गटात मोडतो.

किर्यात येदिदिम ज्या संघाचा[६] सभासद आहे त्याची लोकसंख्या एकूण किबुट्झ लोकसंख्येच्या एक-तृतीयांश आहे. किर्यात येदिदिम व त्याचा संघ हे बहुसंख्य किबुट्झ वसाहतींपेक्षा पुढील ठळक सांस्कृतिक बाबतींत वेगळे आहेत. ( १ ) बहुसंख्य किबुट्झ वसाहती मार्क्सवाद-विरोधी व सोव्हिएत-विरोधी आहेत, पण किर्यात येदिदिम ज्या संघाला संलग्न आहे तो मार्क्सवादी विचारसरणीचा आहे आणि सध्याच्या पूर्व-पश्चिम संघर्षात सोव्हिएतच्या बाजूचा आहे. तीन प्रमुख संघांमध्ये बहुधा हाच महत्त्वाचा फरक आहे आणि निरनिराळ्या संघांच्या परस्पर-सहकार्यात हाच मोठा अडथळा आहे. ( २ ) जरी सगळ्या किबुट्झ वसाहतींमध्ये मुलांना वाढविण्याची कोणत्या ना कोणत्या प्रकारची सामूहिक व्यवस्था आहे तरी किर्यात येदिदिममध्ये तिचे स्वरूप वैशिष्ट्यपूर्ण आहे असे म्हटले पाहिजे, कारण त्यात सामूहिक संगोपन अर्भकावस्थेत सुरू होऊन प्रशालेय शिक्षणापर्यंत चालू राहते. ( ३ ) तिन्ही मोठे संघ धर्मविरोधी असले तरी किर्यात येदिदिम व त्याचा संघ यांचा धर्मविरोध विशेषच कडवा आहे. ( ४ ) इतर संघांच्या मानाने या संघाची समूहवादी तत्त्वज्ञानावर अधिक प्रखर निष्ठा आहे आणि आपल्या तात्त्विक आणि राजकीय श्रद्धांबाबतचा त्याचा आग्रह अधिक कणखर आहे. ( ५ ) इतर तीन संघांवर आपल्या सामाजिक रचनेत बदल घडवून आणण्याबाबत जोराचे दडपण येत असले तरी या संघाने मात्र आपल्या मूलभूत तत्त्वांना धक्का लागेल अशा प्रकारचे कोणतेही बदल घडवून आणण्यास तीव्र विरोध केला आहे. त्यामुळे किर्यात येदिदिममध्ये "चैनी"ची राहणी, भाडोत्री श्रम आणि उद्योगधंदे यांचा अभाव आहे.

मुळात या लिखाणाचा प्रारंभ किर्यात येदिदिममधील [ मुलांचे ] सामाजिक

---

६. ह्या किबुट्झची ओळख पटू नये यासाठी त्याचे नाव, ज्या इतर गटांशी तो संलग्न आहे त्यांची नावे, त्याच्या सभासदांची नावे, त्याची ओळख ज्यामुळे पटेल अशा ग्रंथांची व लेखकांची नावे ह्या सर्वांत बदल तरी केला आहे किंवा त्यांचा निर्देश तरी केलेला नाही. म्हणून ह्या किबुट्झचे खरे नाव न सांगता त्याला "किर्यात येदिदिम" हे नाव दिलेले आहे; ज्या किबुट्झ संघाचा तो संलग्न आहे त्याला केवळ "संघ" म्हटलेले आहे; ज्या राजकीय पक्षाचा तो क्रियाशील अनुयायी आहे त्याला "पक्ष" म्हटलेले आहे; आणि ज्या युवक चळवळीतून त्याचा जन्म झाला त्याला "आंदोलन" हे नाव दिलेले आहे. ज्या अभ्यासकांना संस्थांची व ग्रंथांची खरी नावे हवी असतील त्यांना ती लेखकाकडून मिळतील.

संस्करण आणि व्यक्तिमत्त्वविकास या विषयावरील एका विस्तृत ग्रंथाला एक प्रस्तावना लिहावी या उद्देशाने केला होता. मुलांचा विकास ज्याच्या पार्श्वभूमीवर स्पष्टपणे दिसू शकेल असा समूहसंस्कृतिवर्णनात्मक मजकूर त्या प्रस्तावनेत यावा असा हेतू होता. किर्यात येदिदिमचे बहुतेक संस्थापक आणि नंतरचे रहिवासी सुद्धा युरोपातून पॅलेस्टाइनमध्ये राहावयास आले तेव्हा वयाने मोठे होते. त्यामुळे किबुट्झच्या संस्कृतीचा त्यांच्यावर होणारा परिणाम अल्पच असणार असे गृहीत धरलेले होते. कारण त्यांच्या आयुष्याचा संवेदनाक्षम काळ युरोपीय संस्कृतीत व्यतीत झालेला होता. याउलट, किर्यात येदिदिम-मध्येच जन्मलेल्या आणि वाढलेल्या मुलांच्या व्यक्तिमत्त्वविकासावर हे लोक आणि त्यांनी निर्मिलेली किबुट्झ संस्कृती हेच परिणाम करणारे मूळ घटक होत हेही गृहीत धरलेले होते. त्यामुळे असे वाटले की मुलांचा — या अभ्यासाच्या वेळी तेथला सर्वांत मोठा मुलगा अठ्ठावीस वर्षांचा होता — व्यक्तिमत्त्वविकास नीट ध्यानात यायला हवा तर त्याचा अभ्यास त्यांच्या आईवडिलांचा सामाजिक आणि सांस्कृतिक इतिहास, त्यांनी निर्मिलेली नवी संस्कृती आणि त्या निर्मितीमागचे त्यांचे हेतू यांच्या पार्श्व-भूमीवरच केला पाहिजे. म्हणूनच प्रस्तुत अभ्यास म्हणजे आईवडिलांची पिढी आणि त्यांचा किबुट्झ यांचा अभ्यास आहे. त्यांची प्रौढ मुले आणि नव्याने सभासद होणारी या मुलांच्याच वयाची इतर मुले यांचा किर्यात येदिदिमवर मोठाच प्रभाव आहे, परंतु हा प्रभाव आणि त्यामुळे झालेले बदल, संघर्ष आणि ताण यांची चर्चा येथे केलेली नाही. दुसऱ्या पिढीत झालेल्या सांस्कृतिक आणि मानसिक बदलाचे मोजमाप जिच्या आधारे करता येईल अशा सांस्कृतिक आणि मानसिक तल-रेषेचा हा अभ्यास ठरावा एवढाच मर्यादित हेतू या पुस्तकाचा आहे.

व्यक्तिमत्त्वाच्या घडणींचा शोध घेणाऱ्या मोठ्या पुस्तकाला एक छोटीशी ऐतिहा-सिक आणि समूहसंस्कृतिवर्णनात्मक प्रस्तावना अशा उद्देशाने सुरू केलेला हा प्रयत्न जसजसा रूप घेऊ लागला तसतसे लेखकाला ती एक स्वतंत्र अभ्यासाची वाढ-होत चालल्याचे जाणवू लागले. " स्वतंत्र " अशा अर्थाने की त्याचे स्वरूप व्यक्तिमत्त्वविकासाच्या अभ्यासाची केवळ एक प्रस्तावना असे राहिले नाही. तो दुसरा ग्रंथ आणखी अनेक वर्षे सुद्धा पूर्ण होणार नसल्याने* ही प्रस्तावना एका वेगळ्याच पुस्तकाच्या रूपाने प्रसिद्ध करण्याचे ठरविले. वर सांगितल्याप्रमाणे मूळ हेतू वेगळाच असल्याने या अभ्यासाला लोकसमूहाभ्यास, समूहसंस्कृतिवर्णन, संस्कृतिइतिहास इत्यादी समाजशास्त्रीय वर्गीकरणाच्या चौकटीत बसविणे कठीण आहे; या अभ्यासाला काही " शास्त्र " म्हणण्यासारखा तो ठरेल की नाही याचीही मला शंकाच आहे. समाजाचा शास्त्रीय शोध घेण्यासाठी आजकाल अपरिहार्य समजल्या जाणाऱ्या तंत्रांचा उपयोग करून जमा केलेली सामग्री या पुस्तकात

* **Children of the Kibbutz** या नावाने हा ग्रंथ १९५८ साली प्रसिद्ध झाला. ( अनुवादक )

क्वचित आढळेल. लेखकाने तक्ते किंवा प्रश्नावल्या तयार केल्या नाहीत, औपचारिक मुलाखती घेतल्या नाहीत किंवा आकडेवारी गोळा केली नाही आणि त्याने समाजमितिशास्त्रीय, मानसमितिशास्त्रीय किंवा संभवसूचक अशा कुठल्याच चाचण्या घेतल्या नाहीत. याचे कारण असे की मुलांच्या व्यक्तिमत्त्वविकासाचा शोध घेण्याच्या प्रयत्नात जे साहित्य अगदी अनुषंगाने जमा होत गेले त्याचाच या ग्रंथात वापर केला आहे.

पण असे असले तरी हा ग्रंथ म्हणजे माझा मुक्त कल्पनाविहार आहे असे नाही. या लिखाणावर माझ्या कल्पनांचा ठसा उमटला असेलच तर तो बहुतांशी "नियंत्रित" कल्पनांचा आहे. कारण त्या कल्पना उपलब्ध माहितीवर आधारलेल्या आहेत. ही माहिती "पुरावा" म्हणून गणता येईल की केवळ अर्थसूचक कथा म्हणून, हे सांगण्याचे धाडस मी करू नये हे बरे. छापील स्वरूपाच्या साधनांचा अपवाद वगळता, ही सर्व माहिती लेखक आणि त्याची पत्नी या दोघांनी किर्यात येदिदिमधील आपल्या अकरा महिन्यांच्या वास्तव्यात गोळा केलेली आहे. या अकरा महिन्यांच्या काळात क्रिवुट्झमधल्या मुलांच्या अभ्यासात आम्ही गुंतलेलो असताना किर्यात येदिदिमचे अनौपचारिक सभासद बनलो होतो. क्रिवुट्झच्या इतर सभासदांप्रमाणेच आम्हाला आमच्या पहिल्या नावानेच संबोधले जात असे ( मात्र आमच्या नावांची हिब्रू रूपे केली जात ), आणि त्यांच्याप्रमाणेच "साथी" ( हाव्हर ) म्हणून आमचा उल्लेख केला जात असे. रोज संध्याकाळी जेवणघरातील फळ्यावर इतर अधिकृत सभासदांप्रमाणेच आम्हांलाही दिलेल्या पुढच्या दिवसाच्या कामाचा तक्ता लावला जात असे. मात्र नेहमीचे सभासद आणि आम्ही यांच्यात असा फरक होता की आम्ही अर्धाच दिवस ( साडेचार तास ) काम करीत असू आणि उरलेल्या अर्ध्या दिवसात आम्ही आमचे मुलांबद्दलचे रीतसर संशोधन करीत असू. आम्हांवर सोपविलेले काम वेगवेगळे असे पण त्याचे सर्वसामान्य स्वरूप एकच, म्हणजे "अकुशल काम" असे असे. आम्ही भाजीपाल्याच्या मळ्यात, पपनस आणि ऑलिव्हच्या फळबागांत, द्राक्षमळ्यात, स्वयंपाकघरात इत्यादी ठिकाणी काम करीत असू; याशिवाय माझी पत्नी अर्भकालयात काम करीत असे. किर्यात येदिदिममध्ये राहण्याची परवानगी मिळण्याच्या दृष्टीने आम्ही त्याच्या आर्थिक जीवनात सहभागी होणे आवश्यक होते हे तर खरेच, पण शिवाय सगळ्यात महत्त्वाची माहिती मिळविण्याचा तोच मार्ग होता आणि आमच्यात व इतर सभासदांत सामंजस्य निर्माण होण्याच्या दृष्टीनेही त्याची जरूर होती. आम्ही त्यांचे सहकारी आहो अशी खात्री पटल्यावरच सभासद त्यांच्या जीवनातील ( आमच्या संशोधनाच्या दृष्टीने ) महत्त्वाच्या अशा गोष्टी आमच्याशी बोलू लागत.

आम्ही त्यांच्याबरोबर काम करीत असू एवढेच नव्हे तर सामूहिक जेवणघरात त्यांच्याबरोबर जेवत असू, सामूहिक स्नानगृहात त्यांच्याबरोबर आंघोळी करीत असू, त्यांच्या सभा-समारंभांना हजर राहात असू आणि त्यांच्या खोल्यांत जाऊन त्यांना भेटण्यात किंवा त्यांना आमच्या खोल्यांत बोलावून त्यांचे आदरातिथ्य करण्यात आमचा

संध्याकाळचा बहुतेक वेळ घालवीत असू. मात्र आम्ही नेहमीच सहभागी निरीक्षकांच्या भूमिकेत वावरत होतो. म्हणून शेतात ऐकलेली संभाषणे, सभांमधून झालेली भाषणे, अनेक प्रसंगांमध्ये दिसून आलेली वागणूक आणि पुष्कळ सभासद आमच्याशी चर्चा करताना आपले जीवनाबद्दलचे जे विचार आम्हांला सांगत त्यामधून गोळा झालेली माहिती, अशी आमची एकूण अभ्याससामग्री आहे.

त्यामुळेच हा एक प्रकारचा " प्रयोगशालेय " अभ्यास म्हणता येईल. कारण आवश्यक माहिती मिळविण्यासाठी संख्याशास्त्रीय नमुना–पाहणीपद्धत उपयोगात न आणता यात प्रकरणाभ्यासपद्धतीचा अवलंब केलेला आहे. या अभ्यासपद्धतीचे काही गुण असतील तर ते तिच्यातील उणीवांचेच म्हणावे लागतील. या म्हणण्याचा अर्थ असा की जी केवळ दैनंदिन व्यवहारामधूनच मिळते पण संख्याशास्त्रीय तक्त्यांमधून मिळत नाही अशी कितीतरी माहिती या पद्धतीने उपलब्ध झालेली आहे. इतकेच नव्हे तर सभासदांची मूल्ये आणि त्यांचे दृष्टिकोण याबद्दलची आमची बहुतेक माहिती ही त्यांच्या वागणुकी-वरून काढलेल्या निष्कर्षांवर किंवा संभाषणाच्या ओघात त्यांनी काढलेल्या उद्‌गारांवर आधारलेली असल्यामुळे औपचारिक मुलाखतींच्या प्रसंगी माणसे स्वतःभोवती बचावाचे जे कडेकोट उभारतात त्यांची अडचण तीत आलेली नाही.

* * *

प्रकरण : २ :

# किबुट्झ संस्कृतीचे नैतिक मूलाधार

*किबुट्झचे सामर्थ्य त्याच्या मूलभूत समाजप्रवणतेत आहे. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात व्यक्ती आणि समूह यांच्यात पूर्ण ऐकात्म्य साधणे, प्रत्येक व्यक्तीचा अधिकतम विकास घडवून आणणे ...आणि माणसां-माणसांमधील नैतिक बंध अधिक दृढ करीत राहणे हा या समाजप्रवणतेचा अर्थ आहे.*

किबुट्झ तत्त्वप्रणालीवरील एका निवेदनावरून[1]

वरील अवतरणावरून असे ध्यानात येईल की रूढ पद्धतीने किर्यात येदिदिमची भौतिक परिस्थिती किंवा त्याची अर्थव्यवस्था यांच्या वर्णनाने या ग्रंथाची सुरुवात केली असती तर किबुट्झच्या संस्कृतीचे अंतरंग स्पष्ट झाले नसते. किर्यात येदिदिम हे एक शेती करणारे खेडे आहे, त्यातील स्त्रीपुरुष एक समान भौगोलिक क्षेत्र व्यापतात आणि सहकारी पद्धतीने जमिनीची मशागत करून आपली उपजीविका करतात हे खरे आहे. परंतु याशिवाय, आणि मुख्यतः, किर्यात येदिदिम म्हणजे समान श्रद्धा बाळगणाऱ्या आणि ती प्रत्यक्षात उतरविण्यासाठी एकत्र आलेल्या लोकांचा एक सहानुबंध आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे. किर्यात येदिदिममध्ये राहणे म्हणजे किबुट्झचा सभासद बनणे. आणि किबुट्झमधील सभासदत्व हे नुसते ग्रामसभेत मत देणे, गव्हाच्या शेतात ट्रॅक्टर चालविणे, किंवा एकाकी सुंदरशा खेडेगावात राहणे यापेक्षा निश्चितच अधिक काहीतरी आहे. किबुट्झचा सभासद बनणे याचा खरा अर्थ किबुट्झचा एक "साथी"[2] बनणे असा आहे, म्हणजेच किबुट्झ ज्या सामाजिक, आर्थिक आणि राष्ट्रीय आदर्शांचा अंगीकार करतो त्यांना वाहून घेणे असा आहे. किर्यात येदिदिमची स्थापना होण्यापूर्वीच हे आदर्श तयार झालेले होते, किंबहुना, या आदर्शांना प्रत्यक्षात आणण्याच्या उद्देशानेच किर्यात

---

१. किबुट्झ आणि त्याचा संघ ( फेडरेशन ) यांच्या अधिकृत प्रकाशनांतून आणि भाषणांतून घेतलेली सगळी अवतरणे मूळ हिब्रू भाषेतून लेखकाने भाषांतरित केलेली आहेत.

२. **हाव्हर** ( अनेकवचन **हाव्हरिम** ) म्हणजे किबुट्झचा सभासद. या शब्दाचा **अक्षरशः** अर्थ "सहकारी" किंवा "साथी".

येदिदिमची स्थापना झाली होती.[3] म्हणूनच किर्यात येदिदिमचे स्वरूप समजावून घ्यायचे असेल तर हे आदर्श समजावून घेतले पाहिजेत.

सबंध किबुट्झ संस्कृती ज्या जवळजवळ एकमात्र आणि सर्वश्रेष्ठ तत्त्वावर उभारलेली आहे ते तत्त्व म्हणजे "शारीरिक श्रमांची नैतिक प्रतिष्ठा" हे होय. आज सर्व किबुट्झ चळवळ एका अतिशय आणीबाणीच्या परिस्थितीतून जात असताना हे "स्वश्रमा" चे तत्त्व किबुट्झच्या मूळ आदर्शाविषयीच्या निष्ठेचे परिमाण बनले आहे हा काही योगायोग नव्हे. किर्यात येदिदिमचे संस्थापक हे बहुतेक बुद्धिजीवी होते आणि शारीरिक श्रम ही त्यांच्या सवयीची गोष्ट नव्हती; त्यांच्या दृष्टीने ती एक भक्तिभावाने करण्याची क्रिया, एक "पवित्र" गोष्ट होती. श्रम म्हणजे मनुष्याच्या गरजा भागविण्याचे नुसते एक साधन असे त्यांना वाटत नव्हते. उलट श्रम हीच माणसाची सर्वांत महत्त्वाची गरज आहे अशी त्यांची भावना होती आणि या गरजेची पूर्ती हेच त्यांना साध्य वाटत होते. "श्रम हेच आमच्या जीवनाचे सार आहे" असे किबुट्झचे एक घोषवाक्य आहे. म्हणून श्रमाला दिली जाणारी नैतिक प्रतिष्ठा हाच किबुट्झ जीवनाचा पाया आहे असे म्हणता येईल.

अर्थात् श्रमाकडे बघण्याचा हा दृष्टिकोण किर्यात येदिदिमच्या संस्थापकांपासून प्रथम सुरू झाला असे नाही.[4] श्रमप्रतिष्ठेचे तत्त्व संस्थापकांच्या परंपरेशी फार पूर्वीपासून एकजीव झालेले होते. १८८२ च्या सुमारास रशियन ज्यूंची पहिली तुकडी देशांतर

---

३. **Co-operative Living in Palestine** या ग्रंथात इन्फील्डने लिहिले आहे की किबुट्झचा जन्म "पूर्वीच्या आदर्शवादी वसाहतींप्रमाणे पूर्वकल्पित सिद्धांतांवर बेतलेल्या एका नव्या समाजरचनेच्या साच्यात मुद्दाम बसविण्याच्या प्रयत्नातून झालेला नाही. उलट इतर सर्वसामान्य समाज जसे घडत जातात तसाच तोही घडत गेला. त्याला जे विशिष्ट स्वरूप प्राप्त झाले ते मुख्यतः पॅलेस्टाइनमधील असाधारण परिस्थितीशी जुळवून घेण्याच्या प्रयत्नात झाले. आपले अस्तित्व टिकविण्यासाठी ही विशिष्ट प्रकारची सामाजिक रचना अंगीकारणे त्याला अपरिहार्य होते." (पृ. २५) हे विधान अगदी प्रारंभीच्या किबुट्झ वसाहतींना लागू पडत असले तरी किर्यात येदिदिमला किंवा युरोपीय झिऑनवादी युवक चळवळींनी सुरू केलेल्या इतर बहुतेक किबुट्झ वसाहतींना लागू पडत नाही. किर्यात येदिदिमचे आदर्श आणि ते प्रत्यक्षात आणण्यासाठी अवश्य असलेल्या समाजरचनेचे तत्त्वज्ञान त्याच्या स्थापनेपूर्वीच तयार झालेले होते.

४. संस्थापक = **व्हातिक** ( अनेकवचन **व्हातिकिम** ). याचा शब्दशः अर्थ "जुना आणि जाणता" ( इंग्रजी "व्हेटरन" ) असा आहे. जुन्या वसाहतवाल्यांना नवागतांपासून वेगळे ओळखण्यासाठी इस्रायलमध्ये हा शब्द वापरतात. किबुट्झच्या संदर्भात तो किबुट्झच्या संस्थापकांना वापरतात.

करून पॅलेस्टाइनला आलो त्यावेळीच जमिनीवर कष्ट करण्याचे ध्येय आकाराला येत होते."

एक प्रवर्तक म्हणतो :

"शेतकऱ्या, मानवांच्या समाजात स्वतंत्र मानव म्हणून जग, पण जमिनीचा मात्र गुलाम हो. प्रतिदिनी गुडघे टेकून तिला अभिवादन कर. तिची प्रेमाने नांगरणी कर— आणि असे केलेस तर तिचे दगडगोटेसुद्धा तुला वरदान देतील ! आणि या गुलामगिरीत तू जमिनीची मशागत करणारा आहेस याची आठवण ठेव ! 'पॅलेस्टाइनच्या जमिनीची मशागत करणारा' ! हे आपल्या लोकांचे मानाचे बिरुद झाले पाहिजे."[६]

परंतु सर्वांत महत्त्वाचा प्रभाव पडला तो दुसऱ्या लाटेच्या ( १९०४–१९१४ ) अग्रणींचा आणि विशेषेकरून ए. डी. गॉर्डन ( १८५६–१९२२ ) या मजूर चळवळीच्या द्रष्ट्याचा. गॉर्डननेच "श्रमधर्म" ( "दि रिलिजन ऑफ लेबर" ) हा शब्दप्रयोग शोधून काढला. त्याच्या मते श्रम ही एक सर्जक क्रिया असून एक अंतिम मूल्यही आहे. त्याची शिकवण अशी होती की श्रमांमधूनच मनुष्य स्वतःशी, समाजाशी व निसर्गाशी तादात्म्य पावतो. मात्र हे सोपे नाही असे त्याने बजावले आहे :

जाणीवपूर्वक स्वश्रमावलंबन ही जगण्याची नैसर्गिक रीत आहे. पण नेवढीच सोडून इतर सर्व प्रकारच्या जीवनपद्धतींची सवय झालेल्या लोकांना एक जागृत आणि सहज-स्वभावी असा श्रमिकांचा वर्ग बनणे ही गोष्ट इच्छाशक्तीच्या प्रत्येक धाग्याला ताण दिल्या-शिवाय शक्य होणार नाही. मनुष्याचा जमिनीशी संबंध आणि त्याचा तिच्यावरील हक्क प्रस्थापित करणे एवढा एकच श्रमाचा हेतु नाही, तर राष्ट्रीय संस्कृतीची उभारणी करण्यातला तो एक प्रमुख घटक आहे. श्रम हे मानवजातीचे भविष्यकालीन ध्येय आहे आणि कोणतेही मोठे ध्येय हे सूर्यप्रकाशासारखे आरोग्यदायी असते. गौरवाच्या अर्थाने "वेड" हा शब्द वापरून मी असे म्हणेन की श्रमांचे वेड लागलेली माणसे आम्हांला हवी आहेत.[७]

---

५. झिऑनवादी चळवळीच्या सुरुवातीपासून देशांतरितांच्या लागोपाठ येणाऱ्या "लाटां"च्या ( **अलिया** ) क्रमानुसार पॅलेस्टाइनमधल्या वसाहतींचा इतिहास विभागण्याची रूढी आहे. "पहिली लाट" ( १८७२–१९०४ ) बहुशः केवळ व्यवस्थापक शेतकऱ्यांची होती. ते खेड्यांतून स्थायिक होऊन अरब मजुरांकडून आपल्या मळ्यांची मशागत करून घेत असत. स्वश्रमाचे तत्त्व यांपैकी फारच थोड्यांनी स्वीकारलेले होते तरी या कल्पनेचे बीज मात्र ह्या अलियाइतके जुने होते हे पुढे दिलेल्या अवतरणा-वरून दिसून येईल. श्रमप्रतिष्ठेचे तत्त्व आणि निरनिराळ्या कामगार संस्था यांची वाढ झाली ती मात्र "दुसरी लाट" ( १९०४–१९१४ ) आणि "तिसरी लाट" ( १९१४–१९२४ ) यांच्याकडून. किर्यात येदिदिमचे संस्थापक देशांतरितांच्या तिसऱ्या लाटेच्या सुरुवातीच्या काळी पॅलेस्टाइनमध्ये आले होते. पाहा : Lotta Levensohn, **Outline of Zionist History**.

६. Kurland, पृ. ७.

७. तत्रैव, पृ. ९.

गॉर्डनच्या " श्रमधर्मा "चा त्याच्या पिढीतील झिऑनवादी नेत्यांवरच प्रभाव पडला असे नव्हे तर पॅलेस्टाइनमधल्या ज्यूंच्या श्रमिक चळवळींच्या नंतरच्या इतिहासालाही त्याने वळण दिले. म्हणून, कियांत येदिदिममध्ये श्रमधर्मावर जो जोर आहे तो इतर सामूहिक आणि सहकारी वसाहतींमध्येही आहे एवढेच नव्हे तर, इस्रायलमधील सबंध मजूर चळवळीचेही तेच ध्येय आहे.

शरीरश्रमांकडे बघण्याच्या ह्या वृत्तीला एक विशेष अर्थ आहे. संस्थापकांच्या मध्यमवर्गीय पार्श्वभूमीवरच तिची मानसशास्त्रीय कारणमीमांसा करता येईल. इस्रायलमध्ये येण्यापूर्वी त्यांना शारीरिक श्रम करावे लागले नव्हते, इतकेच नव्हे तर ज्या संस्कृतीत श्रम आणि श्रमिक हे कमी दर्जाचेच मानले जात असत त्या संस्कृतीत ते वाढले होते. पूर्व युरोपातील ज्या खेड्यात ( श्टेट्ल ) संस्थापक जन्मलेले होते त्यांमध्ये सामाजिक दर्जा कमी असलेल्यांना प्रॉस्टे असे नाव होते. प्रॉस्टे म्हणजे यिडिश भाषेत " असंस्कृत " किंवा " ग्राम्य ". अकुशल कामगारांकडे बघण्याचा श्टेट्लचा दृष्टिकोण या शब्दांत अगदी स्पष्ट दिसून येतो. श्टेट्लमध्ये :

> कारागीर असण्यापेक्षा विक्रेता असणे चांगले. विक्रेता आपले डोके वापरतो आणि कामगार नुसतेच शरीरबळ वापरतो.
>
> चांगल्या प्रतिष्ठित घराण्यातल्या माणसाला, आर्थिक गरजेपोटीसुद्धा, शारीरिक श्रम करावे लागणे म्हणजे आपत्तीच वाटे. कारण विद्याभ्यासंगाला वाहिलेले जीवन हा जो सामाजिक आदर्श त्याचे अगदी विरुद्ध टोक म्हणजे शरीरश्रम होत अशी त्याची धारणा असे.[8]

म्हणून, शरीरश्रमाची एक अंतिम मूल्य म्हणून प्रतिष्ठापना करणे म्हणजे संस्थापकांच्या दृष्टीने एक सांस्कृतिक क्रांतीच होती; ही क्रांती घडवून आणण्यासाठी त्यांना आपल्या अंगवळणी पडलेली मूल्ये आणि श्रमाची सवय नसलेले आपले स्नायू या दोघांनाही काबूत आणावे लागले. " शरीरश्रमांशी मुकाबला " ( " कॉन्क्वेस्ट ऑफ लेबर " ) हे त्यांचे पहिले साध्य बनले यात फारसे नवल नाही.[9]

एकोणिसाव्या शतकात अमेरिकेमध्ये ज्या अनेक आदर्शवादी श्रमिक वसाहती अस्तित्वात आल्या त्यांच्या अर्थाने कियांत येदिदिम ही श्रमिक वसाहत नाही. बव्हंशी मध्यमवर्गीय अशा बुद्धिमंतांनी स्वखुषीने श्रमिक बनण्याचे ठरवून स्थापन केलेली ही

८. Zborowski and Herzog, पृ. २४७.

९. **किबुश-हा- आवोदा** ( " कॉन्क्वेस्ट ऑफ लेबर " ) याला येथे निर्देश केलेल्या व्यतिरिक्त दुसराही अर्थ आहे. दुसऱ्या लाटेच्या प्रारंभीच्या काळी ज्यू जमीनमालक कमी मजुरीवर मिळणाऱ्या अरबांना कामाला लावून शेती करीत. त्या वेळी ज्यूंना बंद असलेल्या आर्थिक क्षेत्रात त्यांचा प्रवेश घडवून देणे हे ज्यू मजूर चळवळीचे एक महत्त्वाचे ध्येय होते. ह्यालाही " कॉन्क्वेस्ट ऑफ लेबर " किंवा " श्रमविजय " असे म्हणत असत.

वसाहत आहे; आणि असे ठरविताना त्यांनी पारंपरिक श्रेष्ठकनिष्ठत्व आणि खालच्या सामाजिक पातळीकडून वरच्या पातळीकडे सरकण्याची माणसांची सनातन ओढ या दोन्हींची उलटापालट केली. समाज सोपानाच्या वरच्या पायरीवर "चढण्या"ची महत्त्वाकांक्षा बाळगण्याऐवजी तिच्याबद्दल "खाली उतरण्या" ची इच्छा त्यांनी बाळगली. युरोपीय मध्यमवर्गीय संस्कृतीत व्यापारधंदा आणि ज्यूइश संस्कृतीत विद्वत्ता यांना महत्त्व होते; त्याऐवजी साबांनी शरीरश्रम हेच सर्वोच्च व्यावसायिक उद्दिष्ट मानले हे ध्येय मुख्यतः आध्यात्मिक स्वरूपाचे आहे. आत्मतत्त्वाची ओळख होण्याचे ते साधन आहे, हे मात्र येथे आवर्जून सांगितले पाहिजे. प्रवर्तकांच्या लोकगीतात म्हटल्याप्रमाणे, "पॅलेस्टाइनला आम्ही आलो आहो ते घडवायला आणि (जमिनीतून) घडले जायला." श्रमाकडे बघण्याचा हा टॉलस्टॉयवादी दृष्टिकोण फक्त स्वमरंजनात मश्गुल होणाऱ्या शहरी बुद्धिमंतांनाच शोभेसा आहे असे म्हणणे फारसे धाडसाचे होणार नाही.

"शरीरश्रमाचे नैतिक मूल्य" या तत्त्वाचा भर "स्व-श्रम" या शब्दसंहतीतील दुसऱ्या, म्हणजे "श्रम" या शब्दावरच नसून "स्व" या पहिल्या शब्दावरही आहे, आणि यालाही दुसऱ्याइतकेच महत्त्व आहे. श्रमिक चळवळीच्या या सर्वसामान्य तत्त्वाचा किबुत्झच्या संदर्भात अर्थ असा की किबुत्झच्या बाहेरचा कोणीही कामावर घ्यायचा नाही आणि सर्व काम किबुत्झ सभासदांनीच करायचे. याला घरबांधणी किंवा प्रशालेत भाषा शिकविणे इत्यादी ज्या कामांचे शिक्षण साबांना मिळालेले नसते अशा काही प्रकारच्या कामांचे अपवाद केले जातात. मात्र इतर प्रकारची कामे कितीही कठीण अगर कंटाळवाणी असली तरी त्यांच्या बाबतीत अपवाद केला जात नाही. तीन नैतिक कारणांस्तव भाडोत्री श्रमाला विरोध असतो. एक, आधीच सूचित केल्याप्रमाणे, शरीरश्रमाभोवती एक गूढरम्यतेचे वलय आहे. या गूढरम्यतेमुळे शरीरश्रमाची प्रतिष्ठा आणि सर्जकता आणि भूमीशी दृढ नाते जोडण्याची जरूरी यांवर भर दिला जातो. दोन, भाडोत्री मजूर लावण्याची प्रथा सुरू केली तर अरब मजुरांची संख्या वाढेल ही भीती. पॅलेस्टाइनमध्ये अरब बहुसंख्य होते त्या काळात ही भीती प्रथम निर्माण झाली. तसे झाले असते तर किबुत्झ वसाहत ही अरब मजुरांच्या मेहनतीवर जगणाऱ्या सुखवस्तू मळेवाल्यांची वसाहत झाली असती. शिवाय किर्यात येदिदिमची निष्ठा समाजवादी होती त्यामुळे "अतिरिक्त मूल्य" तिरस्करणीय मानले जात होते, आणि भाडोत्री मजूर नेमणे म्हणजे त्यांचे शोषण करणे अशी त्यांची समजूत होती. भाडोत्री श्रमाला विरोध आणि स्व-श्रमावर भर असण्याचे हे तिसरे नैतिक कारण.[10]

---

१०. किर्यात येदिदिमच्या अंतर्गत आणि बाह्य संबंधांमध्ये या भाडोत्री श्रमाला असलेल्या विरोधामुळे पुष्कळच तणाव निर्माण झाले आहेत. देशात येणाऱ्या स्थलांतरितांच्या लोंढ्यांना (या बहुतेक लोकांना किबुत्झचे सभासद व्हायची इच्छा नाही)

थोडक्यात, किबुट्झ साथींचा समाज म्हणजे उत्कट वर्गजाणीव असलेला श्रमिक समाज आहे. किर्यात येदिदिममधली एखाद्याची प्रतिष्ठा मुख्यतः तो आपले काम किती निर्दोषपणे व किती निष्ठेने करतो यावरून ठरविली जाते यात आश्चर्य नाही.

मात्र सर्वच कामाचे सारखेच मूल्य असते असे नाही. शरीरश्रमाची प्रतिष्ठा सर्वोच्च मानली जाते. एखाद्या कामात शरीरश्रम जितके कमी तितकी त्या कामाची प्रतिष्ठा कमी. खरे म्हणजे किर्यात येदिदिम हा अतिशय सुसंस्कृत समाज आहे, बौद्धिक आणि कलात्मक जीवनाचा त्याला ध्यास आहे, तरीसुद्धा नुसत्या बौद्धिक कामाला

---

काम मिळवून देणे हा इस्रायली सरकारपुढे पेच आहे, आणि किबुट्झ वसाहतींनी या लोकांना मजुरीला लावावे म्हणून सरकारने त्यांना आवाहन केले आहे. पुष्कळशा किबुट्झ वसाहतींनी या विनंतीला नकार दिल्यामुळे त्यांच्याविरुद्ध खूपच असमाधान उत्पन्न झाले आहे, आणि त्यांच्यावर " ज्यूविरोधी " आणि " बेजबाबदार " असल्याचे आरोपही करण्यात आले आहेत. तरीसुद्धा, भाडोत्री मजुरांचा उपयोग करायचाच नाही या आपल्या तत्त्वाला संघ दृढपणे चिकटून राहिला आहे; हा बदल जर केला तर किबु-ट्झची सबंध रचनाच बदलून जाईल, इतरांच्या कामावर देखरेख करणाऱ्या तज्ज्ञांचा आणि व्यवस्थापकांचा " ऐषआरामी " वर्ग असे किबुट्झ सभासदांचे स्वरूप बनेल अशी त्याची धारणा आहे. ज्या दुसऱ्या दोन संघांच्या सभासदांनी भाडोत्री श्रमाची प्रथा स्वीकारली त्यांच्या बाबतीत हे भविष्य खरे ठरलेले आहे.

परंतु भाडोत्री श्रमाचा उपयोग केला तर सरकारचाच एक प्रश्न सुटेल असे नव्हे तर किबुट्झचाही एक तितकाच निकडीचा प्रश्न सुटेल. उदाहरणार्थ, किर्यात येदिदिमचा अत्यंत तीव्र आर्थिक प्रश्न कोणता असेल तर तो म्हणजे मनुष्यबळाची टंचाई. किबुट्झ वसाहतींच्या सुविधांचा विस्तार होऊ लागला तसतसे स्त्रियांना शेतीच्या क्षेत्रातून बाहेर काढावे लागले आणि मजूर टंचाईच्या प्रश्नाने गंभीर स्वरूप धारण केले. यातून सरळ मार्ग म्हणजे कामगारांना रोजावर ठेवणे हा आहे, आणि काही साथी उघडपणे याचा पुरस्कारही करतात. आतापर्यंत अर्थव्यवस्थेत फारसा बिघाड झालेला नाही याचे कारण या समस्येवर काही तात्पुरत्या उपाययोजना करण्यात आल्या आहेत. उदाहरणार्थ, ( १ ) फणसाच्या किंवा बटाट्याच्या खास हंगामासारख्या वेळेची विशेष कामे प्रशाळे-तल्या विद्यार्थ्यांकडून करून घेणे, ( २ ) तातडतोब करायला पाहिजेत अशा विशेष कामांसाठी म्हणून शनिवारची सुट्टी रद्द करणे आणि सबंध किबुट्झ त्या कामासाठी राबविणे, ( ३ ) किबुट्झमध्ये राहावयास आलेल्या युवकगटांकडून आणि त्याचप्रमाणे किबुट्झमध्ये शिक्षणासाठी आलेल्या विविध गटांकडून काम करून घेणे. श्रमपुरवठ्याचा हा तिसरा ओघ आटत आला तर मात्र किबुट्झला भाडोत्री मजूर लावणे किंवा काही तडजोडीच्या स्वरूपाचा उपाय शोधून काढणे याशिवाय निराळा पर्याय उरणार नाही.

त्यात फार मोठी प्रतिष्ठा मिळू शकत नाही. शरीरश्रमाच्या वेगवेगळ्या प्रकारात शेती-विषयक श्रमांना अग्रस्थान असते. शेतकीच्या विविध शाखांमध्येही प्रतिष्ठेच्या वेगवेगळ्या साचेबंद श्रेणी रूढ झाल्या आहेत. जे फळबागांत आणि द्राक्षमळ्यांत काम करतात ते त्यातल्यात्यात बुद्धिजीवी, सुखासीन व कमताकद समजले जातात. गुराखी हे स्वभाळू आणि थोडेसे आळसाकडे प्रवृत्ती असणारे मानले जातात. उलट, **फालाहिम** म्हणजे धान्याच्या शेतात राबणारे श्रमिक हे प्रायः कष्टाळू आणि ताकदवान समजले जातात. त्यांना देशभर मान मिळतो. शिवाय पहिले फालाचिम हे देशाचे नेते आणि प्रमुख श्रमिक संघटनांचे निर्माते बनले अशीही समजूत आहे. या निरनिराळ्या व्यवसायांना एकमेकांच्या तुलनेने शरीरबळ किती लागते हे सांगणे अवघड आहे. पुष्कळशा बाबतीत फालाचिमचे काम सर्वांत जास्त मेहनतीचे असते हे बहुतेक खरे आहे, आणि काही विशिष्ट वेळी – उदाहरणार्थ कापणीच्या हंगामात–जेव्हा अक्षरशः चोवीस तास काम असते त्यावेळी त्यांना जवळ जवळ मानवी शक्तीपलीकडचे श्रम करावे लागतात. परंतु फालाचला मिळणाऱ्या प्रतिष्ठेचे दुसरे एक कारण आहे आणि कामाच्या अवघड-पणाशी त्याचा फारसा संबंध नाही. शिवाय, हे कारण अधिक सयुक्तिकही दिसते. किर्यात येदिदिमच्या अर्थव्यवस्थेविषयी पुढे आपण चर्चा करणार आहोत त्यावेळी ध्यानात येईल की किबुट्झमध्ये " उत्पादक काम " आणि " सेवा " यांत फरक केला जातो. पहिल्या प्रकारच्या कामात जास्त प्रतिष्ठा असते आणि त्यामधून किबुट्झला रोख रकमेची प्राप्ती होते. किंबहुना असे म्हणता येईल की या प्रकारच्या कामातून रोख रकमेची प्राप्ती होते म्हणूनच त्याला अधिक प्रतिष्ठा लाभते. धान्यपीक ( **फालहा** ) ही किबुट्झ अर्थव्यवस्थेत सर्वांत अधिक अर्थप्राप्ती करून देणारी शाखा असल्यामुळे ती सर्वांत महत्त्वाची मानली जाते. या शाखेचे आर्थिक महत्त्व असे असल्यामुळे तीत काम करणाराला सामाजिक महत्त्व प्राप्त होते.

किर्यात येदिदिममध्ये कामाला दिलेले महत्त्व सतत प्रत्ययास येते आणि बहुतेक प्रत्येकजणाच्या वागणुकीत त्याचे प्रतिबिंब उमटलेले असते. कामाची सवय हाडीमासी इतकी खिळलेली आहे, की योग्य कारणासाठी रजा घेतली तरी रजा घेणाऱ्याच्या मनात अपराधीपणाची भावना निर्माण होते. उदाहरणार्थ, प्रस्तुत लेखक एका शेतात एका सदस्येबरोबर तीन महिने काम करीत होता. ह्या बाईची कामाची धमक आणि जोम मोठा होता आणि ती विश्रांतीही क्वचितच घेई. ह्या शरीरश्रमांनी तिला फार यातना होत; तिला ऊन सहन होत नसे आणि तिच्या हातापायांना सतत वेदना होत. पण आश्चर्याची गोष्ट अशी की हे लेखकाच्या ध्यानात फार उशिरा आले. दुसरे एक उदाहरण असे की देशांतर करून आलेल्या लोकांच्या छावणीत काम करण्यासाठी एक सदस्या आपला एक दिवस देत असे. ती एकदा आजारी पडली आणि डॉक्टरने तिला पूर्ण विश्रांती घेण्यास सांगितले. पण आपल्याला कामावर परत जायला मिळावे म्हणूनच ती कुरकुरत होती. छावणीत तिच्या जागी दुसरे कोणी काम करायला नसल्याचे

तिच्या कानी आले तेव्हा तर बिछान्यावरून उठून कामावर परत जाण्याचा हट्ट तिने धरला. किबुट्झच्या परिचारिकेने आम्हांला सांगितल्याप्रमाणे कोणीही आजारीपणाच्या नावाखाली कामचुकारपणा किंवा कामाची टाळाटाळ करीत नाही हेही या संदर्भात लक्षात घेण्यासारखे आहे. एखाद्या परक्या माणसालसुद्धा कामाची ही आच किती तीव्रपणे लागू शकते हे प्रस्तुत लेखकाच्याच एका अनुभवावरून स्पष्ट करता येईल. लेखकाने अर्धा दिवस काम करायचे आणि उरलेल्या अर्ध्या दिवसाचे पैसे किबुट्झला देऊन आपला खर्च भागवायचा असे उभयपक्षी ठरलेले होते. अभ्यास संपतासंपता त्याच्या ध्यानात येऊ लागले की अभ्यासाला अधिक वेळ दिल्याशिवाय त्याचा संशोधनप्रकल्प पुरा होणे अशक्य आहे. दोन महिने फक्त एकचतुर्थांश दिवस काम करायचे व बाकीचा खर्च रोख पैशांत देऊन हिशेब पूर्ण करायचा अशी परवानगी त्याने किबुट्झच्या कचेरीतून मिळविली. याप्रमाणे एकचतुर्थांश वेळेच्या कामाची त्याने सुरुवात केल्यावर मात्र त्याच्या असे लक्षात आले की आपल्याकडून फारच थोडे काम होत आहे. त्याला स्वतःलाच अतिशय अपराधी वाटू लागले. खरे म्हणजे तो नियमित वेळ काम करीत नसल्याचे कोणी बोलले नाही किंवा बहुधा ते कुणाला माहीतही नसेल. पण आपण आपली जबाबदारी टाळीत आहो असे त्याचे त्यालाच वाटू लागले. सभासदांना टाळण्यासाठी तो दिवसा सार्वजनिक ठिकाणांपासून दूर राहू लागला. अशा रीतीने श्रमाबद्दलच्या या भावनेचा प्रभाव एवढा मोठा आहे की सर्वस्वी परक्या माणसावरही थोड्या महिन्यांतच तिचा असर पडतो.[११]

शरीरश्रमाला इतके महत्त्व असल्यामुळे एखादी व्यक्ती आपल्या कामाच्या जबाबदाऱ्या टाळीत असेल. किंवा आपले काम नीटपणे करीत नसेल तर तिला इतर सहकाऱ्यांकडून मान मिळत नाही. एखाद्या व्यक्तीच्या ठिकाणी इतर कोणतेही गुण असोत, ती जर **बातलान** म्हणजे आळशी असेल तर किर्यात येदिदिममधल्या प्रतिष्ठेच्या श्रेणीत तिला सर्वांत खालचे स्थान मिळते.

किबुट्झ संस्कृतीचे दुसरे नैतिक तत्त्व म्हणजे समूहाने निर्माण केलेल्या आणि समूह वापरीत असलेल्या संपत्तीवर सर्वश्र समूहाचाच मालकी हक्क असला पाहिजे.

---

११. लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाचा काही भागही अर्थातच या उदाहरणात विचारात घ्यावा लागेल. परंतु दुसऱ्या एका संशोधन प्रवासातल्या त्याच्या अनुभवांशी तुलना करता किबुट्झमधल्या त्याच्या प्रतिक्रिया विशेष अर्थपूर्ण आहेत असे ध्यानात येईल. मायक्रोनेशियाची संस्कृतीही सहकारी पद्धतीचीच आहे. तिचा अभ्यास करण्यासाठी लेखकाने आपला सर्व वेळ संशोधनातच घालविला. तो पैसेही देत नव्हता किंवा त्यांच्या अर्थव्यवस्थेत कामही करीत नव्हता. असे असूनही ते लोक त्याला अन्न आणि इतर आवश्यक बाबी पुरवीत. पण लेखकाला कधीही अपराधी वाटले नाही कारण या संस्कृतीच्या मूल्यव्यवस्थेत श्रमापेक्षा विश्रामाला अधिक महत्त्वाचे स्थान आहे.

म्हणूनच संपत्तीच्या सार्वजनिक मालकीवर किबुट्झची अर्थव्यवस्था आधारित आहे. किबुट्झच्या वस्तीची आणि मशागतीची जमीन ही कोणत्याही व्यक्तीच्या किंवा कुटुंबाच्या- किंबहुना किबुट्झच्याही स्वतःच्या मालकीची नसते. खरे म्हणजे ती सबंध राष्ट्राच्या मालकीची असते. केरेन कायेमेत ( ज्यू राष्ट्रीय निधी ) या राष्ट्रीय संघटनेने वर्गण्या जमा करून ती विकत घेतलेली असते. केरेन कायेमेत नव्याण्णव वर्षांच्या कराराने ही जमीन किबुट्झला भाड्याने देते. या जमिनीबद्दल मूळ किंमत, अधिक तीवरील सुधारणेचा खर्च यांच्या दोन टक्के वार्षिक भाडे किबुट्झ देते ( आणि तेसुद्धा सुरुवातीच्या पाच वर्षांनंतर ). जमीन राष्ट्रीय मालकीची असणे हे एक अत्यावश्यक नैतिक मूल्य मानले जाते. कारण त्यामुळे जमिनीची सट्टेबाजी, अन्यत्रवासी जमीनमालकी आणि भाड्याचे "अनर्जित" उत्पन्न इत्यादी "अनिष्ट गोष्टींना" पायबंद बसतो. शिवाय, एका बाजूला सुखवस्तू जमीनदार लोक आणि दुसऱ्या बाजूला भूहीन शेतकरी असा ( दुभंगलेला ) समाज उत्पन्न होण्याचे टळते.

किर्यात येदिदिमची जमीन राष्ट्राच्या मालकीची असली तरी इतर सर्व मालमत्ता किबुट्झ सभासदांच्या सामूहिक मालकीची असते. तत्त्वतः, सभासदाला मिळालेल्या छोट्या भेटवस्तू, आणि वार्षिक नऊ इस्रायली पौंड ( म्हणजे सुमारे नऊ डॉलर्स ) "सुट्टीच्या भत्त्यातून" त्याने घेतलेल्या वस्तू सोडल्यास व्यक्तीचे स्वतःच्या मालकीचे काहीच नसते. त्यामुळे सभासद राहातो ते घर, चालवतो ते ट्रॅक्टर्स आणि मालमोटारी, ज्यांची देखभाल करतो ती गुरे, वापरतो ते कपडे आणि खातो ते अन्न हे सर्व किबुट्झच्या मालकीचे असते. खासगी मालमत्ता नष्ट केलेली असल्याने त्याला कामाबद्दल मजुरी मिळत नाही; किबुट्झच्या मालकीच्या घरात राहिल्यामुळे त्याला घरभाडे द्यावे लागत नाही आणि तो किबुट्झच्या जेवणघरातले जेवण घेत असल्यामुळे त्याला अन्नखर्च नसतो. शिवाय किबुट्झच्या वस्त्रालयातून त्याला सर्वांप्रमाणेच कपडे मिळतात. कंगवा, दात घासण्याचा ब्रश यांसारख्या बारीकसारीक वस्तू त्याला किबुट्झच्या भांडारातून मिळतात. तो आजारी पडला तर त्याचे औषधपाण्याचे व इस्पितळाचे बिल किबुट्झ-कडून भागविले जाते. थोडक्यात, व्यक्तीजवळ पैसे नसतात आणि तिला त्यांची जरुरीही नसते. कारण तिच्या आर्थिक गरजा किबुट्झकडून भागविल्या जातात.

सार्वजनिक मालकीच्या तत्त्वाचे मूळही समतेच्या तत्त्वाला किबुट्झ जे नैतिक महत्त्व देतो त्यात आहे. खासगी मालमत्ता आणि तिच्या अनुषंगाने येणारी लाभप्रेरणा आणि स्पर्धा यामुळे बंधुभावाचे पाश नाहीसे होतात अशी किबुट्झची धारणा आहे. किबुट्झची अशी श्रद्धा आहे की, खासगी मालमत्ता अस्तित्वात नसेल तरच आर्थिक वर्गविरहित आणि आर्थिक विषमताविरहित अशी अर्थव्यवस्था प्रस्थापित करणे शक्य होईल आणि परिणामतः अधिक बंधुभाव नांदू शकेल.

अशा रीतीने सामूहिक मालकी हक्काचे तत्त्व किबुट्झ संस्कृतीच्या आणखी एका नैतिक तत्त्वाशी निगडीत आहे. ते तत्त्व म्हणजे सामाजिक व आर्थिक *समता*. किर्यात

येदिदिमजवळ सर्व सभासदांना समान पुरवठा करता येईल इतक्या वस्तू आणि सेवा उपलब्ध नसल्यामुळे त्यांचे वाटप करताना देशात अगोदर आलेल्यांना किबुट्झ अग्रक्रम देते. उदाहारणार्थ पूर्वी एका खोलीची घरे असत; आता नवीन घर बांधणीत दोन खोल्यांची घरे बांधली जात आहेत. मात्र ज्यांना देशात येऊन निदान ३० वर्षे झाली आहेत त्याच लोकांना ही नवी घरे मिळतात. असे काही विशेष अपवाद वजा करता आर्थिक वाटप नेहमी समान असते. कपड्यांचे वाटप करताना सर्व स्त्रियांना दर दोन वर्षांनी एक भारी पोषाख देण्यात येतो आणि एक वर्षाआड एक नेहमीचा साधा पोषाख मिळतो. पुरुषांना दरवर्षी **शबात** ( सॅबाथ ) पँटच्या तीन जोड्या आणि चार शर्ट मिळतात.[१२]

पूर्वी आर्थिक समतेचे तत्त्व आजच्यापेक्षा अधिक अक्षरशः पाळले जात असे. उदाहारणार्थ, सर्वच कपडे सामूहिक मालकीचे असत म्हणून त्यांवर धुलाईच्या वेळी धुलाई-केंद्रात खुणा केलेल्या नसत. त्यामुळे आपण वापरलेले कपडेच त्यात धुवून मिळतील असे नसे. उलट, धुतलेल्या कपड्यांच्या गठ्ठ्यांतील सर्वांत वरच्या घड्या ( पँटस्, शर्टस्, मोजे इ० ) येईल त्याला देण्यात येत. अर्थात यामुळे अतिशय हास्यजनक प्रसंग निर्माण होत. उंच माणसांना लांडे कपडे मिळायचे किंवा बारीक माणसांच्या वाट्याला मोठे थोरले सैल कपडे यायचे. ही **कॉम्यूना अलेफ्** ( पहिल्या सामूहिकाची ) पद्धती आपल्याला नीट बसणारे कपडे हवेत असा आग्रह स्त्रियांनी धरल्यामुळे बदलण्यात आली. निर-निराळ्या मापांच्या कपड्यांवर खुणा करण्यात आल्या. त्यामुळे असे झाले की, एखाद्या साथीला आधीच्या आठवड्यात त्याने वापरलेलेच कपडे परत मिळाले नाहीत तरी निदान त्याच्या मापाचे तरी कपडे साप्ताहिक धुलाईमधून मिळू लागले.

१९३० च्या मध्यावर **कॉम्यूना बेत** ( दुसऱ्या कॉम्यूनची ) पद्धती सुरू करण्यात आली. वापरलेल्या कपड्यांची सभासद फारशी काळजी घेईनात असे दिसून येऊ लागले आणि खराब कपड्यांचे प्रमाण वाढले. जर कपड्यांवर खुणा केल्या आणि प्रत्येक सभासदाला तेच ठराविक कपडे धुलाईकेंद्रातून मिळण्याची व्यवस्था केली तर त्या कपड्यांची काळजी घेण्याबाबत त्याला जबाबदार धरता येईल असे वाटू लागले. हीच पद्धत अद्यापही प्रचारात आहे. तत्त्वतः, इतर वस्तूंप्रमाणेच, सर्व कपडे किबुट्झच्या मालकीचे असतात. परंतु प्रत्येक सभासदाला वार्षिक कपडे-भत्ता मिळतो आणि त्याला मिळणारे कपडे " त्याचे " असतात. म्हणजेच त्याच्या नावाची खूण त्यावर असते. तोच ते वापरतो आणि त्यांची जबाबदारी त्याच्यावर असते.[१३]

---

१२. कामाव्यतिरिक्त इतर वेळी वापरावयाच्या कपड्यांना "पोषाख" ( ड्रेस ) म्हणतात आणि ते बरेच वापरून जुने झाले म्हणजे त्यांचाच कामाच्या वेळचे कपडे म्हणून वापर होतो.

१३. ध्यानात घेण्यासारखी एक महत्त्वाची गोष्ट ही की, सामूहिक कपड्यांबाबत जो निष्काळजीपणा निदर्शनाला आला होता तो जमीन, घरे किंवा इतर भांडवली सामानाबाबत दिसून आला नव्हता.

मूलभूत गरजा भागविण्याच्या बाबतीतील ही औपचारिक समता सोडली तर किबुट्झच्या मूळ व्यवस्थेत ज्या गोष्टींची सोय केलेली नव्हती अशा काही सुखसोयींच्या बाबतीत विषमता निर्माण झाली आहे. किर्यात येदिदिमच्या बाहेर राहणाऱ्या नातेवाइकांकडून काहीजणांना खाद्यपदार्थ, कपडे, फर्निचर इत्यादी स्वरूपाच्या भेटी मिळतात, पण काहींना असे नातेवाइक नसतात. शिवाय, काही व्यक्ती सुट्टीमध्ये किबुट्झच्या बाहेर जाऊन काम करतात आणि अशा प्रकारे मिळवलेल्या पैशांतून आपल्या आवडीच्या वस्तू खरीदतात. काहींना किबुट्झच्या बाहेर नातलग, मित्र वगैरे असतात आणि त्यांच्याकडे जाऊन राहण्याची सोय असते. त्यामुळे त्यांचे सुट्टीचे भत्ते वाचतात, उलट इतरांना ते खाणावळीच्या, हॉटेलच्या बिलापायी खर्चावे लागतात. ज्यांचे पैसे वाचतात त्यांना लहानसहान वैयक्तिक वस्तू घेण्यासाठी ते वापरता येतात. या सर्व प्रकारांनी किबुट्झचे एकेकाळचे वैशिष्ट्य म्हणून असलेल्या संपूर्ण आर्थिक समतेच्या तत्त्वाला थोडीशी मुरड पडली आहे.

मात्र असा एक सर्वसाधारण नियम सांगता येईल की सभासदांचे उत्पन्नातील कौशल्य, किबुट्झमधले त्यांचे आर्थिक महत्त्व, त्यांची प्रतिष्ठा किंवा सत्ता कितीही असो, त्याचा विचार न करता सर्व सभासदांना सारखेच कपडे, सामुदायिक जेवणघरातले सारखेच अन्न व (साधारणपणे) सारखीच घरे राहावयाला मिळतात. व्यक्ती-व्यक्तींच्या कर्तृत्वशक्ती आणि कुशलतेत पुष्कळच फरक असतो या गोष्टीची किबुट्झला जाणीव असूनही (—अगदी प्रारंभीच्या काळी तर अशा फरकांचे अस्तित्वच नाकारण्याची किंवा त्यांकडे दुर्लक्ष करण्याची प्रवृत्ती होती—) त्याचा असा आग्रह आहे की, या फरकांच्या आधारे त्यांना मिळणाऱ्या या सोयीसवलतींमध्ये भेद केला जाऊ नये. समूहाच्या कामाला सर्वांचा सारखाच हातभार जरी लागला नाही तरी सुखसोयी मिळण्यात मात्र सर्वांना सारखाच अधिकार असला पाहिजे.

ह्या वरच्या विधानावरून असे लक्षात येते की, किबुट्झ संस्कृतीमधल्या समतेच्या तत्त्वावर दुसऱ्या एका नैतिक विचाराची मर्यादा पडली आहे—तो विचार म्हणजे गरज. "प्रत्येकाकडून त्याच्या कुवतीप्रमाणे काम व प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणे पुरवठा" या तत्त्वावर किबुट्झचा विश्वास आहे. पण हे तत्त्व पुष्कळदा समतेच्या तत्त्वाशी जुळत नाही. हा संघर्ष मिटविताना बहुधा "गरज" समतेवर मात करते. शेतात काम करणाऱ्या माणसाची उत्पादन करण्याची शक्ती तुलनेने जास्त असली, आणि त्याने इस्रायलच्या कडक उन्हात अतिशय श्रमाचे काम केलेले असले तरी जेवणघरातले सामूहिक साधे अन्नच[14] त्याला मिळते; याउलट कचेरीत काम करणाऱ्या (म्हणजेच

---

(१४) या अभ्यासाचा आणि तत्पूर्वीचा काळ अन्नटंचाईचा होता कारण देशाच्या स्थापनेबरोबर स्थलांतरितांची मोठी संख्या इस्रायलमध्ये आली होती. म्हणून किर्यात येदिदिममधील टंचाई ही राष्ट्रीय घटना होती, नुसती किबुट्झपुरतीच मर्यादित

किबुट्झच्या दृष्टीने कमी प्रतिष्ठेच्या ) एखाद्या सभासदाची उत्पादनक्षमता कमी असली तरी त्याला तब्येतीच्या काही कारणास्तव विशेष प्रकारचे, तुलनेने अधिक सकस, असे जेवण मिळू शकते. मुले असलेला माणूस मुले नसलेल्या माणसापेक्षा अधिक कष्टाचे काम करीत नाही; पण किबुट्झ केवळ त्याच्याच गरजा भागवून थांबत नाही, तर त्याच्या मुलांचीही काळजी घेते. याचा प्रत्यक्षात अर्थ असा होतो की ज्यांना मुले नाहीत किंवा कमी आहेत ते सदस्य ज्यांना मुले आहेत त्या सदस्यांना आपल्या द्रव्यार्जनातून मदत करतात.

किबुट्झ संस्कृती समजावून घेण्याच्या दृष्टीने आणखी महत्त्वाची गोष्ट म्हणजे तिच्यातील सामाजिक समता. तिचा प्रभाव किर्यात येदिदिममध्ये आल्याबरोबर प्रथमदर्शनीच जाणवेल असे नाही, पण किबुट्झ सोडून थोडा काळ जरी बाहेर गेले तरी तो तीव्रतेने ध्यानात येतो. किर्यात येदिदिममध्ये श्रेष्ठ-कनिष्ठपणा ठरविण्याच्या एखाद्या तांत्रिक पद्धतीवर आधारलेली वर्गरचना नाही. आधी सांगितल्याप्रमाणे, काही विशिष्ट प्रकारची कामे इतर काही प्रकारच्या कामाहून जास्त मोलाची मानली जातात; परंतु जे इतरांहून अधिक महत्त्वाची कामे करतात त्यांना जास्त मेहेनताना मिळत नाही. किबुट्झ संस्कृतीचे एक महत्त्वाचे मानसशास्त्रीय वैशिष्टय असे की प्रत्येक व्यक्ती, मग ती कोणतेही काम करो, एक श्रमिक म्हणूनच मानली जाते, आणि तिला इतर कोणाही इतकेच हक्क व जबाबदाऱ्या असतात. शारीरिक श्रमाची कामे करणाऱ्यांना भांडवलशाही समाजात सामाजिकदृष्टया कमी लेखले जाते; किर्यात येदिदिममध्ये मात्र शारीरिक श्रम अप्रतिष्ठेचे समजले जात नाहीत – त्यांवर हीनतेचा शिक्का बसत नाही. किबुट्झमधला सर्वोच्च लोकनियुक्त अधिकारी म्हणजे महामंत्री ( जनरल मॅनेजर ) हा सामाजिक पातळीत शौचकूपांच्या साफसफाईचे काम करणारापेक्षा श्रेष्ठ ठरत नाही. त्यामुळे कोणालाही कोणतेही काम स्वीकारताना आपण सामाजिकदृष्टया कमी लेखले जाऊ ही भीती नसते. म्हणून व्यक्तींचा कोणताही एक गट दुसऱ्याहून कनिष्ठ समजला जात नाही; आज्ञा देणारे आणि पाळणारे, मान घेणारे आणि मान देणारे अशी दोन टोके आढळत नाहीत. कोणी कोणापुढे सेवावृत्तीने वागण्याची किंवा आपली नोकरी गमावण्याच्या भीतीपोटी खुशामत करण्याची जरुरी नसते. थोडक्यात वर्गयुक्त समाजात आढळून येणारी पुष्कळ प्रकारची विषमता किर्यात येदिदिममध्ये दिसून येत नाही. [१५]

---

नव्हती. राष्ट्रीय अन्नपरिस्थिती आणि विशेषतः किबुट्झची अन्नपरिस्थिती त्या काळापेक्षा आता पुष्कळच सुधारली आहे असे लेखकाला कळविण्यात आले आहे.

( १५ ) ज्या किबुट्झनी आपल्या अर्थव्यवस्थेत उद्योगधंद्यांचा अंतर्भाव केला आहे त्यांच्यात त्यामुळेच वर्गरचनेचा उदय झालेला आहे. पाहा Rosenfeld, पृष्ठे ७६६–७७४

किबुट्झची ही महान कामगिरी सिद्ध करणारी दोन उदाहरणे देण्यासारखी आहेत. किबुट्झचा सभासद नसलेल्या व युरोपातून नवीनच आलेल्या एका डॉक्टरने एका सदस्येला दवाखान्यातल्या 'मोलकरणी'चे नाव विचारले. तो कोणाबद्दल विचारीत आहे हेच तिला समजले नाही. तेव्हा शेवटी जी बाई रोज नियमाने दवाखान्याची सफाई करते तिच्याबद्दल आपण विचारीत आहोत असे त्याने सांगितले. तेव्हा सदस्येने त्याला समजावून सांगितले की, 'मोलकरीण' हा प्रकारच कियात येदिदिम-मध्ये नसतो; संध्याकाळच्या जेवणाच्या वेळी कदाचित ही (मोलकरीण) स्त्री त्याच्या शेजारी सुद्धा बसलेली आढळेल. तिने असेही सांगितले की, ही स्त्री किबुट्झमधली एक महत्त्वाची अधिकारी आहे. दुसरे उदाहरण असे — निरनिराळ्या प्रकारच्या किबुट्झची पाहणी करीत असता आम्ही एका किबुट्झमध्ये इस्रायली संसदेच्या एका सभासदाची मुलाखत घेण्यासाठी आलो. आम्ही तेथे पोचल्यावर आम्हांला असे सांगण्यात आले की हा सभासद त्या वेळी स्मशानभूमीत कामावर असलेला आढळेल: कारण संसदेची बैठक चालू नसेल तेव्हा स्मशानभूमीची देखरेख करण्याचे काम त्याच्याकडे असते. कामावरचे कपडे घालूनच तो आम्हांला भेटायला आला आणि तेथे हिरवळीवरच आम्हांला मुलाखत देण्याचे त्याने कबूल केले — कारण त्याच्या खोलीत त्याची बायको डेअरीतील रात्रपाळीचे काम आटोपून झोपलेली होती.

रूढ प्रकारची सामाजिक वर्गवारी जरी किबुट्झमध्ये नसली तरी त्यात कोण-त्याच प्रकारचा श्रेष्ठ-कनिष्ठपणा नाही, किंवा परस्परांना 'समांतर' असे गट नाहीत, असे मात्र नव्हे. ज्यातील सर्वच सभासदांना समान प्रतिष्ठा आणि अधिकार आहेत आणि ज्यातील प्रत्येक माणूस दुसऱ्याशी सारख्याच प्रमाणात व्यवहार करतो अशा ठोकळेबाज व्यक्तींचा समूह म्हणजे किबुट्झ ही कल्पना मनातून काढून टाकली पाहिजे. उलट, प्रतिष्ठा आणि सत्ता यांच्या वेगवेगळ्या श्रेणी, त्याचप्रमाणे वेगवेगळे सामाजिक कंपू कियात येदिदिममध्ये दिसून येतात, आणि त्याचे स्थूल चित्र सुरुवातीलाच रेखाटलेले बरे.

किबुट्झमधल्या निरनिराळ्या अधिकाराच्या जागा तात्पुरत्या आणि आळीपाळीने भरायच्या असतात हे जरी खरे असले तरी जे ह्या जागांवर असतात त्यांच्या हाती पुष्कळ सत्ता असते. इतकेच नव्हे तर, पुढे दर्शविले आहे त्यावरून लक्षात येईल की ही कामे दोन किंवा तीन वर्षांच्या मुदतीपुरतीच असली तरी महामंत्री, चिटणीस, खजिनदार इत्यादी प्रकारच्या कामांची गुंतागुंत समजण्यास आवश्यक ते कौशल्य थोड्याच सभासदांजवळ असल्यामुळे प्रत्यक्षात फक्त बारा ते पंधरा लोकांच्या लहानशा वर्तुळातच ही कामे फिरत असतात.[१६] याचा अर्थ किबुट्झमध्ये सत्ता समप्रमाणात

---

१६. ही अधिकारपदे आणि त्यांची मुदत यांच्या चर्चेसाठी पुढे पृष्ठ ५७–५८, ७५–७६ पाहा.

वाटली गेलेली नसते; उलट, या लहान गटातच ती केंद्रित झालेली असते. तरीसुद्धा हे मुद्दाम लक्षात घेतले पाहिजे की ह्या अधिकाऱ्यांना कसलाही विशेषाधिकार किंवा विशेष आर्थिक लाभ नसतो.[१७] शिवाय त्यांच्या सत्तेवर मर्यादाही असते. महत्त्वाचे निर्णय हे अधिकारी घेत नाहीत, ग्रामसभा घेते; ते ग्रामसभेच्या सतत नजरेखाली असतात व ग्रामसभा त्यांची नेमणूक रद्द करू शकते. त्याचबरोबर हा गट एकात्म नसतो. ज्यांचे एकमेकांशी पटत नाही एवढेच नव्हे तर ज्यांचा एकमेकांशी पुष्कळदा संघर्षही होतो असे उपगट वा व्यक्ती यांचा त्यात समावेश झालेला असतो. आणखी शेवटचा मुद्दा असा की ज्याच्यात बाहेरून प्रवेश मिळत नाही असा जखडबंद गट हा नसतो आणि त्याची निवड त्याने स्वतःच केलेली नसते. उलट, पात्रता आणि शाबीत झालेले कर्तृत्व यांच्या आधारावर किबुट्झने निवडून दिलेल्या सभासदांचा हा गट असतो. आणि ग्रामसभेने या अधिकारपदासाठी निवडून दिलेल्या योग्य अशा नव्या सभासदांना त्यात प्रवेश मिळू शकतो.

ज्यांना प्रतिष्ठा प्राप्त होते त्यांच्याही बाबतीत बव्हंशी हेच म्हणणे लागू होईल. एक अपवाद सोडला तर किर्यात येदिदिममध्ये प्रतिष्ठा ही *प्राप्त* करून घ्यावयाची बाब असते, पारंपरिक वारशाने आलेली नसते. आणि प्रतिष्ठा असलेल्या व्यक्ती हा समाजातील एक *गट* असण्याऐवजी समाजाचा एक *भाग* असतो असे म्हणता येईल. उत्पादक आणि निष्ठावान श्रमिक असणे, किबुट्झचा ध्येयवाद रोजच्या आचरणात आणणे, एक " एकसंध व्यक्तिमत्त्व "[१८] विकसित करणे आणि किबुट्झचा संस्थापक असणे या गोष्टी किबुट्झमध्ये प्रतिष्ठा मिळविण्याच्या दृष्टीने साधनीभूत ठरतात. यातील पहिल्या तीन गोष्टी अर्थातच प्रयत्नसाध्य असतात आणि त्यामुळे त्या सर्वांना उपलब्ध असतात. चौथी मात्र वर्तमानकाळी प्राप्त करून घेणे शक्य नसले तरी ती जेव्हा मिळालेली असते तेव्हा कर्तृत्वानेच मिळलेली असते. शिवाय नुसते संस्थापक " असणे " एवढीच गोष्ट पुरेशी नाही; प्रतिष्ठेला लायक ठरण्यासाठी संस्थापकाला गतकालातील मोठेपणावरच विसंबून चालता येत नाही, तर दररोजच्या वागण्यातून त्याला आपली प्रतिष्ठा खरी करून दाखवावी लागते. संस्थापकांच्या मुलांकडे वारसाहक्काने प्रतिष्ठा चालून येत नाही हेही लक्षात घेतले पाहिजे. संस्थापकांच्या मुलांनी इतर सभासदांच्या मुलांना खुल्या असलेल्या मार्गांनी जाऊनच प्रतिष्ठा कमवायची असते. आई-वडिलांच्या प्रतिष्ठेमुळे त्यांना कोणताही स्पर्धात्मक लाभ मिळत नाही.

परंतु किर्यात येदिदिम नुसत्या सत्ता आणि प्रतिष्ठा यांच्या थरांनी विभागलेला नाही. त्यात आणखीही पोटविभागांचे " आडवे " गट आहेत; हे गट म्हणजे, स्नेहीमंडळीचे गट किंवा कंपू असतात व ते निदान चार घटकांवर आधारलेले असतात :

---

१७. पुढे पृष्ठ ७७ पाहा.

१८. पृ. (१२०) पाहा.

वय, व्यवसाय, निवासस्थानाचे सान्निध्य, आणि आवडीनिवडी. बहुधा या कसोट्या समव्याप्तही असतात. कारण संध्याकाळच्या भेटीगाठी हे जर मित्रसंबंधांचे गमक समजले तर असे दिसून येते की एकमेकांशी मैत्री करणाऱ्या आणि एकाच वयाच्या माणसांच्या आवडीनिवडीही समान असतात; आणि किबुट्झच्या घरबाटपाच्या[१९] विशिष्ट तत्त्वांमुळे ते बहुतेक वसाहतीच्या एकाच भागात राहतात. किबुट्झने स्वतःच वयोमानाप्रमाणे चार "थर"[२०] किंवा वयगट मानले आहेत, आणि एखाद्या कंपूतील व्यक्ती वेगवेगळ्या वयगटातल्या आहेत असे क्वचितच घडते. मात्र, एकाच वय-गटातल्या सर्व व्यक्तींचा एकच कंपू बनतो असेही नाही. एकाच वयाच्या थरामध्येही काही समान बौद्धिक किंवा राजकीय विषयाच्या अनुरोधाने किंवा समान असंतोषामुळे अनेक कंपू बनतात.

वय आणि निवासस्थानाचे सान्निध्य यांच्या मिश्रणानेच सगळे कंपू बनतात असे नसून कधीकधी व्यवसाय आणि सत्तास्थान यांमुळे त्यांना छेद जातो. सत्ता-धाऱ्यांचा असा जो लहान गट असतो तो मित्रसंबंधी असतोच असे नाही. पण तरीसुद्धा त्यांचे एकमेकांशी वारंवार संबंध येतात, कारण त्यांनाच किबुट्झमध्ये सतत उत्पन्न होणारे निरनिराळे प्रश्न सोडविण्यासाठी एकमेकांना नेहमी भेटावे लागते आणि तेही विशेषतः संध्याकाळी चहाच्या वेळी; तो कंपू समवयीनांचा किंवा जवळ राहणाऱ्यांचा असतोच असे नाही.

त्याचप्रमाणे अर्थव्यवस्थेतील काही शाखांमधल्या कामगारांत—उदाहरणार्थ, गुराख्यांत—एक प्रभावी संघभावना उत्पन्न होते आणि काम सोडून एरव्हीच्या वेळीही ती त्यांना चिकटून राहते. म्हणून, एकाच वयाचे नसून आणि त्यांच्यात निवाससान्निध्य नसूनही त्यांच्यामध्ये समान व्यवसायामुळे निर्माण झालेल्या वैयक्तिक स्नेहामधून कंपू तयार होतात. शिवाय असेही दिसते की गुराख्यांप्रमाणे काही शाखा समलिंगीच असल्याने त्यांचे सभासदत्व भिन्नलिंगी व्यक्तींना मिळत नाही. याचाच अर्थ असा की सामाजिक गट तयार व्हायला लिंगभेद हेही एक कारण होऊ शकते.

किर्यात येदिदिमच्या संस्कृतीमधले आणखी एक मूलभूत तत्त्व म्हणजे व्यक्ति-

---

१९. किर्यात येदिदिममध्ये घरबांधणी वाढविताना इमारतींचा समूहच्या समूहच नवा बांधला जातो, एकेकटी लहान घरे बांधली जात नाहीत. साधारणपणे पूर्वीच्या रचनेत खूपच सुधारणा करून या नव्या समूहाची उभारणी केलेली असते, त्यामुळे अग्रहक्काच्या पद्धतीनुसार ज्येष्ठ असतील त्यांनाच बहुधा या नव्या वसाहतीत जागा मिळते. उदाहरणार्थ, संस्थापक आता नवीन बांधलेल्या घरात राहात आहेत आणि त्यांची विवाहित मुले खेड्याच्या दुसऱ्या भागातील ज्या लाकडी घरात पूर्वी संस्थापक व त्यांच्या मागून आलेले सभासद राहात होते त्यांत आता राहात आहेत.

२०. पुढे पृष्ठ ४९–५१ पाहा.

स्वातंत्र्य. किंबहुना, आपण जगातील सर्वांत मुक्त समाज असल्याचा किबुट्झचा दावा आहे. किर्यात येदिदिमच्या पहिल्या काळात स्वातंत्र्य याचा अर्थ नागरी संस्कृतीच्या " कृत्रिम रूढी " पासून सुटका एवढाच होता. मात्र, एकदा स्वतःच्या मालकीच्या भूमीवर स्थायिक झाल्यानंतर जेव्हा काहीएका प्रकारची सामाजिक संघटना आणि सत्ता यांची गरज उत्पन्न झाली तेव्हा स्वातंत्र्याबद्दलची ही पहिली कल्पना अधिक विस्तृत करण्यात येऊन, कोणत्याही प्रकारच्या सत्तेला विरोध असा तिचा व्यापक अर्थ करण्यात आला. किबुट्झ हा एक " जीवशास्त्रीय समूह " आहे म्हणून त्याची निरनिराळी कामे आपोआपच पार पडतील; त्यासाठी एखाद्या व्यक्तीची किंवा व्यक्तींची इतरांवर सत्ता असण्याची जरूर नाही; असे समजले जात होते. म्हणून किर्याद येदिदिममध्ये अधिकारी नसत, आणि ज्याला अध्यक्ष किंवा कार्यक्रमपत्रिकाही नाही अशा अनौपचारिक गटाच्या चर्चेत सर्व निर्णय घेतले जात. अधिक विस्तार झाल्यावर आणि अर्थव्यवस्थेची वाढ झाल्यावर मात्र काहीएका प्रकारची औपचारिक संघटना अस्तित्वात आणणे आणि अधिकारपदे निर्माण करणे आवश्यक आहे असे स्पष्ट झाले. परंतु कोणाच्याही हातीं वैयक्तिक सत्ता केंद्रित होऊ नये किंवा दृढमूल नोकरशाही तयार होऊ नये म्हणून असे ठरविण्यात आले की अगदी कनिष्ठ शारीरिक कामापासून तो थेट महामंत्र्याच्या कामापर्यंत सर्व कामे जास्तीत जास्त दोन किंवा तीन वर्षे मुदतीची असावीत. अशी अमदानीची मर्यादा घातली म्हणजे निरनिराळ्या सत्तास्थानांवर आळीपाळीने माणसे बदलतील आणि किबुट्झच्या सभासदांना जास्तीत जास्त स्वातंत्र्य उपभोगता येईल अशी कल्पना होती.

स्वातंत्र्यावर दिलेला हा भर नुसता औपचारिक घटनेपुरता मर्यादित होता असे नसून तो आविष्कारस्वातंत्र्यातही प्रतिबिंबित झालेला होता हे लक्षात घेतले पाहिजे. भाषणस्वातंत्र्य किंवा वाचनस्वातंत्र्य यांवरची कोणतीही मर्यादा सभासदांना तिरस्करणीय वाटते आणि वसाहतीत कोणत्याही प्रकारची विचार नियंत्रणपद्धती अस्तित्वात नाही.

शेवटी, ह्या संस्कृतीच्या नैतिक मूलाधारांच्या चर्चेत " समूहाचे नैतिक मूल्य " असे नाव ज्याला देता येईल त्या तत्त्वाचा अंतर्भाव केला पाहिजे. किबुट्झ संस्कृतीत समूह म्हणजे व्यक्तीच्या सुखाचे फक्त एक साधन एवढीच कल्पना नाही; समूह आणि समूहाची व्यवहारपद्धती हीही एकप्रकारची नैतिक साध्येच आहेत. या तत्त्वाला तीन बाजू आहेत. पहिली म्हणजे व्यक्तीचे हितसंबंध हे समूहाच्या हितसंबंधांपुढे गौण आहेत. जेव्हा व्यक्तीच्या गरजा आणि समूहाच्या गरजा यांच्यात संघर्ष उत्पन्न होतो तेव्हा व्यक्तीने समूहाच्या सुखासाठी आपल्या गरजांवर पाणी सोडावे अशी अपेक्षा असते. ही गोष्ट धंदाव्यवसायातील आवडीनिवडीप्रमाणेच वैचारिक निष्ठांनाही लागू आहे. व्यक्तीची पसंती तिला नेमून देण्यात येणाऱ्या कामाबाबत नेहमी विचारात घेतली जाते; परंतु तिचे कौशल्य व श्रम किबुट्झला दुसऱ्या एखाद्या खास शाखेमध्ये हवे असतील तर तिने समूहाच्या गरजा शिरोधार्य मानल्या पाहिजेत असे अपेक्षित असते.

ह्याच नियम वैचारिक निष्ठांनाही लागू होतो. राजकीय बाबतीत निर्णय घेण्याचे आणि आपला दृष्टिकोण इतरांना पटवून देण्याचे व्यक्तीला संपूर्ण स्वातंत्र्य असते. परंतु किबुट्झने एकदा अधिकृत निर्णय घेतला म्हणजे आपली मते कितीही विरोधी असली तरी व्यक्तीने त्या निर्णयाला संमती व दुजोरा दिला पाहिजे अशी अपेक्षा असते.[२१]

समूहाच्या नैतिक मूल्याच्या तत्त्वाची दुसरी बाजू अशी की व्यक्तीच्या प्रेरणा स्वहिताबरोबरच समूहाच्या हिताकडेही वळविण्यात याव्यात. इझ्रा हादादित किंवा " परस्पर साहाय्य " हा गुण वर्तणुकीत दिसून यावा अशी अपेक्षा असते. याचा अर्थ असा की, ज्याप्रमाणे प्रत्येक सभासदाच्या कल्याणाची जबाबदारी किबुट्झवर आहे त्याचप्रमाणे प्रत्येक सभासदावर दुसऱ्या प्रत्येक सभासदाच्या आणि संबंध किबुट्झच्या कल्याणाची जबाबदारी आहे. या तत्त्वाच्या आचरणाचा व्यवहारिक अर्थ असा की वैद्यकीय मदत, मुलांचे शिक्षण, अन्न, निवारा, वस्त्र किंवा इतर एखादी गरज भागविण्याची जोपर्यंत किबुट्झला शक्यता आहे तोपर्यंत कुणालाही त्यांची कमतरता पडू नये.

समूहाचे नैतिक मूल्य या तत्त्वाची तिसरी व शेवटची बाजू अशी की समूह-जीवन आणि सामूहिक अनुभव या गोष्टी व्यक्तिजीवन आणि वैयक्तिक अनुभव यांच्यापेक्षाही अधिक मोलाच्या आहेत. किंबहुना समूहाचे महत्त्व इतके मानले जाते की जे सभासद अधिक एकांत मिळविण्याचा प्रयत्न करतात ते " चमत्कारिक " मानले जातात. " हेव्हरा " तयार करणे हे किबुट्झचे ध्येय असते. चांगले किबुट्झ, चांगली प्रशाळा, किंवा चांगले बालमंदिर यांची अखेरची कसोटी म्हणजे चांगला "हेव्हरा" तयार झाला आहे की नाही. " हेव्हरा " या शब्दाचा वाच्यार्थ समाज असाच आहे; पण त्याचा सूचितार्थ, आणि क्रियांत येदिदिमच्या दृष्टीने त्याचा खरा अर्थ म्हणजे परस्परांशी खूप जवळचे संबंध असलेला, आणि परस्पर प्रेम नसले तरी परस्पर आस्था बाळगणारा समूह असा होतो. थोडक्यात, हेव्हरा हा एक " जेमीनशाफ्ट " ( प्राथमिक समाज ) किंवा किबुट्झचाच शब्दप्रयोग वापरावयाचा तर " जीवशास्त्रीय समूह " आहे. म्हणून सामूहिक अनुभवाऐवजी खाजगी जीवनाला अधिक चाहणारा एखादा व्यक्तिवादी मनुष्य समूहाला धोक्याचा वाटावा हे उघड आहे. त्याची एकान्तप्रियता गटाला " हेव्हरा " बनवण्याच्या आड येते किंवा तो समूह " हेव्हरा " नाही याचे ते लक्षण ठरते. कारण की तो हेव्हरा असता तर त्या माणसाने व्यक्ती म्हणून एकटे जीवन जगण्यापेक्षा समूहजीवन जगणे पसंत केले असते.[२२]

---

२१ ह्या संबंध परिच्छेदावरून असे दिसून येईल की किबुट्झने स्वातंत्र्यावर कितीही भर दिलेला असला तरी व्यक्तीचे स्वातंत्र्य पुष्कळ प्रकारे मर्यादित केलेले आहे.

२२. समूहाच्या सर्वश्रेष्ठपणावर ही जी श्रद्धा आहे तिचा अविष्कार खूपच व्यापक

या बाबतीत किबुट्झचे श्टेटलशी जवळचे नाते आहे. श्टेटलचे पुढील वर्णन कसलाही बदल न करता कियीत येदिदिमला लागू पडेल :

माणसाला एकांत लागतो तो पापासाठीच, एरवी एकांताचा आग्रह धरणे हा एक मोठा अपराध आहे…एखाद्या माणसाविषयी जास्तीत जास्त वाईट बोलावयाचे म्हणजे

---

परिसरावर होतो. उदाहरणार्थ, कलेच्या प्रांतात, एका शिक्षकाने " टोबॅको रोड " या पुस्तकावर " अश्लील " म्हणून आणि त्यात फक्त लेखकाच्याच भावना दाखविल्या आहेत, समूहाच्या नाहीत, म्हणून टीका केली. " यंग हार्ट्स् " ही कादंबरी " वास्तव नव्हे " म्हणून तिच्यावर एका साथीने टीका केली. कादंबरीकाराने पाहिलेले " वास्तव " त्याने चित्रित केले असेल असे प्रस्तुत लेखकाने जेव्हा विरोधाच्या सुरात म्हटले तेव्हा टीकाकाराने उत्तर दिले, " साहित्यात सर्वच समूहाची भावना व्यक्त व्हायला हवी, एका व्यक्तीची नव्हे. तसे नसेल तर ते साहित्यच नव्हे. " किबुट्झमधल्या एका विचारवंताने शॅगॉल हा चित्रकार महत्त्वाचे *सामाजिक* प्रश्न टाळतो व स्वतःच्या *खाजगी* मनोराज्यात गुंग होतो म्हणून त्याच्यावर " अवास्तववादी " अशी टीका केली.

इतकेच नव्हे तर, समूहावर असलेला हा भर हेच संघाच्या " करिअरिझम " ला ( वैयक्तिक उत्कर्षाला ) अगदी पूर्णपणे विरोध असण्याचे कारण आहे. किबुट्झ चळवळीत शहरी तरुणांनी भाग घ्यावा म्हणून प्रोत्साहन देणाऱ्या भाषणातून आणि लेखांतून व्यक्तीने स्वतःच्या उत्कर्षासाठी धडपड करीत राहण्याच्या वृत्तीला विरोध हा नेहमीचा विषय असतो. जुलूम आणि विषमता यांनी युक्त अशा सध्याच्या जगात, स्वतःचा वैयक्तिक आयुष्यक्रम, स्वतःचे वैयक्तिक सुख, किंवा स्वार्थी महत्त्वाकांक्षा पुऱ्या करणे हे अप्रशस्त मानले जाते. नैतिक संवेदना असलेला माणूस अधिक चांगले जग निर्माण करण्याकरिता वैयक्तिक महत्त्वाकांक्षा आणि अधिक चांगल्या खाजगी जीवनाची आकांक्षा या गोष्टींवर पाणी सोडतो.

किबुट्झमध्ये मनोविश्लेषणाचे माहात्म्य जवळजवळ कुठेच आढळत नाही याचे कारण हेच की समूह आणि त्याचे कल्याण यांवरच सगळा भार असतो. प्रस्तुत लेखकाला या अभ्यासाच्या काळात, समकालीन अमेरिकन संस्कृतीमध्ये पदोपदी आढळून येणारे " मानसिक शांती, " " व्यक्तित्वाची समाजाशी जुळणी," "विवंचना–मुक्तता " हे आणि अशा प्रकारचे मानसशास्त्राशी संबंधित असे अनेक विषय संभाषणात केव्हाही ऐकू आले नाहीत. एखाद्या सभासदाचे किबुट्झशी ऐकात्म्य झालेले नाही अशा प्रकारचे बोलणे कधी कधी ऐकू येते. कारण हा प्रश्न साथींच्या दृष्टीने गंभीर स्वरूपाचा असतो; पण व्यक्तींच्या परस्परसंबंधांतील जुळणीच्या प्रश्नाची चर्चा क्वचितच ऐकू येते. *सामाजिक* संघर्ष आणि *आंतरराष्ट्रीय* तणाव कमी करणे आणि *सामाजिक* शांती प्रस्थापित करणे ही ध्येये त्यांच्या दृष्टीने महत्त्वाची साध्ये आहेत. व्यक्ति-व्यक्तींमधल्या तणावांना त्यांच्या दृष्टीने महत्त्व नाही.

" तो ते स्वतःपाशीच ठेवतो ", किंवा " तो ते इतरांपासून लपवितो " असे म्हणणे. मग तो लपवितो ती गोष्ट पैसे असोत, ज्ञान असो, कपडे असोत वा एखादी बातमी असो.

दरवाजे बंद ठेवणे, समाजापासून अलग राहणे, समूहाचे नियंत्रण न मानणे इत्यादी गोष्टींनी माणसाविषयी शंका उत्पन्न होते...हेयमिशे मेंटशेन म्हणजे " घरची माणसे " एखाद्याकडे दिवसाच्या कोणत्याही वेळी हक्काने येऊ शकतात...

एखादा माणूस शरीराने वा मनाने समाजापासून अलग राहणे हा समाजावरचा आघातच आहे असे समजले जाते, आणि तुटकपणा असह्य मानला जातो. "समूहातच जे जगले जाते ते जीवन."

घर असो, बाजारपेठ असो, रस्ता असो, माणसे गोळा होतात आणि गप्पा मारतात. ताजी बातमी, नव्यात नवी गप्प आपल्याला कळली पाहिजे अशी प्रत्येकाची इच्छा असते.

सर्व व्यक्ती एकमेकांना जबाबदार आहेत आणि एकमेकांवर अवलंबून आहेत अशी तीव्र भावना अस्तित्वात असेल तर तिच्यायोगेच आपल्या जवळच्यांचे जीवन न्याहाळणे आणि त्याच्यावर शेरे मारणे, त्यांच्याशी संवाद प्रस्थापित करणे आणि घटना व भावना यांचा एकत्रित अनुभव घेणे या गोष्टी अपरिहार्यपणे येतात."[२३]

ही नैतिक गृहीततत्त्वे म्हणजे किर्यात येदिदिमचे सामाजिक नीतिशास्त्र आहे आणि तीच त्याच्या समाजवादाची मूलतत्त्वे आहेत. परंतु किबुट्झ संस्कृती ज्या दोन तत्त्वांवर आधारलेली आहे त्यातले समाजवाद हे केवळ एक तत्त्व आहे; दुसरे तत्त्व म्हणजे झिऑनवाद. किर्यात येदिदिमच्या दृष्टीने किबुट्झ म्हणजे फक्त सामाजिक आणि वैयक्तिक मुक्तीचेच साधन आहे असे नाही तर ते राष्ट्रीय मुक्तीचेही साधन आहे. या प्रकरणात वर्णिलेल्या प्रकारचा समाजवाद हा किबुट्झचा विश्वविषयक दृष्टिकोण स्पष्ट करतो. याउलट झिऑनवाद त्यांचा विशिष्ट मर्यादित ज्यू जातिविषयक दृष्टिकोण स्पष्ट करतो. किर्यात येदिदिमची स्थापना पूर्व युरोपात म्हणजे संस्थापकांच्या जन्मस्थानी होण्याऐवजी पॅलेस्टाइनमध्ये झाली हा काही निव्वळ योगायोग नव्हे.

किर्यात येदिदिमची झिऑनवादी तत्त्वे ही बव्हंशी एकूण झिऑनवादी चळवळीच्या तत्त्वांसारखीच आहेत आणि ती पुढीलप्रमाणे थोडक्यात सांगता येतील. गेल्या १९०० वर्षांत ज्यू कितीही विखुरले गेले असले आणि राष्ट्रवादाची बाह्य लक्षणे त्यांच्यात दिसून येत नसली तरी ज्यू जमात हे एक राष्ट्र आहे. प्रत्येक राष्ट्राला जिवंत राहण्याचा व आपली राष्ट्रीय संस्कृती टिकविण्याचा अधिकार आहे इतकेच नव्हे तर ते त्याचे कर्तव्यच आहे. जोपर्यंत इतर राष्ट्रांमध्ये एक अल्पसंख्य राष्ट्रीय समाज म्हणून ज्यूंना राहावे लागत आहे तोपर्यंत ज्यू राष्ट्राचे भौतिक अस्तित्व सतत धोक्यात आहे असे समजले पाहिजे. फक्त त्यांच्या स्वतःच्या " ऐतिहासिक मातृभूमी "तच त्यांना ज्यूद्वेषापासून मुक्तता मिळू शकेल आणि आपल्या अल्पसंख्यत्वाच्या अनैसर्गिक अवस्थेतून त्यांची सुटका होईल. ह्या अल्पसंख्यत्वामुळे ज्यूंना ज्यूद्वेषाचे आघात सहन करावे लागले इतकेच नव्हे तर त्यामुळे त्यांची मानसिक व सांस्कृतिक ठेवणच बिघडून गेली. अनेक

२३. Zborowski and Herzog, पृ. २२५–२२७.

प्रकारच्या आर्थिक व्यवहारांत भाग घेण्याची शक्यता न उरल्याने ज्यूंना एका संकुचित आर्थिक वर्तुळातच स्वतःला कोंडून घ्यावे लागले आणि त्यामुळे ते केवळ "मध्यस्थ" झाले. मध्यस्थ हे अर्थव्यवहारात केवळ बांडगुळासारखे ठरतात एवढेच नव्हे तर त्यांच्या कामाचे स्वरूपही असे असते की त्यामुळे त्यांची मानसिक घडणही अनैसर्गिक होते. त्यांच्यात निसर्गाचा आस्वाद घेण्याची क्षमता उरत नाही आणि म्हणून ते भूमीत मूळ धरू शकत नाहीत; त्यांना शारीरिक श्रमांची प्रतिष्ठा आणि सर्जकता यांची समज येत नाही; त्यांच्यात वास्तव जीवनापासून तुटलेल्या बांझ बुद्धिवादाची, कोरड्या पांडित्याची वाढ होते.

झिऑनवादाच्या स्वीकाराने ही सर्व वैशिष्ट्ये बदलू शकतात. आपल्या स्वतःच्या "मातृभूमी"त राहिल्याने ज्यू लोक आर्थिक बांडगुळे बनणार नाहीत, कारण तेथे ते नुसते मध्यस्थच नसतील तर जमिनीची मशागत करतील आणि कारखाने चालवितील. आर्थिक व्यवहाराच्या सर्व पक्षा अंतर्भूत करण्याइतका अर्थ व्यवस्थेचा पाया व्यापक झाल्यामुळे ज्यूंचे सांस्कृतिक आणि बौद्धिक जीवनही "स्वाभाविक" होईल, कारण निर्मितिक्षम जीवनात त्याची मुळे रुजलेली असतील. आणि ही आर्थिक सांस्कृतिक आणि राष्ट्रीय स्वाभाविकता अल्पसंख्य अवस्थेतून, व म्हणूनच, ज्यूद्वेषातून मुक्त झालेल्या ज्यू लोकांना आपले स्वायत्त आणि स्वाभाविक असे स्थान जगातील इतर राष्ट्रांमध्ये मिळवून देईल. थोडक्यात, किर्यात येदिदिमच्या दृष्टीने झिऑनवाद ही जरी एक विशिष्टवादी चळवळ असली तरी शेवटी तिचे अंतिम ध्येय वैश्विक आणि मानवतावादी आहे. हे ध्येय म्हणजे ज्यूंच्या वैशिष्ट्यांची वाढ करण्याच्या उद्देशाने बिगर-ज्यू जगापासून ज्यूंना अलग करणारे ज्यूंचे भौगोलिक वेगळेपण नव्हे. उलट त्याचा उद्देश असा आहे की ज्यूंचे त्यांच्या मातृभूमीत एकत्रीकरण झाल्याने ते "स्वाभाविक" राष्ट्रीय जीवन जगू लागतील आणि त्यामुळे परावलंबी, परपुष्ट आणि भयग्रस्त अल्पसंख्य म्हणून राहण्याऐवजी इतर जगाशी त्यांचे संबंध स्वाभाविकपणाचे होतील. म्हणून किर्यात येदिदिमच्या दृष्टीने राष्ट्रीय स्वातंत्र्य हे वैयक्तिक आणि सामाजिक स्वातंत्र्याइतकेच महत्त्वाचे आहे. एवढेच नव्हे तर राष्ट्रीय स्वातंत्र्य हे इतर स्वातंत्र्यांच्या अस्तित्वाचीच एक आवश्यक अट आहे.

मात्र याचा अर्थ असा नव्हे की इतर राष्ट्रवादी तत्त्वज्ञानांत अंतर्भूत असलेला देशाभिमान किर्यात येदिदिमच्या झिऑनवादात नाही. इतर इस्रायली लोकांप्रमाणेच त्यांसुद्धा जगाची विभागणी अरेट्झ (शब्दशः अर्थ "देश") आणि हुत्झ्‌ला- अरेट्झ (शब्दशः अर्थ "देशबाह्य") अशी करतात. त्याचप्रमाणे ते जगातील लोकांचे येहुदिम, म्हणजे इस्रायली व बिगर इस्रायली ज्यू आणि गोयिम (शब्दशः "राष्ट्रे"), म्हणजे बाकीची मानवजात, असे दोन प्रकार करतात. अर्थात ही भाषा अलंकारिक आहे आणि ज्या काळात मित्र (ज्यू) आणि शत्रू (बाकीची मानवजात) अशा दोन प्रकारांतच जग विभागलेले

होते, त्या काळापासूनची आहे. तरीसुद्धा या अलंकारिक भाषेतून आजचीही महत्त्वाची मानसिक प्रवृत्ती प्रतिबिंबित होते हे लक्षात यायला वेळ लागत नाही. सर्व ज्यूंनी इस्रायलमध्येच वस्ती केली पाहिजे असाही साबींचा आग्रह असतो. इस्रायलला भेट द्यावयास आलेला एखादा ज्यू मनुष्य आपल्या मायदेशी परत जाण्याची गोष्ट करू लागला तर साबींना आश्चर्याचा धक्का बसतो. ही दोन उदाहरणेही साबींच्या वंशाभिमानाची द्योतक आहेत.

किर्यात येदिदिसच्या झिऑनवादी तत्त्वज्ञानातून त्याची महत्त्वाची वैशिष्ट्ये आणि वर्तणूक स्पष्ट होतात. शारीरिक श्रमांवरील भर आणि शहरी राहणीपेक्षा ग्रामीण राहणीची पसंती या गोष्टी त्यांच्या सर्वसाधारण सामाजिक तत्त्वज्ञानातूनच केवळ नव्हे तर झिऑनवादाच्या श्रद्धांमधूनही उगम पावलेल्या आहेत. झिऑनवादाची अशी श्रद्धा आहे की ज्यूंच्या राष्ट्रीय जीवनाचे "स्वाभाविकीकरण" होण्यासाठी त्यांनी शारीरिक श्रमांचा अवलंब केला पाहिजे आणि आपली मुळे भूमीमध्ये घट्ट रोवली पाहिजेत. शिवाय, किर्यात येदिदिमचे भौगोलिक स्थानही झिऑनवादी श्रद्धेतून निश्चित झाले आहे. ज्यू वसाहतीपासून दूर असलेल्या दलदलीच्या प्रदेशात किर्यात येदिदिसची स्थापना झालेली आहे. झिऑनवादी वसाहत धोरणाचे उद्दिष्ट असे होते की अधिक जमीन लागवडीखाली आणण्यासाठी पॅलेस्टाइनच्या दलदलीच्या प्रदेशांतून पाण्याचा निचरा करायचा आणि मँडेटरी पॅलेस्टाइनचा सर्व प्रदेश ज्यूंच्या वसाहतींनी व्यापला जावा यासाठी त्यांच्या सीमा सतत विस्तारत न्यायच्या. किर्यात येदिदिसची स्थापना या धोरणाचा एक भाग म्हणूनच बुद्धिपुरःसर करण्यात आली होती.

किर्यात येदिदिस आणि इतर किबुट्झ आपले बरेचसे मनुष्यबळ आणि ताकद किबुट्झ-बाह्य आणि व्यापक राष्ट्रहिताच्या ध्येयासाठी खर्च करतात त्यामागेही हेच झिऑनवादी तत्त्वज्ञान आहे. दुसऱ्या जागतिक युद्धाच्या व युद्धोत्तर काळात ज्यू निर्वासित युरोपातून पॅलेस्टाइनमध्ये चोरून पाठविण्याच्या कामी ज्यांनी आपले जीव धोक्यात घातले त्यांत किबुट्झ सभासद आघाडीवर होते. युद्धानंतर किबुट्झ वसाहतींनी इस्रायलभर विखुरलेल्या निर्वासितांच्या छावण्यातून काम करण्यासाठी आपले काही सभासद तात्पुरते पाठविले आहेत. सरतेशेवटी, किर्यात येदिदिस आपल्याला एक झिऑनवादी संस्था मानीत असल्यामुळे निर्वासित युवकांची वसाहत आणि पुनर्वसन यांकरिता त्याने आपली दारे खुली ठेवली आहेत. हिटलरने पादाक्रांत केलेल्या युरोपातून आणि अलीकडे मुस्लीम देशांतून इस्रायलमध्ये ज्यू मुले येऊन पोचली तेव्हा त्यांची देखभाल कशी करावी हा प्रश्न देशापुढे उभा होता. किबुट्झ वसाहतींनी ज्युइश एजन्सीशी केलेल्या कराराप्रमाणे त्यांचे शिक्षण पुरे करून हे तरुण राष्ट्रीय जीवनात जबाबदारीच्या जागा घेण्यायोग्य होईपर्यंत त्यांचे गट आपणाकडे ठेवून घेण्याची जबाबदारी पत्करली होती. आणि असा एक गट तयार होऊन जातो न

जातो तोच त्याच्या जागी दुसरा येतो. त्यांना अन्न, निवारा आणि संपूर्ण शिक्षण देण्याची जबाबदारी किबुट्झ घेतात. याचा अर्थ असा नव्हे की हे करण्यात त्यांचे उद्देश सर्वस्वी भूतदयावादी आहेत. किर्यात येदिदिमला या पद्धतीने काही फायदा होतो, कारण प्रत्येक मुलामागे त्याला एजन्सीकडून भत्ता मिळतो आणि ही मुले किबुट्झच्या अर्थव्यवस्थेत कामाला उपयोगी पडतात. मात्र, ही गोष्ट खरी आहे की हा आर्थिक लाभ अल्प असतो, आणि आर्धाच सर्व सुखसोयींची कमतरता असलेल्या किबुट्झमध्ये या व्यवस्थेने ज्या अनेक गैरसोयी निर्माण होतात त्यांची भरपाई या लाभामुळे होत नाही.

किर्यात येदिदिमची आणि खरे म्हणजे सर्वच किबुट्झ वसाहतींची नैतिक गृहीत-तत्त्वे ही अशी आहेत. किबुट्झच्या समाजरचनेचा पाया म्हणून ती महत्त्वाची आहेत. इतकेच नव्हे तर, त्याच्या अस्तित्वाचे एक महत्त्वाचे गृहीतकृत्य समजण्यास साधन म्हणूनही त्यांचा उपयोग होतो; ते गृहीतकृत्य हे की जीवन गंभीरपणे जगावयाचे असते. गंभीर अशासाठी की जीवनाचा हेतू तात्कालिक सुख किंवा स्वार्थ साध्य करणे हा नसून ही नैतिक मूल्ये साकार करणे हा आहे.

स्वतःच्या वैयक्तिक सुखाच्या पलीकडे असणाऱ्या मूल्यांचा शोध घेत राहणे यातच जीवनाची इतिकर्तव्यता आहे हा विचार एका सदस्येने उत्तम प्रकारे व्यक्त केला. ही स्त्री नुकतीच अमेरिकेला भेट देऊन आली होती. अमेरिकेत असताना तिला इस्रायलची आठवण केव्हा व्हावयाला लागली असा प्रश्न प्रस्तुत लेखकाने तिला केला तेव्हा फारच लवकर आठवण होऊ लागल्याचे सांगून ती म्हणाली:

[ अमेरिकन ]…त्यांना कसलीच मूल्ये नाहीत. इस्रायलमध्ये आम्हाला सगळ्या प्रकारची टंचाई आहे हे खरे पण आम्हाला मूल्ये आहेत: आम्ही स्थलांतरितांना सामावून घेत आहो, नवा समाज घडवीत आहो. म्हणून आमच्या आयुष्याला काही अर्थ आहे असे आम्हाला वाटते. पण अमेरिकन जीवनाला काय अर्थ आहे ?

जीवनाच्या गांभीर्याची जाणीव हे किर्यात येदिदिमचे नव्हे तर सबंध किबुट्झ चळवळीचेच वैशिष्ट्य आहे आणि ह्या जाणिवेवर प्रत्येक वेळी, अगदी उत्सवप्रसंगीसुद्धा भर दिला जातो. उदाहरणार्थ, अखिल इस्रायलचा वार्षिक नृत्यमहोत्सव किबुट्झ डेलिया येथे भरविला जातो. किबुट्झ वसाहतींसह देशातील निरनिराळ्या गटांकडून तो साजरा होतो. प्रस्तुत लेखक हजर होता त्या वर्षी प्रेक्षकांची संख्या ५०,००० हून जास्त होती आणि इस्रायलला स्थलांतर केलेल्या प्रत्येक गटाने आपापला सांस्कृतिक कार्यक्रम सादर करावयाचा अशी योजना होती. जगाच्या प्रत्येक भागातून आलेल्या गटाने आपापल्या देशातील निरनिराळी नृत्ये व गाणी सादर केली. परंतु अनेक संस्कृतींची विविध दृश्ये आणि संगीत संपल्यावर त्या रात्रीचे मुख्य मूकनाट्य सादर करण्यात आले. त्यात ज्यूंच्या जीवनाची विदेशामधून झालेली शोकांतिका, त्यांना त्यातून बाहेर पडण्यासाठी करावी लागलेली धडपड व त्यांचे मातृभूमीला यशस्वी

पुनरागमन यांचे चित्रण करण्यात आले. अद्यापही पुष्कळसे ज्यू विदेशामध्ये खितपत आहेत आणि त्यांच्या मुक्ततेसाठी व पुनरागमनासाठी प्रयत्न करणे हे प्रेक्षकांचे कर्तव्य असल्याची जाणीव त्यांना करून देण्यात आली. जीत कसलाही सामाजिक संदेश नाही अशा विशुद्ध लोककलेचा " केवळ " कला म्हणून एक रात्रसुद्धा आस्वाद घेणे बरोबर नाही असा याचा अर्थ दिसतो.

किर्यात येदिदिमचे संस्थापक – पूर्व युरोपातील श्टेटलमधले ज्यू तरुण – आपली मध्यमवर्गीय घरे सोडून पॅलेस्टाइनला कसे आले आणि वर वर्णन केलेल्या तत्त्वांनुसार एक नवा समाज त्यांनी कसा स्थापन केला याचा शोध घेणे हा आपला यापुढचा विषय आहे.

* * *

प्रकरण : ३ :

# किर्यात येदिदिमचा सामाजिक इतिहास

*आम्ही नेहमीच टोकाची भूमिका घेत आलो आहोत. विदेशांत झिऑनवादी म्हणून जगण्याऐवजी आम्ही हागशामाची (म्ह. पॅलेस्टाइनला स्थलांतर करून आत्मसाक्षात्कार करून घेण्याची) ऐकांतिक मागणी केली. पॅलेस्टाइनमध्ये आल्यावरही भूमीकडे धाव घेण्याची व शेती करण्याची आमची मागणी ऐकांतिकच होती. शेतीतही वसाहत करावयाची तर ती किबुट्झच्या पद्धतीची हा आमचा आग्रहही ऐकांतिकच. आमचा किबुट्झही देशाच्या सरहद्दीवर हवा ही आमची इच्छा आमचा आत्यंतिक स्वभावच दर्शविते. आमच्या राजकीय आत्यंतिकतेची मानसिक मुळे अशी खोल गेलेली आहेत. आम्ही सतत सीमेवरचे उभे आहोत.*

एका साथीचे निवेदन

## युरोपीय पार्श्वभूमी

किर्यात येदिदिमचे संस्थापक मुख्यत्वेकरून मूळचे पोलिश होते, आणि ते पॅलेस्टाइनला जरी लहान वयात– म्हणजे विशीच्या आसपास असताना– आलेले होते तरी ज्या प्रकारचा समाज त्यांनी स्थापन केला आहे त्यावर त्यांच्या युरोपातील अनुभवांचा ठसा उमटलेला आहे. ह्या युरोपीय अनुभवांचे संस्थापकांवर जे संस्कार झाले त्यांचे विश्लेषण पाच प्रकारांनी करणे शक्य आहे : (१) पोलंडमधले ज्यूंचे स्थान, (२) श्टेटलची व्यापक संस्कृती, (३) श्टेटलमधील आईबाप-मुले यांचे संबंध, (४) झिऑनवादी चळवळ आणि (५) ज्यू युवकांच्या आणि युरोपातील इतर युवकांच्या चळवळी.

## पोलिश ज्यूंचे स्थान

पूर्व युरोपातील ज्यू लोक ज्यूद्वेषाच्या परंपरेला फार काळ बळी पडले होते.[1]

---

१. पाहा, Dubnow, **The History of the Jews in Russia and Poland.**

या ज्यूद्वेषामध्ये केवळ सामाजिक भेदभावाचाच नव्हे तर शारीरिक हल्ले आणि अत्याचार यांचाही समावेश असे. तरीसुद्धा विसाव्या शतकाच्या आरंभी पुष्कळशा ज्यूंना असे वाटू लागले होते की पाश्चिमात्य नवजागृती आणि उदारमतवाद यांच्या ज्या विचारधारा पूर्व युरोपात हळूहळू झिरपत होत्या त्यांमधून आपण शोधीत असलेले दास्यविमोचन आपल्याला मिळविता येईल. काहींनी पुढेमागे आपण व्यापक समाज-जीवनात एकजीव होऊन जाऊ अशी आशा धरली आणि पोलिश राष्ट्रीयता आणि पोलिश सांस्कृतिक प्रेरणा यांच्याशी स्वतःला एकरूप करून घेतले. जेव्हा पोलिश शाळांतून ज्यूंना प्रवेश मिळू लागला तेव्हा त्यांच्या आशा बळावत गेल्या आणि असे धर्मनिरपेक्ष, राष्ट्रीय शिक्षण हाच विशाल पोलिश समाजाशी आपण एकरूप होण्याचा मार्ग आहे असे त्यांना वाटू लागले.

मात्र, आपल्या या आशा निष्फळ ठरणार हे त्यांना लवकरच कळून चुकले. ज्यूंना शाळात प्रवेश दिल्यावरसुद्धा पोलिश मुले " ज्यू विद्यार्थ्यांना बरोबरीचे मानीत नसत आणि प्रत्येक ठिकाणी ते उपरे असल्याची भावना त्यांच्या मनात उत्पन्न केली जात असे,"[२] आणि आपणाला बरोबरीचे स्थान मिळावे म्हणून पोलिश समाजाशी सर्वस्वी एकरूप झालेल्यांनासुद्धा " पोलिश राष्ट्रीय समाजाच्या पुनरुज्जीवनात तुमची गरज नाही. "[३] असे सांगण्यात येई. पोलिश राष्ट्राबद्दल अव्यभिचारी भक्तिभाव असूनही आपली कोणाला जरुरी नाही या जाणिवेने या ज्यू तरुणांना भयंकर धक्का बसला, आणि त्यातूनच दुसऱ्या काही मार्गांनी आपले दास्यविमोचन घडवून आणण्याचा निर्धार अधिक बळकट झाला. या अव्हेराचे महत्त्व किती निर्णायक होते हे संस्थापकांकडून बोलण्याच्या ओघात अव्हेराच्या विशिष्ट अनुभवांचे सहजगत्या जे संदर्भ येत त्यावरून स्पष्ट होते. एक संस्थापिका म्हणाली, " पोलिश शाळांचा देशभक्तीवर फार भर होता आणि या पोलिश देशभक्तीत ज्यू विद्यार्थी सहभागी होते. " आपण ज्यू असलो तरी ते फक्त आपल्या घरापुरते. बाकी आपण पोलच आहो असे ते मानीत असत. " एरवी आम्ही ज्यू आहोत हे आम्ही विसरलो होतो. " परंतु ही स्त्री अवघी दहा वर्षांची होती तेव्हा अशी एक घटना घडली की जी "आपण कधीच विसरणार नाही " असे ती म्हणाली. हाच अनुभव इतरही पुष्कळांना आलेला होता. तो पोलंडचा स्वातंत्र्यदिन ( ३ मे ) होता आणि शाळेला जायची तयारी करताना ती अगदी अधीर झाली होती, कारण तिच्या वर्गात त्यादिवशी समारंभ होणार होता. जेव्हा वर्ग भरला तेव्हा शिक्षकांनी जाहीर केले की सगळ्या ज्यू विद्यार्थ्यांनी घरी परत जावे, कारण " हा आमचा सण आहे, तुमचा नव्हे ! " तिला

---

२. किर्यात येदिदिमच्या एका जुन्या रहिवाशाने ( Veteran Settler ) प्रसिद्ध केलेल्या पुस्तकातून.

३. तत्रैव.

बसलेला हा " जबरदस्त धक्का " होता आणि यातूनच तिची " आंदोलनात " प्रवेश करण्याची मानसिक तयारी झाली. पोलिश शिक्षणाबाबतचा आणि पोलिश समाजात स्वीकारले जाण्याबाबतचा हा भ्रमनिरास, पहिल्या जागतिक युद्धानंतरच्या संघटित ज्यूविरोधी अत्याचारांच्या उद्रेकाने आणखीच तीव्र झाला. या अत्याचारात पोलिश शेतकऱ्यांनी ज्यूंना ठार केले, त्यांची घरे लुटली आणि या कामी पुष्कळदा पोलिश पोलिस आणि लष्कर यांनी त्यांना सक्रिय मदत केली. सुशिक्षित तरुणांवर हा अखेरचा आघात ठरला. आंदोलनाने पोलिश शाळांवर बहिष्कार घालून त्यांच्याऐवजी ज्यूइश " जिम्नॅशिया "ची म्हणजे शाळांची स्थापना केली. एक संस्थापक म्हणाला, " निदान आंदोलनाच्या सभासदांना तरी स्पष्ट दिसू लागले की ज्यूंच्या समस्येला पोलंडमध्ये दुसरे उत्तर नाही. "

## श्टेटलची संस्कृती

बहुतेक संस्थापक श्टेटलमध्ये किंवा श्टेटलसारखीच संस्कृती असलेल्या शहरी "गेटो"मध्ये राहाणारे होते, अथवा श्टेटल संस्कृतीला चिकटून राहणाऱ्या सनातनी आईवडिलांच्या पोटी जन्माला आलेले होते. या संस्कृतीचे वस्तुनिष्ठ गुण' काहीही असले तरी तिच्याकडे बघण्याचा ज्यू युवकांच्या नव्या पिढीचा दृष्टिकोण प्रतिकूल होता. त्यांच्या मते श्टेटल म्हणजे " एक दरिद्री, कोंदट, गॅलिशियन खेडे " होते आणि त्यातील लोक मानसिक व प्राकृतिक अशा दोन्ही अर्थांनी " अरुंद गल्लीतून "[६] राहात होते. त्यातून खऱ्याखुऱ्या माणसांची " व्यंगचित्रे " म्हणावीत अशा प्रकारची माणसे निर्माण होतात, असे त्यांना वाटे. आंदोलनाच्या एका अधिकृत प्रकाशनात असे लिहिलेले आहे की श्टेटलमधला ज्यू म्हणजे

> ...सर्वसाधारण माणसाचे शारीरिक आणि आत्मिक व्यंगचित्र होय. गटामधली एक व्यक्ती म्हणून आपल्यावर पडणारी जबाबदारी तो टाळतो आणि संघटना व शिस्त यांचे त्याला वावडे असते. आपण सर्व माणसांहून शहाणे आहोत आणि आपल्यासाठी

---

४. " आंदोलन, " आज दोन स्वरूपांत अस्तित्वात आहे. इस्रायलमधल्या व परदेशातल्याही तरुणांना किबुट्झ जीवनासाठी तयार करण्याचे काम जी युवक संघटना करते तिचे नाव आंदोलन ( Movement ) आहे. किबुट्झमध्ये वाढलेली मुलेही किबुट्झची सभासद होण्यापूर्वी ह्या युवक संघटनेची सभासद होतात. पण युरोपीय युवक संघटनेच्या सभासदांनी इस्रायलमध्ये आल्यावर ज्या राजकीय पक्षाची स्थापना केली त्याचेही नाव ' आंदोलन ' असेच आहे. ह्या पक्षाने अलीकडे दुसऱ्या दोन लहान पक्षांबरोबर संयुक्त आघाडी बनविलेली आहे आणि ' मूव्हमेंट ' नावाच्या एका मोठ्या गटाच्या अंतर्गत एक लहानसा गट म्हणून त्याचे सभासद काम करतात.

५. श्टेटलच्या समूहसंस्कृतिवर्णनात्मक अभ्यासासाठी पाहा, Zborowsky and Herzog.

६. पूर्वोल्लिखित Veteran Settler.

बाकीच्यांनी त्यांची मते सोडून आपली स्वीकारावीत असे त्याला वाटते. वादंग आणि शब्दच्छल यांत त्याचा हातखंडा असतो आणि हीच त्याला साध्ये वाटतात.[७]

पारंपरिक ज्यू संस्कृती आणि तीतून निर्माण होणारा व्यक्तिमत्त्व-प्रकार यांबद्दल तरुण ज्यूंच्या मनात कटुत्व होते आणि त्याची परिणती तथाकथित ज्यू शारीरिक ठेवणीबद्दलही नावड उत्पन्न होण्यात झाली. आजदेखील किबुट्झमधले प्रौढ आपल्या छोट्या, गोऱ्या " साब्रां "कडे बघून अभिमानाने, " हे ज्यू आहेत असं तुम्हाला कधी तरी वाटेल काय ? " असे विचारतात. आणखी एक नमुनेदार प्रतिक्रिया सांगायची तर अशी सांगता येईल की किबुट्झला भेट देण्यास आलेल्या दोन तरुण अमेरिकन ज्यूंकडे बघून एक संस्थापिका उद्गारली, " ते इतके छान दिसतात की ते ज्यू आहेत असे कुणाला वाटणारही नाही. " प्रस्तुत लेखकाने तिच्या या उद्गारात लपलेली ज्यू-विरोधी भावना दाखवून दिली तेव्हा तिने ती कबूल केली आणि ज्यूंचा जो शारीरिक " छाप " आहे त्याचा आपण नेहमीच " तिरस्कार " करीत आलो आहोत असेही सांगितले.

म्हणूनच, बिगर-ज्यू जगाने लाथाडलेले असूनही आपल्या स्वतःच्या ज्यू जगातही या तरुणांना सुख वाटत नव्हते; त्यांनी एका जगाचा अव्हेर केला होता आणि दुसऱ्याने त्यांना अव्हेरले होते.

## आईबाप-मुले यांचे परस्परसंबंध

श्टेटलला असणारा विरोध आणि पुढे त्यांनी कियांत येदिदिममध्ये सुरू केलेली " सामूहिक शिक्षणाची "ची पद्धत या दोन्ही गोष्टी समजण्याच्या दृष्टीने या युवकांचा आईबापांशी असणारा विरोध ही बाब मानसशास्त्रीय महत्त्वाची आहे. " आमच्या आईवडिलांच्या जीवनक्रमाला आमचा विरोध असे " असे उद्गार एका संस्थापिकेने काढले. एक संस्थापक म्हणाला, " आईवडील आणि त्यांची जीवनपद्धती यांविरुद्ध बंड केले पाहिजे या विचारावर आमचा मोठा जोर होता. " बाळपणी व तरुणपणी आपल्या वाट्याला आलेला हा संघर्ष लक्षात घेऊन तो टाळण्याचे महत्त्व केवढे आहे ह्या विषयीचे ध्रुवपद किबुट्झ शिक्षणपद्धतीसंबंधी कोणतीही चर्चा चालते तेव्हा सतत ऐकू येते. श्टेटलमधल्या आईबाप-मुले ह्या संघर्षाचा सारांश एका सभासदाने पुढीलप्रमाणे दिला आहे :

---

७. १९१७ मध्ये प्रसिद्ध झालेल्या **Our Program** मधून. ज्यूंचे हे वर्णन झिऑनवादाच्या एका महत्त्वाच्या अंगाचा निर्देश करते. ज्यूंच्या या प्रकारच्या वर्णनातून झिऑनवादाची एक महत्त्वाची पण बहुशः दुर्लक्षित बाजू सूचित होते– ती म्हणजे झिऑनवादात अनुस्यूत असलेला ज्यू-विरोधी अंश. पाहा कॉफमन **Anti–Semitic Stereotypes in Zionism.**

आपल्या स्वतःच्या कौटुंबिक जीवनातसुद्धा ज्यू तरुणाला दिलासा वा प्रोत्साहन लाभले नाही. वडील आणि मुलगे यांच्यातली दरी रुंदावत गेली. मुले एक प्रकारच्या चवाठ्यावर उभी होती. ज्यात त्यांचे बापजादे अद्यापही बुडालेले होते त्या काळच्या जगातून त्यांनी सुटका करून घेतली होती. परंतु त्यांच्या पुढचा भविष्यकाळ अजूनही धुक्यात गुरफटलेला होता.[८]

## युवक चळवळ

ज्यू " जग " आणि बाकीचे " जग " या दोन्ही जगांविरुद्ध बंड केलेल्या या तरुणांना युरोपीय युवक चळवळ आणि झिऑनवादी चळवळ या दोन प्रवाहांचा संगम झालेल्या " आंदोलना "त आपला मार्ग सापडला. १८९७ मध्ये बासल येथे भरलेल्या पहिल्या आंतरराष्ट्रीय झिऑनवादी कॉंग्रेसच्या वेळेपासून पूर्व युरोपमध्ये एक धर्मनिरपेक्ष राजकीय चळवळ म्हणून झिऑनवाद ही एक जोरदार शक्ती बनली होती.[९] अनेक झिऑनवादी पक्ष आणि युवक संघटना लगेच उगम पावल्या होत्या. "आंदोलन" हे त्यातील दुसऱ्या प्रकारात मोडते. मुळात, झिऑनवादाबद्दल सहानुभूती असणारी अशी एक बालवीर चळवळ एवढेच आंदोलनाचे स्वरूप होते. त्याने पॅलेस्टाइनला स्थलांतर करण्यावर जोर दिला नाही किंवा प्रोत्साहनही दिले नाही. आंदोलनाचा मुख्य भर बालवीर कार्यक्रमावर होता, असे त्याच्या मूळ दहा तत्त्वांवरून दिसून येते. आंदोलनाचा सभासद म्हणजे :

( १ ) सत्यवादी
( २ ) स्वजननिष्ठ
( ३ ) स्वजनांविषयी भ्रातृभाव बाळगणारा

---

८. पूर्वोल्लिखित 'जुना रहिवासी'. सार्थींनी आपल्या आईवडिलांच्या जीवनातील बरीचशी मूल्ये आणि आचार आपल्या जीवनातही कायम ठेवले आहेत हे सैद्धांतिक दृष्टीने विचार करता फार महत्त्वाचे आहे. ह्या पुस्तकात ठिकठिकाणी त्यांचा उल्लेख येणार आहे. सार्थींच्या दैनंदिन जीवनक्रमाचे ज्या पद्धतीने नियमन केले गेले आहे तीत हे सातत्य विशेषपणे दिसून येते. ' शुल्हन आरुह ' ह्या [ धर्मसिंधुसदृश ] ग्रंथाने त्यांच्या आईवडिलांचे जीवन अगदी बारीकसारीक तपशिलातही नियंत्रित केले गेले होते. सार्थींचे दैनंदिन जीवनही संघाच्या नियमावलीने तितकेच बांधून टाकलेले आहे. निद्रागृहात किती मुलांनी झोपावे, किती मुलांमागे एक परिचारिका असावी, दिवसाकाठी किती तास काम करावे, वार्षिक सुट्टी केवढी असावी, राहण्याच्या कमीत कमी सोयी काय असाव्या, खोलीत कमीत कमी किती फर्निचर असावे, गरवारशी बाईला किंवा बाळंतिणीला विश्रांती किती मिळावी ह्या आणि इतर अनेक बाबींबद्दल संघाने नियम घालून दिलेले आहेत.

९. Levensohn यांचे **Outline of Zionist History** हे पुस्तक झिऑनवादाच्या इतिहासाठी पाहा.

( ४ ) केव्हाही मदतीस तयार असणारा विश्वसनीय बंधू

( ५ ) निसर्गप्रेमी

( ६ ) नेत्यांचा आज्ञाधारक

( ७ ) आनंदी आणि प्रसन्न

( ८ ) काटकसरी व उदार

( ९ ) निर्भय

(१०) विचार, शब्द व कृती यांत शुद्धता असणारा[१०] —
असा असावयास हवा.



व्हिएनाला पळून गेलेल्या अनेक ज्यू तरुणांवर पहिल्या महायुद्धानंतरच्या काळात निर्माण झालेल्या जर्मन युवक चळवळींचा परिणाम झाला व तेव्हापासून त्यांचा बालवीर-सदृश कार्यक्रमांवरचा भर दृढ झाला. जर्मन युवक चळवळींचा त्यांच्यावरील परिणाम वज्रलेप ठरला, कारण,

> ...जर्मन युवकांच्या तडफदार आणि आधुनिक प्रतिमांमध्ये एक जादू होती. स्वातंत्र्याची आणि बंधमुक्ततेची आस लागलेल्या आम्हांला हे तरुण स्त्रीपुरुष म्हणजे दास्यमुक्त तारुण्याचे प्रतीकच वाटले. पुष्कळांना हे दर्शन साक्षात्कारासारखे वाटले, त्यांनी या युवक चळवळींचे साहित्य आधाशीपणे वाचले आणि त्यातले शब्द तहान लागल्याप्रमाणे पिऊन टाकले, त्यातल्या सर्व विचारांचा त्यांच्यावर प्रभाव पडला आणि पगडा बसला.[११]

ह्या गटाचे, विशेषतः आंदोलनावर ज्याचा अतिशय प्रभाव पडला त्या 'वॅंडरव्होगेल' नावाच्या युवक गटाचे विचार अगदी साधे होते. परंपरेविरुद्ध बंड, निसर्गप्रेम, ज्यात 'जनते' बद्दलचे काही कल्पनारम्य गूढ सामावलेले आहे असे राष्ट्रप्रेम, आत्माविष्कार, जीवनाच्या भावनात्मक बाजूवर भर, कामातच आनंद, हे ते विचार होत. व्यक्तीचा पुनर्जन्म आणि शहरी वागण्याच्या पद्धती व कृत्रिम संकेत यांच्या बंधनातून सुटका या गोष्टींवर त्यांच्या कार्यक्रमाचा जोर होता. याचा अर्थ असा की व्यावहारिक आणि मानसशास्त्रीय अशा दोन्ही दृष्टींनी, आईबापांपासून आणि त्यांच्या पिढीपासून तुटून निघणे हे यात अपरिहार्य होते. बेकर म्हणतो त्याप्रमाणे"...त्यांना वडील माणसांच्या जगाबद्दल घृणा आणि द्वेष वाटे; जिथे इच्छिताला फळ येईल अशा

---

१०. **Our Principles** या १९१७ मध्ये प्रसिद्ध झालेल्या पुस्तकातून उद्धृत. शेवटच्या तत्त्वाचा अर्थ मद्यपान, धूम्रपान आणि लैंगिक संबंध यापासून अलिप्त राहणे असा केला जाई.

११. पूर्वोल्लिखित Veteran settler पृ. १३

एका नव्या जगाची लालूच दाखविणाऱ्या कोणत्याही पुंगीवाल्यामागून जायला ते तयार होते.'[१२]

ही चळवळ एका विशेष अर्थाने 'निसर्गवादी' ( प्रिमिटिव्हिस्ट ) होती आणि इतिहासातील इतर 'निसर्गवादी' चळवळींप्रमाणेच जर्मन युवक चळवळीचे सभासदही असे मानीत की मानवी वागणुकीमधला सर्व प्रकारचा क्षुद्रपणा आणि अनुदारता हे शहरी जीवनाचे आणि तदनुषंगिक सुखसोयींचे व खोट्या संकेतांचे परिणाम होत.[१३] शहरी जीवनाच्या या दोषांपासून एकदा मुक्तता झाली म्हणजे मानवी शक्तींचा पूर्ण विकास होईल व आनंद व बंधुभाव ही मनुष्याच्या सामाजिक जीवनाची वैशिष्ट्ये बनतील. म्हणून या युवकांना असे वाटत होते की आंदोलन म्हणजे

...चैतन्यहीन शालेय कार्यक्रम, ढोंगी धार्मिकपणा, पोकळ बंडेजावीच्या मैफिली, ऐश्वर्याच्या प्रदर्शनार्थ आणि बढतीच्या उद्देशाने ठरविलेल्या कंटाळवाण्या मेजवान्या, निर्जीव आचार-समारंभ आणि खोटा मनमोकळेपणा यांनी भरलेला विद्यार्थ्यांचा फोल आनंद, जगात कसे यशस्वी व्हावे यासाठी सद्हेतूने दिलेला पण घृणास्पद सल्ला...या सर्वांविरुद्धच्या बंडखोरीचे दृश्य प्रतीकच होते.[१४]

मात्र या बंडखोरीने राजकीय चळवळीचे स्वरूप धारण केले नाही. या "खोट्या" मूल्यांच्या नाशासाठी आंदोलनाने कार्यक्रम आखला नाही किंवा इतर कोणते राजकीय कार्यक्रमही अंगावर घेतले नाहीत. तत्कालीन समाजात बदल सुचविण्याऐवजी समाजातून सुटून निसर्गाच्या विश्वातच मग्न होण्याचा संदेश त्याने दिला; कारण त्यात 'साहसाला अमाप वाव होता.'

आपल्या आवडत्या नेत्याबरोबर पायपीट करीत असतानाच त्यांना हा नवा जीवन-मार्ग दिसला. शेतांतून, जंगलांतून, आणि डोंगरांतून स्वैर विहार करावा, एखाद्या भग्न किल्ल्यात किंवा जेथे शहरी ढोंगीपणाचा अभाव आहे अशा शेतकऱ्यांच्या घरांच्या पुंजक्याभोवतीच्या लिंडन झाडांखाली आपला तंबू ठोकावा.[१५]

---

१२. Becker पृ. ७३. हे पुस्तक, विशेषतः प्रकरण पाच, हे जर्मन युवक चळवळीचे बहुमोल वर्णन आणि विश्लेषण आहे.

१३. A Documentary History of Primitivism and Related Ideas या Lovejoy व Boas यांच्या अतिसुंदर पुस्तकात ज्याअर्थाने 'निसर्गवाद' ( Primitivism ) हा शब्द वापरलेला आहे त्याच अर्थाने तो येथे वापरलेला आहे. समाजव्यवस्था 'नैसर्गिक स्थिती'ला ( State of Nature ) जेवढी जवळची तेवढी तीत उत्कृष्ट मानव निर्माण करण्याची क्षमता असा हा विचार आहे. अठराव्या शतकातील 'नोबल सॅव्हेज' व एकोणिसाव्या शतकातील स्वप्नरंजनवाद यांच्याशी निसर्गवादाचे जवळचे नाते आहे.

१४. Becker पृ. ७५

१५. तत्रैव.

नेहमीच्या जीवनातून सुटका करून घेऊन निसर्गाकडे धाव घेण्याच्या प्रवृत्तीचे ज्यू तरुणांना विशेष आकर्षण वाटले. या सहलींचे वर्णन करताना एक संस्थापिका म्हणाली, ' निसर्ग म्हणजे काय, झाड कसे असते हे ज्यूंना मुळी माहीतच नाही. ' युवक चळवळीतील या स्पेटींमुळेच त्यांना ' निसर्गातील शांती ' कळून आली, आणि त्यामुळेच त्यांना पॅलेस्टाइनमध्ये गेल्यानंतर जमिनीवर वसाहत करण्याची त्यांना प्रेरणा मिळाली.

निसर्गाकडे परत जाण्यातच नव्हे तर साध्या राहणीच्या आग्रहातही या गटाचा ' निसर्गवाद ' दिसून येत होता. अगदी सुरुवातीला

> सुखसोयी नाकारून कठोर निसर्गवादाचा अंगीकार केला जात होता. आणि नंतर ...मद्य व तंबाखू यांचा त्याग, बॉलरूम नृत्ये, सिनेमा इत्यादींवर बहिष्कार आणि इतर अनेक प्रकारचे निर्बंध स्वेच्छेने लादून घेतले गेले. युवक चळवळीचे जे कडवे अनुयायी नव्हते अशांच्या गटांनासुद्धा यामुळे एक तापसीपणाची छटा चढली आणि प्रौढांच्या जगाशी झालेली त्यांची फारकत अगदी स्पष्ट झाली. इतकी की अगदी मंदबुद्धी आई-बाप, शिक्षक, आणि धर्मोपदेशक यांच्या सुद्धा ती ध्यानात यावी.[16]

' स्वेच्छेने लादून घेतलेले ' आणखी काही महत्त्वाचे असे निर्बंध आंदोलनाने स्वीकारले ते म्हणजे साध्या घरांतून राहणे, साधे कपडे वापरणे आणि स्त्रियांनी प्रसाधन न करणे हे होत. किर्यात येदिदिममध्ये या विरक्तीची परंपरा अद्यापही जिवंत आहे.[17] एका बाजूला ही विरक्तीची ऐतिहासिक परंपरा व दुसऱ्या बाजूला चैन व सुखसोयींची प्रबळ इच्छा असा संघर्ष पुष्कळशा संस्थापकांच्या जीवनात निर्माण झाला आहे व त्यातून किबुट्झ चळवळीत पेचप्रसंग निर्माण झालेला आहे.[18]

जर्मन युवक चळवळीने व्यक्तिस्वातंत्र्य, आत्माविष्कार आणि समूहापासून मुक्तता या तत्त्वांवर भर दिला होता. तरी समूहाचेच महत्त्व— मात्र आता त्यांच्या स्वतःच्याच समूहाचे—पुन्हा प्रस्थापित होण्यास वेळ लागला नाही. जर्मन युवकांच्या जीवनात समूह दोन प्रकारचे कार्य करीत असे आणि किर्यात येदिदिमची स्थापना करणाऱ्या ज्यू तरुणांच्या जीवनात सुद्धा त्याने तीच कार्ये केली आहेत यात शंका नाही. एक म्हणजे, " आपण एका बंडखोर समूहाचे, वेचक सदस्य असलेल्या गुप्तमंडळाचे घटक आहोत या जाणिवेतून निर्माण होणारी रोमांचकारी भावना. "[19] एक संस्थापिका सांगते की, " आंदोलना"मुळे, " आमच्या आयुष्याला अर्थ आला कारण आम्ही एका नव्या आयुष्याला सुरुवात करणार असल्याने आम्ही इतरांहून निराळे, इतरांहून अधिक चांगले आहों असे आम्हाला वाटू लागले. "

---

१६. तत्रैव, पृष्ठ ९८.

१७. पुढे पाहा, पृष्ठे...५४–५६.

१८. सहावे प्रकरण पाहा.

१९. Becker, पृ. ७५.

एका " नव्या जीवना "च्या उभारणीचा निश्चय केल्यामुळे आपण इतरांहून " वेगळे " आणि " अधिक चांगले " आहो या भावनेचे महत्त्व कमी लेखता कामा नये. ह्या भावनेमधून आणि तिच्याबरोबर तिच्या सामाजिक आणि मानसिक परिणामांमधून एका धूसर आणि स्वप्नाळू बालवीर चळवळीचे एका एकात्म आणि सुसंघटित अशा पंथात–आणि पुढे एका आत्मजाणीवयुक्त राजकीय संघटनेत रूपांतर झाले आणि अजूनही होत आहे.[२०]

समूहाकडून झालेले दुसरे कार्य म्हणजे सभासदांना हवीहवीशी वाटणारी आनंदाची व स्वातंत्र्याची जाणीव त्यांच्यात उत्पन्न करतील अशा प्रकारचे भावनिक अनुभव त्यांना आणून देणे. बेकर म्हणतो, "समानधर्मीयांचा सहवास" आणि "सहल" किंवा "रपेट" व " घरटे " यांचे अनुभव यातून उफाळणाऱ्या भावनांमुळे त्यांचे आत्मे विकसन पावत असत. "[२१] हे अनुभव किती गंभीर आणि खोलवर रुजलेले होते याची साक्ष पुढे तीस वर्षांनी संस्थापकांकडून निघणाऱ्या त्यासंबंधीच्या उत्स्फूर्त उल्लेखांतून पटते. खरे म्हणजे ते अनुभव इतके महत्त्वाचे होते की, एका किबुट्झ पुढाऱ्याच्या मते, पुढे पॅलेस्टाइनमध्ये त्यांनी निर्माण केलेल्या समूहजीवनाचा आदर्श नमुना म्हणून ते उपयोगी पडले. तो म्हणाला, " श्रमधर्माचे तत्त्वज्ञान रशियन झिऑनवाद आणि प्रारंभीचे किबुट्झ यांमधून आले आणि सामूहिक राहणी आंदोलनातील रपेटींमधून आली. "

व्यक्तीचे पुनरुज्जीवन आणि परिणामी अखेर समाजाचेच पुनरुज्जीवन यावर आंदोलनाचा भर असल्यामुळे " आदर्श " अशी शिक्षणपद्धती तयार करण्यात त्याने आपली बरीच शक्ती कामी लावली. एक संस्थापक म्हणाला, " ही शिक्षणपद्धती हेच आमचे मुख्य लक्ष्य होते; त्या कल्पनेने आम्ही झपाटूनच गेलो होतो. तीनचार वर्षे

---

२०. प्रस्तुत लेखकाच्या मनावर सुरुवातीलाच झालेल्या परिणामांपैकी एक म्हणजे किबुट्झचे [ धार्मिक ] पंथाशी सादृश्य. ( पुढे ५ व्या प्रकरणात ह्याचा विचार केला आहे. ) जर्मन युवक चळवळीचे विश्लेषण करताना बेकरला सुद्धा त्यांच्या वर्णनासाठी " पंथ " (सेक्ट) हाच शब्द वापरावा लागला हे सुद्धा ध्यानात घेण्यासारखे आहे. तो लिहितो, " प्रारंभी विस्कळीत असलेल्या बेडखोर विचारांच्या समूहांची सामूहिक ऐकात्म्याच्या भावनेमधून समान विचारांच्या व स्वतःला वेगळे समजणाऱ्या अशा पंथात परिणती झाली. " ( तत्रैव, पा. ८३ )

२१. तत्रैव, पा. ७७. " सहल " म्हणजे नियमित कालावधीने केलेली पदभ्रमणे आणि " घरटे " म्हणजे स्थानिक गटाची भेटीगाठीची जागा. " घरटे " हा शब्द ( हिब्रू–केन ) आंदोलनाने युरोपात असतानाच वापरावयास सुरुवात केली होती. आज मात्र त्या शब्दाने भेटीच्या जागेऐवजी स्थानिक गटाचाच निर्देश होतो. उदाहरणार्थ, केन तेल अव्हीव, केन किर्यात येदिदिम, इत्यादी.

आमच्यामधले हजारोजण या प्रश्नाशी झुंजत होते. आज किबुट्झमध्ये आढळणारी शैक्षणिक तत्त्वप्रणाली आणि तिची चौकट मुळात तयार झाली ती त्यावेळी."

## झिऑनवाद

आतापर्यंतच्या चर्चेवरून, त्याचप्रमाणे आंदोलनाच्या तत्त्वांवरून दिसून येईल की आंदोलन ही मुख्यतः यूरोपच्या कॉंटिनेंटमधील युवक चळवळ होती आणि तिच्यात झिऑनवादाचा भाग फारच अल्प होता. १९१७ सालच्या "आमचा कार्यक्रम" या लेखात झिऑनवाद हा आंदोलनाशी विशेष निगडित असल्याचा काही उल्लेख नाही. या "कार्यक्रमा"चा ज्या तीन गोष्टींवर भर होता त्यांतल्या सर्व, एक अपवाद सोडल्यास, जर्मन युवक चळवळीशीच संलग्न होत्या. पहिला भर ज्यू जीवनक्रम बदलण्यावर होता, त्यातून मुक्त होण्यावर नव्हता. मात्र, हा बदल म्हणजे पॅलेस्टाइनला स्थलांतर करण्याच्या स्वरूपाचा नसून आंदोलनाच्या मूल्यांबरहुकूम ज्यूंच्या जीवनात बदल घडवून आणण्यावर होता. ज्यांवर भर होता ती दुसरी तत्त्वे म्हणजे समूह जीवन, औपचारिक शिक्षणाचा त्याग आणि "शिकण्या"साठी निसर्गाकडे धाव ही होत.

आंदोलनाची झिऑनवादी दिशेने प्रगती होण्यास महत्त्वाचे कारण घडले ते म्हणजे पोलंड व युक्रेनमध्ये युद्धानंतरच्या काळात ज्यूंवर झालेले पूर्वोल्लिखित अत्याचार. आंदोलनातील पुष्कळशा सभासदांना हे अत्याचार व्यक्तिशः भोगावे लागले होते आणि त्यांच्यावर त्यांचा खोल परिणाम झाला होता. त्यांच्यापैकी एका सभासदाने तरी निराशेने आत्महत्या केली होती. "या घटनेने पॅलेस्टाइनला जाण्याचा आमचा निर्णय पक्का झाला; पोलंडमध्ये राहाणे आम्हाला अशक्य झाले," असे एका संस्थापकाने सांगितले. पाश्चिमात्य संस्कृती व "फ्रेंच राज्यक्रांतीचे बूर्झ्वा तत्त्वज्ञान" यावरील ज्यूंच्या अनेक आरोपांची जी लांबलचक यादी होती त्यांमधील फक्त एक नोंद म्हणजे युद्धोत्तर पोलंडमधला ज्यूद्वेष असे दुसऱ्या एका संस्थापकाने सांगितले. अशा रीतीने क्रियांत येदिदियची स्थापना करणाऱ्या ज्यू तरुणांना बुद्धिवाद, उदारमतवाद, बंध-मुक्ती इत्यादी आदर्श मूल्ये म्हणजे एक "मोठे थोरले असत्य" असल्याचे जाणवले व त्यांनी स्थलांतर करण्याचे निश्चित केले.

हे लक्षात ठेवले पाहिजे की त्यांचा झिऑनवादी निर्णय हा काही झिऑनवादी आदर्शांच्या "विधायक" पायावर आधारलेला नव्हता, तर युरोपीय समाजपद्धतीच्या विरुद्ध एक अकरणात्मक प्रतिक्रिया असे त्याचे स्वरूप होते आणि झिऑनवादाबद्दलच्या व अंतिमतः त्यांच्या स्वतःच्या ज्यूपणाबद्दलच्या या वृत्तीचे सार्थीवर आणि त्यांच्या मुलांवर देखील महत्त्वाचे मानसिक परिणाम झाले आहेत. एकोणिसाव्या शतकातील इतर राष्ट्रीय चळवळींप्रमाणे झिऑनवादही एतद्देशीय राष्ट्रीय संस्कृतीचे पुनरुज्जीवन करू पाहाणाऱ्या स्वभाळू परंपरेचा एक भाग होता. या इतर राष्ट्रवादांप्रमाणे ज्यूंच्या राष्ट्र-

वादानेही आपल्या लोकांच्या सांस्कृतिक गतवैभवावर भर दिला होता, आणि एकदा आपल्या भूमीला राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळाले की या वैभवाचा पुनर्जन्म होईल असे त्यांचे भाकित होते. परंतु हे राष्ट्रीयत्वाचे गूढवादी आवरण आंदोलनाच्या मूळ आदर्शाशी जमणारे नव्हते. ज्यूधर्माचा आविष्कार म्हणून झिऑनवादाकडे बघण्याऐवजी ज्यूधर्मापासून म्हणजेच श्टेटल संस्कृतीतून सुटका असाच त्याचा अर्थ ते करीत होते. झिऑनवाद हा ज्यूत्वाचा म्हणजेच श्टेटलमधील ज्यू संस्कृतीचा आविष्कार नसून तो ज्यूत्वामधून आणि त्याचप्रमाणे विदेशामधल्या ज्यूंच्या जीवनातील भीषण वास्तवातून सुटण्याचा एक मार्ग आहे अशी त्यांची दृष्टी होती. थोडक्यात झिऑनवादाने ज्यूंना आपले "स्वाभाविक" जीवन जगता येईल असे त्यांना वाटत होते.[२२]

पण झिऑनवादी प्रेरणा कोणत्याही असोत, एकदा तो निर्णय घेतल्यानंतर झिऑनवादी चळवळीचा औपचारिकपणे भाग होणे किंवा झिऑनिस्ट ध्येयाला निःसंदिग्ध पाठिंबा देणे याहून बरेच काही त्यात आले ही गोष्ट महत्त्वाची आहे. झिऑनवादी होणे म्हणजे पॅलेस्टाइनला स्थलांतर करण्याची तयारी असणे असा अर्थ होता. फक्त पॅलेस्टाइनमध्येच आपल्याला आत्मसाक्षात्कार होईल अशी त्यांची श्रद्धा होती. एका संस्थापकाने लिहिले आहे की

> …राष्ट्रीय परिस्थितीचे नुसते विश्लेषण केले आणि तिचे अचूक निदान केले की झाले असा [ आंदोलनाचा अर्थ ] नव्हे; उलट संकटावर मात करून त्यातूनच मुक्तीचा मार्ग शोधून काढण्यासाठी सभासदांना कार्यप्रवृत्त करणे असा त्याचा अर्थ होता आणि यातूनच राष्ट्रीय प्रश्नाकडे पाहण्याच्या क्रियाशील प्रवृत्तीचा जन्म झाला. ती प्रवृत्ती म्हणजे राष्ट्राच्या भविष्यकालीन इतिहासाची घडण करणे ही आपली जबाबदारी आहे असे वाटणे.[२३]

स्थलांतर करण्याचा त्यांचा निर्णय हासुद्धा त्यांच्या इतिहासातील इतर अनेक गोष्टींप्रमाणे युरोपीय युवक-चळवळीच्या सर्वसाधारण संदर्भात समजण्यास सोपा आहे. सामान्यतः युवक चळवळीच्या अनुभवात असे दिसून आले होते की जेव्हा सभासदत्वाच्या अगदी स्पष्ट अशा कसोट्या आवश्यक नसत तेव्हा ज्याला "ताण" जाणवत होते अशा कोणालाही सभासद बनता येत होते व असे सभासद होतही होते. परिणामतः ही परिस्थिती :

---

२२. आपल्या भूतकाळाबद्दल अभिमान न बाळगता "स्वाभाविक" राष्ट्रीय जीवन जगणे कितपत शक्य आहे याची शंकाच आहे आणि साब्रांची आपल्या ज्यूत्वाबद्दल जी द्विधा मनःस्थिती आहे तीवरून लक्षात येते की "स्वाभाविकता" ही गोष्ट प्रारंभीच्या वसाहतवाल्यांना वाटली तेवढी सोपी नाही.

२३. पूर्वोक्त Veteran Settler.

...ज्यांची निष्ठा अधिक कडवी त्यांना असह्य होते आणि ते आपल्या सहकाऱ्यांत आंतरिक ऊर्मीची बाह्य खूण कोठे दिसते की नाही हे पाहू लागतात–आणि या खुणा नेहमीच दिसून येतात असे नाही... ( ही खूण म्हणजे )... ऐकात्म्याची सातत्याने होत राहणारी जाणीव; आणि ही जाणीव स्पेटीच्या अनुभव कसोटीतून निर्माण होत असे."[२४]

ज्यूंच्या चळवळीपुढेही अशीच समस्या होती; परंतु जर्मन युवक चळवळीपेक्षा तिचे प्रश्न अधिक तीव्र असल्यामुळे जी "खूण" त्यांना अभिप्रेत होती तीही तितकीच टोकाची होती. तिने देशातल्या देशात एका "स्पेटी"ची मागणी करण्याऐवजी, देशाबाहेर स्पेट – "अलिया" – करण्याची, पॅलेस्टाईनमध्ये स्थलांतर करण्याची मागणी केली. एका विशेष सूक्ष्म दृष्टीच्या संस्थापकाने सांगितल्याप्रमाणे "अलिया" किंवा "स्थलांतरा"चा आग्रह हेच...

आमच्या मते, आपल्या समस्येचे खरे उत्तर होते, कारण तो एकच अंतिम सुटकेचा मार्ग होता. आणि त्यातच युवक चळवळीची सार्थकता होती. इतर युवक चळवळींप्रमाणे कोसळून जाण्याऐवजी, ( आमची चळवळ ) यशस्वी झाली याचे कारण पॅलेस्टाईनमध्ये स्थलांतर करण्यात तिची कृतार्थता झाली व कळस गाठला गेला. झिऑनवाद नसता तर आपल्या पारंपरिक जीवनाबद्दल असंतुष्ट असलेल्या ज्यू तरुणांच्या आयुष्यातील एक बिन महत्त्वाची घटना एवढाच अर्थ आंदोलनाला उरला असता."[२५]

१९२० मध्ये त्यांनी पॅलेस्टाईनकडे कूच केले.

## अलिया

काळाच्या इतक्या अंतरावरून आज पाहताना हे स्थलांतर म्हणजे एक वेडपट साहस वाटते. जे सुमारे नव्वद स्थलांतरित पॅलेस्टाइनला पोचले आणि ज्यांनी एका वर्षानंतर

---

२४. Becker, पृ. ८४

२५. हे मात्र लक्षात ठेवावयास हवे की वडीलधाऱ्यांविरुद्ध त्यांचे जे बंड होते त्यात वडीलधाऱ्यांच्याच एका श्रद्धेचा–म्हणजे झिऑनवादाचा–अंतर्भाव होता. अर्थात् वडीलधाऱ्यांचा झिऑनवाद मुलांच्या झिऑननवादापेक्षा काहीसा वेगळ्या जातीचा होता हे खरे. त्यांपैकी काहींचा झिऑनवाद "परमेश्वराला प्रिय असलेल्या लोकांना त्याच्या पवित्र भूमीकडे नेणाऱ्या प्रेषिता"ची प्रतीक्षा करणारा धार्मिक झिऑनवाद होता तर काहींचा पॅलेस्टाइनला स्वतः स्थलांतर न करता फक्त चळवळीला पाठिंबा देणारा निष्क्रिय असा राजकीय झिऑनवाद होता. दोन्ही प्रकारच्या झिऑनवाद्यांचा आपल्या मुलांनी पॅलेस्टाइनला जाण्यास विरोधच होता. मात्र गमतीचा विरोधाभास असा की मुलांनी वडिलांना ( त्यांच्यापासून दूर होऊन ) अव्हेरिले असले तरी त्यामुळे वडील आणि मुले यांच्यातले अंतर वाढत जाण्याऐवजी उलट कमी झाले. किंबहुना, असाही तर्क लढविणे शक्य आहे की वडिलधाऱ्यांविरुद्ध बंड करीत असतानाच त्यांच्याशी नाते राखून ठेवण्याची सुप्त इच्छा त्यांच्या मनात होती आणि या इच्छेतूनच युगांडाऐवजी पॅलेस्टाइनमध्ये स्थलांतर करण्याला ते प्रेरित झाले.

किर्यात येदिदिमची स्थापना केली ते त्यावेळी विशीच्या आतलेच, अठरा एकोणीस वर्षांचे होते; आणि तेथली जमीन किंवा लोक कशा प्रकारचे असतील याची जरा-शीही कल्पना त्यांना नव्हती. पॅलेस्टाइनमधल्या त्यावेळच्या परिस्थितीबद्दलचे त्यांचे अज्ञान इतके गाढ होते की १९०९ साली स्थापन झालेली "देगानिया" किंवा इतर अशाच काही सामूहिक वसाहती अस्तित्वात आहेत हे त्यांना ठाऊकही नव्हते. देशाच्या आर्थिक स्थितीची त्यांना जवळ जवळ काहीच माहिती नव्हती आणि आपल्याला रोजगार मिळू शकेल की नाही याबद्दल खात्री नव्हती. आपण कुठे आणि कसे राहू याचाही त्यांना पत्ता नव्हता. युवक चळवळीतील "स्पेटी" एवढाच ग्रामीण अनुभव त्यांच्या गाठीशी होता. अशा या मध्यम वर्गातल्या शहरी तरुणांच्या डोक्यात आपण जमिनीवर काम करायचे एवढ्या एका भावुक कल्पनेशिवाय दुसऱ्या कोणत्याही योजना नव्हत्या. मात्र आपल्याला त्यांचे हे धाडस कितीही वेडेपणाचे आणि अव्यवहारीपणाचे वाटले तरी त्यांच्यामागे युवक चळवळीची जी पार्श्वभूमी होती तिच्या आधारे तिचे अंशतः स्पष्टीकरण करणे शक्य आहे. युवक चळवळींचा व्यवस्था, योजना, ध्येये, निश्चित उद्दिष्टे अशा गोष्टींना विरोध होता. "अविवेकी सामाजिक कृतीचा याहून शुद्ध स्वरूपाचा आविष्कार इतर कोणत्याही समाजात आढळणे कठीण आहे" असे वॉंडरव्होगेलच्या बेकरने लिहिले आहे.[२६]

विल्हेल्म स्टाहलिन या वॉंडरव्होगेलच्या एका नेत्याने ह्या परिस्थितीचे मोठे नाट्यमय वर्णन केले आहे :

जेव्हा उत्साहाने ओसंडणारे लोक एकत्र येतात तेव्हा कोणालाही ठरीव कार्य-क्रमाची गरज नसते. कोणतीही गोष्ट आगाऊ ठरविलेली नाही, तिच्यावर विचार झालेला नाही, अमुक एक करावयाचेच असे शिक्कामोर्तब झालेले नाही असा प्रकार जेव्हा असे तेव्हाचे क्षण सर्वोच्च सुखाचे वाटत असत. आमचे शब्द आणि गाणी जागत्या वर्तमानाच्या जाणिवेतून आणि प्रत्येक सदस्याला एकात्म्याच्या भावनेने बांधून टाकणाऱ्या घट्ट स्नेहबंधातून उत्स्फूर्तपणे बाहेर पडत.

एकात्म्याची भावना दृढ करणारा आणि भारावून टाकणारा स्वच्छंदीपणा, उत्स्फूर्त चैतन्य आणि "वाहील तसे वाहील" अशा प्रवृत्तींना अडसर घालणाऱ्या योजना आणि ठरीव दिनक्रम ज्यात नाहीत अशा परस्पर विश्वासू मित्रांच्या एखाद्या लहानशा गटामधल्या सहसंवादाइतका अद्भुत आणि फलदायी अनुभव दुसरा कोणताही नाही. प्रत्येक दिवसाचा आरंभ उत्सुकतेने आणि आशेने होतो आणि समृद्ध व ओसंडणाऱ्या अनुभवांबद्दल आमची हृदये दर घटकेला कृतज्ञतेने भरून येतात. सतत "काहीतरी आखून ठेवलेले" करणारे आणि प्रत्येक क्षणी काय करायला पाहिजे, काय बोलायला पाहिजे याची जाणीव बाळगणारे आत्मे खरोखरी दुर्दैवी म्हटले पाहिजेत; कारण कोणत्याही कार्यक्रमा-शिवाय नुसते जिवंतपणे जगणे व मित्रांसमवेत एकत्र असणे, यातला आनंद त्यांना कधी लाभत नाही.[२७]

---

२६. Becker पृ. ९६–९७.

२७. तत्रैव पृ. ९७.

पॅलेस्टाइनमधल्या या नवागतांना ज्या भौतिक परिस्थितीला तोंड द्यावे लागले ती इतकी खडतर होती की पुष्कळांना त्या नव्या वातावरणाशी जुळवून घेणे अशक्य झाले आणि ते पोलंडला परत गेले. प्रारंभी त्यांना काम मिळेना आणि त्यांना खायला तर जवळ जवळ काहीच नव्हते. शिवाय, तेथल्या भौगोलिक परिस्थितीची अद्याप सवय न झाल्यामुळे पुष्कळजण फार आजारी पडले. एका ठिकाणी सगळे ऐंशीच्या ऐंशीजण मलेरियाने पछाडले गेले आणि त्यांना हॉस्पिटलमध्ये ठेवावे लागले. युरोपला परतायला नाखूष असणारे काहीजण गट सोडून शहरात आपापला मार्ग शोधायला गेले. अखेर जे गटाबरोबर राहिले त्यांनी किबुट्झची स्थापना केली.

याच काळात स्थलांतरितांच्या या लहान कंपूला समूहजीवनाचा सखोल अनुभव आला तो इतका की भविष्यकाळावरही त्याचा ठसा उमटला; आणि आजही त्या-काळाची " सुवर्णयुग " म्हणून आठवण केली जाते. त्या काळी एका बाजूला असलेल्या डोंगरामधल्या " नेव्हे गिला " नावाच्या एका जागी ते राहात होते; तेथेच त्यांना पहिल्या प्रथम युवक चळवळीतील एका महत्त्वाच्या संकल्पनेचा अनुभव आला. " सेंद्रिय समाज " ( Organic Community ) ही ती संकल्पना होय. सेंद्रिय समाज म्हणजे ज्यातील ऐकात्म्य आणि संघटन जिव्हाळ्याच्या वैयक्तिक संबंधांवर आधारित आहे असा एक लहानसा समूह. जर्मन युवक चळवळीच्या " बुंदेस्लेबनिस " या संकल्पनेतील अनेक घटकांशी " सेंद्रिय समाज " या संकल्पनेचे साम्य होते. असा समाज हे युरोपातील युवक चळवळीचे एक महत्त्वाचे उद्दिष्ट होते. संस्थापकांवर ज्याच्या विचारांचा फार प्रभाव होता तो जर्मन युवक चळवळीचा तत्त्वविवेचक कार्ल ब्लूहर सांगतो की बुंदेस्लेबनिस हा " रपेटी "चा महत्त्वाचा परिणाम होता.

आम्हाला फार काळ जाणवलेले परंतु प्रत्यक्षात जिवंत अनुभव म्हणून प्रत्ययाला न आलेले असे काहीतरी मग आकाराला येऊ लागले. ते काहीतरी म्हणजे आमच्यात एक अतूट आणि दृढ बंधुभाव उत्पन्न झाला. अखेर आम्हाला बरोबर दिशा सापडली आणि संकटांशी केलेल्या मुकाबल्यातून आमच्या मनात एका अनिर्वचनीय आनंदाचा उमाळा आला. पण हेही खरेच की आम्हाला सर्वांत अधिक आनंद झाला तो यामुळे की आमची एकमेकांशी असलेली मैत्रीची आणि सहकाराची नाती कसोटीला उतरली होती.[२८]

नेव्हे गिला याठिकाणी संस्थापकांनी जो काळ घालविला त्यात ते " मैत्रीच्या आणि सहकार्याच्या बंधांनी " एकत्र आले होते एवढेच नव्हे तर त्यांच्या इतिहासातला तो एकमेव " निर्मितीचा क्षण " होता असे त्यातल्या एकाने सांगितले. " जणू काही आमच्यामधल्या सर्वोत्कृष्ट शक्तींचा अविष्कार तेथे झाला. " त्याने आपले गहिरे भावनात्मक अनुभव आणि " सेंद्रिय समाज " निर्माण करण्याचे यशस्वी प्रयत्न यांची दोन हजार वर्षांपूर्वी त्याच डोंगरात जीझसने केलेल्या निर्मितीशी तुलना केली.

---

२८- तत्रैव पृ. ८२–८३.

हा काळ जणू काही आदर्श किबुट्झचा मूळ नमुना तयार करण्याचा होता. त्यामुळे या " निर्मितीच्या क्षणा "चे स्वरूप समजावून घेणे महत्त्वाचे आहे. हे लक्षात ठेवले पाहिजे की " बिघडलेली मुले " असे ज्यांचे वर्णन एक सभासद गमतीने करतो ती ही मुले म्हणजे ज्यांनी आपले घरदार, कुटुंब यांचा त्याग करून ओसाड व भीतिदायक, भौतिकदृष्टया प्रतिकूल व वाईट हवामानाच्या अशा एका अनोळखी देशाचा आश्रय घेतला होता अशा लहान मुलांचा गट होता. ते एकाकी, स्वजनांपासून दूर आणि मित्रहीन होते. ह्या सामाजिक-मानसिक परिस्थितीत, त्यांना आपल्या आंतरिक शक्तीवरच अवलंबून राहावे लागले; आणि मानसिक सामर्थ्य आणि समाधान या गोष्टी जर त्यांच्या वाट्याला येणारच असल्या तर त्यांच्या स्वतःच्या गटामधूनच येणार होत्या. ओसाड पण सुंदर डोंगरांच्या भौतिक वातावरणात आणि पारंपरिक बंधने व जबाबदाऱ्या यांतून मुक्त अशा सामाजिक वातावरणात त्यांच्यामध्ये परस्पर अवलंबन आणि परस्पर संरक्षण हे संबंध प्रस्थापित झाले. ह्या गोष्टी आणि त्याचबरोबर लैंगिक वर्तणुकीचे स्वातंत्र्य यातून त्यांना एक " उन्मादावस्था "च प्राप्त झाली होती असे एक संस्थापक म्हणाला. ही मानसिक पार्श्वभूमी लक्षात घेता, त्यांना " सेंद्रिय समाजा "चे वास्तव अनुभवता आले यात फारसे नवल नव्हे.

संस्थापकांना या अनुभवांचे महत्त्व वाटत होते ते अशासाठी की त्यांमधूनच या तरुण लोकांना आपला आदर्श समाज कसा असू शकेल याची कल्पना आली, आणि आदर्शाच्या या कल्पनाचित्रातूनच किबुट्झ स्थापन करण्याची प्रेरणा त्यांना मिळाली. पण हा अनुभव पुन्हा काही आपल्या वाट्याला येणार नाही याची कल्पना त्यावेळी कुणालाच आली नाही ( आणि आजही फारच थोड्यांना आली आहे ). तरीही सध्याच्या किबुट्झचे मूल्यमापन करताना एक निकष म्हणून आज हे कल्पनाचित्र संस्थापक वापरतात. याचा परिणाम असा की वास्तव आणि आदर्श यामधल्या अपरिहार्य अशा विरोधामुळे क्लेशदायक ताण निर्माण झालेले आहेत.[२९]

सर्वांना समान असे स्वप्न गवसल्यानंतर ते प्रत्यक्षात उतरविले पाहिजे असे संस्थापकांना वाटू लागले. कारण " काहीतरी निर्माण करायला सुरुवात केली नाही तर ते हवेतच विरून जाईल किंवा हास्यास्पद ठरेल " असे एक सभासद म्हणाला. " म्हणून, " तो पुढे म्हणाला, " ते निर्मितीच्या कार्यासाठी दरीमध्ये उतरले. " एका शहराजवळ तंबूमध्ये शिबिर उभारून त्यांनी राहायला सुरुवात केली आणि रस्ता बांधण्याचे काम अंगावर घेऊन पोटापुरते मिळविण्याचा प्रयत्न केला. हा सुद्धा तीव्र भावनात्मक अनुभवाचा त्याचप्रमाणे अतिशय खडतर कष्टांचा काळ होता. सहा महिने ते बेकार आणि अर्धपोटी होते. सरतेशेवटी जेव्हा त्यांना एका मोठ्या रस्त्यावर

---

२९. सध्याच्या " संकटावस्थेत " ह्या " ताणांचे " महत्त्व काय याची चर्चा प्रकरण ६ मध्ये केली आहे.

काम मिळाले तेव्हा आपण शरीरश्रमाला किती अपुरे पडतो हे त्यांच्या ध्यानात आले. युरोपमधल्या आरामशीर आणि सापेक्षतः समृद्ध जीवनातून उठून अतीव काबाड-कष्टाच्या आणि दारिद्र्यमय जीवनाचा स्वीकार करणे, अपुऱ्या शिध्यावर गुजारा करणे आणि पुढ्यांच्या अंथरुणावर झोपणे हे स्थित्यंतर अत्यंत अवघड होते. "अशा जीवनाला आवश्यक ती तयारी आमच्यापाशी नव्हती. ते इतके खडतर असेल याची आम्हांला कल्पना नव्हती," असे एक संस्थापक म्हणाला. पण कष्ट हे तर प्रवर्तकांचे ब्रीद होते. एक संस्थापिका आठवण सांगते की आपण "गाद्या नाहीत अशी तक्रार केली तेव्हा माझा नवरा 'तू प्रवर्तिकाच नव्हेस' असे म्हणाला. आणि जेव्हा मला कपडे कधीच नीट बसत नसल्याची कुरकूर मी केली तेव्हाही तो 'तू प्रवर्तिकाच नव्हेस' असे म्हणाला." नंतर अर्धवट शरमिंदेपणाने ती पुढे म्हणाली, "खरं सांगू का? हे सगळं मला फार कठीण गेलं." दुसरी एक संस्थापिका म्हणाली, "ते जीवन फारच स्वप्निल होतं पण तितकंच खडतरही होतं." मागाहून सुचलेला एक विचार सांगत ती म्हणाली, "एखाद्या आदर्शासाठी जगायचं असं ठरविल्यानंतर मात्र संकटावर मात करणं शक्य असतं."

या "आदर्शा"चे महत्त्व कमी न लेखताही हे ध्यानात घेतले पाहिजे की संकटांवर मात करायला आणखीही काही गोष्टी संस्थापकांच्या उपयोगी पडल्या. त्यांना आणि जर्मन युवक चळवळीतील त्यांच्यासारख्या तरुणांना शारीरिक कष्ट सोसणे, त्यांवर विजय मिळविणे, इतकेच नव्हे तर त्यांना एका उच्च आत्मिक अनुभवाचे रूप देणे ही शक्ती प्राप्त झाली होती व ती शक्ती हे त्यांच्या आत्मिक समाधानाचे एक मोठे साधन होते. निसर्गाचा नुसता आनंदच लुटायचा असे नव्हे तर श्रमाप्रमाणेच त्याच्यावरही विजय मिळवायचा अशी त्यांची ईर्ष्या होती. वाचकांच्या ध्यानात असेल की या संस्थापकांची युद्धघोषणा "श्रमावर विजय" अशी होती आणि श्रमावरच्या विजयात निसर्गावरील विजयाचाही अंतर्भाव होता. म्हणून वॉंडर व्होगेलबद्दल जे लिहिलेले आहे ते त्यांनाही लागू करणे फारसे चुकीचे होणार नाही :

> जोराच्या पावसात खेड्यापाड्यांतून हिंडताना फाटक्या आणि चिंब भिजलेल्या कपड्यांची गमतीने चेष्टा करीत [ते] एखाद्या निवाऱ्याच्या जागी पोचून अंग झोकून देत. मोठ्या थोरल्या शेकोटीपुढे स्वतःला कोरडे करीत व कपडे वाळवीत. यात त्यांना एक विशेष सौंदर्य व साहस वाटे. निसर्गाशी एकरूप होऊनच त्याच्यावर (प्रॉमीथिअसप्रमाणे)* मात करणे हेच त्यांच्या हर्षोत्फुल्ल अनुभवाचे सार होते.[३०]

कष्टाचे काम आणि बिकट भौतिक परिस्थिती यामुळे संस्थापकांना आत्मसमाधान मिळत राहिले आणि नेव्हे गिलामधल्या सामूहिक अनुभवांमुळे त्यांना गाढ भावनिक

---

* ग्रीक पुराणातील एक बंडखोर वृत्तीचा बहुगुणसंपन्न पुरुष — अनुवादक.

३०. Becker पृ. ८२.

तृप्ती मिळत राहिली. ह्या भावनेची तीव्रता दर्शविण्यासाठीच संस्थापकाने "उन्मादावस्था" हा शब्दप्रयोग वापरला. नेव्हे गिलामध्ये आणि येथेही ज्या परिस्थितीमुळे "उन्मादा"चा उगम झाला तीत आणखी एका महत्त्वाच्या नव्या घटकाची भर पडली तो म्हणजे **हासिद** तत्त्वज्ञान.[31] "जुना रहिवासी" या नावाने लिहिणारा लेखक म्हणतो त्याप्रमाणे हासिदांच्या विचारांमुळे ह्या तरुण ज्यूंचा त्यांच्या भूतकाळाशी दुवा जोडला गेला.

पाळेमुळे उखडून टाकलेल्या अवस्थेत राहणे आम्हाला नको होते. मागील पिढ्यांच्या सांस्कृतिक वाङ्मयाशी आमचा संबंध आम्ही शोधीत होतो आणि त्याच वेळी आम्हाला हासिदांची गीते आणि लोककथा यांचा खजिनाच सापडला. संध्याकाळी शिबिराच्या मध्यभागी सर्व किबुत्झ गोळा होऊन गाणी गात असे. "पवित्र भूमीतून झालेली परमेश्वराची हद्दपारी" आणि "मुक्ततेबद्दलची उत्कंठा" या विषयांवर ज्यूंच्या पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेल्या गीतांचा प्रतिध्वनी या गाण्यांत उमटलेला असे.[३२]

हासिदवादाचा स्वीकार ही काही योगायोगाने घडलेली घटना नव्हती. एका संस्थापकाच्या मते हासिदिझमचे प्रवर्तक आणि किबुत्झ येदिदिमचे प्रवर्तक या दोघांनीही "पारंपरिक ज्यू धर्माच्या शृंखला तोडल्या होत्या" आणि दोघांनीही "वडिलांविरुद्ध बंड केले होते." म्हणून "आम्हाला आमच्या आणि हासिदांच्या जीवनात एक जिव्हाळ्याचे नाते जाणवले". हे नाते इतके अर्थपूर्ण होते की, पोटात पुरेसे नसतानाही त्यांनी काही हासिदिक नाटके बसविली आणि "जुना रहिवासी" लिहितो त्याप्रमाणे, या नाटकांमधून त्यांना "आत्मिक पोषण" मिळाले, कारण प्रवर्तक आणि या नाटकांमधील पात्रे यांत बौद्धिक आणि सामाजिकदृष्ट्या महद्अंतर होते तरीही ती पात्रे "आमच्या मनातले हृद्गतच व्यक्त करीत होती" असे एक संस्थापक म्हणतो.

ते हासिदिक गीते गात असत आणि हासिदांची नाटके करीत असत एवढेच नव्हे तर हासिद पद्धतीची नृत्येही करीत असत. याचा अर्थ असा की त्यांच्या नाचात **कवाना** किंवा "भक्तिभाव" असे. "कित्येक महिने आम्हाला खायला काही नसे तरीही आम्ही रात्ररात्र नाचत असू," असे एका संस्थापकाला स्मरते. होरा हे त्यांचे आवडते लोकनृत्य ज्याने पाहिले आहे आणि "कवाना" सह ते कसे नाचले जात असेल याची ज्याला कल्पना करता येते त्याला हे पटते की या विधानात

---

३१. 'हासिदिझम' ही एक लोकसंस्कृतीतील धार्मिक चळवळ होती. तिचा उगम अठराव्या शतकात पूर्व यूरोपातील ज्यूंमध्ये झाला. धार्मिक जीवनाच्या गूढवादी आणि भावनात्मक बाजूवर या चळवळीचा जोर होता. ज्यू तरुणांना धर्माविषयी औदासीन्य होते हे खरे. पण हासिदांचा निसर्ग, आनंद, नृत्य इत्यादींवर जो भर होता त्याचे त्यांना साहजिकच आकर्षण वाटले.

३२. पूर्वोक्त Veteran Settler.

त्यांच्या सामूहिक अनुभवाची तीव्रता अत्यंत प्रभावीपणे व्यक्त झाली आहे. होरा जेव्हा "कवाना" सह नाचला जातो तेव्हा तो एकाच वेळी सामूहिक अनुभवाचे कारण आणि त्याचा आविष्कारही असतो. या समूहनृत्यात भाग घेणारे सगळे लोक एका मोठ्या वर्तुळात एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवून साखळी तयार करतात. अशा रीतीने समूहाची एकात्मता साधते कारण त्यात प्रत्येकाचे तोंड मध्याकडे असते व प्रत्येकाला इतर सगळेजण दिसू शकतात. समूह एकात्म बनतो तो फक्त स्थलवाचक आणि शारीरिक अर्थाने नव्हे तर नाचाच्या गतीचा मोहराही ऐक्याकडे झुकणारा असतो. कारण ती गती अशी असते की तिच्यामुळे एक केंद्रापसारी शक्ती निर्माण होते आणि या शक्तीमुळे प्रत्येकजण गोलाच्या बाहेर फेकला जातो की काय असे वाटते; परंतु नर्तकाचे केंद्रापसारण हे सबंध समूहापासून उत्पन्न होणाऱ्या केंद्राभिसारी ओढीने उलट खेचले जाते आणि त्याचे हात दोन्ही बाजूंच्या सहकाऱ्यांच्या हातांशी गुंफलेले असल्यामुळे तो मध्यबिंदूकडे परत ओढला जातो. अशा रीतीने, नाचणाऱ्याला एका बाजूने बंधमुक्ततेचा व सुटकेचा अनुभव येतो; पण दुसऱ्या बाजूने दर पावलाला जीवर सर्व समूहाचे नियंत्रण पडते अशी ती सुटका असते. समूहाची ही ऐक्यभावना पावलाच्या तालबद्ध ठेक्याने व अखंडपणे पुनरावृत्त होत असलेल्या गीताच्या त्याच त्या सुरावटीमुळे अधिकाधिक दृढ होते. अशा प्रकारे, समूह प्रत्येकामध्ये उन्माद निर्माण करतो व त्याच वेळी तो उन्माद व्यक्तही करतो.

हासिदिझमच्या जोडीला संस्थापकांवर दुसरा एक महत्त्वाचा प्रभाव पडला तो म्हणजे सिगमंड फ्रॉयडच्या विचारांचा. "आमच्या भावना, आमचे ताण, आणि आमचा लोभ या सर्वांची उपपत्ती शोधण्याच्या प्रयत्नात आम्हाला मनोविश्लेषणशास्त्र गवसले आणि ते फ्रॉयडने जणू काही खास आमच्याकरिताच लिहिले असल्यासारखे आम्हाला वाटले" असे एक संस्थापक सांगतो. प्रारंभीच्या काळात फ्रॉयडचा हा जो प्रभाव पडलेला होता त्याचा आता काही संस्थापकांना पश्चात्ताप होतो. कारण त्यातल्या एकाने सांगितल्याप्रमाणे "फ्रॉयडचे आमच्या समाजावर अधिराज्य झाल्यामुळे मार्क्स-वादाचा स्वीकार करायला आम्हाला उशीर झाला." मात्र, मनोविश्लेषणशास्त्राने त्यांच्या वैयक्तिक जीवनाची उपपत्ती लागली हे तर खरेच पण त्याहूनही बरेच अधिक काही झाले. त्यांनी नंतर जी शिक्षणपद्धती स्थापन केली तिला ह्या शास्त्राच्या सिद्धांताचा खूपच उपयोग झाला.

मात्र, हा काळ साथींवर झालेल्या मानसिक परिणामांच्या दृष्टीनेच नव्हे तर सामूहिक जीवनाचे संघटन कसे करावे याच्या प्रत्यक्ष अनुभवाच्या दृष्टीनेही महत्त्वाचा होता. कारण याच काळात आताच्या किबुट्झमध्ये दिसणाऱ्या सामूहिक मालकी, नगरसभा, समितीपद्धत आणि इतर बहुतेक संस्था वाढीला लागल्या. आणि श्रमावर एक मूलभूत तत्त्व म्हणून भर देणाऱ्या समाजाची म्हणजे किबुट्झची त्यांनी स्थापना

केली तीही याच काळात. ह्या निर्णयामुळे ज्या अनेक सभासदांना श्रमावरचा भर पसंत नव्हता त्यांनी गटाचा त्याग केला. त्याचबरोबर, गटाजवळ निश्चित असे तत्त्वज्ञान नसल्यामुळे आणि विशेषतः काही राजकीय कार्यक्रम नसल्यामुळे, ज्यांचा राजकीय कार्याबद्दल आग्रह होता तेही दुरावले आणि त्यांनीही गट सोडला. मात्र ही मंडळी गळल्यामुळे उरलेल्यांचा एक एकसंध गट बनला, त्यांच्यात संघभावना बळावली आणि नवसमाज निर्मिण्याच्या आपल्या शक्तीबद्दल त्यांना विश्वास वाटू लागला. त्यामुळे, ज्यूइश एजन्सीने जेव्हा त्यांना त्यांच्या स्वतःच्या भूमीवर वसाहत करण्यासाठी बोलाविले तेव्हा ते नव्या जीवनाचा आरंभ करण्यास उत्सुक झालेले होते.

* * *

प्रकरण : ४ :

# किबुट्झ : एक सामूहिक समाज–१

*आजच जो रूप घेऊ लागला आहे अशा एका भविष्यकालीन समाजाची किबुट्झ ही मूळपेशी आहे...किबुट्झ समाजाने जीवनात एक संपूर्ण क्रांती घडवून आणली आहे आणि मानवाच्या राहणीची सनातन पद्धत बदलून टाकली आहे. मालमत्तेची पद्धत, उत्पादनाची व्यवस्था, श्रम-विभागणी, कुटुंबसंस्थेचा पाया, मानवी संबंधांचे स्वरूप, स्त्रियांचा दर्जा, शिक्षणाचा पाया—या सर्वांमध्ये मूलभूत बदल झाले आहेत आणि हे बदल स्थिरावण्याच्या मार्गावर आहेत.*

एका किबुट्झ नेत्याच्या भाषणातून

## लोक आणि त्यांची पार्श्वभूमी

किर्यात येदिदिमची लोकसंख्या सुमारे पाचशे असून त्यात तीन पिढ्यांचा समावेश आहे. किबुट्झचे सुमारे अडीचशे प्रौढ सभासद आहेत व त्यांतल्या बहुतेकांनी युरोपमधून–विशेषतः पूर्व युरोपमधून–पॅलेस्टाइनमध्ये स्थलांतर केलेले आहे. मात्र, हे स्थलांतर एकाच वेळी झालेले नाही त्यामुळे स्थलांतराचे वर्ष आणि त्यांचा किबुट्झमध्ये प्रवेश याच्या आधारे प्रौढांचे निरनिराळे वयगट करता येतात. उरलेले सभासद इस्रायलमध्येच जन्मलेले व शहरातून किबुट्झमध्ये आलेले आहेत किंवा किर्यात येदिदिमध्येच जन्म पावून प्रौढपणी सभासद झालेले आहेत.

एक अनौपचारिक विभागणी ठरविण्यासाठी या वयगटांचा उपयोग होतो आणि किबुट्झही या गटांचा उल्लेख **शिचवॉत** किंवा "थर" असाच करतो. सगळ्यात जुना थर म्हणजे किर्यात येदिदिमच्या संस्थापकांचा. हे साधारण ऐंशी आहेत व त्यांचे वय साधारणपणे पन्नाशीचे आहे. अनेक अर्थांनी किबुट्झमधला हा सर्वांत महत्त्वाचा थर आहे. या गटाची सामाजिक रचना त्याची ध्येये प्रत्यक्षात आणण्याच्या दृष्टीने उपयुक्त अशी बनली होती. किबुट्झचे औपचारिक आणि अनौपचारिक असे दोन्ही

प्रकारचे नेतृत्व याच थरातून उदयास येते; राष्ट्रीय किबुट्झ चळवळ, मजूर चळवळ, आणि राष्ट्रीय राजकारण यांमध्ये किबुट्झचे प्रतिनिधित्वही या थरातील सभासदांकडून मुख्यत्वे केले जाते; आणि किर्यात येदिदिममधल्या बुद्धिमंतांमध्येही या गटाचेच सभासद मोडतात.

दुसऱ्या थरातील लोकसुद्धा पूर्व युरोपमधून स्थलांतरित होऊन आलेले आहेत पण किर्यात येदिदिमच्या स्थापनेनंतर दहा ते वीस वर्षांच्या दरम्यान ते सभासद झालेले आहेत. या सर्वांना आंदोलनात शिक्षण मिळालेले असल्याने किबुट्झची मूल्ये त्यांनी आत्मसात् केलेली आहेत, आणि किबुट्झच्या राहणीची पुरेपूर तयारी येथे येण्यापूर्वी त्यांच्याकडून करून घेतली गेली आहे. संख्येच्या दृष्टीने बोलायचे तर हा एकशेवीस सभासदांचा थर सर्वांत मोठा आहे. त्यातले काही सभासद खूप सुसंस्कृत असले तरी किर्यात येदिदिममधला हा सर्वात कमी बुद्धिमंत थर आहे, आणि शालेय शिक्षणही त्याला सर्वांत कमी मिळालेले आहे. किर्यात येदिदिमचे पुष्कळसे अधिकारी, समित्यांचे अध्यक्ष, आणि उत्पादन क्रियेतले मुकादम हे या थरातले आहेत. त्या-बरोबरच नवे बदल करण्याबद्दलचा – म्हणजेच किबुट्झच्या मूळ मूल्यांपासून विचलित होण्याबद्दलचा–पुष्कळसा दबाव याच थरातील लोकांकडून आणला जातो.

तिसरा थर हा पंचवीस ते तीस वयाच्या तरुणांचा असून, यात सुमारे चाळीस सभासद आहेत. यातले बहुतेक **साब्रा**[1] तरी आहेत किंवा फारच लहान वयात युरोपातून आलेले आहेत. या गटातला एक लहानसा वर्ग किर्यात येदिदिममध्येच जन्म पावलेल्या व पुढे सभासद झालेल्या मुलांचा आहे. यातले बहुसंख्य तरुण मात्र तेल अव्हिव्ह आणि इतर इस्रायली शहरांमधील आंदोलनाचे माजी सभासद आहेत. किबुट्झमध्ये जन्म पावलेल्या मुलांना त्यांच्या वयाचा एक मोठा गट सोबतीला मिळावा म्हणून त्यांना किर्यात येदिदिममध्ये येण्यासाठी आमंत्रण दिलेले होते. ( ही गोष्ट या अभ्यासाच्या आरंभापूर्वी दहा वर्षांची. ) त्यांची संख्या मोठी आहे. किबुट्झ युवकांनी आपले लग्नाचे जोडीदार निवडले आहेत तेही याच थरामधून. या थरातले सभासद आणि विशेषतः त्यातल्या ज्यांना तेल अव्हिव्हमधल्या चळवळीत शिक्षण मिळालेले आहे ते खूपच उच्च दर्जाचे बौद्धिक वरदान लाभलेले आहेत. या थरात निदान एक तरी संगीतकार, चित्रकार, नर्तक, नाटककार, नट आणि तत्त्वचिंतक आढळतोच. अर्थव्यवस्थेत हा थर अधिकाधिक जबाबदारी घेऊ लागला आहे आणि किबुट्झच्या वेगवेगळ्या समित्यांतून आपला अधिक प्रभाव पाडू लागला आहे. शिवाय नवे बदल घडवून आणण्यास विरोधी असा दबाव आणि किबुट्झच्या मूळ मूल्यांशी इमान राखण्याचा आग्रह याच थरातील सभासदांमधून होत असतो.

---

१. **साब्रा** हा शब्द इस्रायलमधल्या प्रचलित प्रथेप्रमाणे इस्रायलमध्येच जन्म पावलेल्या ज्यूंना लावतात. ह्या पुस्तकात मात्र तो किर्यात येदिदिममध्ये जन्मलेल्या ( बाल किंवा प्रौढ ) व्यक्तींचा निर्देश करण्यासाठी वापरला जाईल.

सगळ्यात लहान थर साधारण वीस-सभासदांचा असून ते वीस ते पंचवीस या वयातले व प्रशालेय शिक्षण घेऊन नुकतेच बाहेर पडलेले आहेत. यातले निम्मे किर्यात येदिदिमध्ये जन्मलेले आहेत, बाकीचे निम्मे शहरातले पण किबुट्झच्या प्रशालेत शिकलेले व शिक्षण संपल्यावर किबुट्झचे सभासद बनलेले असे आहेत. मात्र या थरातील अर्ध्याहून अधिकजण अद्याप सैन्यात नोकरीला आहेत आणि ते शनिवारी व सुट्टीच्या दिवशी किर्यात येदिदिमला परत येतात. ह्या गटातील सभासद उत्पादन-प्रक्रियेतील महत्त्वाच्या आर्थिक जागांवर आहेत आणि त्यातले काहीजण त्यांच्या आर्थिक शाखांचे मुकादम म्हणूनही निवडले गेले आहेत. मात्र अद्याप हा गट फारसा बोलका झालेला नाही; किबुट्झ समित्यातून तो आपली मते क्वचितच बोलून दाखवितो.

साथी आणि त्यांची मुले यांची संख्या अडीचशेहून अधिक आहे आणि त्यांच्या जोडीला खेड्यांत राहणारे दुसरेहि गट आहेत. यांमध्ये किबुट्झने युरोपातील वसति-स्थानांमधून इस्रायलला आणलेले सभासदांचे आईवडील आणि शिवाय ज्यूइश एजन्सीने किबुट्झमध्ये कामासाठी आणि अभ्यासासाठी पाठविलेले तरुणांचे दोन गट आहेत. यातला एक गट स्थलांतरित मुलांचा आहे आणि दुसरा शहरांमधील आर्थिक-दृष्ट्या मागासलेल्या कुटुंबांतील मुलांचा आहे. प्रस्तुत लेखकाच्या भेटीच्या वेळी किर्यात येदिदिममध्ये नेमून दिलेली एक लष्करी तुकडीही होती. ( इस्रायलमध्ये स्त्रिया आणि पुरुष या दोघांनाही सक्तीच्या लष्करी नोकरीपैकी काही काळ शेतकी वसाहतीत काम करण्यात घालवावा लागतो. ) या शेवटी उल्लेख केलेल्या चार गटांचा मात्र आपण या ग्रंथात विचार करणार नाही.

आज सभासद राहतात तो परिसर किबुट्झचे संस्थापक प्रथम वसाहत करण्यास आले तेव्हाच्या या दलदलीच्या प्रदेशाहून वेगळा आहे. बायबलमध्ये ग्रथित केलेल्या इतिहासातील एका प्रसिद्ध अशा पर्वतश्रेणीच्या पायथ्याशी असलेल्या एका सुपीक दरीचा किर्यात येदिदिम हा आज एक भाग बनला आहे. डोंगराच्या पली-कडल्या बाजूला शत्रूंचा प्रदेश आहे आणि रात्रीचा रखवालदार भरल्या बंदुकीनिशी तेथे गस्त घालीत असतो.

आलटून पालटून उन्हाळ्याची रखरखीत कोरडी उष्णता नाहीतर हिवाळ्या-तील थंड पाऊस असे हवामान असते. उन्हाळ्याच्या दिवसांतील रणरणत्या उन्हात बारा ते दोन वाजेपर्यंतच्या वेळात काम करणे अशक्य असते आणि त्या वेळात बहुधा सगळेजण थोडीशी वामकुक्षी घेतात. उन्हाळ्याच्या ऐन भरात सकाळच्या प्रहरी सुद्धा अतिशय ऊन असते, त्यामुळे द्राक्षाच्या हंगामात कामगार झुंजुमुंजू होताच म्हणजे पहाटे तीन-चारच्या सुमारास उठतात आणि दहा वाजेपर्यंत द्राक्षे तोडतात. त्या वेळी तोडणी थांबवावीच लागते कारण तसे केले नाही तर टोपल्यांतील द्राक्षे सूर्याच्या

उष्णतेमुळे सुकण्याची भीती असते. या ऋतूत जमीन उन्हाने करपते, बागा कोळपून जातात आणि डोंगरावर झुडूप किंवा फूल उगवलेले नसल्याने तो निर्जीव तपकिरी रंगाचा दिसतो. उलट, हिवाळ्यात सारखा पाऊस पडत असतो आणि गार वारे वाहत असतात आणि बर्फ इतका क्वचित पडतो की तो पडला म्हणजे मुलांना त्याचे नवल वाटते. सबंध हिवाळ्यात खोल्या दमट राहतात, आणि कपडे तर कधीही सुकल्यासारखे वाटत नाहीत. बहुधा त्यामुळेच पुष्कळशा सभासदांना "संधिवात" जडतो. अशा रीतीने हिवाळा एरव्ही त्रासदायक असतोच पण चिखल आणि दलदल यांतून धडपणे चालता येत नाही, आणि सतत गुडघ्यापर्यंत येणारे बूट घालणे जरूर पडते. या गोष्टींमुळे हा त्रासदायकपणा अधिकच चीड आणणारा बनतो.

वसंत आणि शरद यांचे मोसम मात्र अतिशय सुंदर असतात. म्हणून सभासद त्यांचे हर्षाने स्वागत करतात. हवा सौम्य असते, आणि विशेषतः वसंत ऋतूत डोंगरावर फुले फुललेली दिसतात, आणि बागा म्हणजे तर नानाविध रंगांचा एक कल्लोळ असतो. या सर्वांमुळे लोकांच्या नेहमीच्या वृत्तीही लक्षात येण्याइतक्या बदलतात.

किबुट्झ आणि त्याच्या वहिवाटीखाली येणारी जमीन सुमारे ११,००० दुनाम[२] इतक्या क्षेत्रफळाची आहे. युरोपातील सर्वसाधारण खेड्याप्रमाणेच येथेही गावाची वस्ती केंद्रस्थानी आहे व त्या केंद्रबिंदूपासून सर्व दिशांना शेतांच्या व फळबागांच्या रांगा निघालेल्या आहेत. शेताच्या दूरच्या भागांवर कामाला जाणारे सभासद सकाळी गाव सोडून जातात ते संध्याकाळी परततात आणि ज्यांचे काम जवळच असते त्यातले बहुतेकजण मात्र दुपारच्या जेवणासाठी वस्तीकडे परततात.

किबुट्झचे सामूहिक जेवणघर म्हणजे किबुट्झचा भौगोलिक आणि सामाजिक केंद्रबिंदूच म्हणावा लागेल कारण जेवणघराच्या दोन्ही बाजूंनी समांतर रांगांत घरे बांधलेली आहेत. जेवणघर इतर इमारतींहून वेगळे दिसावे व त्याचे मध्यवर्ती स्थान लक्षात यावे म्हणून त्याच्याभोवती सुंदर हिरवळीचे पटांगण केलेले आहे. घरे म्हणजे मोठ्या विस्तृत इमारती आहेत, कारण सर्वसाधारणपणे प्रत्येक इमारतीत चार बिऱ्हाडांची सोय केलेली असते. प्रत्येक बिऱ्हाडाची जागा म्हणजे एक खोली, व काही वेळेला जिचा उन्हाळ्यात दुसरी खोली म्हणून उपयोग करता येईल अशी एक लहानशी देवडी अशी आहे. साधारणपणे प्रत्येक इमारत दुसरीपासून त्याचप्रमाणे गावातून जाणाऱ्या पायवाटांच्या जाळ्यापासून मोठ्या हिरवळीच्या पट्ट्यांनी आणि उंच वेढलेल्या झुडपांनी अलग केलेली असते. या हिरवळीची फार काळजीपूर्वक निगा राखली जाते. शिवाय, प्रत्येक सभासदाची फुलबाग असते आणि संध्याकाळी कामावरून परतल्यावर तो आपल्या बागेची प्रेमाने जोपासना करतो. प्रत्येकजण आपली बाग अभिमानाने फुलवीत असतो.

---

२. एक दुनाम म्हणजे सुमारे १/४ एकर.

शिवाय किर्यात येदिदिममध्ये एक आणि प्रशालेच्या आवारासाठी एक असे दोन पूर्ण वेळ काम करणारे माळी असतात. त्यामुळे इस्रायलमधील अतिशय सुंदर अशा गावांपैकी एक अशी किर्यात येदिदिमची ख्याती आहे.

मात्र सगळीच घरे अशा नमुन्याची असतात असे नव्हे. किर्यात येदिदिमचा विस्तार कितीतरी झालेला असल्याने त्याची वास्तुरचनाही बदलली आहे. किबुट्झची भरभराट चालू असल्यामुळे प्रत्येक नवी घरबांधणी योजना पहिलीपेक्षा अधिक चांगली करणे शक्य होते. या भूमीवर संस्थापक प्रथम राहायला आले तेव्हा ते तंबूत राहात असत आणि प्रशालेय शिक्षण नुकतेच संपविलेले तरुण सभासद आजही तेच करतात. अगदी प्रथम कायम स्वरूपाची घरे बनविली गेली ती लाकडी होती. आजही ती घरे वापरात आहेत आणि बहुतकरून तरुण विवाहित जोडपी त्यांत राहतात. बांधकामाच्या दुसऱ्या कालखंडात विटांची घरे उभी राहिली. बाहेरून त्यांना गिलावा केलेला होता आणि त्यांच्या प्रवेशद्वाराशी एक लहानशी देवडी असायची. सर्व लाकडी घरांची प्रवेश-द्वारे एकाच दिशेला असल्यामुळे एकांत फारच कमी मिळे. नंतरच्या काळात इमारती अशा प्रकारे बांधल्या की त्यांच्यापैकी अर्ध्यांची प्रवेशद्वारे एका दिशेला व अर्ध्यांची दुसऱ्या दिशेला ठेवली, त्यामुळे अधिक एकांत मिळू लागला. शिवाय प्रत्येक घराला वर छप्पर असलेली अशी बसण्याजोगी देवडी देण्यात आली. प्रस्तुत लेखकाच्या वास्तव्याच्या काळात शेवटी जी घरबांधणी योजना पुरी होत आली होती ती नेहमीच्या किबुट्झ घरांच्या मानाने चैनीच्या घरांचीच म्हटली पाहिजे. प्रत्येक बिऱ्हाडाला दीड खोली, मोठी देवडी आणि स्वतंत्र स्नानगृह अशी व्यवस्था त्यात करण्यात येत होती.

प्रत्येक खोलीत एक जोडपे राहते आणि हीच खोली बैठकीची व झोपण्याची अशी संयुक्त खोली असते. कमीत कमी लागेल एवढीच ही जागा असते कारण स्वयंपाक सामूहिक स्वयंपाकघरात केला जातो, सामूहिक जेवणघरात जेवायला जायचे असते आणि मुले त्यांच्या स्वतंत्र निद्रागृहात झोपतात. खाजगी स्नानगृहाऐवजी पुरुषांसाठी वेगळी अशी सामूहिक स्नानगृहे व शौचकूप असतात.

प्रत्येक खोली किबुट्झमध्ये तयार होणाऱ्या वस्तूंनी साध्याच पण आकर्षक रीतीने सजविलेली असते. एक पलंग, लिहिण्याचे टेबल, कपड्यांसाठी कपाट व पेटी एकत्रित, खुर्च्या, पुस्तकांसाठी कपाटे, आणि दिवे असे गरजेचे सामान प्रत्येक खोलीत असते. सौम्य रंगाच्या आणि साध्या, कौशल्यपूर्ण नक्षीच्या चादरी व रग किबुट्झ-मध्ये विणले जातात व ते पाहताना त्याहीपेक्षा सौम्य अशा मेक्सिकन नमुन्यांची आठवण होते. याशिवाय कधी कधी प्रत्येक खोलीत एक रेडिओ असतो तो ज्याचा त्याचा स्वतःचा किंवा किबुट्झने दिलेला असतो. प्रत्येकाची स्वतःची पुस्तके असतात आणि एखाद-दुसरे चांगले चित्र प्रत्येकाचे स्वतःचे किंवा किबुट्झकडून वापरावयास

घेतलेले असते. याप्रमाणे प्रत्येक खोलीला जवळ जवळ सारखेच सामान दिलेले असते, पण प्रत्येक जोडपे आपापली बुद्धी व कौशल्य वापरून रंगांची आणि वस्तूंची सजावट आपल्या आवडीप्रमाणे करते. त्यामुळे खोल्यांवर त्यात राहणाऱ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा स्वतंत्र ठसा उमटलेला दिसतो.

याशिवाय गावात एक धुलाईघर, शिवणाची खोली, कपड्यांचे भांडार, कोशेर स्वयंपाकगृह, सभासदांच्या वृद्ध आईवडिलांसाठी जेवणघर, दवाखाना, कचेरी, दुकान, ग्रंथालय, वाचनालय, मुलांची निद्रागृहे व शाळा अशा इमारती आहेत. प्रस्तुत लेखकाच्या वास्तव्याच्या काळात एका "संस्कृतिगृहा"चे बांधकाम चालू होते. त्यात ग्रंथालय आणि जलसे, सभा व नाटके इत्यादींकरिता प्रेक्षागृह अशा सोयी करण्यात यायच्या होत्या. मुख्य वस्तीच्या परिघावर गुरे, घोडे, मेंढ्या, बकरे यांच्यासाठी गोठे, कोंबड्यांची खुराडी, गराज, ट्रॅक्टर ठेवण्यासाठी जागा, वखार, माल साठविण्याची जागा, पॅकिंगचा कारखाना, आणि सुतारकामाचे दुकान अशा सर्वांची सोय केलेली आहे. गावापासून मुख्य रस्त्यामुळे अलग झालेल्या जागेत प्रशाळा आणि तिच्या वर्गांच्या खोल्या, जेवणघर या सर्व इमारती येतात.

ज्या युवक चळवळीमधून बहुतेक सभासद किबुट्झमध्ये आले तिचे तत्त्व साध्या राहणीचे होते. हे अनासक्तीचे तत्त्व किबुट्झ राहणीच्या पुष्कळ गोष्टीत प्रतिबिंबित झालेले दिसत. विवाहपूर्व लैंगिक अनुभव, धूम्रपान, मद्यपान, भपकेबाज कपडे, आणि "बेबंद" राहणी या गोष्टींना आंदोलनाचा विरोध होता (आणि आहे). सुरुवातीच्या काळात अशाप्रकारची वागणूक, त्याचप्रमाणे चैनीच्या राहणीशी संबंधित अशा इतर गोष्टी ह्या शहरातील रोगट संस्कृतीच्या निदर्शक मानल्या जात. नंतरच्या काळात त तिरस्करणीय अशा "मध्यम वर्गाचेही" चिन्ह मानले जाऊ लागले. अशा प्रकारे किर्यात येदिदिमच्या सुरुवातीच्या इतिहासात टंचाईची स्थिती आणि अनासक्तीचे तत्त्वज्ञान यांची जोडी जमल्यामुळे राहणी अगदीच प्राथमिक पातळीवर होती. घरांची गरज तंबूंनी भागविली जात होती, अन्न तुटपुंजे होते आणि कपडेही अपुरे होते. किबुट्झची आर्थिक परिस्थिती सुधारली तसे सभासद तंबूतून लाकडी घरांत राहावयास गेले पण कमीतकमी गरजेच्या गोष्टींखेरीज अधिक काही पुरविण्याचा फारसा प्रयत्न त्यांनी केला नाही. उदाहरणार्थ, पुष्कळ वर्षेपर्यंत खोलीत फक्त एक पलंग व खुर्ची असावयाची. टेबल, कपड्यांचे कपाट, पडदे, रग, पुस्तकांचे कपाट अशा सोयी सभासदाला पुरविणे जरूर आहे असे किबुट्झला अगदी अलीकडे वाटू लागले आहे. इतक्या उशिरा हे सुचण्याचे कारण आर्थिक नसून नैतिक होते असे एक संस्थापिका म्हणाली, "स्पार्टन लोकांप्रमाणे अत्यंत साधेपणाने राहणे हे आमचे ध्येय होते. सुखसोयींपेक्षा दुसऱ्या कितीतरी महत्त्वाच्या गोष्टी आहेत असे संस्थापकांना वाटत असे. त्यामुळे पहिल्या वीस वर्षांत सभासदांच्या सुखासाठी किबुट्झने काहीही केले नाही."

आणि आजसुद्धा हे खरे आहे. किर्यात येदिदिम हा एक जुना किबुट्झ असला तरी "आरोग्य आणि कल्याण" विषयक सुविधा पुरविण्यात काही नव्या किबुट्झ वसाहतींच्या मानाने तो मागे आहे. अगदी अलीकडेपर्यंत कायम स्वरूपाची घरे त्याने बांधली नव्हती; त्याची आरोग्यरक्षणाची व्यवस्था जुन्या पद्धतीची आणि अत्यंत अपुरी आहे; स्नानगृहे कोंदट व गर्दीची आहेत; त्याचे जेवणघर व स्वयंपाकघर यातील गैरसोयी ही एक अखंड डोकेदुखी आहे. कारण "विचार करण्याजोग्या याहून महत्त्वाच्या आणखी पुष्कळ गोष्टी होत्या."

कुठलीही नवी सुखसोय म्हणजे किबुट्झच्या मूळच्या ध्येयांशी प्रतारणा आहे अशा समजुतीने किबुट्झमधल्या सनातन्यांनी तिला कट्टर विरोध केलेला आहे. एका सभासदाने आपल्याला भेट म्हणून मिळालेला रेडिओ किबुट्झला देणगी म्हणून दिला तो किबुट्झमध्ये आलेला पहिला रेडिओ. तो जेवणघरात ठेवला गेला कारण जेवणघर हे समूहाचे केंद्र होते. बहुतेक लोक आपला संध्याकाळचा वेळ जेवणघरातच घालवीत असल्यामुळे कोणालाही आपल्याला खाजगी रेडिओ हवा अशी गरज त्या वेळी वाटली नाही. मात्र जसजशी लोकांची वये वाढू लागली तसतसा त्यांचा वेळ जेवण-घरात कमी आणि त्यांच्या स्वतंत्र खोल्यांत जास्त जाऊ लागला. तेव्हा आपल्या खोलीतच रेडिओ असला तर बरे असे त्यांना वाटू लागले. पण ज्या थोड्या लोकांनी रेडिओ घेतले त्यांच्याबद्दल नापसंती दर्शविली जाई. ते किबुट्झमध्ये खाजगी माल-मत्तेचा, एवढेच नव्हे तर अनावश्यक चैनीच्या वस्तूंचा, प्रवेश करून देत आहेत असे मानण्यात येई. मात्र हळूहळू इतरांनीही रेडिओ आणायला सुरुवात केली आणि लवकरच आपल्या सभासदांना रेडिओ पुरविण्याची जबाबदारी किबुट्झला घ्यावी लागली. आज दरवर्षी दहा ते बारा रेडिओ वाटले जातात आणि बहुतेक प्रत्येक सभासदाच्या खोलीत रेडिओ आहे.

उन्हाळ्याची कडक उष्णता लक्षात घेता दिवसभर उन्हात काम करून परतल्यावर खोलीत पंख्याचा गारवा हवासा वाटेल यात नवल नाही. काही साथींनी भेट म्हणून पंखे मिळविलेले आहेत, तर काहींनी आपल्या वार्षिक भत्त्यात बचत करून विकत घेतले आहेत, परंतु पंखे पुरविण्यास किबुट्झने नकार दिलेला आहे. पंखे ही सुद्धा एक अनावश्यक चैन आणि ध्येयाशी प्रतारणा आहे असे समजले जाते. मात्र, जेवणघर किंवा कचेरी यांसारख्या सार्वजनिक जागी पंखे बसविण्यापर्यंत किबुट्झने मजल मारली आहे.

उन्हाळ्यासाठी पंखे घेण्यास विरोध असला तरी हिवाळ्यातील दमटपणाचा व गारठ्याचा बंदोबस्त करण्याची तयारी मात्र दिसते. घरांना गरम ठेवण्याची काही व्यवस्था नसल्याने हिवाळ्यात संध्याकाळी अंगावर कोट घालणे किंवा पांघरुणात गुरफटून पडणे अनेकदा भाग पडते. काही सभासदांनी विजेचे हीटर घेतले आहेत

परंतु त्यामुळे फार वीज खर्च होते असे ठरवून त्याबदली किबुट्झने त्यांना तेलाचे स्टोव्ह दिले. तेव्हापासून किबुट्झ दरवर्षी थोडेसे स्टोव्ह पुरवीत आहे आणि हळूहळू प्रत्येक खोलीत एक स्टोव्ह येईल.

प्रारंभीच्या साधेपणाचा हा प्रभाव खाण्यापिण्यावरही पडलेला आहे. सर्वसाधारण सभासद क्वचित्च मद्य घेतो, आणि " पासोव्हर " च्या सणाला जेव्हा मद्याची बाटली प्रत्येकाला देण्यात येते तेव्हा बहुतेकजण ती बाटली जशीच्या तशीच परत करतात. मद्यपानाचा अतिरेक केव्हाच केला जात नाही आणि दारूची नशा तर ऐकिवातही नाही. अन्नाचा तुटवडा अर्थातच आहे—कारण सबंध देशभर शिधापद्धती अमलात आहे. मात्र, जे अन्न मिळते त्याची पाकसिद्धी चांगल्या रीतीने करण्याचे विशेष प्रयत्न फारसे केले जात नाहीत; त्यामुळे ते कंटाळवाणे, सपक, बेचव असते. पदार्थांत वैविध्य तर नसतेच पण जेवतानाही कोणी चवीने व आनंदाने जेवत नाही, लोक घाईघाईने जेवतात, एखाद्या चविष्ट पदार्थावर रेंगाळताना दिसत नाहीत आणि जेवताना फारसे संभाषण नसते. बाह्य परिस्थितीही अशीच असते की सावकाशपणे, प्रसन्नपणे जेवायला वाव नसतो. सकाळचे व दुपारचे जेवण भराभरा उरकावे लागते कारण कामावर जाण्याची घाई असते. संध्याकाळच्या जेवणाच्या वेळी असा काही भार डोक्यावर नसतो पण जेवणघर लहान असल्याने गर्दी व गोंगाट असतो आणि फक्त सभासदांनाच नव्हे तर किबुट्झमध्ये शिक्षण घेण्यासाठी आलेल्या अनेक तरुणांच्या गटांनासुद्धा जेवायला वाढावे लागते. म्हणून सभासदांना ज्यात संध्याकाळी सावकाशपणे बसून आनंदाने जेवण जेवता येईल अशा एका नव्या जेवणघराची जरुरी आहे. परंतु ते बांधण्याचे काम नेहमीच पुढे ढकलले जाते कारण, " विचार करण्याजोग्या याहून महत्त्वाच्या आणखी पुष्कळ गोष्टी आहेत. "

मात्र या विरक्त परंपरेला लोक विरोध करू लागले असल्याचे स्पष्टपणे नजरेस येते. पूर्वी ज्यांकडे अगदी तुच्छतेने पाहिले गेले असते अशा कितीतरी सुखसोयींची आज ते मागणी करीत आहेत. ही गोष्टच एका नव्या प्रवृत्तीची द्योतक आहे. याचे एक अगदी टोकाचे उदाहरण असेः किबुट्झचा सभासद नसलेल्या एका पशुवैद्याच्या घरावरून एक सभासद जात होता. एक लहानसे चार खोल्यांचे ते घर पाहिल्यावर सभासद अत्युत्साहाने त्याचे गुणवर्णन करू लागला आणि नंतर अर्धवट उपहासाने आणि अर्धवट अपराधी स्वरात तो म्हणाला, " आपल्या सगळ्यांना तसलं घर असतं तर ? फार वाईट झालं असतं का ? आपला समूहवाद त्यामुळे नष्ट होईल असं तुम्हाला वाटतं का ? आपल्या-पैकी प्रत्येकाला असं घर का नसावं ? "

जुन्या मूल्यांपासून दूर जाण्याचा हा कल दोन प्रकारांनी व्यक्त होतो : चैनीच्या वस्तूंबाबत खाजगी मालमत्तेच्या प्रथेचा प्रारंभ ( याची चर्चा पुढे दुसऱ्या एका संदर्भात करायची आहे) आणि वारंवार होणाऱ्या खाजगी " मेजवान्या ". गुरे आणि कोंबड्या-

बदके यांची देखभाल करणारे आणि मत्स्यपालन करणारे सभासद जेव्हा कधी कधी मित्रांसमवेत मेजवान्या करतात यावेळी आपल्या उत्पादन शाखांतील माल खाण्यासाठी वापरतात. काहीजण रानटी डुकरांची आणि बदकांची शिकार करतात व त्यांचाही चमचमीत खाजगी मेजवान्यांसाठी उपयोग करतात. बहुधा ज्याचा स्वयंपाकात उपयोग केला जात नाही अशा प्रकारचा शेतीचा माल गोळा करण्यासाठी काहीजण शेतात जातात. उदाहरणार्थ, मका गुरांसाठी मोठ्या प्रमाणात पिकवितात परंतु खाण्यात त्याचा वापर क्वचित केला जात नाही. पण संध्याकाळच्या वेळी पुष्कळ लोक मक्याची कणसे तोडून आणल्यावर भाजून खाताना आढळतात. असे प्रसंग थोड्या वेळा घडतात हे खरे, आणि त्यात भाग घेणारांना अपराधीपणाची भावनाही वाटत असते, परंतु पुढेमागे ज्याची अधिकृतपणे दखल घ्यावी लागेल अशा प्रवाहाचे दर्शन या घटनांतून होते.

असा नवा प्रवाह असला तरी युवक चळवळीचे अनासक्तीचे तत्त्वज्ञान ही अजूनही एक प्रभावी शक्ती म्हणून किबुट्झमध्ये ( विशेषतः संस्थापकांमध्ये ) अस्तित्वात आहे. जेव्हा एका तरुण साथीने " पार्कर ५१ " या फाऊंटन पेनचे गुणगान करायला सुरुवात केली तेव्हा एक संस्थापक रागाने म्हणाला, " हा मिजासखोरपणाचा कळस झाला! साध्या पेनात काय कमी आहे? अमेरिकेतसुद्धा कोणी इतकी मिजास दाखवीत नाही."

## अर्थव्यवस्था

किबुट्झची विविधतेने संपन्न अशी शेतजमीन वस्तीपासून सर्व दिशांना लांबवर पसरलेली आहे. किर्यात येदिदिमची स्थापना झाली तेव्हा ज्युइश नॅशनल फंडाकडून प्रत्येक जोडप्यामागे शंभर दुनाम याप्रमाणे एकूण सुमारे आठशे दुनाम जमीन मिळाली होती. आज अकरा हजार दुनाम जमीन कसणुकीखाली आहे. पण ही सगळीच जागा खुद्द किबुट्झच्या परिसराला लागूनच आहे असे मात्र नाही. इतर किबुट्झ वसाहतींमध्ये उद्योगधंद्यांचा शिरकाव झालेला असला तरी किर्यात येदिदिमने त्याला विरोध केलेला आहे त्यामुळे त्याचे सर्व उत्पन्न शेतीमधूनच प्राप्त होते. जे थोडे सभासद किबुट्झच्या बाहेर बिगरशेतीची कामे करतात त्यांच्या पगारातून किबुट्झला होणारी थोडीशी प्राप्ती एवढाच फक्त अपवाद. मात्र बहुतेक वेळा ही कामे अंगावर घेतली जातात ती त्यांतून किबुट्झला पैसा मिळतो यापेक्षा किबुट्झच्या शेतीला त्यामुळे साहाय्य होते यासाठी घेतली जातात. म्हणून, हे लोक ऑलिव्ह तेल गाळण्याचे कारखाने, उतारू व मालवाहू मोटारी, किंवा मोटारदुरुस्तीची ठिकाणे अशा व्यवसायांतून कामे करतात. हे व्यवसाय प्रादेशिक व्यापाच्या सहकारी संस्थांनी संघटित केलेले असून त्यांची किबुट्झ शेतीला फार मदत होते.

किर्यात येदिदिमची शेती पुढील आठ शाखांमध्ये विभागलेली आहे.

( १ ) **दुग्धशाळा** — दर वर्षी पाच लाख लिटर दुधाचे उत्पादन डेअरीतून होते. मात्र शेतीच्या सर्व शाखांमध्ये सर्वात कमी प्राप्ती याच शाखेची आहे.

( २ ) **धान्यपिके** -- या शाखेचे दरवर्षी पाच ते सहा हजार टन पीक निघते. पिके चांगली असतील त्यावर्षी एकूण उत्पन्न खूप असते. त्यातून एका कामाच्या दिवसामागे ६-८ लिरा[3] सुटतात.

( ३ ) **भाजीमळे** -- प्रत्येक वर्षी या शाखेतून ४०० ते ५०० टन माल स्थानिक बाजारात जातो.

( ४ ) **मत्स्योत्पादन** --- किबुट्झने मत्स्योत्पादनासाठी कृत्रिम तळी बांधली आहेत. त्यांतून दर वर्षी ७० टन उत्पादन होते. नक्त उत्पन्न दर कामाच्या दिवसामागे ६ ते ८ लिरा, म्हणजे बसवहीत असते.

( ५ ) **फळबागा** -- ८० टन द्राक्षे, ७००० पेट्या पपनस, आणि २० टन ऑलिव्ह फळे इतका माल दरवर्षी बाजारात जातो. प्रत्येक कामाच्या दिवसामागे तीन लिरा सुटतात.

( ६ ) **कळप** -- किबुट्झमध्ये बकरी आणि मेंढ्या दोन्हींची निपज होते. बकऱ्या दुधासाठी व मेंढ्या लोकरीसाठी उपयोगी पडतात.

( ७ ) **कोंबड्या-बदके** --- दर वर्षी किबुट्झमधल्या कोंबड्या सुमारे दहा लाख अंडी घालतात, त्यांपासून प्रत्येक कामाच्या दिवसामागे ६–८ लिरा प्राप्ती होते.

( ८ ) **चारा** -- दर वर्षी २५००० टन क्लोव्हर, अल्फाल्फा, आणि सायलेज ( मका, सोरघम, आणि साखर बीट ) यांचे उत्पादन निघते.

किबुट्झचे ठोक उत्पन्न सुमारे २५०,००० लिरा आहे. हा व्याप काही लहान नाही हे स्पष्ट आहे. किर्यात येदिदिममध्ये शेतीचे पूर्णपणे यांत्रिकीकरण झालेले आहे. त्याच्या मालकीचे दहा ट्रॅक्टर, तीन कंबाइन आणि तीन मालमोटारी आहेत.

किर्यात येदिदिमची अर्थव्यवस्था समाजवादी असल्याने तिची हिशेबपद्धती थोडक्यात विशद करणे क्रमप्राप्त ठरते. 'मजूर-दिवस उत्पन्न' म्हणजे कोणत्याही उत्पादन-शाखेत एक माणूस एका दिवसात करीत असलेल्या कामाची मिळकत ( मॅन-डे इन्कम ). या मोजमापावर हिशेबव्यवस्था आधारलेली आहे. मॅन-डे इन्कम म्हणजे शाखेचे एकूण उत्पन्न भागिले एकूण कामगारांची संख्या. किर्यात येदिदिममधील एकूण श्रमांपैकी दोनतृतीयांश श्रम सभासद करतात आणि उरलेले एकतृतीयांश श्रम तात्पुरत्या कामगारांकडून ( युवक गट, लष्कर इ. ) केले जातात. हिशेबासाठी श्रमाचे

---

३. १९५१ मध्ये लिराचा म्हणजे इस्रायली पौंडाचा हुंडणावळीचा अधिकृत दर २·८० डॉलर होता. काळ्या बाजारातील दर मात्र १·०० डॉलर किंवा त्याहून कमी होता. लिराची क्रयशक्ती विचारात घेतली तर उत्तरोक्त दरच अधिक वस्तुनिष्ठ म्हटला पाहिजे.

दोन प्रकार केलेले आहेत : उत्पादक श्रम ( **आवोदा प्रॉडक्टिव्हिट** ) म्हणजे ज्या श्रमामुळे नफा मिळतो किंवा किबुट्झच्या भांडवल गुंतवणुकीची वाढ होते; आणि दुसरा प्रकार अनुत्पादक श्रम (**आवोदा लो माक्निसा**, शब्दशः अर्थ ज्या श्रमापासून कोणतेही उत्पन्न लाभत नाही ते ). या प्रत्येक प्रकाराचे पुन्हा काही ढोबळ उपप्रकार केलेले आहेत त्यांची रूपरेषा पुढीलप्रमाणे :

( अ ) उत्पादक काम : या विभागात सुमारे अर्धे मनुष्यबळ अंतर्भूत आहे.

( १ ) रोख रकम मिळवून देणारे काम ( **आवोदा माक्निसा** ) :—

( i ) मेशेकमधील म्हणजे किबुट्झच्या ( वरच्या यादीत दाखविलेल्या ) शेतीसंबंधित शाखांमधील काम.

( ii ) किबुट्झच्या सभासदांनी मजुरीसाठी बाहेर केलेले काम ( या कामांची यादी वर दिली आहे ).

(iii) बांधकाम.

( २ ) भांडवली सुधारणा : यंत्रांची किंवा इमारतींची दुरुस्ती इत्यादी ज्या प्रकारच्या कामांमुळे किबुट्झमधल्या भांडवल गुंतवणुकीची किंमत वाढायला मदत होते अशी कामे.

( ३ ) व्यवस्थापकीय काम : खजिनदार, खरेदी करणारा प्रतिनिधी, जनरल मॅनेजर इत्यादींकडून होणारे काम.

( ४ ) युवक नेतृत्व : किबुट्झमध्ये नेमलेल्या निरनिराळ्या युवक गटांना पुढारी आणि शिक्षक पुरविण्याबद्दल किबुट्झला थोडे रोख उत्पन्न मिळते.

( ब ) अनुत्पादक काम :— ( **आवोदा लो माक्निसा** )

( १ ) प्रौढांकरिता "सेवा" ( **शेरूत** ) यामध्ये पुढील गोष्टी येतात :—

( i ) शिंप्याचे दुकान.

( ii ) धुलाई केंद्र.

( iii ) स्वयंपाकघर व जेवणघर.

( iv ) सीमेपलीकडून लष्करी किंवा लुटारू हल्ल्याच्या प्रतिकारार्थ रोज रात्री ठेवावा लागणारा पहारा.

( v ) आरोग्य: यांत संडास–स्नानगृहे यांची स्वच्छता आणि डबक्यांवर मच्छरप्रतिबंधक फवारे मारणे वगैरे गोष्टी येतात.

( २ ) मुलांकरिता "सेवा" : यांमध्ये परिचारिका, शिक्षक, स्वयंपाकी इत्यादी येतात.

( ३ ) रजा व सुट्या, वार्षिक रजेवर गेलेले सभासद, तान्ह्या मुलांच्या माता इत्यादी.

( ४ ) आजारीपण.

( ५ ) प्रतिकूल हवामान.

( ६ ) राखीव सैन्यातील सेवा.

( ७ ) युवक चळवळीतील काम.

" अनुत्पादक " कामात किबुट्झचे पन्नास टक्के मनुष्यबळ अडकलेले असल्यामुळे उत्पादक कामे करणाऱ्या अर्ध्या लोकांवर सबंध किबुट्झला पुरेसे होईल एवढे उत्पादन करण्याची जबाबदारी पडते. प्रत्येक सभासदाच्या एका दिवसाच्या निर्वाहाला ( **योम कियुम** ) सरासरी ५० प्रश ( १/२० लिरा ) एवढा खर्च येतो. अनुत्पादक व उत्पादक या दोन्ही प्रकारच्या कामांचा मिळून प्रत्येक सभासदाची मजूर-दिवसाची सरासरी उत्पादनक्षमता ( **योम आवोदा** ) सुमारे दोन लिरा असते. अशा रीतीने सर्वसाधारण सभासदाची उत्पादनक्षमता ही त्याच्या निर्वाहखर्चाच्या दुप्पट असते.[४] मात्र, निर्वाहखर्च आणि उत्पादनक्षमता यांच्यातील फरक म्हणजे " नफा " नव्हे. आपल्या सभासदांच्या निर्वाहाला लागणाऱ्या खर्चाच्या जोडीला किर्यात येदिदिमला आणखीही कितीतरी खर्च आहेत. एकूण भांडवल गुंतवणुकीतील फक्त वीस टक्के भांडवल किर्यात येदिदिमच्या मालकीचे आहे. उरलेले भांडवल कर्जाऊ रकमेतून उभारलेले आहे. आणि त्यासाठी किर्यात येदिदिमची मालमत्ता गहाण ठेवलेली आहे. कर्जावरील व्याजाचे दर जबर आहेत आणि त्यापायीच किबुट्झच्या उत्पन्नाचा फार मोठा भाग संपतो. तरीही आर्थिकदृष्ट्या किबुट्झ म्हणजे एक " गोईंग कन्सर्न " आहे म्हणजेच तो व्यवसाय म्हणून नफ्यात चालतो.

किबुट्झमधल्या श्रमविभागणीकडे आता आपण वळू. काही थोडे अपवाद सोडल्यास कोण माणूस कोणत्या शाखेत काम करतो हे त्याच्या आवडीनिवडीवरून व कौशल्यावरून ठरते. लाभप्रेरणा नसल्यामुळे आणि तत्त्वतः सर्व प्रकारचे शारीरिक काम सारख्याच योग्यतेचे गणले जात असल्यामुळे प्रत्येकाची कामाची निवड त्याला त्यापासून कामाचा आनंद किती मिळतो यावरून ठरते. प्रत्येक सभासदाला त्याच्या इच्छेप्रमाणे काम देण्याचा आदर्श किबुट्झने आपल्यासमोर ठेवला आहे. याच्यामागचे साधे कारण म्हणजे माणूस कामगार म्हणून असंतुष्ट राहिला तर तो सभासद म्हणूनही असंतुष्ट राहील असे गृहीत धरलेले आहे. एखाद्याला एखाद्या ठराविक शाखेत काम करण्याची तीव्र इच्छा आहे इतकेच नव्हे तर त्या कामात तो कुशलही आहे असे दिसून आले तर त्याच्या आवडीच्या शाखेमध्ये त्याची कायमची नेमणूक होण्याची

---

४. **योम आवोदा** = एकूण उत्पादन *भागिले* सभासद संख्या, त्याचप्रमाणे **योम कियुम** = सभासदांचा निर्वाहखर्च *भागिले* सभासदसंख्या.

दाट शक्यता असते आणि कामाचे वाटप करणारे अधिकारी जेव्हा रोजच्या कामाची यादी तयार करतात तेव्हा त्याची नेमणूक साहजिकच त्या शाखेत करतात. मात्र, क्वचित् प्रसंगी जेव्हा एखाद्या विशिष्ट शाखेत एखाद्या खास कामासाठी माणसांची तीव्र टंचाई भासते आणि इतर शाखांतून कामगार ओढून घ्यावे लागतात तेव्हा त्याची थोड्या दिवसांसाठी बदली होते.

मात्र आपल्या आवडीच्याच शाखेत काम न मिळण्याचेही प्रसंग येतात. याला पुष्कळ प्रकारची कारणे असू शकतात आणि यातून किबुट्झमधले ताण आणि संघर्ष निर्माण होतात. ती कारणे अशी :

( १ ) आवश्यक ते कौशल्य किंवा ज्ञान माणसाजवळ नसते. पुष्कळदा आपल्या आवडीच्या शाखेतले कसब त्याच्याजवळ नसले तरी दुसऱ्या एखाद्या शाखेत कायमचे काम मिळण्याइतके काही प्रकारचे कसब त्याच्यापाशी असते. अशी गोष्ट असेल तेव्हा त्याला दुसऱ्या शाखेत काम मिळते आणि त्या शाखेसाठी त्याची पसंती दुसऱ्या क्रमांकाची असली तरी अशी व्यवस्था बहुधा समाधानकारक ठरते. मात्र काही वेळा असे होते की एखाद्या माणसाजवळ कसलेच कसब नसते त्यामुळे तो कुठेच उपयोगी पडत नाही, निदान कोणत्याही शाखेत तो विशेष उपयुक्त ठरत नाही. अशा वेळी त्याची अवस्था खेळातल्या लिंबूटिंबूसारखी होते. म्हणजे त्याची कुठेही कायम नेमणूक नसते पण किबुट्झमधल्या पडेल ते काम करणाऱ्या इतर कामगारांत त्याचा समावेश होतो आणि ज्या कोणत्याही शाखेत कामगारांची तात्पुरती जरुरी असेल तेथे त्याला घेतले जाते. एक दिवस त्याला सुतारकामाच्या दुकानातील आजारी सुताराच्या ऐवजी काम करावे लागेल, तर दुसऱ्या दिवशी सुट्टीवर गेलेल्या गुराख्याच्या जागी. आणि असेच कुठे ना कुठे. अशी लिंबूटिंबूची जागा कोणालाही देण्याचे शक्यतो टाळण्यात येते कारण तसे केल्याने सभासदाचा मनोभंग होतो. शारीरिक श्रम हेच ज्यामध्ये सर्वश्रेष्ठ मूल्य असते अशा समाजात अमक्यापाशी काम करण्याची शक्ती कमी आहे असे अधिकृतपणे जाहीर होते तेव्हा त्याची प्रतिष्ठा कमी होते, आणि किबुट्झ अर्थव्यवस्थेच्या गतिशीलतेत श्रम-प्रतिष्ठा या प्रेरणेला तर महत्त्वाचे स्थान आहे.

( २ ) शाखा अगोदरच पूर्ण भरलेली असून जास्त कामगारांची गरज नसते अशा वेळी त्या कामगाराला दुसऱ्या शाखेत घेतात. मात्र जेव्हा त्याच्या आवडीच्या शाखेत जागा रिकामी होईल तेव्हा त्याला तेथे काम देण्याचा संकेत पाळला जातो. अर्थात् पुष्कळदा असेही होते की दिलेले काम त्याला हळूहळू आवडू लागते आणि बदलीची इच्छा त्याला उरत नाही.

( ३ ) काही प्रकारची कामे कोणाच्याच आवडीची नसतात, किंवा त्यांच्यासाठी ज्या खास शिक्षणाची जरुरी असते ते कोणालाच नसते किंवा त्यापासून कोणचाच फायदा नसतो. अशा वेळी ते काम पत्करण्यासाठी कोणावर तरी वजन आणण्यात येते, किंवा

ग्रामसभेच्या निर्णयाने औपचारिक ठराव करून ती जागा भरली जाते. जेव्हा एखाद्या-वर वजन आणण्यात येते तेव्हा ते वजन नैतिक असते. उदाहरणार्थ, किबुट्झने पाव-रोट्या तयार करण्याच्या नोकरीवर ठेवलेला एक बेकर निवृत्त व्हायला आला होता त्यामुळे किबुट्झला बेकरची गरज होती. या जागेवर किबुट्झचा एक सभासद नेमायचे ठरले. परंतु ही जागा कोणालाच नको होती कारण हे काम कठीण, विस्तवाच्या भट्टीजवळचे आणि अस्वच्छ होते. अर्थधोरण समितीने या जागेसाठी सर्वांत योग्य म्हणून सौम्य वृत्तीच्या एका "क्ष" सभासदाची निवड करायची असे ठरविले. त्याने हे काम पत्करायचे नाकारले तेव्हा चिटणीस त्याला खासगी रीत्या भेटला. आणि "क्ष" ने हे शिकून घेतले तर किबुट्झची पैशांची कितीतरी बचत होईल हे त्याच्या ध्यानात आणून दिले. दुसऱ्या दिवशी महामंत्री "क्ष" ला भेटला आणि त्याला दुसरे नियमित असे काम नसल्याने बेकरचे काम त्यानेच पत्करणे तर्कदृष्ट्या कसे योग्य आहे हे त्याने त्याला पटवून दिले. तसेच इतरत्र नियमित काम नेमून दिले आहे अशा एखाद्या व्यक्तीची या कामासाठी निवड केल्यास किबुट्झच्या अर्थव्यवस्थेत खंड पडेल हेही त्याने सांगितले. दुसऱ्या दिवशी प्रस्तुत लेखकाला "क्ष" ने सांगितले की आपण हे काम बहुतेक पत्करू. आपल्या सदसद्विवेकबुद्धीची टोचणी हे त्यामागचे कारण असल्याचेही त्याने सांगितले.

तात्पुरत्या कामासाठी माणसांची भरती करायची असली तरी ती सक्तीने नसते त्यामुळे एखाद्याने सयुक्तिक कारण दाखविले असता त्याला सूट दिली जाते. मात्र त्याने काही कारण दाखविले नाही तर आणि गटाच्या कल्याणासाठी व्यक्तीने आपणास गौण मानण्याच्या तत्त्वाचा किबुट्झने आग्रह धरला तर त्या सभासदाला शिस्तभंगाबद्दल काढून टाकण्याची धमकी किबुट्झ देऊ शकते. उदाहरणार्थ डेअरीच्या कामासाठी कामगारांची भरती करावीच लागते कारण कामाचे तास अनियमित असतात, त्यामुळे कामाचा दिवस विभागलेला राहतो आणि संध्याकाळ रिकामी सापडत नाही; म्हणून या शाखेत काम करायला फारच थोडे लोक उत्सुक असतात. ह्या समाजात शारीरिक श्रमांवर भर दिला जातो त्यामुळे प्रशालेतील शिक्षकाचे काम हे बहुतेकांना न आवडणारे दुसरे काम. ह्या कामासाठी लायक माणसेही फार थोडी असतात. मात्र, कमीत कमी पाच वर्षांच्या मुदतीनंतर इच्छा असल्यास शिक्षकाला कामाचा राजीनामा देता येतो अशी प्रथा आहे. तेव्हा हे काम कोणाला तरी सांगावे लागते. शहरातील युवक चळवळीतले काम पुष्कळांना आवडत नाही, कारण किबुट्झपासून आणि आपल्या कुटुंबापासून संपूर्ण आठवडाभर दूर राहावे लागते. येथेही एखाद्या कामगाराची मुद्दाम योजना करावी लागते.

( ४ ) काही कामे कोणालाच इतकी नकोशी असतात की ती कामे करण्यासाठी कायम पाळीची पद्धत ठेवावी लागते आणि प्रत्येकालाच पाळी घ्यावी लागते; या

प्रकारच्या कामाचे सर्वांत मोठे उदाहरण म्हणजे स्वयंपाकघरातली व जेवणघरातली कामे म्हणजेच स्वयंपाक करणे, भांडी घासणे व वाढणे ही कामे. ही बायकांना एका वर्षाच्या व पुरुषांना दोनतीन महिन्यांच्या मुदतीपुरती करावी लागतात. फक्त आजारी, वृद्ध आणि शिक्षकाचे काम करणारी मंडळी यांना या पाळीतून सुटका मिळते. रात्रीच्या पाहारेकऱ्याचे काम हेही एक गैरसोयीचे काम असल्याने तेही पाळीच्या पद्धतीने करावे लागते आणि ही पाळी दोन आठवड्यांच्या मुदतीची असते.

( ५ ) एखादा आजारी असतो व त्याला कष्टाचे काम करता येत नाही. अशा व्यक्ती, त्याचप्रमाणे मातृत्वाची विशेष जबाबदारी असलेल्या तान्ह्या मुलांच्या आया यांना कायम स्वरूपाच्या नेमणुका देता येत नाहीत म्हणून त्यांना त्यांच्याजोगे काम देण्यात येते, परंतु ते त्यांना आवडेलच असे नव्हे.

( ६ ) शेवटी, कायम नेमणूक असलेल्या परंतु गरोदरपण, बाळंतपण किंवा अंगावर पिणारे मूल इत्यादी कारणांनी जिला कामातून निवृत्त व्हायचे असते अशा स्त्रीचा प्रश्न. तिच्या गैरहजेरीत तिचे काम चांगल्या प्रकारे करणारी कोणी मिळालेली असेल आणि त्याच शाखेत दुसरी जागा नसेल तर तिला आपल्या कामावर परत येता येत नाही. तिला विशेष इच्छा नसली तरी तेवढ्या वेळात तिला दुसरे काम करावेच लागते. स्त्रियांमधील असंतोषाच्या महत्त्वाच्या कारणांपैकी हे एक म्हणता येईल, आणि "स्त्रीची समस्या "[५] या चर्चेत याबद्दलचा अधिक विचार होईल.

किर्यात येदिदिममध्ये औपचारिक सत्तेबद्दल नेहमीच भीती बाळगली जाते. समाजरचनेच्या इतर कुठल्याही अंगाप्रमाणे आपल्या अर्थव्यवस्थेतही औपचारिक नेतृत्वाचे प्रकार येऊ देण्याबाबत किर्यात येदिदिमला नाखुशी वाटते. तरीसुद्धा, अर्थव्यवस्था जसजशी गुंतागुंतीची होत गेली तसतसे हळूहळू सत्तेचे प्रकारही वाढले. त्यामुळे आज किर्यात येदिदिममध्ये आर्थिक धोरण ठरविण्याच्या व अमलात आणण्याच्या समित्या, अधिकारी आणि मुकादम इत्यादींचे जाळे पूर्वीच्या मानाने वाढलेले आहे. पूर्वी असे गृहीत धरले जात असे की पुरेशा अनुभवानंतर कोणीही सभासद व्यवस्थापकाच्या जागेवर काम करू शकेल व त्यामुळे सगळ्या सभासदांना सगळे हुद्दे आळीपाळीने मिळतील. मुळात कोणत्याही हुद्द्याला वेगळा मोबदला नसतोच, शिवाय या पद्धतीने ठराविक मुदतीचे बंधन येत असल्यामुळे नोकरशाहीचा प्रादुर्भाव टळेल अशीही कल्पना होती. अनुभवानंतर असे आढळून आले की ही समजूत चुकीची आहे; किबुट्झला आर्थिक स्थैर्य मिळवायचे व टिकवायचे असेल तर अत्यंत कुशल व अत्यंत कार्यक्षम अशा लोकांखेरीज इतर कुणालाही जबाबदारीच्या जागी ठेवणे परवडण्यासारखे नाही. म्हणून जरी महत्त्वाच्या जागा आळीपाळीने भरल्या जातात व कोणाही सभासदाला लागोपाठ

---

५. प्रकरण ६ पाहा.

दोन-तीन वर्षांपेक्षा अधिक काळ एका जागेवर ठेवीत नाहीत, तरी ज्यांची योग्यता इतरांना पटली आहे अशा दहा ते पंधरा लोकांच्या लहान गटातच हे बदलीचे चक्र फिरत असते.

साधारणतः नेमणूक समितीच्या शिफारशींना अनुसरून निरनिराळ्या समित्यांतील सभासद आणि अधिकारी यांची ग्रामसभेत निवड होते. समित्या एक वर्षभर आणि अधिकारी दोन किंवा तीन वर्षे काम करतात. निरनिराळ्या समित्या पुढीलप्रमाणे :

( १ ) **अर्थधोरण समिती** : ही समिती पंधरा सभासदांची असते. ती किबुट्झशी संबद्ध अशा सर्व आर्थिक व्यवहारांबद्दल धोरण ठरविते आणि दीर्घकालीन महत्त्वाचे बहुतेक निर्णय घेते. तिचे बहुतेक सभासद ग्रामसभेने निवडलेले असतात आणि प्रत्येक सभासद अर्थव्यवस्थेच्या वेगवेगळ्या शाखेचे प्रतिनिधित्व करतो. निवडलेल्या सभासदांच्या जोडीला या समितीत कामाच्या नेमणुका करणारे दोन अध्यक्ष, खजिनदार, चिटणीस आणि किबुट्झचा अर्थव्यवस्थापक असे लोक असतात.

( २ ) **अर्थ–कार्यकारी समिती** : या समितीचे सहा सभासद असतात. त्यांत अर्थव्यवस्थापक, खजिनदार, हिशेबनीस, त्याचप्रमाणे अर्थधोरण ठरविणाऱ्या समितीचे तीन सभासद इतक्यांचा अंतर्भाव होतो. ही कार्यकारी समिती म्हणजे अर्थधोरण समितीचीच कार्यकारी समिती असते आणि अर्थधोरण समितीने ठरविलेल्या सर्वसाधारण धोरणांना अनुसरून आर्थिक बाबींसंबंधी दैनंदिन निर्णय घेते.

( ३ ) **नियोजन समिती** : या समितीचा काळ मर्यादित असतो कारण फक्त वर्षाच्या सुरुवातीलाच हिला काम असते. किबुट्झसाठी एक सर्वसमावेशक वार्षिक योजना ही समिती तयार करते, पण हिला सत्ता अशी नसते. ही समिती स्थायी स्वरूपाची असावी आणि तिला दीर्घकालीन योजना तयार करण्याचा अधिकार असावा असे काही सभासदांचे मत आहे.

( ४ ) **कामवाटप समिती** : हीत अर्थव्यवस्थापक, चिटणीस आणि कामाची नेमणूक करणारे अध्यक्ष हे येतात. हिच्या बैठका दर महिना-दोन महिन्यांच्या मुदतीने होतात. या बैठकांत नजीकच्या काळासाठी मनुष्यबळाची सर्वांत कार्यक्षम आणि व्यवहार्य वाटणी करण्याची सर्वसाधारण योजना आखली जाते.

( ५ ) **बांधकाम समिती** : या समितीचे काम म्हणजे नवीन घरे, निद्रागृहे, शाळेच्या इमारती इत्यादींच्या बांधकामाच्या योजना तयार करणे.

या समित्यांना ग्रामसभेकडून अधिकार प्राप्त होतात आणि कार्यवाहीपेक्षा धोरण आखण्याचेच काम असते हे लक्षात आलेच असेल. कार्यवाहीची कामे उत्पादनविषयक " अधिकाऱ्यां " कडून होतात. किबुट्झमधला सर्वांत महत्त्वाचा आर्थिक हुद्दा सर्वसाधारण अर्थव्यवस्थापकाचा ( जनरल इकॉनॉमिक मॅनेजरचा ) असतो कारण

अर्थव्यवस्थेच्या सर्व उत्पादक विभागाची व्यवस्था त्याच्याकडे असते. शेतकी-विषयक सर्व धोरणांच्या अंमलबजावणीला तोच जबाबदार असतो आणि मनुष्यबळ व साधनसामग्री यांचे वाटप आणि देखरेख यासंबंधीची अंतिम सत्ता त्याच्याच हातात असते. त्याला कामाचा ताण फार असल्याने हे काम सोडून इतर सर्व कामांतून त्याला मोकळीक दिलेली असते. आणि शिवाय या कामासाठी खूपच तांत्रिक ज्ञानाची आवश्यकता असल्यामुळे त्याच्या कामाची कारकीर्द बहुधा दोन-ते चार वर्षांची असते.

खजिनदाराचे काम किबुट्झजवळ अगोदरच असलेल्या पैशाची व्यवस्था बघण्या-पेक्षा पैसा उपलब्ध होण्यासाठी नवे मार्ग शोधणे हेच असते. आजच्या इस्रायलमधील हे सर्वांत अवघड काम आहे आणि त्यासाठी खजिनदाराला आठवड्याचा बराचसा काळ किबुट्झच्या बाहेर घालवावा लागतो. महामंत्र्याप्रमाणेच या कामालाही अवश्य असणारे तांत्रिक ज्ञान आणि जबाबदाऱ्या इतक्या असतात की खजिनदाराची मुदत बहुधा तीन वर्षांची असते आणि त्याला इतर सगळ्या कामापासून मोकळे ठेवण्यात येते.

सगळा औद्योगिक माल, तसेच प्रक्रिया केलेले खाद्यपदार्थ किबुट्झच्या बाहेरून विकत घ्यावे लागत असल्याने दररोज निरनिराळ्या शहरांत जाऊन किबुट्झला जरूर असणारा माल विकत घेणारा खरेदी प्रतिनिधी किर्यात येदिदिमला निवडावा लागतो. त्यामुळे, हेही एक पूर्ण वेळाचे काम आहे आणि हे पत्करणाराला इतर उत्पादक कामातून मोकळे केलेले असते.

सर्वांत अवघड अशी व्यवस्थापनाची जागा कोणाची असेल तर, कामे नेमून देणाऱ्या अध्यक्षाची. किर्यात येदिदिमची अर्थव्यवस्था ज्या वेगाने विस्तारली आहे त्या वेगाने त्याची लोकसंख्या वाढलेली नाही त्यामुळे आज त्याला मजूरटंचाई फार तीव्रतेने जाणवते. शिवाय, पाणी व पाणीपुरवठ्याचे नळ व ट्रॅक्टर आणि कंबाइन अशा अवजड यंत्रांसाठी पुरवठ्याच्या मानाने मागणी खूप आहे. अर्थव्यवस्थेच्या निर-निराळ्या शाखांमध्ये ह्या मानवी आणि यांत्रिक साधनसामग्रीसाठी प्रत्येक शाखा मागणी करत असल्यामुळे तिचे सर्वांना न्याय्य वाटप करणे हे महत्त्वाचे काम कामे नेमून देणाऱ्या अध्यक्षांना महामंत्र्याच्या सहकार्याने करावे लागते.

बहुसंख्य पुरुष "उत्पादक" कामात, आणि बहुतेक स्त्रिया "सेवा" कार्यात असल्याने उत्पादक कामे नेमून देणारा अध्यक्ष पुरुष निवडला जातो तर "सेवा" म्हणून गणल्या जाणाऱ्या कामांसाठी अध्यक्षा म्हणून स्त्रीची नेमणूक केली जाते. रोज संध्याकाळी हे अध्यक्ष आणि अर्थव्यवस्थेच्या निरनिराळ्या शाखांचे मुकादम खूप वेळ एकत्र जमतात आणि प्रत्येक सभासद, त्याचप्रमाणे हाताशी असलेली इतर माणसे, कोठे कामाला लावावयाची हे ठरवितात. नंतर ते दुसऱ्या दिवसाच्या कामाचा तक्ता तयार करून तो जेवणघरातील वृत्तपत्रफलकावर संध्याकाळी लावून ठेवतात. ह्याही कामात

ताण खूप असला तरी त्याला विशेष मोठे कौशल्य किंवा तांत्रिक पात्रता लागत नाही ( मात्र व्यवहारचातुर्य आणि धूर्तपणा जरूर लागतो ) आणि म्हणून ह्या सभासदांची कारकीर्द वर्षभराची असते. शिवाय, हे काम वेळखाऊ असले तरी अध्यक्षांना त्यांच्या नेहमीच्या उत्पादक कामातून नियमित मोकळीक दिली जात नाही.

सबंध अर्थव्यवस्थेला जबाबदार असणाऱ्या या वेगवेगळ्या समित्या आणि त्यांचे अधिकारी यांशिवाय अर्थव्यवस्थेच्या प्रत्येक शाखेला एकेक मुकादम असतो आणि तो आपल्या शाखेच्या कारभाराला प्रत्यक्ष जबाबदार असतो. मुकादमाच्या जागेवरील माणसाची किबुट्झमधल्या इतर व्यवस्थापकीय जागांवरील माणसांप्रमाणेच निवडणूक केलेली असते; परंतु निवडणुकीची पद्धत शाखेच्या स्वरूपावर अवलंबून असते. ज्या शाखांमध्ये कामगार कायमचे असतात त्यातला मुकादम त्या शाखेत काम करणाऱ्या त्याच्या सहकाऱ्यांकडून निवडला जातो. ज्या शाखेतील कामगार ( काम नावडते व म्हणून पाळीचे असल्यामुळे ) हंगामी असतात त्यातील मुकादम ग्रामसभेमार्फत निवडला जातो. मुकादम हा धोरण ठरविणारा नसून प्रशासक असतो. कायम कामगारांखेरीज आपणाला इतर माणसे किती हवीत, ती कुठे व कशी नेमायची, कोणती यंत्रसामग्री लागेल, इत्यादी सर्व बाबतीत दैनंदिन निर्णय तो घेतो. प्रत्येक शाखेतले बहुतेक सर्व कामगार आपापल्या कामात तज्ज्ञ असतात त्यामुळे मुकादम हा केवळ " समानांमधला पहिला " आणि तोही तात्पुरता असतो; तात्पुरता म्हणण्याचे कारण असे की शाखेमधील सभासदांत ही जबाबदारी पाळीने फिरत असते त्यामुळे शाखेसंबंधी धोरणे ठरविण्याचे काम एकट्या मुकादमाकडून न होता संबंध शाखेकडून होते.

ग्रामसभेकडून आवार, कोठार, धुलाईघर, स्वयंपाकघर, वस्त्रभांडार या शाखांचे मुकादम निवडले जातात. यातल्या शेवटच्या तीन मुकादमांच्या जागा इतक्या कमालीच्या नावडत्या असतात की त्यांच्या नेमणुकीसाठी वापरण्यात येणाऱ्या पद्धतीला " निवडणूक " न म्हणता " भरती " ( ड्राफ्ट ) म्हणणे अधिक रास्त ठरेल. किबुट्झच्या श्रमविभागणीप्रमाणे शेवटच्या दोन शाखा हे " बायकांचे " काम समजले जाते; मात्र धुलाईघराच्या मुकादमाची जागा पुरुष किंवा स्त्री कोणीही भरू शकते.

धुलाईघराच्या मुकादमाची जागा ठरलेल्या मुदतीची नसते पण त्या जागेवरच्या माणसाने किमान वर्षभर तरी काम करावे अशी अपेक्षा असते. कोणीही हे काम दोन वर्षांहून अधिक काळ करायला क्वचितच तयार होते कारण ते शारीरिक कष्टाचे व अवघड असते. वस्त्रभांडाराच्या मुकादमाचे काम नव्या कपड्यांचे वाटप करणे हे असते आणि शिलाई खात्याने कोणते कपडे अगोदर व कोणते मागाहून वावयाचे हे त्याने ठरवायचे असते. ह्या स्त्री-मुकादमाच्या कामाला मुदतीची अट घातलेली नसते, तरी ग्राहकांत व तिच्यात होणाऱ्या कटकटींचा फार ताण पडत असल्याने हे काम थोड्या वर्षांनंतर करायला ती बहुधा तयार नसते.

स्वयंपाकघर व जेवणघर यांवरच्या मुकादमाचे काम हे किबुट्झमधले सर्वांत अवघड काम समजण्यात येते. स्वयंपाकघरातले काम ज्या परिस्थितीत करावे लागते ती अगदीच दीनवाणी असते, सोयी अपुऱ्या असतात आणि एकूण इस्रायलमधल्या-प्रमाणेच अन्न अपुरे असते. म्हणून हीही जागा स्त्रियांमध्ये पाळीपाळीने बदलत असते आणि प्रत्येकीने दोन ते तीन वर्षे काम करावे अशी अपेक्षा असते.

आता आपण किबुट्झच्या अर्थव्यवस्थेतील अत्यंत महत्त्वाचा आणि निर्णायक असा घटक म्हणजे उत्पादन प्रेरणा त्याची चर्चा करू. खाजगी मालमत्ता आणि पैसा ह्या गोष्टी अस्तित्वातच नसल्यामुळे या समाजात लाभप्रेरणेला अवसर नाही हे उघडच आहे. शिवाय हा समाज स्तरयुक्त नसल्यामुळे सत्तेवर असलेल्या लोकांनी आपली कामे कनिष्ठ वर्गांवर लादून करून घेण्याचा प्रकार त्यात संभवत नाही. किर्यात येदिदिमवर सत्ता गाजविणारी वरिष्ठ अशी राजकीय शक्ती नाही—जी काय आहे ती फक्त गटाची स्वतःचीच आणि वर सांगितल्याप्रमाणे त्यातले अर्थविषयक कार्यवाह आणि व्यवस्थापक ग्रामसभेच्या तंत्रानेच चालत असतात. तरीसुद्धा, पाश्चिमात्य समाजात ज्या आर्थिक प्रेरणा रूढ झालेल्या आहेत त्यांचा अभाव असूनही किर्यात येदिदिमचे सभासद एवढ्या मोठ्या अर्थव्यवस्थेचे संचालन यशस्वीपणे करतात.

पहिल्या प्रथम हे लक्षात घेतले पाहिजे की लाभप्रेरणा अस्तित्वात नाही याचा अर्थ किबुट्झच्या आर्थिक वर्तुणुकीत इतर पारंपरिक उत्पादनप्रेरणा अस्तित्वात नाहीत असे नव्हे. सभासद टाळाटाळ न करता खूप काम कार्यक्षमतेने करीत असलेले दिसतात त्यामागे निदान चार वैयक्तिक स्वरूपाच्या प्रेरणा असतात. एक म्हणजे भांडवलशाही समाजातल्याप्रमाणेच, तो जितके जास्त काम करील तितका जास्त आर्थिक लाभ त्याला मिळतो. सभासदाला आपल्या श्रमाची फळे प्रत्यक्ष मिळत नाहीत व त्यामुळे आपल्या उत्पादनशक्तीचा तात्काळ परिणाम त्याला दिसत नाही हे खरे; तथापि हेही खरेच आहे की गटाचे राहणीमान प्रत्येक सभासदाच्या उत्पादक शक्तीवर अवलंबून असते आणि त्याच्या स्वतःच्या राहणीचा दर्जा गटाच्या राहणी-मानावर अवलंबून असतो. प्रत्येकजण हे ओळखून असतो की आपण काम टाळले तर इतर सगळेही तेच करतील आणि शेवटी इतरांबरोबर आपलेही नुकसान होईल. म्हणून वैयक्तिक आर्थिक उन्नतीची इच्छा ही किर्यात येदिदिममधील कामामागची एक प्रेरणा आहे असे म्हणता येईल.

शिवाय हेही लक्षात ठेवले पाहिजे की बहुतेक सभासदांनी ग्रामीण जीवन आणि शेतीचे काम मुद्दाम पत्करलेले आहे. आणखी असे की सभासद आपल्या सर्वांत अधिक आवडीच्याच शाखेत काम करतो. याचा परिणाम असा होतो की अगदी सर्व-साधारण सभासदालाही आपल्या कामात गोडी वाटते; त्याला त्या कामाच्या प्रक्रियेत त्याचप्रमाणे त्याच्या निष्पत्तीतही आनंद मिळतो. व्हेबलेनने " कामाच्या फलनिष्पत्तीचा

आनंद" याहून वेगळी अशी "कारागिरीची अंतःप्रेरणा" किंवा "कामाच्या प्रक्रियेतला आनंद" ही संकल्पना मांडलेली आहे. ही प्रेरणा इतर कुणाहीप्रमाणे सभासदालाही कार्यप्रवण करते. थोडक्यात, सर्वसाधारण सभासदाला त्याच्या कामापासून मिळणारा आनं ही त्याच्या आर्थिक वर्तनाची दुसरी वैयक्तिक प्रेरणा म्हणता येईल.

वैयक्तिक प्रेरणेचे तिसरे उगमस्थान म्हणजे स्पर्धावृत्ती. साधारण सभासद हा फळबाग, गव्हाची शेते, दुग्धोत्पादन केंद्रे इत्यादी कोणत्या तरी ठराविक शाखेचा कायमचा कामगार असतो आणि त्याला त्याच्या शाखेविषयी ेम व जिव्हाळा उत्पन्न झालेला असतो. शाखा यशस्वी झाली तर त्याला अभिमान वाटतो आणि तिच्या अपयशाने तो दुःखी होतो आणि सबंध किबुट्झची भरभराट पाहावी अशी जरी त्याची इच्छा असली तरी त्या भरभराटीत आपल्या शाखेने योग्य तो वाटा उचलला आहे एवढेच नव्हे तर त्याहूनही अधिक काही केले आहे ह्या जाणिवेने त्याला मोठे समाधान लाभते. म्हणून या अनौपचारिक चढाओढीमध्ये आपल्या शाखेचा क्रम वरचा लागावा यासाठी जास्त कष्ट करण्याची प्रेरणा त्याला मिळते. याचे एक उदाहरण असे सांगता येईलः सामान्यतः किबुट्झमधल्या उत्पादनाचा सर्वांत जास्त वाटा धान्य पिकांच्या शाखेचा असतो आणि या शाखेतले कामगार इतर शाखांतील कामगारांच्या मानाने आपण विशेष महत्त्वाचे असल्याचे दाखवितात असे नेहमी आढळून येते. मात्र, प्रस्तुत लेखकाचे संशोधन चालू होते त्यावर्षी दुष्काळ पडला होता आणि धान्याचे पीक कमी आले होते. पण कृत्रिम पाणी पुरवठ्याच्या मदतीने भाजीपाल्याचे उत्पन्न मात्र खूप मोठे आले होते. याचा भाजीमळ्यातल्या कामगारांना अभिमान वाटत असल्याचे सर्वांनाच स्पष्ट दिसून आले.

कार्यक्षम आणि उत्पादक आर्थिक वर्तणुकीमागची शेवटची वैयक्तिक प्रेरणा म्हणजे प्रतिष्ठा. किर्यात येदिदिमच्या संस्कृतीमध्ये श्रम हे एक श्रेष्ठ मूल्य आहे हे वाचकांच्या लक्षात असेलच. अगदी काबाडकष्टाचे व चोख काम ही गोष्ट प्रतिष्ठा मिळवायला आवश्यक अशी अट आहे. या समाजात लाभप्रेरणा नसल्याने आपल्या सहकाऱ्यांचा आपल्या विषयीचा आदर ही एक महत्त्वाची प्रेरणा बनलेली आहे. कामाची टंगळमंगळ करून हा आदर गमावण्याला कोणी तयार नसतात आणि बहुतेक काम सहकारी गटागटातून होत असल्याने कोणी कामाची टाळाटाळ केलीच तर तो तावडतोब ध्यानात येते. किबुट्झच्या मूल्यश्रेणीत श्रमाला फार महत्त्व असल्याने जनमत ही कामामागची फार महत्त्वाची प्रेरणा आहे.

कामामागच्या ह्या वैयक्तिक प्रेरणा महत्त्वाच्या असल्या तरी सार्थीचे आर्थिक वर्तन समजून घेण्याच्या दृष्टीने त्या पुरेशा नाहीत. त्यांच्या उत्पादक कौशल्यामुळे त्यांना किबुट्झमध्ये जेवढे मानसिक समाधान – प्रतिष्ठा, अभिमान वगैरे – मिळते निदान तितके तरी किबुट्झबाहेरच्या जगातही खासच मिळू शकेल. सुधारलेल्या राहणीमानाच्या प्रेरणेचा विचार केला तर असे ध्यानात येईल की पुष्कळशा सभासदांना

किबुट्झच्या बाहेरच्या स्पर्धात्मक अर्थव्यवस्थेत निश्चितच अधिक धन मिळेल. यावरून असा निष्कर्ष निघतो की किर्यात येदिदिममधल्या आर्थिक वर्तणुकीमागे अशा काही प्रेरणा आणि असे काही समाधान असले पाहिजे की जे बाहेर आढळणार नाही. या निष्कर्षाला पोषक असा पुरावा देता येईल. प्रथम आपण किबुट्झमध्ये मिळणाऱ्या अनन्यसाधारण अशा आर्थिक समाधानाचा विचार करू.

किर्यात येदिदिमच्या अर्थव्यवस्थेत सवसाधारण सभासदाला जी सुरक्षिततेची भावना लाभते ती किबुट्झच्या बाहेर लाभणे अगदीच अशक्य नसले तरी कठीण आहे. हे घडते याचे कारण किबुट्झची सामाजिक सुरक्षिततेची व्यवस्था व्यापक स्वरूपाची आहे आणि किबुट्झमध्ये प्रतिष्ठा ही संपत्तीवर अधिष्ठित नाही. सामाजिक सुरक्षितता ही इतकी व्यापक आहे की व्यक्तीला आर्थिक विवंचना जवळजवळ नसतात. जोपर्यंत सबंध किबुट्झ आर्थिकदृष्ट्या सुस्थितीत आहे तोपर्यंत सभासदाला आर्थिक सुस्थितीची निश्चिती आहे. जोपर्यंत थोडेतरी अन्न आहे तोपर्यंत कोणीही उपाशी राहणार नाही; जोपर्यंत थोडेतरी कपडे आहेत तोपर्यंत कोणीही उघडा राहणार नाही. सबंध किबुट्झच्या आर्थिक परिस्थितीची सभासदाला चिंता वाटेल हे खरे पण व्यक्तिशः आपले घरभाडे कसे भरायचे, आपली डॉक्टरची बिले किंवा आपल्या मुलांचा शिक्षण-खर्च कसा भागवायचा इत्यादींनी तो चिंताग्रस्त होणार नाही. या सर्व चिंता किबुट्झने करायच्या. उदाहरणार्थ, एखाद्या जोडप्याला मूल झाले तर त्याला आर्थिक विवंचनेचे काहीच कारण नसते. औषधांची व इस्पितळांची त्याचप्रमाणे पुढे मुलांचे कपडे, अन्न, शिक्षण या सगळ्याचीच बिले किबुट्झकडून भागविली जातात. नवीन मुलासुळे जागेचाही काही प्रश्न उद्भवत नाही कारण ते मूल अर्भकालयात राहणार असते.

त्याचप्रमाणे, आजारी व वृद्ध यांनाही कसलीच चिंता नसते. एखादा सभासद आजारी पडला तर त्याला इस्पितळात पाठविले जाते किंवा घरीच वैद्यकीय मदत दिली जाते आणि किबुट्झ त्याचा खर्च भागविते. रुग्णालयातून घरी आल्यावर त्याला काही विशेष पथ्याचा आहार घ्यायची जरूरी असेल तर किबुट्झकडून त्याचीही व्यवस्था होते. त्याला काही महिने, किंवा काही वर्षेसुद्धा, कामावर परतणे शक्य नसले तरी आपल्या कुटुंबाचे कसे होईल याची काळजी करण्याचे कारण नसते. बरे झाल्यावर आपण बेकार राहू की काय याचीही भीती त्याला नसते कारण त्याला तावडतोब परत कामावर घेण्यात येते. कायमची अपंगावस्था आली किंवा म्हातार-पणामुळे त्याला काम करवत नाहीसे झाले तरी त्याचे राहणीमान बदलत नाही. तो कामावर असताना त्याचे जे राहणीमान असे ते तसेच चालू राहते. किंबहुना, एखाद्या विशेष आहाराची वा विशेष प्रकारच्या निवासाची सोय त्याला आवश्यक आहे अशी (त्याच्या आजारपणामुळे वा वयामुळे) त्याची अवस्था असेल तर त्याचे राहणीमान खरे म्हणजे सुधारते असेच म्हणावे लागेल.

किबुट्झच्या अर्थव्यवस्थेत मिळणाऱ्या आर्थिक सुरक्षिततेइतकीच त्यात मिळणारी मानसिक सुरक्षितताही महत्त्वाची आहे. सामूहिक समाजाचा सभासद म्हणून सभासदाच्या मनात एक आत्मीयतेची खोल भावना निर्माण झाल्यामुळे त्याला भावनिक सुरक्षितता वाटते हे तर खरेच पण याहून महत्त्वाची गोष्ट अशी की आर्थिक चढाओढीच्या वातावरणात उत्पन्न होणारी मानसिक असुरक्षितता त्याच्या वाट्याला येत नाही. उदाहरणार्थ, " दामडौली खर्चा "तून उद्भवणारे अनेक प्रश्न किबुट्झ सभासदांना भेडसावीत नाहीत. सर्व संपत्ती समाजाच्या मालकीची असल्याने प्रतिष्ठा, सत्ता किंवा अहंकाराच्या समाधानासाठी मालमत्तेच्या संचयाची प्रवृत्ती संभवत नाही. आपले कपडे विशोभित आहेत, आपले घर व फर्निचर जुनेपुराणे आहे किंवा आपली राहण्याची जागा फॅशनेबल नाही इत्यादी प्रकारच्या विवंचना किर्यात येदिदिममध्ये आढळतच नाहीत. अशा रीतीने, मालमत्ता आणि धन यांच्याशी प्रतिष्ठा निगडित असल्यामुळे आपल्या संस्कृतीत ज्या प्रकारच्या विवंचना निर्माण होतात त्या किर्यात येदिदिममध्ये अस्तित्वातच नसतात. " डेथ ऑफ ए सेल्समन " या नाटकाच्या प्रयोगावरील किर्यात येदिदिमची प्रतिक्रिया या संदर्भात फार बोलकी आहे. कित्येक सभासदांशी या नाटकाविषयी चर्चा करताना असे स्पष्ट दिसून आले की सर्वसाधारण सभासदाला विली लोमनच्या नैराश्याचे स्वरूपच न समजल्यामुळे त्याची गंभीर शोकांतिका समजू तरी शकली नाही, किंवा त्याला हे नैराश्य चांगले समजले पण आपल्या स्वतःच्या संस्कृतीपेक्षा विली लोमनची संस्कृती कनिष्ठ दर्जाची आहे एवढ्यावरच त्याने तो प्रश्न सोडून दिला.

सर्वसाधारण साथीला किबुट्झ अर्थव्यवस्थेमध्ये जी सुरक्षितता लाभते ती त्याच्या कामामागची प्रेरणा आहे हे जरी खरे असले तरी, तो ज्या भक्तिभावाने, कळकळीने आणि जबाबदारीने काम करतो त्याचे पुरेसे स्पष्टीकरण या आत्मपर प्रेरणेतून होऊ शकत नाही. हे स्पष्टीकरण किबुट्झ ज्याला **हक्कारा** म्हणतो त्या प्रकारच्या आत्मार्तीत प्रेरणेच्या आधारेच शक्य आहे. या संज्ञेचा शब्दशः अर्थ "जाणीव" असा करता येईल; पण **हक्कारा** या शब्दात नुसत्या जाणिवेपेक्षा अधिक अर्थ आहे. हक्कारा ही एक नैतिक व आदर्शवादात्मक संकल्पना आहे आणि तिचा अर्थ किबुट्झबद्दल एक नैतिक जबाबदारी वाटणे असा आहे. आणि किबुट्झबद्दलची जबाबदारी याचा अर्थ किबुट्झ ज्या राजकीय व आर्थिक मूल्यांचे प्रतिनिधित्व करतो त्याबद्दलची जबाबदारी. मी **हक्काराने** काम करीत असेन तर त्याचा अर्थ असा की प्रत्येक साथीने सर्वोच्च कार्यक्षमतेने काम करण्यावरच किबुट्झची आर्थिक सुस्थिती अवलंबून आहे याची मला जाणीव आहे; आणि शिवाय मला हीसुद्धा जाणीव आहे की किबुट्झचे राजकीय भवितव्य सुस्थिर राहणे, त्याला अधिक अनुयायी मिळणे, आणि संपूर्ण इस्रायली समाजाचे आपल्या ध्येयवादानुसार परिवर्तन घडवून आणण्याची क्षमता त्याच्यामध्ये येणे हे सर्व शेवटी इतर अनेक गोष्टींप्रमाणे किबुट्झच्या आर्थिक सुस्थिती-

वरही अवलंबून आहे. अर्थात्‌ येथे असे सुचवायचे नाही की सार्थाच्या जाणिवेत हकारा अखंड जागता असतो. खरे म्हणजे कोणतीच आत्मातीत प्रेरणा जाणिवेत अशी अखंडपणे वास करीत नाही. किंवा असेही सुचवायचे नाही की हकारा ही भावना प्रत्येक व्यक्तीत सारखीच प्रबळ असते. तरीसुद्धा हे खरेच की सर्वसाधारण सार्थीच्या आर्थिक वर्तणुकीमागे हकारा ही फार प्रभावी प्रेरणा आहे.[६] खरे म्हणजे ही संकल्पना वापरल्याशिवाय सार्थीच्या दैनंदिन आर्थिक वर्तणुकीचा उलगडाच होणार नाही. त्याच्या कामावर लक्ष ठेवायला कोणी पर्यवेक्षक, मुकादम किंवा देखरेखनीस नेमलेला नसतो; कामावर रुजू होताना किंवा काम संपविताना तो घड्याळ लावीत नाही आणि त्याचा वक्तशीरपणा किंवा कार्यक्षमता तपासायला कोणी नसते. तरीसुद्धा सकाळी साडेपाचला घंटा झाली की तो उठतो; आणि सहाला इतर कामगारांबरोबर तत्परतेने शेतावर जायला निघतो. एखाद्या ठिकाणी तो एकटाच काम करीत असेल किंवा सहकाऱ्यांच्या गटाबरोबर करीत असेल; पण काहीही असले तरी जेवणाची वेळ होईपर्यंत आपले काम सोडून तो हलणार नाही. साडेअकराला तो जेवणघराकडे परत येईल किंवा त्याची कामाची जागा जेवणघरापासून फार दूर असेल तर तो काम बंद करून शेतावरच जेवण घेईल. पुन्हा दुपारची वामकुक्षी झाल्यावर तो तत्परतेने कामावर रुजू होईल आणि साडेपाचला काम संपण्याची वेळ झाल्यानंतर आपल्या खोलीवर परतेल. हे करण्यासाठी कोणीही त्याच्यावर सक्ती करीत नाही किंवा जादा वेळ काम केल्याबद्दल त्याला दीडपट मजुरीही मिळत नाही. तरीसुद्धा काम अपुरे राहिले असेल तर तो कामाची वेळ संपल्यानंतरही काम करीत राहील. या सर्व गोष्टी करताना आपला स्वतःचा फायदा त्यात असतो म्हणून किंवा गट तशी अपेक्षा सभासदांकडून बाळगतो म्हणून तो त्या गोष्टी करतो असे नसून आपल्या हकाराच्या प्रेरणेने करतो.

म्हणून, लाभप्रेरणा नसणारा हा सर्वसाधारण सार्थी लाभप्रेरणेने काम करणाऱ्या कामगारापेक्षाही जास्त कळकळीने काम करतो असे म्हणणे बहुधा अतिशयोक्तीचे होणार नाही. हकाराने केलेले काम म्हणजे नुसते " काम " किंवा उपजीविकेचे साधन राहात नाही, ते त्याहून काही तरी अधिक असते. ते एक पवित्र कर्तव्य किंवा धार्मिक आदेशाप्रमाणे केलेले काम बनते आणि हे काम परमेश्वराला नव्हे तर आपल्या गटाच्या कल्याणाला समर्पित केलेले असते. एखादा खाजगी शेतकरी काम करतो तेव्हा त्यालाही काही जबाबदारीची जाणीव अर्थातच असते, पण किबुट्झमधल्या कामगाराला वाटणारी जबाबदारीची जाणीव वरील कारणामुळे वेगळी ठरते. खाजगी शेतकरी स्वतःसाठीच काम करतो आणि त्याच्या हातून काही चूक झाली तर तिचा परिणाम तोच भोगतो. उलट किबुट्झमध्ये एखाद्या व्यक्तीची चूक झाली तर तिचा परिणाम त्या व्यक्तीला तर भोगावा लागतोच पण सबंध गटालाही भोगावा लागतो.

---

६. त्याच्या जीवनातल्या इतर अंगांमध्येही हिचे महत्त्व आहे, पुढे पाहा, पृष्ठ ९८

त्यामुळे सगळ्या गटाच्या नुकसानीला कारणीभूत होण्याचा अपराध आपल्याकडून घडू नये म्हणून प्रत्येकजण फार काळजीपूर्वक वागतो. याचे एक उदाहरण देण्यासारखे आहे. एका सभासदाने फळझाडांवर चुकून भलत्याच रसायनाचा फवारा मारला; त्यामुळे झाडांचे संरक्षण होण्याऐवजी ती मरून गेली. आपली चूक सभासदाला कळून आली तेव्हा त्याला विलक्षण दुःख झाले. खरे म्हणजे कोणीही त्याला दोष दिला नाही कारण अशी चूक कोणाकडूनही सहजगत्या घडली असती. उलट बहुतेक सभासदांना त्याच्याविषयी सहानुभूतीच वाटत होती. तरीसुद्धा आपण आत्महत्त्या करणार असल्याचे तो एका सदस्येजवळ बोलला आणि आपल्या चुकीच्या परिणामांबद्दल चिटणिसाशी बोलताना त्याने गळफास लावून घेण्यासाठी एक दोर त्याच्याकडे मागितला.

सारांश, इतर समाजात आढळणाऱ्या भौतिक व मानसिक समाधानाच्या प्रेरणांबरोबरच सुरक्षितता आणि हक्कारा याही प्रेरणा किबुट्झमध्ये कार्यान्वित होतात.

## सत्ता व सामाजिक नियंत्रण

किर्यात येदिदिममध्ये औपचारिक सत्तेचे प्रकार थोडेच आहेत म्हणून त्याच्या सामाजिक नियंत्रणाचे गतिशास्त्र समजावून घ्यायचे तर या समाजाचे एक महत्त्वाचे मानसिक वैशिष्ट्य लक्षात घेणे आवश्यक आहे. केवळ जवळ राहतात एवढ्या एकाच गोष्टीमुळे पश्चिमेतील कोणत्याही सर्वसामान्य खेडेगावातील रहिवाश्यांत एकात्म्य उत्पन्न झालेले असते तसे किर्यात येदिदिममध्ये नाही. लोकसमाज जसा रक्तसंबंधाने बांधलेला असतो तसेही सार्थीचे नाही. तरीसुद्धा किबुट्झ हा एक प्राथमिक समाज ( Gemeinschaft ) आहे आणि ह्याचे कारण तो आकाराने लहान आहे व त्यामुळे सभासदांतील परस्परसंबंध वारंवार घडून येतात व घनिष्ठ होतात एवढेच नव्हे. तो प्राथमिक समाज आहे ह्याचे खरे कारण तो *जणू काही* नातेसंबंधाने एकत्र आलेल्यांसारखा किंवा *जणू काही* एकवंशीय, किंवा एका मोठ्या संयुक्त कुटुंबासारखा असावा तसा चालतो. किबुट्झ हा समान निवासस्थान, समान अनुभव, समान भूतकाळ, समान भवितव्य, आणि परस्परसाहाय्य इत्यादि कुटुंबाला एकत्र ठेवणाऱ्या सर्व पाशांनी बांधलेला आहे; शिवाय सभासद समान ध्येयाने प्रेरित झालेले आहेत. त्यामुळे सभासदांचे मानसिक दृष्टीने एक कुटुंबच बनलेले आहे असे त्यांना स्वतःला तर वाटतेच पण बाहेरच्या निरीक्षकाच्या नजरेलाही तसे दिसते.[५] श्टेटलप्रमाणे किबुट्झ हेही " एका

---

५. किबुट्झची ही कुटुंबसदृश बाजू जीवशास्त्रीय पातळीवरही दृष्टोत्पत्तीस येते. किर्यात येदिदिममध्ये जन्मलेल्या आणि वाढलेल्या मुलांनी आपले वैवाहिक जोडीदार निरपवादपणे किबुट्झच्या बाहेरून निवडलेले आहेत. अंतर्विवाह हे कुटुंबगत समागमासारखे आहेत, हे साऱ्यांचे मन लक्षात घेतले तर या स्वेच्छेने स्वीकारलेल्या बहिर्विवाह पद्धतीचे स्पष्टीकरण होईल.

मोठ्या समाजातील लहान तुकडा असलेल्या कुटुंबाप्रमाणे दिसण्याऐवजी एका कुटुंबाचाच मोठा विस्तार बनल्यासारखे दिसते."[८]

सभासदांची एकमेकांसंबंधीची भावना मानसिक आप्तपणाची असल्याने गटविषयक विधिनिषेध त्यांच्याकडून सहजपणे पाळले जातात आणि किर्यात येदिदिममधील विधिनिषेध फारच कडक आहेत हे ध्यानात ठेवले पाहिजे. कोणत्याही कुटुंबातील व्यक्तीप्रमाणे साथीसुद्धा असे गृहीत धरून चालतात की जो आजारी असेल त्याची जास्तीत जास्त काळजी घेतली जाईल; प्रत्येकाने समूहाच्या आर्थिक कल्याणासाठी काय केले आहे यापेक्षा त्याला कशाची जरूर आहे यावरून त्याची मिळकत ठरेल; वरिष्ठ आर्थिक स्थानावर असलेल्या माणसाला अधिक चांगले अन्न, चांगले कपडे वा चांगली जागा मिळेल असे नाही. म्हणून किबुट्झमधील सत्तेची आणि सामाजिक नियंत्रणाची चर्चा या सामाजिक-मानसिक संदर्भात केली आहे.

किर्यात येदिदिममधील सर्वोच्च सत्ता ग्रामसभेकडे असते आणि या सभेत किबुट्झचा प्रत्येक सभासद समाविष्ट असतो. किबुट्झच्या अंतर्गत व्यवहाराबाबतची अंतिम सत्ता ग्रामसभेकडे असल्याने ही सभा आपल्या अधिकारांविषयी अतिशय दक्ष असते. सत्तेबद्दलचा गैरविश्वास हे युवक चळवळीच्या काळाचे वैशिष्ट्य अजूनही साथींनी बऱ्हंशी जागते ठेवलेले आहे आणि आपले अधिकार इतर कोणाकडे संक्रमित करण्यास ते नाखूष असतात. फार महत्त्वाचे बहुतेक निर्णय आणि कधीकधी कमी महत्त्वाचे निर्णयही ग्रामसभेत घेतले जातात. वार्षिक अंदाजपत्रक, नवीन बांधकामाचे कार्यक्रम, एखाद्या शेतीशाखेचा विस्तार, अधिकाऱ्यांची व समित्यांची निवडणूक या सर्व गोष्टी ग्रामसभेत चर्चिल्या जातात. एखाद्या राजकीय प्रश्नावर कोणती भूमिका घ्यायची, एखाद्या राजकीय मोहिमेत किती प्रमाणात सक्रिय भाग घ्यायचा, एका अमेरिकन मानववंशशास्त्रज्ञाला संशोधनकार्यासाठी किबुट्झमध्ये परवानगी द्यायची की नाही, मुलांच्या बौद्धिक पातळीचा प्रश्न कसा सोडवायचा, स्वयंपाकघरातील सोयींसंबंधीच्या स्त्रियांच्या तक्रारींबद्दल काय करायचे, हे आणि इतर असंख्य लहानमोठे प्रश्न ग्रामसभेच्या कक्षेत येतात.

ग्रामसभेच्या बैठका नियमितपणे आठवड्यातून दोनदा होतात. इतक्या वेळा या बैठका होण्याची निदान तीन कारणे आहेत. साथींचा नोकरशाहीला विरोध असल्यामुळे प्रशासकाकडे निर्णयाचा अधिकार सोपविण्यास ते नाखूष असतात आणि "शुद्ध लोकशाही" समाज असे आपले स्वरूप कायम टिकवून धरण्याची त्यांची इच्छा असल्यामुळे इतर समाजात जे प्रश्न प्रशासकीय अधिकाऱ्यांकडे सोपविण्यात आले असते किंवा जे कायदेमंडळाच्या अधिकारक्षेत्रात आले असते त्यांची जबाबदारी सबंध समाजाला घ्यावी लागते. दुसरे म्हणजे पुष्कळशा बाबतीत किबुट्झ हे एखाद्या

८. Joffe. पृ. २३१.

संयुक्त कुटुंबासारखे असल्यामुळे बहुतेक समाजातून जे बरेचसे निर्णय कुटुंबीयांकडून घेतले जातात, ते किर्यात येदिदिमध्ये ग्रामसभेकडून घेतले जातात. एखाद्या विशिष्ट विद्यार्थ्याला शिक्षणासाठी शहरात पाठवावे की नाही? मनःक्षोभ झालेले एखादे मूल मानसोपचारतज्ज्ञाला दाखवावे का? हे आणि असे "कौटुंबिक" प्रश्न सबंध समाजाने सोडवायचे असतात. शेवटी किबुत्झ हा एक धार्मिक-राजकीय असा समाज असल्यामुळे इतर समाजांत समूहाने ज्यावर चर्चा होत नाही असे अनेक प्रश्न किबुत्झच्या ग्रामसभेच्या कार्यक्रमपत्रिकेवर अनेक वेळा आढळून येतात. समूहामधील स्त्रियांचा प्रश्न, तरुण मंडळींचा समसमूहजीवनात सहभाग, किबुट्झच्या अस्तित्वाच्या दृष्टीने एखाद्या नुकत्याच घडलेल्या राजकीय घटनेचा अर्थ, इस्रायलच्या राष्ट्रीय जीवनात अरबांचे योग्य ते स्थान—हे सर्व ग्रामसभेचे विषय बनतात.

या सर्व बैठकांच्या पाठीमागे, योग्य—म्हणजे न्याय्य आणि कार्यदृष्ट्या उपयुक्त या अर्थाने योग्य—असे निर्णय हे सर्वांगीण चर्चा केल्याशिवाय घेता येत नाहीत असा पूर्ण विश्वास असतो. या चर्चा पुष्कळदा गरमागरम आणि दीर्घ होतात, आणि अनेक बैठका कधी कधी मध्यरात्रीपर्यंत चालतात आणि औपचारिकपणे सभा तहकूब झाली तरी जेवणघरात ती चर्चा अनौपचारिकपणे सभासदांमध्ये चालूच राहते.

अनौपचारिक चर्चा औपचारिक चर्चाइतक्याच महत्त्वाच्या असतात आणि तितक्याच त्वेषाने आणि अधिक वारंवार केल्या जातात. शेतात, जेवणघरात, स्नानगृहात, सगळीकडे अखंड चर्चा चालू असतात. एखादे ताजे पुस्तक, अमेरिकन राजकारण, इस्रायली संसदेमधले नवे विधेयक, किबुट्झ सोडून जाण्याची एखाद्या जोडप्याची इच्छा, प्रदर्शनातील एखादी कलाकृती, चांगले पीक येण्याची शक्यता, नव्या ट्रॅक्टरचे फायदे, अस्तित्ववादावरचे अलीकडेच झालेले नवे व्याख्यान—हे आणि असले दुसरे अगणित विषय अविरत चर्चिले जातात. ग्रामसभेच्या बैठकीच्या खूप अगोदरपासूनच कोणते मुद्दे उपस्थित करायचे याबद्दल बहुतेकजण तयारी करून ठेवतात; या अनौपचारिक चर्चांच्या आधारावरच प्रत्येकाच्या भूमिका ठरतात, त्या त्या बाजूंचे पक्षपाती आपापल्या युक्तिवादांसह सिद्ध असतात आणि बैठका संपल्यानंतर किती तरी वेळ चर्चा त्याच हिरीरीने चालू राहतात.

किर्यात येदिदिममध्ये चर्चेला जे महत्त्व दिले जाते त्याला एक ऐतिहासिक परंपरा आहे. श्टेटलची संस्कृती वर्णन करणाऱ्या एका पुस्तकाच्या लेखकद्वयाने असे लिहिले आहे की कुटुंब व समाज या दोन्हीं मधला प्रत्येक प्रश्न... "दीर्घकाल चर्चिला जातो, प्रत्येक प्रश्नाचा शक्य तितक्या बाजूंनी विचार केला जातो... सतत चर्चा केल्याशिवाय जीवन कंटाळवाणे होईल आणि सतत मतभेदच झाले नाहीत तर चर्चा तरी कशी होणार?"[१]

---

१. Zborowski & Herzog. पृष्ठ ३०१

श्टेटल संस्कृतीची ही आणखी एक बाजू तिच्या वारसांनी किबुट्झमध्ये चालू ठेवली आहे हे स्पष्टच दिसते; कारण वरील उतारा किर्यात-येदिदिममधील परिस्थितीला अचूकपणे लागू पडतो.

किबुट्झचा जसजसा विस्तार होऊ लागला तसतसे एकट्या ग्रामसभेच्या आधारावर कारभार चालणे अशक्य झाले आणि " हुद्दे " व समित्या इत्यादि प्रपंच असलेले असे औपचारिक नेतृत्व व सत्ता यांची स्थापना करणे भाग पडले. मात्र ही औपचारिक नेतृत्वाची प्रथा सुरू करणे भाग आहे हे ध्यानात आल्यावर कोणत्याही एका व्यक्तीच्या हातात अतिरिक्त सत्ता केंद्रित होऊ नये याकरिता काही वर्षांच्या मुदतीचे बंधन घालण्यात आले. पाळीची पद्धत आणि कामापासून मिळणाऱ्या मोबदल्यावर नियंत्रण यामुळे कुणालाही ठराविक मुदतीपलीकडे कामावर राहणे शक्य नसते किंवा कुणाला तसे राहण्याची इच्छाही होण्यासारखी नसते.

ह्याच प्रकरणातील " अर्थव्यवस्था " ह्या विभागात बऱ्याच समित्या आणि हुद्दे यांची अगोदरच चर्चा झालेली असल्याने ह्या विभागात फक्त इतर समित्यांची व हुद्द्यांची माहिती देणे पुरेसे होईल.

सर्वसाधारण सचिव ( **माझकिर** ) हा किबुट्झचा हरकाम्या असतो; तो ग्राम-सभेची कार्यक्रमपत्रिका तयार करतो आणि तिचा अध्यक्ष असतो; सर्व अधिकृत पत्रव्यवहार त्याच्या अखत्यारीत असतो; किबुट्झ आणि संघ यांच्यामधला तो संपर्का-धिकारी असतो; आणि सामान्यतः किबुट्झच्या आर्थिक व्यवहारात अर्थखात्याच्या सर्वसाधारण व्यवस्थापकाची जी भूमिका असते तशीच भूमिका सामाजिक व्यवहारात या सचिवाची असते. त्याला हे काम खूप पुरत असल्यामुळे नेमून दिलेल्या कामातील त्याच्यावरील निदान अर्ध्या कामाचा भार कमी केलेला असतो.

किबुट्झच्या सामाजिक जीवनाची देखरेख करण्यासाठी सचिवाच्या मदतीला बऱ्याच समित्या निवडून दिलेल्या असतात.

( १ ) **सचिवालय :** किबुट्झमधली अर्थ-व्यवस्थेशी संबंधित अशी कामे वगळून इतर सगळी कामे या समितीकडे सोपवलेली असतात. ही समिती सहा सदस्यांची असते व तिच्यात सर्वसाधारण अर्थव्यवस्थापक, कामाचे वाटप करणारे दोन अध्यक्ष, सर्वसाधारण सचिव, आणि आणखी दोन निवडलेले सदस्य यांचा समावेश होतो.

( २ ) **नेमणूक समिती :** आगामी वर्षासाठी अधिकारी व समित्यांचे सदस्य यांची नेमणूक ही समिती करते त्यामुळे ती अल्पकाळच अस्तित्वात असते. नेमणूक करणे म्हणजे शुद्ध लोकशाहीपासून विचलित होणे असे काही सभासदांना वाटते आणि म्हणून तिच्या अस्तित्वालाच त्यांचा विरोध आहे.

( ३ ) **शिक्षण समिती :** मुलांच्या अर्भकावस्थेपासून ती प्रशाळेत प्रवेश करीपर्यंतच्या काळातले त्यांचे शिक्षण व सामाजिकीकरण या बाबतच्या सर्व गोष्टी या समितीकडे असतात. या समितीचे निम्मे सभासद शिक्षक व निम्मे इतर असतात.

( ४ ) **प्रशाळा समिती :** प्रशाळा व तिचे कार्यक्रम यासंबंधी सर्व कामकाज या शिक्षण समितीकडून होते.

( ५ ) **सांस्कृतिक समिती :** किबुट्झमधल्या सगळ्या सांस्कृतिक कार्यक्रमांची जबाबदारी या समितीवर असते. व्याख्याने व जलसे आयोजित करणे, सणसमारंभ ठरविणे, निरनिराळ्या विषयांवरचे अभ्यासवर्ग चालू करणे, आणि ग्रंथालय व वाचनालय यांची देखरेख करणे हे या समितीचे काम असते.

( ६ ) **कल्याण समिती :** सभासदांचे खाजगी आणि आपआपसातले प्रश्न सोडविणे हे या समितीचे काम असते. घरे आणि फर्निचर यांचा पुरवठा व वाटप, वार्षिक सुट्टीच्या योजना, वार्षिक सुट्टीच्या भत्त्याचे वाटप, आरोग्य व आजार या संबंधीचे प्रश्न, आणि परदेशात असलेल्या नातेवाइकांना मदत हे सर्व प्रश्नही ह्या समितीच्या कक्षेत येतात.

( ७ ) **सुरक्षा समिती :** शत्रूचा हल्ला झाला तर संरक्षणाची तयारी ठेवण्याची सर्व जबाबदारी या समितीवर असते.

( ८ ) **परिसर शोभा समिती :** या समितीचे सदस्य किबुट्झच्या सर्वच परिसराचे सौंदर्य वाढविण्याचा कार्यक्रम ठरवितात.

ह्या निरनिराळ्या समित्या आणि आधी वर्णन केलेल्या इतर समित्या म्हणजे एका महत्त्वाच्या अर्थाने समाजाचे आधारस्तंभच आहेत असे म्हणता येईल कारण किबुट्झ-जीवनाचे प्रत्येक अंग कोणत्या ना कोणत्या तरी समितीच्या हवाली केलेले आहे. एखाद्या समितीने आपले काम एखाद्या वर्षात नीटपणे केले नाही तर तिच्या जबाबदारीखालची शाखा दुर्लक्षित राहते आणि त्यामुळे झालेले नुकसान कधीकधी दीर्घ-काळपर्यंत भरून येत नाही.

विशेष जबाबदारीच्या जागांवर फारच थोडेलोक काम करीत असले तरी समित्या, अधिकारी आणि मुकादम यांच्या वर केलेल्या संक्षिप्त वर्णनावरून हे ध्यानात येईल की शेवटी प्रत्येक सदस्याला कोणत्या ना कोणत्या समितीवरच्या अधिकाराच्या जागेवर काम करावे लागेल. साठ ते सत्तर जागा प्रतिवर्षी नेमणूक समितीला भरायच्या असतात. शाखेच्या मुकादमांसारख्या आणखी वीस जागा यात मिळविल्या म्हणजे ध्यानात येईल की किबुट्झच्या जवळजवळ प्रत्येक सभासदाला कोणत्या ना कोणत्या तरी जागेवर काम करावे लागते. जबाबदारीच्या व अधिकाराच्या जागा स्वीकारण्यासाठी लोकांना प्रवृत्त करणे ही किबुट्झच्या समोर असलेली एक प्रमुख

समस्या आहे. काही जागा, उदाहरणार्थ स्वयंपाकघराची देखभाल, या इतक्या कटकटीच्या असतात की त्या टाळण्याकडे लोकांचा कल का असावा ते समजण्यासारखे आहे. पण जबाबदारीच्या इतर जागांबाबतही ही प्रवृत्ती का असावी हे प्रथमदर्शनी कळणे कठीण आहे.

यात खरी गोष्ट अशी की जबाबदारीच्या मानाने या जागांपासून लाभ नसतो. आर्थिक फायदा तर नसतोच; औपचारिक मानमरातबाचा भागही कमी; आणि या हुद्द्यांमुळे फार मोठी सत्ता लाभते असेही नाही. शिवाय, यातली पुष्कळशी कामे फार वेळखाऊ असतात आणि बऱ्याच वेळा या जागांवर काम करणाऱ्या माणसांना दुसऱ्या जबाबदाऱ्यांतून मोकळे केलेले नसते—त्यामुळे अगोदरच संबंध दिवसाचे नेमलेले काम करून झाल्यावर संध्याकाळी हे काम करावे लागते. याचा अर्थ ते नुसते दमलेले असतात एवढाच नव्हे तर त्यांना आपल्या कुटुंबीयांबरोबर घालवायला वेळ नसतो. ही सर्वसाधारण सभासदाच्या दृष्टीने मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. म्हणून, शहरात एखाद्या हुद्द्याच्या जागेसाठी उभा राहणारा उमेदवार लोकांनी आपल्याला मत द्यावे म्हणून त्यांच्यामागे धावत असतो, तर किबुट्झमधला "उमेदवार" आपल्या सहकाऱ्यांनी आपल्याला मत देऊ नये म्हणून त्यांच्यापासून लांब पळत सुटतो असे किबुट्झमधल्या एका व्यंगचित्रात दाखविले आहे.

तरीसुद्धा, लोक अधिकाराच्या जागेसाठी उभे राहतात आणि जबाबदारीच्या जागाही पत्करतात, त्यामुळे त्यांची नाखुषी खरीखुरीच असते की काय असाही कधीकधी प्रश्न पडतो. अधिकाराच्या जागेला नकार देण्यात थोडासा देखाव्याचाही भाग असतो असे दिसते. अधिकाराच्या जागेचा तिरस्कार करणारा सभासद हा किबुट्झच्या लोकसंस्कृतीचा एक भाग बनला आहे आणि त्याच्या आत्मप्रतिमेचे ते एक आवश्यक अंग बनले आहे. नेमणूक समितीने विचारल्याबरोबर लगेच उमेदवारीला कबूल होणारा सभासद हा किबुट्झच्या दृष्टीने संशयास्पदच ठरणार. कुणाचेही पहिले उत्तर नेहमीच "मला ते नको आहे" असे असते; आणि प्रत्येकाने हेच उत्तर द्यावे असे अपेक्षित असते. तरीसुद्धा हे खरेच की समितीवरच्या आणि इतर लहान कार्यकारी जागा स्वीकारण्याबाबतची नाखुषी बहुधा खरीखुरी असते आणि हा एक महत्त्वाचा सामाजिक प्रश्न बनला आहे.

कोणाही व्यक्तीकडे किंवा व्यक्तींच्या गटाकडे शिक्षा करण्याचा अधिकार नसतो. ग्रामसभेकडे सर्व सत्ता दिलेली असते आणि पोलीस, न्यायाधीश किंवा न्यायालये या समाजात नसतानासुद्धा किबुट्झचे नियम निरपवादपणे पाळले जातात. थोडक्यात, कमीत कमी सत्ता वापरून किर्यात येदिदिममध्ये सामाजिक नियंत्रण प्रस्थापित केले गेले आहे. म्हणून, किर्यात येदिदिमच्या सामाजिक नियंत्रणाच्या गतिक्रियेचे थोडेसे वर्णन केले पाहिजे.

किर्यात येदिदिममधल्या सामाजिक नियंत्रणाचा सर्वात महत्त्वाचा प्रकार म्हणजे प्रत्येक व्यक्तीचे स्वयंशासन आणि त्याला कारण त्याचा " हक्कारा ". ह्या आत्मातील प्रेरणेचे दुसऱ्या संदर्भात[10] आर्थिक वर्तणुकीमागची प्रेरणा म्हणून वर्णन केलेले आहे. त्यामुळे त्याची येथे पुनरावृत्ती करण्याचे कारण नाही. एवढेच लक्षात आणून दिले पाहिजे की किबुट्झजीवन पत्करणाऱ्या माणसाने ते स्वेच्छेने पत्करलेले असते कारण किबुट्झमधले जीवन हे किबुट्झबाह्य " जगातील " जीवनापेक्षा श्रेष्ठ आहे असा त्याचा विश्वास असतो. बाहेरच्या संस्कृतीपेक्षा किबुट्झ संस्कृती श्रेष्ठ असल्याचा विश्वास असल्यामुळेच त्याने किबुट्झजीवनाचा स्वीकार केलेला असतो आणि असे असूनही त्याने नियमभंग केला तर आपल्या मूळ प्रेरणेशीच त्याने इमान राखले नाही असा अर्थ होईल.

ज्यांच्या बाबतीत हे मूळ उद्देश पुरेसे बंधनकारक ठरत नाहीत त्यांच्यासाठी औपचारिक व अनौपचारिक अशा दोन्ही प्रकारचे सार्वजनिक स्वरूपाचे सामाजिक नियंत्रण असते. कोणत्याही प्राथमिक समाजामध्ये सामाजिक नियंत्रणाचे सर्वात प्रभावी असणारे अनौपचारिक तंत्र म्हणजे लोकमत. किबुट्झमध्ये तर लोकमत अधिक महत्त्वाचे असते कारण त्यात एकांताचा जवळ जवळ संपूर्णपणे अभाव आढळतो. सामूहिक राहणी ही मुळातच अशी गोष्ट आहे की तीत एकांत फार दुर्मिळ होऊन बसतो. दिवसभरात केव्हाही एकटे असण्याची संधी मिळणेच दुरापास्त असते कारण प्रत्येकजण काम करतो तो गटाबरोबर, जेवतो तो सामूहिक जेवणघरात, स्नान करतो तो सार्वजनिक स्नानगृहात—इत्यादी. आपल्या खोलीतही एकांत लाभणे मुष्कील असते—उन्हाळ्याच्या दिवसांत खिडक्या उघड्या असतात, आणि खोलीबाहेरच्या आवाजांचा त्रास कुणालाही चुकत नाही. उन्हाळ्याच्या दिवसात मुले हिरवळीवर खेळतात पण हिवाळ्यात त्यांना घरात खेळावे लागते व त्यामुळे एकांत अशक्य ठरतो. मुले आपल्या झोपायच्या ठिकाणी परत गेल्यावरसुद्धा एकांत मिळणे कठीण असते कारण खोली एक व त्यात आपली बायको ( किंवा नवरा ) सतत असणारच.

दिवसापेक्षा संध्याकाळी जास्त एकांत लाभतो असेही म्हणता येत नाही. सर्वसाधारण सभासद बहुधा रोज संध्याकाळी कोणत्या तरी गटाच्या कार्यक्रमात सहभागी होतो. किबुट्झची कार्यक्रमपत्रिका मोठी भरगच्च असते आणि तीत सण, उत्सव, समित्यांच्या बैठका, शिक्षणवर्ग, व्याख्याने, चित्रपट आणि आठवड्यातून दोनदा होणाऱ्या ग्रामसभेच्या बैठका अशा कितीतरी गोष्टी असतात. " आमचं जीवन काठोकाठ भरलेलं असतं " असे साथी म्हणतात, आणि हे म्हणत असताना त्यांच्या स्वरात अभिमान असतो आणि तक्रारही असते. फावल्या वेळात इंग्रजीचा अभ्यास करणाऱ्या एका स्त्री-सभासदाची आपल्याला आठवड्यातून अवघी एक संध्याकाळ

---

१०. वर पृष्ठे ७०–७१ पाहा.

अभ्यासाला मिळते अशी तक्रार असायची यात नवल नाही. म्हणून, किबुट्झची सामूहिक राहणी आणि त्यातील कार्यक्रमांची खेचाखेच यामुळे माणसांचे वारंवार एकमेकांशी संबंध येतात आणि त्यामुळे प्रत्येकजण सतत इतरांच्या नजरेसमोर असतो.

शिवाय, लहान समाजात संज्ञापन लवकर होते त्यामुळे कोणतीही गोष्ट फार काळ लपून राहात नाही. कोणत्याही लहान समाजातल्याप्रमाणे किबुट्झमध्येही सर्वांच्या हालचाली एकमेकांना समजतात. तीच ती संभाषणे पुनः पुनः होतात, त्यामुळे गुप्तता केवळ अशक्यप्राय असते. दुसरे असे की, काही अपवाद वगळल्यास सभासद परस्पर संबंधात कमालीचे सरळ व स्पष्टवक्ते असतात. गुप्तता राखण्याचे प्रयत्न निष्फळ ठरत असल्यामुळे आपले विचार लपविण्याचा प्रयत्न जसा ते करीत नाहीत तशी आपल्या सहकाऱ्यांबद्दलची आपली मतेही ते लपवून ठेवीत नाहीत. एकमेकांशी उडवाउडवी न करता किंवा आडवळणाने न बोलता सभासदांनी एकमेकांशी मोकळेपणाने वागावे अशी अपेक्षा केली जाते. जो सभासद असा मोकळेपणाने वागत नाही त्याच्यावर कुणी विश्वास ठेवत नाही. उदाहरणार्थ एका सभासदाला त्याच्या काही विशेष नैपुण्यामुळे किबुट्झमध्ये मोठी जबाबदारीची जागा दिलेली आहे. पण बहुतेक सभासदांना तो अप्रिय आहे कारण तो 'धाशार' म्हणजे स्पष्टवक्ता नाही. एखाद्या सभासदाने गटाचे नियम मोडले तर ते लगेच सर्वांना कळून येईल इतकेच नव्हे तर त्याच्या वागणुकीवर उघड उघड टीका होईल. अशा प्रकारची लोकनिंदा अनौपचारिक असली तरीसुद्धा लहानशा समाजात फार प्रभावी ठरते आणि व्यक्तीचे किबुट्झमधील जीवन असह्य करून टाकते. त्यामुळे एका सभासदाचे पुढील उद्गार स्वाभाविकच वाटतील:

येथे प्रत्येकाला लोक काय म्हणतील याचा विचार करावा लागतो; त्यापासून सुटका नाही. किबुट्झमधल्या प्रत्येकाला दुसऱ्याची माहिती असते. कधीकधी हे नकोसे होते.

पण लोकमत अनौपचारिक त्याचप्रमाणे अर्धौपचारिक व औपचारिक रीतीनेही व्यक्त होतो. ह्या अभ्यासाच्या काळात ज्या दोन अर्धौपचारिक तंत्रांचा अवलंब करण्यात आला त्यांच्याबद्दल येथे सांगावयाचे आहे; एकाचा संबंध एका कमी महत्त्वाच्या प्रश्नाशी होता. तर दुसऱ्याचा त्या मानाने दोन गंभीर प्रश्नांशी संबंध होता. डेअरीच्या शाखेत काम करण्यास सभासदांची नाराजी हा किबुट्झपुढचा नेहमी सतावणारा प्रश्न असतो. काही तरुण मुलांना हे काम करण्याबद्दल आग्रह करण्याचे प्रयत्न झाले पण ते निष्फळ ठरले. मात्र, या तरुणांना त्यांच्या नकाराबद्दल चार लोकांत केव्हाही दोष देण्यात आला नाही. किबुट्झपुढचा आणखी एक गंभीर प्रश्न म्हणजे खाजगी मालमत्तेची हळूहळू पण सातत्याने होणारी वाढ. एका जोडप्याने एक लहानसा रेफ्रिजरेटर मिळविला तेव्हा खाजगी टीका खूप झाली पण त्यावर अधिकृत प्रतिक्रिया मात्र काही झाली नाही. ही प्रवृत्ती किबुट्झला फार

काळजीची वाटते तरी अद्याप कोणतीही अधिकृत यंत्रणा तिच्याशी मुकाबला करायला तयार केलेली नाही. मात्र, हे दोन्ही प्रश्न पुरिम आणि सुकॉत या दोन सणांच्या प्रसंगी सादर करण्यात आलेल्या दोन प्रहसनांमध्ये प्रामुख्याने उल्लेखिले गेले. पुरिमच्या प्रहसनात, जी मुले डेअरी कामाला राजी नव्हती त्यांच्यावर निनावी परंतु सहज लक्षात येईल अशा प्रकारचा एक विनोदी प्रवेश होता. आणि सकॉट प्रहसनात "रेफ्रिजरेटर"चा उल्लेख प्रामुख्याने होता. ज्या जोडप्याच्या मालकीचा रेफ्रिजरेटर होता त्याची प्रतिक्रिया काय झाली हे प्रस्तुत लेखकाला ठाऊक नाही पण "डेअरी" प्रहसनाबद्दल मात्र तात्काळ प्रतिक्रिया झाली. दुसऱ्या दिवशी लेखक त्यातल्या एका मुलाबरोबर शेतावर काम करीत होता तेव्हा त्याने आपणहून त्या प्रहसनाचा उल्लेख केला व आपल्यावर त्याचा फारच परिणाम झाल्याचे कबूल केले.

इतका गंभीर नसला तरी तातडीने लक्ष द्यायला हवा असा दुसरा प्रश्न एका वेगळ्याच पद्धतीने सोडविण्यात आला. किर्यात येदिदिममध्ये "पासोव्हर"चा सण दर वर्षी सार्वजनिक सेडर म्हणून साजरा करतात, आणि त्याला किबुट्झच्या बाहेरचे मित्र, नातेवाईक यांना आमंत्रण असते. या समारंभात किबुट्झचा गायकसंघ प्रामुख्याने भाग घेतो, परंतु त्या वर्षी तालमीला नियमित हजर राहण्याची दक्षता त्याने घेतली नव्हती त्यामुळे पासोव्हरच्या दिवसापर्यंत त्यांची तयारी होणार नाही अशी दाट शक्यता दिसत होती. उत्सवाच्या आधी तीन दिवस वार्ताफलकावर उत्सव समितीच्या सहीची एक नोटीस लावण्यात आली. त्यात असे म्हटले होते की "पासोव्हरला फक्त तीन दिवस बाकी आहेत पण अद्याप संघगायनाचा कार्यक्रम तयार नाही. सभासद तालमीला येत नसल्यामुळे ह्या तीन रात्री गायकसंघ जमला नाही तर समारंभ रद्द करण्याची शिफारस समितीकडून सचिवालयाला केली जाईल". ह्या निवेदनाखाली गायकसंघाच्या सभासदांची व ते कोणकोणत्या विभागात गाणार त्याची यादी होती. या नोटिशीचा इच्छित परिणाम झाला. प्रत्येक रात्री तालमीला सर्वच्या सर्व हजर राहिले आणि सेडरच्या संघगायनाचा कार्यक्रम ठरल्याप्रमाणे पार पडला.

अनौपचारिक किंवा अर्धौपचारिक मार्गांनी आणण्यात येणारे जनमताचे दडपण प्रभावी ठरत नाही तेव्हा किबुट्झला अधिक औपचारिक पद्धतींचा अवलंब करावा लागतो. किबुट्झचा अधिकृत निर्णय अमान्य करणे किंवा त्याच्या एखाद्या नीति-नियमाचे उल्लंघन करणे अशा तऱ्हेचा शिस्तभंग होतो तेव्हा या पद्धतींचा वापर केला जातो. पहिली पद्धत म्हणजे संबंधित व्यक्तीची कर्तव्यच्युती ग्रामसभेच्या बैठकीत किबुट्झच्या अधिकृत नजरेला आणणे. ही फार प्रभावी शिक्षा आहे, आणि ज्या समाजात जनमताबद्दल लोक इतके संवेदनाशील असतात त्या समाजात अशी शिक्षा होण्याची नुसती धमकी देखील बहुधा पुरेशी ठरते. उदाहरणार्थ एका तरुणाला राष्ट्रीय युवक चळवळीचे पुढारीपण स्वीकारायला संघाने सांगितले असता त्याने त्या विनंतीचा

अव्हेर केला. सचिवालयाकडून त्याला कळविण्यात आले की हे प्रकरण ग्रामसभेपुढे ठेवण्यात येईल. त्याबरोबर त्याने ते आमंत्रण स्वीकारण्यास कबुली दिली.

उलटपक्षी, ग्रामसभेपुढे प्रकरण नेण्याची नुसती धमकी माणसाला आपली वर्तणूक बदलायला लावण्यास पुरेशी नसेल तर ती प्रत्यक्षात आणणे भाग पडते. डेअरीत काम करणाऱ्या एका स्त्रीची स्वयंपाकघरातल्या कामगारांमध्ये कार्यसमिती-कडून नेमणूक झाली, कारण फिरतीच्या पद्धतीप्रमाणे तिची पाळी आली होती. तिने काम नाकारले आणि ते प्रकरण ग्रामसभेपुढे आले. सबंध सभा या प्रश्नासाठीच बोलावण्यात आली होती, पण काही निर्णय होण्यापूर्वीच दुसरे आणि अधिक निकडीचे प्रश्न कार्यक्रमपत्रिकेवर आले आणि पुढच्या सभांमध्येही त्या दुसऱ्या विषयां-बाबीच चर्चा चालू राहिली. शेवटी काय निष्पन्न झाले हे लेखकाला ठाऊक नाही. दुसऱ्या एका प्रकरणात, किबुट्झ "भांडारा"शी संबंधित असणाऱ्या एका माणसावर त्यातले काही सामान स्वतःच्या खाजगी उपयोगासाठी वापरल्याचा आरोप दुसऱ्या एकाने केला. या आरोपामुळे तप्त वातावरणात चर्चा झाली आणि त्याची चौकशी करण्यासाठी सचिवालयाने एक समिती नेमली. चौकशीचे काम संपल्यावर समितीने आरोपी निर्दोषी असल्याचा अहवाल सादर केला. मात्र, त्याच्या वागणुकीत काही अनियमितपणा चौकशी समितीला आढळून आला. पुरावा ऐकण्यासाठी बोलावलेली ग्रामसभेची बैठक मोठी वादळी झाली, आणि पहाटे दोन वाजेपर्यंत संपली नाही. अखेर आरोपी निर्दोषी सुटला.

किर्यात येदिदिमच्या हातात असलेली अंतिम शिक्षा म्हणजे हकालपट्टी. एखाद्या सभासदाला ग्रामसभेपुढे आणले व तो गुन्हेगार आहे असे आढळले, किंवा एखादा सभासद किबुट्झच्या निर्णयाप्रमाणे वागायचे नाकारतो आहे असे दिसले तर त्याला काढून टाकण्याचा निर्णय सभा घेते. आम्ही किर्यात येदिदिमला येण्याच्या काही काळ अगोदर एका माणसावर चोरी केल्याचा आरोप होता, तो अपराधी आहे असे ग्रामसभेच्या बैठकीत आढळून आले होते आणि त्याला किबुट्झमधून काढून टाकले होते. अर्थात्, त्याच्या कुटुंबाला काढून टाकलेले नव्हते आणि कुटुंबीयांनी किबुट्झमध्ये राहायचे ठरविले होते.[११]

---

११. सुमारे सहा महिन्यांनंतर या माणसाने आपल्याला किबुट्झ म्हणजेच आपले घर वाटते, दुसऱ्या कुठेही आपण सुखाने राहू शकणार नाही आणि परत येण्याचा आपला विचार आहे असे किबुट्झला लिहून कळविले. तो परत आला, आणि त्याला सोडून जायला लावावे असा प्रयत्न झाला नाही कारण त्याच्या विरुद्धचा पुरावा निर्णायक नव्हता. प्रस्तुत लेखकाच्या माहितीप्रमाणे किबुट्झ सभासदाकडून घडलेला हा चोरीचा एकमेव प्रसंग आहे. "पौर्वात्य" तरुणांचा गट येईपर्यंत गावातल्या दारांना कधीही कुलपे लावलेली नसत कारण चोरी हा प्रकारच अज्ञात होता.

लेखकाच्या किबुट्झमधल्या वास्तव्यात एका जोडप्याला रजा पाहिजे होती आणि ग्रामसभेने ती देण्याचे नाकारले. मंजूर होवो अगर न होवो आपण रजा घेणार असे जोडप्याने जाहीर केले. हे आव्हान जाणूनबुजून दिलेले असल्यामुळे त्याच्याकडे दुर्लक्ष करणे शक्य नव्हते, म्हणून त्या जोडप्याला हकालपट्टीची धमकी देण्यात आली. जोडप्याने आपला बेत बदलला नाही आणि त्याची हकालपट्टी करण्यात आली.

मात्र, हकालपट्टीची ही अंतिम शिक्षा सहसा अमलात आणावी लागत नाही. जो सभासद हकालपट्टीची पाळी येईपर्यंत नियमभंग करतो तो किबुट्झ जीवनात असंतुष्ट असला पाहिजे हे स्पष्ट आहे, आणि त्याला काढून टाकले काय किंवा न टाकले काय, तो एक दिवस बाहेर पडणारच असतो.

किर्यात येदिदिममध्ये किबुट्झच्या मूल्यांचे उल्लंघन होण्याचे प्रसंग थोडे येत असले तरी इतर समाजाप्रमाणेच त्या समाजापुढेही आक्रमकपणाचा प्रश्न उभा असतो. कोणत्याही संस्कृतीतला गट असो, तो आपल्या सभासदांमधील आक्रमक वृत्ती नष्ट करू शकेल हे फार असंभवनीय आहे, आणि आक्रमक वृत्तींचा सगळा बाह्य आविष्कार बंद करू शकेल हेही तितकेच असंभवनीय आहे. आक्रमकतेचे आविष्कार थांबविणे तर सोडाच, सर्व प्रकारचे समाज त्यांना संस्थारूप वाट करून देऊन एक प्रकारे त्यांच्यावर पसंतीचे शिक्कामोर्तब करतात. या सर्वसाधारण नियमांना किर्यात येदिदिम अपवाद नाही. किर्यात येदिदिम हा एक लहानसा आणि सहकारी समाज असल्यामुळे आपल्या ( म्हणजे किबुट्झबाह्य ) समाजात आक्रमक वृत्तीचा जसा आर्थिक स्पर्धेत आविष्कार होतो तसा त्यात होणार नाही हे गृहीतच धरून चालता येईल. आणि किबुट्झची सहकारी संस्कृती टिकून राहायची असेल तर तिच्या सभासदांच्या आक्रमक वृत्तींचा परस्परसंबंधांमधील आविष्कारही अगदी मर्यादित राहील हे उघड आहे. उपलब्ध पुराव्याने ही गृहीतकृत्ये बव्हंशी बरोबरही ठरतात. तरीही किबुट्झ-मध्येही स्पर्धा आणि परस्परसंबंधातील आक्रमकपणा थोडाफार आढळून येतोच आणि त्याचा अभ्यास करणे आवश्यक आहे. तो झाल्यावर या आविष्कारांना दिलेल्या संस्थारूपाकडे आपण वळू.

परस्परसंबंधातील आक्रमण प्रथम आढळते ते गप्पा आणि क्षुद्र टीका यांच्या स्वरूपात. उदाहरणार्थ, सामूहिक स्नानगृहाचे महत्त्वाचे सामाजिक कार्य म्हणजे गप्पा मारायला तेथे मिळणारी संधी, आणि या गप्पांना केवढे महत्त्व असते ही गोष्ट वयस्कर स्त्रियांच्या घट्टच्या सुरातील-तक्रारीवरून समजून येते; त्या नव्या जागेत राहायला गेल्या तेथे प्रत्येक घराला स्वतंत्र नळ असल्यामुळे गप्पा कुठे मारायच्या ही त्यांची काळजी ! गप्पांच्या जोडीला पुष्कळशी क्षुद्र टीका व " पाठीमागे निंदा " हेही प्रकार असतात. हे बायकांच्या बाबतीत विशेषच खरे असल्याचे दिसते. बायकांच्या मुलाखती घ्यायला सुरवात करून थोडा वेळ होतो न होतो तोच त्या दुसऱ्या बायकांचे

दोष दाखवायला सुरुवात करीत. अ सदस्येची मुलांची काळजी घेण्याची पद्धत; ब बाईचा अधिकार गाजवण्याचा स्वभाव; अमकीचा खोटा विनयशीलपणा; तमकीचा अनुदारपणा; इत्यादी इत्यादी. त्यांची टीका विशिष्ट व्यक्तींनीच अनुलक्षून असते असे नव्हे, तर सामान्यतः सर्वांनाच लागू असते. बोलण्याच्या ओघात जवळ जवळ प्रत्येकापाशी किबुट्झवर टीका करण्यासारखा काही ना काही मुद्दा असतोच— लोक किबुट्झच्या मालमत्तेची काळजी घेत नाहीत, ते किबुट्झच्या कार्यात सक्रिय भाग घेत नाहीत, जबाबदारीची योग्य ती जाणीव बाळगत नाहीत, खाजगी मालमत्तेच्या वस्तू जमवायला लागले आहेत, इत्यादी. मात्र, आपल्याखेरीज इतर सगळे या गोष्टी करतात, दुसरे सभासद आपल्यासारखेच ( चांगले ) असते तर किर्यात येदिदिम ही एक अगदी आदर्श वस्ती झाली असती असा सूर बहुधा प्रत्येकाच्या बोलण्यात असतो. एका दृष्टिकोणातून पाहिले तर ही टीका म्हणजे सामान्यतः इतरांबद्दल वाटणारी द्वेषभावनाच होय हे ध्यानात येईल.

भांडणे आणि तक्रारी हा आक्रमकपणा व्यक्त होण्याचा आणखी एक प्रकार. ग्रामसभेमध्ये पुष्कळदा टीकेचा जोराचा भडिमार होतो. ह्या अभ्यासाच्या मुदतीत दृष्टीस पडलेली बहुतेक भांडणे निरनिराळ्या शाखांमध्ये कामगारांचे वाटप, किंवा घोडे, ट्रॅक्टर आणि पाणी यांचे वाटप अशा प्रकारच्या रोजच्या कामांमधूनच निर्माण झालेली होती. वेगवेगळ्या शाखांचे मुकादम आपसात किंवा कामाचे वाटप करणाऱ्या अध्यक्षांबरोबर भांडतात. मात्र, आर्थिक प्रश्नांवरून उत्पन्न होणारा संघर्ष हा कामाचे वाटप करणारा अध्यक्ष आणि मुकादम यांच्या दररोजच्या भेटींपुरताच मर्यादित नाही. स्नानगृहे म्हणजे गप्पांचा अड्डा असतो याचा आधीच उल्लेख केला आहे आणि पुष्कळशा वादांचे उगमस्थानही तेच असते. मनुष्यबळाच्या किंवा यंत्रांच्या वाटपाबद्दल होणाऱ्या चकमकी पुष्कळदा पुरुषांच्या स्नानगृहातच उडतात. हे वादविवाद एखाद्या वेळी गंभीर स्वरूपही धारण करतात, आणि भांडणाच्या भरात भडकलेले किंवा संतापाने काळेनिळे झालेले सभासद लेखकाला अनेकदा दिसले आहेत. मात्र, हे वादविवाद शाब्दिकच राहतात, अंगावर हात टाकण्याइतपत कधीही पाळी येत नाही— निदान लेखकाच्या पाहण्यात तरी असे कधी झालेले नाही.

प्रहसनामधून एकमेकांबद्दलची आक्रमक भावना बरेचदा व्यक्त केली जाते. सामाजिक नियंत्रणाचे एक साधन म्हणून प्रहसनांचा उपयोग केला जातो हे अगोदर सांगितले आहेच, पण आक्रमक वृत्तीच्या अविष्काराचे वाहन म्हणूनही त्यांचा वापर केला जातो. उदाहरणार्थ, किबुट्झमधला एक अधिकारी, त्याच्या कर्तबगारीबद्दल इतरांना अतिशय आदर असूनही, काही वैयक्तिक अवगुणांमुळे लोकांमध्ये अप्रिय होता. तीन महिन्यांच्या अवधीत, तीन प्रहसनांमधून त्याच्यावर उपहासात्मक टीका करण्यात आली, आणि या प्रहसनांना सभासदांची जी धमाल प्रतिक्रिया झाली तीवरून

असे स्पष्ट दिसून आले की या माणसाबद्दल त्यांना वाटणाऱ्या आक्रमक भावनेचा ह्या नाट्यतंत्रामुळे निचरा होत होता.

किर्यात येदिदिममध्ये आक्रमणाप्रमाणे स्पर्धेची भावनाही परस्परसंबंधांत आविष्कृत होते. जिथे वस्तू व सेवा यांची टंचाई असते किंवा मूल्यांना महत्त्व असते, तेथे स्पर्धा असते. आणि इतर समाजातल्याप्रमाणेच व्यक्तिगणिक स्पर्धाभावनेचे प्रमाण वेगळे असते. स्पर्धेचे एक मूळ म्हणजे मुले. आईबापांना आपल्या मुलांचा अतिशय अभिमान असतो, दुसऱ्यांपाशी बोलताना ते :मुलांबद्दल बढाया मारतात, आणि अहमहमिकेने आपापल्या मुलांचे गुणगान करतात. आपले मूल बोलू लागलेले शब्द एखादी आई इतरजणींना सांगते तेव्हा लगेच इतर आया या बाबतीत आपली मुले कशी पुढे गेलेली आहेत याची उदाहरणं देतात. आपली मुलगी ऑलिव्हच्या झाडावर कशी सरसर चढते म्हणून एखादी आई कौतुक करू लागताच एखादा बाप सांगतो की आपली मुलगी तर ह्यापेक्षाही हुशार आहे.

आर्थिक वर्तणुकीतही पुष्कळदा स्पर्धा दिसून येते. विशेषतः मुलांच्या " परिचारिका " आपल्या स्वतःच्या कर्तृत्वाची स्तुती करतात आणि इतर परिचारिकांच्यावर टीका करतात. शेतावर काही स्त्रिया जाणूनबुजून एकमेकींशी स्पर्धा करतात व कोण जास्तीतजास्त काम करते ते पाहतात, किंवा सर्वात आधी कोण काम पूर्ण करते ते बघतात. थोडक्यात, उत्पादन शाखेच्या अंतर्गत प्रतिष्ठेसाठी स्पर्धा असते. यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही कारण या संस्कृतीमध्ये श्रम हेच सर्वात मोठे मूल्य मानले जाते. कामातून मिळणारी प्रतिष्ठा हीच प्रत्येकाच्या खाजगी मालकीची एकमेव बाब असते व योग्यतेचे ते एक मोजमाप असते. एका सभासदाने सांगितले की ही प्रतिष्ठेसाठी केलेली स्पर्धा " पुष्कळदा फार कठोर असते. " उदाहरणार्थ, शेतीच्या एका शाखेत दोन तज्ज्ञ आहेत, दोघेही राष्ट्रीय कीर्तीचे आहेत. त्यांचे संबंध बिघडलेले आहेत, आणि दोघेही एकमेकांना टाळतात. कडक उन्हाळ्याच्या दिवसात किबुट्झमध्ये काही प्रकारचे अन्न मिळेनासे झाले तेव्हा काही लोकांची तक्रार अशी होती की या दोघांत वैमनस्य नसते तर टंचाई निर्माण झाली नसती. दुसऱ्याला श्रेय मिळेल म्हणून दोघांपैकी कोणीच परिस्थिती सुधारण्याचा उपाय केला नाही, असे किबुट्झमध्ये म्हटले जाते.

कधीकधी आवश्यक वस्तूंसाठी परस्परांशी कडवट स्पर्धा होते. खोल्यांच्या व फर्निचरच्या वाटपाबाबत खडाजंगी होते आणि अन्याय्य वाटपाबद्दल कल्याणसमितीविषयी आणि ज्या सभासदांना " काही समर्थनीय कारण नसताना " चांगल्या खोल्या किंवा फर्निचर मिळालेले असते त्यांच्याविषयीही तक्रारी ऐकू येतात. कापड आणि त्याचा पोशाख तयार करणारे कारागीर या दोन्हींची टंचाई असल्यामुळे स्त्रियांमध्ये चालणारी स्पर्धा विशेषच कडवट असते. या स्पर्धेमुळे उत्पन्न होणारा

कडवटपणा बहुधा या शाखेच्या व्यवस्थापिकेकडे रोखलेला असतो, आणि तो बहुतेक वेळी इतका जहाल असतो की व्यवस्थापिकेची अमदानी थोड्याच मुदतीपुरती राहते.

यावरून हे स्पष्ट दिसते की सभासदांमध्ये आक्रमक भावना असतात, आणि त्यांपैकी काहींचा त्यांच्या परस्परसंबंधात आविष्कार होतो. तरीसुद्धा हे खरे की त्यांच्या या आक्रमकत्वाचा रोख सहकाऱ्यांकडून काढून घेऊन त्याला इतर व बव्हंशी इष्ट अशा दिशांना वळविण्यात येते. ह्या दिशा म्हणजे काम, राजकारण आणि ( अलीकडे ) " वांशिक " पूर्वग्रह ह्या होत.

काम आणि राजकारण ह्या दोन क्रियांचे किबुट्झमधले महत्त्वाचे पण वरवर पाहता लक्षात न येणारे कार्य म्हणजे आक्रमणाच्या भावनेला वाट करून देणे हे आहे यात शंका नाही. आक्रमक ईर्ष्यांचा निचरा करणारी राजकारण ही बहुधा सर्वात महत्त्वाची मानसिक वाट आहे. अधिक चांगले जग निर्माण करण्याच्या प्रयत्नात किबुट्झला खूप विरोधाला तोंड द्यावे लागते आणि या विरोधाकडे बघण्याची त्यांची दृष्टी तीव्र वैरभावनेची आहे. खरोखर, किबुट्झ जवळजवळ प्रत्येकाकडे विरोधक म्हणूनच पाहात असल्यामुळे जवळजवळ प्रत्येकाचा द्वेष करतो असे म्हणणे अन्यायाचे होणार नाही. इस्रायलच्या बाहेरच्या सगळ्या " भांडवलशाही " ( बूर्ज्वा ) देशांचा द्वेष केला जातो, आणि फक्त सोव्हिएत युनियन आणि " जनतेच्या लोकशाह्या " ( पीपल्स् डेमॉक्रसीज ) यांवर " प्रेम " केले जाते. इस्रायलच्या समाजवादी चळवळीतील " सुधारणावादी " लोकांचा भांडवलशहांहून अधिक तिरस्कार केला जातो. आणि विरोधी पक्षावर करावा तसा कडक हल्ला आपल्या राजकीय पक्षातील " उजव्या गटावर " करण्यात येतो. हा वैरभावाचा आवेग रोज पक्षाचे दैनिक वाचून झाल्यावर हलका होतो. कारण हे दैनिक सभासदांना पुनःपुन्हा सांगते की जग दुष्ट माणसांनी भरलेले आहे आणि ती माणसे सोव्हिएत रशियावर स्वारी करायला, इस्रायलचे तुकडे करायला आणि कामगार वर्ग व किबुट्झ चळवळ या दोन्हींचा निकाल करायला सज्ज झाली आहेत.[१२]

राजकारणाच्या द्वारा सभासदांच्या आक्रमक वृत्तींचा मानसिक आविष्कार होतो तर कामामधून अतिशय महत्त्वाचा असा शारीरिक आविष्कार होतो. कामाचा दिवस दीर्घ असतो, ऊन कडक असते आणि जमिनीची अखंड काळजी घ्यावी लागते त्यामुळे त्यांची बहुतेक शारीरिक शक्ती कामातच खर्च होते. ज्या आवेगाने व जबरदस्त ओढीने या ते कामावर तुटून पडतात ( हल्ला करतात असेच म्हणणे जास्त बरोबर ठरेल ) त्यावरून असे दिसते की निसर्गावर विजय मिळविण्याची क्रिया त्यांच्या आक्रमणशील प्रवृत्तींना एक महत्त्वाची वाट देते.

पण राजकारण आणि शारीरिक श्रम यांमुळेच केवळ आक्रमणाची भावना शमते असे नव्हे तर जे सभासद नाहीत अशांच्या संबंधातसुद्धा ती आविष्कृत होते. जरी

---

१२. किबुट्झच्या ध्येयवादाच्या सविस्तर वर्णनासाठी प्रकरण ५ पाहा.

किबुट्झच्या ध्येयवादात आंतरराष्ट्रीय आणि आंतर-वंशीय बंधुत्वावर भर देण्यात येत असला तरी बिगर-ज्यू आणि बिगर-इस्रायली यांच्याबद्दलच्या काही सभासदांच्या दृष्टिकोणांत फार पूर्वग्रह दिसून येतो. उदाहरणार्थ, नव्याने आलेल्या डॉक्टरची पत्नी ज्यू नसल्यामुळे सभासदांना ती आवडलीही नाही आणि तिला आपल्यात घेण्याचा त्यांनी प्रयत्नही केला नाही. तिच्याकडे बघण्याच्या त्यांच्या दृष्टिकोणाबद्दल त्यांना विचारले तेव्हा मिळालेले उत्तर प्रातिनिधिक म्हणता येईल. " ती **गोय्या** ( " जेंटाइल " म्हणजे बिगरज्यू ) आहे आणि बिगर-ज्यूंना ज्यू जितपत आवडतात तितपतच ज्यूंना बिगरज्यू आवडणार ! " पौर्वात्य ज्यूंबद्दलही पूर्वग्रह दिसून येतो आणि ह्या पूर्वग्रहाला " वांशिक अहंकारा "चा दर्प आहे. मोरोक्को आणि इराकमधून किबुट्झमध्ये राहण्यास आलेल्या युवकांचा पुष्कळदा तुच्छतेने " काळे लोक " ( **हाशे कोरीम** ) असा उल्लेख होई; आणि त्यांच्या पौर्वात्यत्वाचा आणि त्यांच्या " असंस्कृत " राहणीचा अनेकदा अहंमन्यपणे उच्चार केला जाई. एका सभासदाचे पुढील उद्गार प्रातिनिधिक स्वरूपाचे म्हणता येणार नाहीत पण त्यावरून सर्वसाधारण वृत्ती ध्यानात येईल. एक दिवस स्वयंपाकघरातील काम विशेषच मंद गतीने आणि अव्यवस्थित चालले होते, तेव्हा हा सभासद उद्गारला, " दुसरे काय होणार ! स्वयंपाकघरात आता काम करताहेत ते सगळे आफ्रिकी, आशियाई आणि अमेरिकन आहेत ! "

* * *




प्रकरण : ५ :

# किबुट्झ : एक सामूहिक समाज – २

## आईबाप आणि मुले

किर्यात येदिदिममध्ये कुटुंबसंस्था, किंवा निदान विवाहसंस्था तरी, रूढ स्वरूपात अस्तित्वात आहे की नाही हे ठरविणे कठीण आहे. अगदी प्रारंभापासूनच किर्यात येदिदिमने सामाजिक अस्तित्वाची "व्यक्ती" आणि "समष्टी" ही जी दोन टोके आहेत त्यांवर भर दिला आहे; आणि या दोन टोकांमध्ये येणाऱ्या कोणत्याही गटांचे महत्त्व नाहीसे करण्याचा किंवा निदान कमी करण्याचा प्रयत्न केलेला आहे. रूढ अर्थाने ज्याला "विभक्त" कुटुंब म्हणतात तेसुद्धा किबुट्झमध्ये अस्तित्वात नाही किंवा असलेच तर अगदी क्षीण स्वरूपात आहे असे म्हणावे लागेल. स्थूलमानाने असे म्हणता येईल की संबंध किबुट्झ हेच एक विशाल असे "एकत्र" कुटुंब आहे. मात्र किबुट्झ कुटुंबसंस्थेचे मूल्यमापन इतक्या लवकर करता येणार नाही, कारण किर्यात येदिदिम अद्याप संक्रमणावस्थेत आहे आणि त्याची सामाजिक घडण पुढे कोणत्या प्रकारची होईल याचा अंदाज आज वर्तविणे अवघड आहे. किर्यात येदिदिमचा इतिहास आणि संस्थापकांबरोबर झालेली प्रस्तुत लेखकाची संभाषणे यावरून हे उघड दिसून आले की रूढ अर्थाची विवाहसंस्था आणि कुटुंबसंस्था ही दोन्ही नाहीशी करण्याचा त्यांचा विचार होता. संस्थापकांचे बदलते दृष्टिकोण, त्याचप्रमाणे "साब्रां"ची विवाहसंस्था आणि कुटुंबसंस्था यांकडे बघण्याची वृत्ती, आणि मुले आणि नातवंडे यांच्या आगमनानंतर किबुट्झमधल्या सामाजिक परिस्थितीत झालेले बदल या सर्वांमुळे किबुट्झमधल्या या दोन्ही संस्थांच्या स्वरूपात एक प्रवाहीपणा आलेला आहे, त्यांना अजून सुस्थिर असे स्वरूप आलेले नाही.

वाचकांच्या हे ध्यानात असेल की संस्थापक जेव्हा युवक चळवळीचे सभासद होते तेव्हा त्यांनी युरोपातील ज्यूंची "श्टेटल" नावाच्या ग्रामीण वसाहतीतील संस्कृती आणि युरोपीय शहरातील भांडवलशाही संस्कृती या दोहोंविरुद्ध बंड उभारले होते. या संस्कृतीमधली "ढोंगी" लैंगिक नीतिमत्ता, पुरुषांचे "पितृसत्ताक" अधिकार, मुलांचे वडिलांवर "अवलंबन" आणि स्त्रीचे "दास्य" या गोष्टींमध्ये त्यांना बदल घडवून आणायचा होता. पहिल्या दोन रूढींविरुद्ध त्यांनी उभारलेल्या बंडामुळे लग्नसंबंधांत आमूलाग्र सुधारणा घडून आली आणि दुसऱ्या दोन गोष्टींना असलेल्या त्यांच्या विरोधामुळे रूढ कुटुंबसंस्थेमध्ये विशेष स्वरूपाचे परिवर्तन घडून आले.

प्रथम आपण विवाहसंबंध विचारात घेऊ. युवक चळवळीच्या विचारसरणीत एक कर्मठपणाची गडद छटा होती व तिचा सर्वसाधारण कटाक्ष "शुद्ध" वर्तणुकीवर असे. लैंगिक संबंधांकडे पाहण्याची तिची दृष्टीही या "शुद्धते" वरच आधारलेली होती. या चळवळीतील सोळा वर्षांच्या सर्वसाधारण तरुणालासुद्धा "प्रेम" ही जीवनातली विलक्षण गंभीर घटना वाटत असे, या अनुभवात काही आल्हाद किंवा आनंद आहे असे समजणे म्हणजे "सडलेल्या" भांडवलशाही संस्कृतीचा दृष्टिकोण स्वीकारणे असे त्याला वाटत असे. "आम्ही त्या काळी प्रेम या घटनेचा फार गंभीरपणाने, खरे म्हणजे अतिरिक्त गंभीरपणाने, विचार करीत होतो," असे एक संस्थापिका म्हणाली. अगदी सौम्यशा उच्छृंखलपणाही या तरुण मंडळींना मान्य नसे. एका संस्थापिकेने एक गमतीची आठवण म्हणून सांगितली की युरोपमधल्या डोंगरात शनिवार-रविवारच्या सहलीला एकदा ते सर्व गेले असताना "एखादे चुंबनसुद्धा" न घेता परत आले होते. ती पुढे म्हणाली, "आम्ही कोणीतरी अतिमानव आहो याचाच आम्हांला अभिमान वाटत असे. मात्र या बाबतीत तरुण "साब्रा" आमच्यापेक्षा जास्त निरोगी आहेत; आमच्याच विचारात त्याकाळी गोंधळ होता."

विशीच्या आसपासची ही तरुण मंडळी पॅलेस्टाइनमध्ये प्रथम आली तेव्हा लैंगिक संबंधांची नवी व्यवस्था कोणत्या तत्त्वांच्या पायावर करायची हा प्रश्न त्यांच्यापुढे होता. आणि आताच उल्लेखिलेल्या संस्थापिकेच्या मते "हे काम सोपे नव्हते." पुरुष आणि स्त्रिया यांचे परस्पर प्रमाण दोनास एक, साठ पुरुष आणि तीस स्त्रिया, असे होते. ही परिस्थितीच मुळात बिनतोड होती. शिवाय, त्या सर्वांना एकच समाज म्हणून एकत्र राहायचे होते, मात्र जोडपी म्हणून नव्हे. "यामुळे स्त्री-पुरुषसंबंध या विचाराचे आम्हाला एक व्यवधानच असे यात नवल नाही". याच काळात फ्रॉयडचा अभ्यास फार काळजीपूर्वक केला जाई. अर्थात त्याचा हेतु बौद्धिक आनंद असा नसून या अभ्यासांतूनच काही प्रत्यक्ष मार्गदर्शन मिळावे हा असे. परंतु फ्रॉयडने "आणखीच गोंधळ उडविला."

सुरुवातीच्या काळी या बाबतीत खूप विचार झाला. आणि प्रयोग करीतकरीत, चुकांमधून धडे घेतघेत या प्रश्नाची काही समाधानकारक सोडवणूक करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. स्त्री-पुरुषसंबंधांची उभारणी "बूर्झ्वा" विवाहसंस्थेपेक्षा अधिक बळकट आणि जास्त नैसर्गिक पायावर करणे शक्य आहे अशी त्यांची मुळापासून खात्री होती. आणि इतर पर्यायांबरोबर अनौपचारिक बहुपतित्व-आणि बहुपत्नित्व यांचे प्रयोगही त्यांनी करून पाहिले. पारंपरिक संस्कृतीत लैंगिकतेबद्दल जी लज्जेची भावना असते ती मोडून काढण्यासाठी त्यांनी एकत्रित स्नानगृहाची प्रथा सुरू केली. पण हा प्रयोग त्यांना लवकरच सोडून द्यावा लागला. "आमचे पूर्वसंस्कारच बलिष्ठ ठरले". विवाहाबाबत त्यांची अशी समजूत होती, व अजूनही आहे, की स्त्री-पुरुषांचे एकत्र येणे ही सर्वस्वी त्यांची खाजगी बाब आहे. एकत्र येण्याला प्रेमाचा पाया

असावा आणि प्रेम संपुष्टात आले तर दूर होता यावे. एकत्र येणे किंवा विभक्त होणे यापैकी कशालाही समाजाची परवानगी अगर मान्यता आवश्यक नाही. उदाहरणार्थ आज एखाद्या जोडप्याला लग्न करावेसे वाटले तर ते जोडपे आपल्याला एक स्वतंत्र खोली हवी असे सांगते, त्यांना विभक्त होण्याची इच्छा झाली तर ते वेगवेगळ्या खोल्यांत परत जातात. मात्र येथे हे सांगायला पाहिजे की किबुट्झ हा काही स्वायत्त समाज नव्हे. त्याला देशाचे कायदे विचारात घ्यावे लागतात. कायद्याने विवाहबाह्य संततीला नागरी हक्क नसतात. म्हणून स्त्रीला जेव्हा दिवस जातात तेव्हा ते जोडपे देशाच्या कायद्याप्रमाणे विवाहबद्ध होते.

किबुट्झमधल्या मुलांना लैंगिक शिक्षण मिळालेले आहे ते अशा प्रकारच्या वातावरणात. लैंगिक अनुभवाचे प्रयोग करण्यापासून मुलांना परावृत्त करण्यात येते, परंतु शाळेत त्यांना वस्तुनिष्ठ दृष्टिकोणातून स्त्री-पुरुषसंबंधाबाबत शिक्षण देण्यात येते. लैंगिक अनुभव किंवा प्रणयसंबंध याबाबत प्रशाळेमधल्या मोठ्या मुलांनाही उत्तेजन दिले जात नाही. यामागे काही विशिष्ट लैंगिक नीतिमत्तेचा आग्रह आहे असे नव्हे. असे अनुभव त्यांनी घेतले तर बौद्धिक आणि सामाजिक क्षेत्रातील कामातून त्यांचे लक्ष उडेल अशी भीती यामागे आहे. याउलट, मुलामुलींच्या झोपण्याच्या खोल्या बाल्यापासून प्रशालेय शिक्षण संपेपर्यंत एकच असतात आणि त्यांची स्नानगृहेही प्रशालेत प्रवेश करीपर्यंत एकच असतात. अगदी अलीकडेपर्यंत प्रशालेमध्येही एकत्र स्नानगृहे असायची पण ही पद्धत मुलांनीच नको म्हणून सोडून टाकली आहे.

प्रशालेय शिक्षण नुकतेच संपवून किबुट्झचे पूर्ण सभासद झालेले विद्यार्थी लैंगिक संबंधांत मोकळेपणाने प्रवेश करू शकतात व तसे केल्याने ते दोषार्ह ठरत नाहीत. लैंगिक संबंधांकडे फक्त त्या जोडीची खाजगी बाब म्हणून बघितले जाते. त्यांचे प्रेम जमून त्यांनी लग्न करायचे ठरविले म्हणजेच त्यांच्या संबंधाला सामाजिक परिमाण प्राप्त होते. लग्न ठरले की आपल्यासाठी एका स्वतंत्र खोलीची मागणी ते जोडपे गृहव्यवस्था समितीकडे करते. आणि ही मागणी मान्य झाली की विवाहाला समाजाची अधिकृत मान्यता आणि परवानगी मिळाली असे समजण्यात येते.

"लग्न", "नवरा", "बायको" इत्यादी शब्दांना रूढीने चिकटलेल्या अर्थांचा तिटकारा असल्यामुळे अगदी आरंभापासूनच ते शब्द त्याज्य ठरविण्यात आले होते. एखाद्या पुरुषाचे आणि स्त्रीचे "लग्न" झाले असे न म्हणता त्यांची "जोडी" (झूग) जमली म्हणण्यात येते. स्त्रीला "नवरा" मिळत नाही तर "तरुण पुरुष" (बाहुर) मिळतो, किंवा "सखा" (हावेर) मिळतो. त्याच प्रकारे पुरुषाला "बायको" मिळत नाही तर "तरुण स्त्री" किंवा "सखी" मिळते. पूर्वी घटस्फोट वारंवार होत असत. परंतु त्यात कायद्याचे प्रश्न निर्माण होत नसल्याने आणि त्या काळी तर फारच थोड्या जोडप्यांना मुलेबाळे असल्याने घटस्फोटातून फारसे अवघड प्रश्न उत्पन्न होत नसत. त्या काळात संस्थापक कामाच्या छावण्यांतून राहात

तेव्हा कायमचे निवासस्थान लाभेपर्यंत मुले होऊ द्यायची नाहीत असा अलिखित नियम पाळला जात असे. किर्यात येदिदिममध्ये राहायला लागल्यानंतरही सभासदांची अशी प्रवृत्ती असे की किबुट्झचा भौगोलिक परिसर आणि आर्थिक स्थिती सुधारेपर्यंत मुले होऊ द्यायची नाहीत. ( ते त्याकाळी दलदलींच्या जागेत राहात होते आणि भयानक अन्नटंचाईला तोंड देत होते. )

पूर्वी जेव्हा दोन व्यक्ती प्रेमात पडत आणि " जोडपे " म्हणून संबंध जोडीत, तेव्हा लोकांमध्ये एकत्र न दिसण्याची कोशीस करीत, किंवा चारचौघांत भेटण्याची वेळ आलीच तर औपचारिकपणाचे नाटक करीत: जणू काही आपले काहीच नाते नाही असे दाखविण्याचा प्रयत्न करीत. भोजनगृहात एकत्र प्रवेश करायचासुद्धा त्या जोडीदारांना जणू " लाज " वाटत असे. निरनिराळ्या वेळी ते आत येत व निरनिराळ्या टेबलांवर जेवण घेत. एक सदस्या सांगते की तिच्या नवऱ्याने चार लोकांत नुसते तिच्या-बरोबरच नव्हे तर खांद्यावर हात ठेवून तिच्यासह जेवणाच्या खोलीत प्रवेश करण्याचा आग्रह धरला तेव्हा ती किती तरी बावरून गेली होती. किर्यात येदिदिममधल्या आमच्या वास्तव्यात झालेली एक गाठ ऐतिहासिक महत्त्वाची म्हणून समजली जाते. कारण जोडीदारांनी एकमेकांबरोबर सहलीला जाण्याचा तो पहिलाच प्रसंग होता. पूर्वीच्या काळी ही एक अश्रुतपूर्व घटना म्हणूनच समजली गेली असती. त्या काळी प्रत्येक जोडीदार वेगळ्या मार्गाने जाई आणि परतल्यावर आपल्या सहचराखेरीज किंवा सहचारिणीखेरीज प्रत्येकाला अभिवादन करीत असे.

जोडपे म्हणून आपले काही विशेष दृढ नाते आहे या गोष्टीचा चारचौघांत " इन्कार " करण्याची ही जी प्रवृत्ती आहे तिच्यामागे दुहेरी कारण संभवते. एक तर असे न करणे म्हणजे " बूझ्वा " ठरणे होय: आणि किबुट्झच्या दृष्टीने " बूझ्वा " वागणूक ही एक तिरस्करणीय गोष्ट होती. दुसरे म्हणजे, किर्यात येदिदिम समूहजीवन हेच सर्वोच्च साध्य मानीत असल्याने व्यक्तीचा सर्वांत बळकट पाश हा संबंध समूहाशीच जोडलेला असला पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. त्यामुळे ज्या व्यक्तीला " जोडीदार " किंवा " जोडीदारीण " मिळाली असेल तिला आपण समूहजीवनापासून अलग झालो नाही, समूहाशी असलेले आपले नाते तुटलेले नाही किंवा समूहाशी असलेले संबंध ज्यामुळे धोक्यात येतील असे खाजगी आयुष्य आपण जगत नाही असे इतरांच्या मुद्दाम निदर्शनाला आणून देण्याची जरूर वाटे.[1]

---

१. या 'इन्कारा'चा दुसऱ्याही एका पातळीवर विचार करता येईल. तो म्हणजे युवक चळवळीच्या तत्त्वज्ञानातील लैंगिक बाबतीतल्या सनातनीपणाचा एक अविष्कार म्हणून. आजही हा कर्मठपणा हे किबुट्झचे एक अविभाज्य अंग आहे. लैंगिक बाबींचा उल्लेख संमिश्र समाजात जवळजवळ कधीच होत नाही आणि जेथे सगळे पुरुषच काम करतात अशा ठिकाणीही कधी असे उल्लेख किंवा असल्या विषयां-वरचे विनोद ऐकू आल्याचा एकही प्रसंग लेखकाला आठवत नाही.

" बूझ्वा " विवाहसंस्थेला किबुट्झचा विरोध होता तो अशा विवाहातल्या " खोट्या " आणि " ढोंगी " नीतिमत्तेला होता. शिवाय युवक चळवळीतील स्त्री मुक्तिवादाच्या जोरदार तत्त्वज्ञानाचेही त्याला पाठबळ होते. सार्थींच्या दृष्टीने " बूझ्वा " स्त्री म्हणजे जवळ जवळ एक गुलामच. तिला कायदेशीर हक्क किंवा राजकीय अधिकार फारच थोडे असतात, आणि आर्थिक व सामाजिक दृष्टीनेही ती आपल्या नवऱ्यावरच अवलंबून असते. तिचे " स्थान " घरात असते, आणि तिचे मुख्य कर्तव्य म्हणजे नवऱ्याची व मुलांची सेवा करणे. उलट सार्थींना अभिप्रेत असलेल्या नव्या समाजरचनेत सर्वच बाबतीत स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीच्या ठरणार होत्या. त्यांच्यामते बूझ्वा समाजात स्त्रीच्या वाट्याला आलेले पुरुषांचे दास्य हा तिच्या नैसर्गिक कनिष्ठपणाचा परिणाम नसून भांडवलशाही समाजरचनेचाच परिणाम होता. परंपरेने रूढ झालेल्या विवाहपद्धती चालू ठेवायच्या तर स्त्रियांना पुरुषांशी बरोबरी होऊ शकत नव्हती. कायद्यानेच त्या पुन्हा आपल्या नवऱ्यावर अवलंबून राहिल्या असत्या, कारण त्यांचे कायदेशीर स्थान " सौ. अमुक अमुक " असेच राहिले असते. नवऱ्याच्या समाजातल्या स्थानावरच त्यांचे समाजातले स्थान अवलंबून असल्याने सामाजिक दृष्टीनेही त्या नवऱ्यांवरच अवलंबून राहिल्या असत्या. नवरेच अन्नवस्त्र पुरविणारे असल्याने स्त्रियांना घरकाम करणे भाग पडून आर्थिकदृष्ट्याही त्या नवऱ्यांवरच अवलंबून राहिल्या असत्या. नवऱ्यांचा " पितृसत्ताक अंमल " नाहीसा करायचा तर स्त्रियांचे कायदेशीर सामाजिक आणि आर्थिक स्थानच बदलायला हवे होते. हे सर्व आता साध्य झाले आहे असे किबुट्झला वाटते.

विवाहसमारंभ नाहीसा केल्याने स्त्रीची पुरुषाच्या कायदेशीर दास्यातून सुटका झाली आहे असे सभासदांना वाटते. ती त्याचे नाव लावीत नाही आणि समाजातील तिचे स्थान हे त्याची बायको असे नसून किबुट्झची सभासद असेच असते. म्हणूनच दोघेही सर्व बाबतीत समान असे किबुट्झचे सभासद असतात. एकाच खोलीत राहत असूनही किबुट्झशी त्यांचे संबंध कायदेशीरपणे वेगवेगळे, स्वतंत्र असतात. नवऱ्याच्या सामाजिक स्थानावर बायकोची सामाजिक प्रतिष्ठा अवलंबून नसते. स्त्रीची प्रतिष्ठा तिचा नवरा कोणी मान्यवर पुढारी आहे किंवा कुशल कारागीर आहे वा मोठा विद्वान आहे यावरून मोठी ठरत नाही, अथवा तो मूर्ख, बेजबाबदार किंवा कर्तृत्वशून्य आहे यावरून कमीही ठरत नाही. शिवाय खाजगी मालमत्ता आणि आर्थिक विषमता अस्तित्वात नसल्यामुळे स्त्रीला नवऱ्याच्या आर्थिक परिस्थितीचा बडेजाव मिरविणे अशक्य होते. स्त्री व पुरुष यांना समान सहकारी ठरविले गेल्यामुळे किबुट्झच्या आर्थिक व्यवहारात स्त्रीचे पुरुषावरील आर्थिक अवलंबन नष्ट झाले आहे. ती पूर्वीसारखी स्वतःच्या घरात काम न करता किबुट्झच्या अर्थव्यवहारात भाग घेत असल्याने पुरुषाप्रमाणे स्वतःची उपजीविका स्वतःच मिळवीत असते आणि भरणपोषणासाठी नवऱ्यावर अवलंबून नसते. याच कारणामुळे ती स्वतंत्र कामगार म्हणून

जगते आणि समाजाच्या आर्थिक सुस्थितीला तिने लावलेला हातभार तिच्या नवऱ्या-इतकाच मोठा समजला जातो. तिला त्याच्यापासून घटस्फोट घ्यायची इच्छा झाली तर आपला आर्थिक आधार नाहीसा होण्याची भीती उरलेली नाही. शिवाय, स्त्रीपुरुष भेदावर आधारलेली पारंपरिक श्रमविभागणी नष्ट केल्यामुळे अर्थकारणात स्त्रीचा दर्जा आता पूर्वीसारखा कनिष्ठ राहिलेला नाही असे किबुट्झला वाटते. किबुट्झच्या सुरुवातीच्या दिवसांत तर स्त्रीपुरुष भेदावर आधारलेल्या श्रमविभागणीचे प्रमाण अगदीच अल्प होते. स्त्रिया आणि पुरुष दोघेही स्वयंपाकघरातील किंवा इतर "बायकी" कामात सहभागी होत, आणि रस्त्यावरची, ट्रॅक्टर्सची किंवा इतर "पुरुषी" कामे दोघेही पार पाडीत असत. प्रारंभीसारखी स्थिती आता उरलेली नाही. आजही काही स्त्रिया शेतावर कामे करतात आणि पुरुष आपली पाळी असेल तेव्हा स्वयंपाकघरातले काम करतात हे खरे. पण "स्त्रियांची समस्या" या प्रश्नाचा आपण जेव्हा[2] विचार करू तेव्हा असे दिसेल की मूळचे स्त्रीमुक्तीचे तत्त्वज्ञान आणि विशेषतः त्याचा व्यवहारातील अंमल यात अलीकडे खूपच बदल घडून आलेला आहे. तरीसुद्धा विवाहसंबंधांची मूलभूत रचना पूर्वी होती तशीच आजही आहे. फक्त तीन दोन प्रकारचे बदल झाले आहेत. घटस्फोटांचे प्रमाण पूर्वी जास्त होते ते आता कमी झाले आहे. विवाहाचे स्थैर्य वाढण्याचे कारण बहुधा असे दिसते की संस्थापक पूर्वी जसे उसळत्या रक्ताचे बंडखोर तरुण होते तसे आता राहिलेले नाहीत आणि त्यांच्या विवाहित मुलांचा घटस्फोटाला तत्त्व म्हणूनच विरोध आहे. खरे म्हणजे सबंध किबुट्झचा स्त्री-पुरुष संबंधांकडे बघण्याचा दृष्टीच फार बदलली आहे. लैंगिक स्वातंत्र्याकडे संशयाने पाहिले जाते आणि विवाहबाह्य संबंधावर उघड टीका केली जात नसली तरी त्यावर पसंतीचा शिक्काही मारला जात नाही. विवाहबाह्य संबंधाचे एकच उदाहरण लेखकाच्या वास्तव्यात घडले (म्हणजे ते त्याच्या कानी आले) पण तो "व्यभिचार" आहे अशीच त्याकडे पाहण्याची अनेकांची दृष्टी होती. अर्थात "व्यभिचार" ("ॲडल्टरी") हा शब्द मात्र त्यांनी वापरलेला नव्हता.

दुसरा महत्वाचा बदल म्हणजे "जोडपे" या नात्याला मिळालेली समाजाची मान्यता आणि परवानगी. जोडीदार आता एकत्र सहलीला जातात, सुट्या एकत्र घेतात आणि संध्याकाळची जेवणेही, एक नित्याचीच गोष्ट असल्यासारखी, एकत्र घेतात आणि असे करताना कोणत्याही प्रकारची लज्जा अगर संकोच त्यांना आता वाटत नाही. शिवाय स्त्रीने आपल्या साथीचा " माझा पती " ( बाली ) म्हणून उल्लेख केलेला आता पुष्कळदा ऐकू येतो. हा वाक्प्रचार पूर्वी निषिद्ध होता. प्रस्तुत लेखकाने एका स्त्रीला याबद्दल खिजविण्याच्या हेतूने विचारले असता ती म्हणाली, "त्यात काय फरक आहे ? पूर्वी आम्हाला या गोष्टीचा फार बाऊ वाटायचा, पण आता आम्ही मोठे झालो असल्याने त्याचे आम्हाला विशेष काही वाटत नाही."

---

२. प्रकरण ६ मध्ये

काहीं सात्रा तर "जोडीदार" बनले की एक मोठा थोरला सार्वजनिक समारंभ साजरा करतात. जुन्या काळी असे कोणी केले असते तर आश्चर्याचा धक्का बसला असता. पण हे काहीच नव्हे. आमच्या वास्तव्याच्या काळात एका जोडप्याने याहीपलीकडे उडी घेतली, आणि त्यामुळे किबुट्झच्या नीतिमत्तेचा भंग झाल्यासारखे काहीजणांना वाटले. दोन वर्षे "जोडपे" म्हणून राहात असलेले दोन सात्रा जेरुस-लेमला अभ्यासाकरिता जाणार होते. तेव्हा तेथे गेल्यानंतर होणारी टीका टाळण्यासाठी म्हणून त्यांनी कायदेशीरपणे लग्न करायचे ठरविले. समारंभाच्या रात्री धार्मिक विधियुक्त विवाह करण्यात आला आणि त्या निमित्त मुलीच्या वडिलांनी एक थाटाचा समारंभ साजरा केला. या समारंभावरची किबुट्झ सभासदांची टीका दोन प्रकारची होती. एक टीका अशी कीं लग्न धार्मिक विधीने केले; आणि दुसरी अशी की किबुट्झच्या दृष्टीने दोन वर्षे अगोदरच अधिकृत लग्न झालेले असूनही जणू काय ते आता नव्यानेच होत आहे अशा थाटात त्यांनी ते साजरे केले.

इतके वर्णन केले तरी निरनिराळ्या संस्कृतींमधील विवाहसंस्थांचे परीक्षण करून विवाहाची जी व्याख्या केलेली आहे त्या व्याख्येनुसार "विवाहसंस्था" किबुट्झमध्ये अस्तित्वात आहे की नाही हा प्रश्न शिल्लक उरतोच. मुरडॉकच्या मते विवाहात दोन भिन्न पण एकमेकांशी निगडित असलेले व्यवहार एकत्र येतात. एक, सर्वसामान्यपणे कायम स्वरूपाचा असा लैंगिक संबंध आणि दोन, कमीत कमी दोन भिन्नलिंगी व्यक्तींमधील आर्थिक सहकार्य.

> आर्थिक सहकार्याशिवाय लैंगिक संबंध अनेकदा अस्तित्वात असू शकतात. आणि आर्थिक सहकार्य अस्तित्वात असूनही, लैंगिक संबंधाचा अभाव अनेक वेळा दिसून येतो. परंतु जेव्हा आर्थिक आणि लैंगिक असे दोन्ही प्रकारचे संबंध एकवटतात तेव्हाच विवाहसंस्था अस्तित्वात येते.[३]

किबुट्झ "जोडप्याच्या" अगोदर केलेल्या वर्णनावरून हे स्पष्ट दिसते की जोडीदारांमध्ये आर्थिक सहकार्य नसते अगर श्रमविभागणीही नसते. संबंध किबुट्झमध्ये श्रमविभागणी स्त्रीपुरुषभेदाच्या पायावर उभारलेली असते हे नक्कीच आणि ही विभागणी हा "आर्थिक सहकार्याचा" एक महत्त्वाचा अविष्कार आहे हेही आवर्जून सांगितले पाहिजे, परंतु पुरुष आणि बायकाही त्यांच्या स्वतःचे घरचे नव्हे तर समूहाचेच आर्थिक व्यवहार पार पाडीत असतात आणि त्यांच्या श्रमांची फळे त्यांच्या खाजगी मालकीची न होता समाजाचीच होतात. यावरून हे उघडच आहे की स्त्रीपुरुष भेदावर आधारित श्रमविभागणी ही संबंध समूहातील पुरुषांचा एक गट व स्त्रियांचा एक गट अशा प्रकारे बनलेली असते. ती एका विशिष्ट स्त्रीपुरुष जोडीमध्ये केलेली श्रमविभागणी नसते.

---

३. Murdock पृ. ८

मुरडॉकचा निकष किबुट्झ "जोडप्याला" लागू पडत नसल्याने त्याच्या व्याख्येनुसार विवाहसंस्था किबुट्झमध्ये अस्तित्वात नाही असे म्हणावे लागेल किंवा विवाहसंस्थेचे आपणाला दुसरेच निकष ठरवावे लागतील. पण हा प्रश्न प्रस्तुत अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाचा नसल्याने आपण त्यावर अधिक वेळ घालविण्याचे कारण नाही. विवाहसंस्थेने केल्या जाणाऱ्या कार्यांच्या तुलनेने "जोडपे" ही संस्था काय कार्य करते याचाच केवळ विचार आपल्या दृष्टीने महत्त्वाचा आहे असे म्हणता येईल. स्त्रीपुरुषांना एकमेकांच्या निकट सान्निध्याची जी गरज असते ती भागविणे हे एक अत्यंत महत्त्वाचे कार्य ही संस्था करते. या गरजेचे शारीरिक आणि मानसिक असे दोन प्रकार मानता येतील. म्हणजे असे की या नात्यातून जोडीदार आपली लैंगिक भूक भागवितात आणि (मैत्री, साहचर्य, सहानुभूती इत्यादि रूपांनी) मानसिक स्थैर्य मिळवितात. या संबंधातल्या या दुसऱ्या गोष्टीनेच "लग्नसंबंध" हा "प्रेमसंबंधा" पेक्षा वेगळा ठरतो, आणि हा फरक किबुट्झनेच केलेला आहे. प्रेमिक स्वतंत्र खोलीची मागणी करीत नाहीत आणि त्यांनी केली तरी त्यांना ती पुरविण्यात येत नाही. जेव्हा दोन व्यक्ती स्वतंत्र खोलीत राहण्याची मागणी करतात तेव्हाच ते नुसते "प्रेमिक" नसून एकमेकांच्या "प्रेमात पडलेले" आहेत असे गृहीत धरले जाते.[४]

किर्यात येदिदिममधील विवाहसंस्थेचे स्वरूप निश्चित करणे तर कठीण आहेच पण कुटुंबसंस्थेचे स्वरूप ठरविणे तर त्याहूनही कठीण आहे. मुरडॉकने निरनिराळ्या संस्कृतींच्या अभ्यासाच्या आधारे केलेली कुटुंबसंस्थेची व्याख्या पुढीलप्रमाणे आहे. कुटुंब म्हणजे :

...एकत्र निवास, आर्थिक सहकार्य आणि प्रजाजनन या वैशिष्ट्यांनी युक्त असा एक सामाजिक गट असतो. ज्यांमधील निदान दोघांमध्ये समाजसंमत लैंगिक संबंध

४. विवाहसंस्था ही एक नैसर्गिक व इष्ट अवस्था आहे असा किर्यात येदिदिमचा दृष्टिकोण आहे. अविवाहितांकडे पाहण्याची सभासदांची दृष्टी कशी असते याचे निदर्शक म्हणून एका बाईने एका अविवाहितेबद्दल पुढील उद्गार काढले ते पाहावे. "ती बाई किती चांगली आहे. पण बिचारीला अजून जोडीदार मिळाला नाही." असे असले तरी किबुट्झमधल्या २०० प्रौढांपैकी (तरुण पिढी सोडून) १५ जण अविवाहित तरी आहेत, विधवा किंवा विधुर तरी आहेत किंवा ज्यांनी पुन्हा लग्न केले नाही असे घटस्फोटित तरी आहेत. साधारणपणे त्यांनाही विवाहित व्यक्तींसारखेच हक्क व जबाबदाऱ्या आहेत. तथापि वरील अवस्थेमुळे त्यांची काही बाबतीत गैरसोयही होते. सभासदांसाठी दीड खोल्यांची घरे बांधतांना, अविवाहितांना दीड खोली लागत नसल्यामुळे, त्यांची नव्या घरात सोय करायची नाही असे किबुट्झने ठरविले. याबाबत एक अविवाहित स्त्री अतिशय कडवटपणाने म्हणाली, "माझं पेन्शन मिळवायला तरी मला लग्न करावं लागेलसं दिसतं."

असतो असे प्रौढ स्त्रीपुरुष आणि लैंगिक संबंध असलेल्या जोडप्याची एक किंवा अनेक औरस वा दत्तक मुले यांचा त्यात समावेश होतो.[५]

कुटुंबातील प्रौढ आणि मुले यांचे परस्परसंबंध वर्णन करताना मुरडॉक म्हणतो की मुलांची " शारीरिक निगा " आणि " समाजाचे घटक म्हणून त्यांच्यावर संस्कार करणे " या प्रौढाच्या दोन अत्यंत महत्त्वाच्या जबाबदाऱ्या समजल्या जातात. दुसऱ्या जबाबदारीबद्दल तो लिहितो :

" मुलांच्या शिक्षणाचा आणि सामाजिक संस्करणाचा भार प्रत्येक ठिकाणी मुख्यतः विभक्त कुटुंबावरच पडतो. इतर कोणत्याही एका गोष्टीपेक्षा, शिक्षण आणि सामाजिकीकरण यांची सामूहिक जबाबदारी हेच कार्य कुटुंबसंस्थेतील निरनिराळी नाती दृढपणे एकत्र ठेवण्यास कारण होते.[६]

किबुट्झ " कुटुंब " म्हणजे " ज्यांचे लैंगिक संबंध समाजाने मान्य केले आहेत " आणि ज्यांची " स्वतःची अगर दत्तक मुले " आहेत असे दोन प्रौढ स्त्रीपुरुष एवढ्याचपुरती वरची व्याख्या त्याला लागू होईल. आपण आधीच पाहिले आहे की त्यात आर्थिक सहकार्याचा अंतर्भाव होत नाही किंवा समान वास्तव्याचाही अंतर्भाव होत नाही, कारण मुले आपल्या स्वतंत्र निवासात राहातात. शिवाय, ह्या " कुटुंबा " ला शिक्षणाचे आणि सामाजिक संस्करणाचे काम नसते. कारण " सामूहिक शिक्षणा'चा एक भाग म्हणून हे काम सामूहिक वसतिगृहातील " परिचारिका " आणि शिक्षक यांच्याकडे सोपविलेले असते. पित्याच्या " पितृसत्ताक " अधिकाराला आणि स्त्रीच्या " दास्या "ला असलेल्या विरोधातून ही शैक्षणिक व्यवस्था उगम पावली.

मुलांचे वडिलांवरील " अवलंबन " आणि " पित्याचे अधिकार " कमी होण्याचा एक मार्ग म्हणजे मुलाला वडिलांपासून शरीरानेच दूर ठेवणे आणि त्याला दुसऱ्या कुणा व्यक्तीच्या हवाली करणे. ज्यात पित्याऐवजी ( किंवा मातेऐवजी ) प्रशिक्षित " परिचारिका " आणि शिक्षक हेच मुलाचे संगोपन करतात अशी मुलांची वसतिगृहे स्थापन करून किबुट्झने हे कार्य साध्य केले आहे. संघाचे शैक्षणिक नियतकालिक सांगते :

कुटुंबसंस्थेचा आर्थिक पायाच उखडून टाकल्यामुळे तीत जे बदल झाले आहेत त्यामुळे किबुट्झ समाजात स्त्री आणि पुरुष यांचे स्थानच बदलले आहे आणि त्याचबरोबर माता आणि पिता यांचे कुटुंबातले स्थानही बदलले आहे. हा बदल प्रकर्षाने घडून आला आहे तो पित्याच्या बाबतीत, कारण त्याची पुरुषी सत्ता ज्यांतून उगम पावते ते ते सर्व विशेष अधिकार किबुट्झने संपुष्टात आणले आहेत.

बापाला मुलाचे संगोपन करावे लागत नाही एवढेच नव्हे तर त्याला मुलाच्या बाबतीत कोणतीच विशेष जबाबदारी उरलेली नाही. संबंध किबुट्झकडूनच मुलाचे

५. तत्रैव, पृ. ९
६. तत्रैव, पृ. १०

पालनपोषण होते. त्याला त्याचे अन्न वसतिगृहाच्या जेवणघरातून मिळते, त्याचे कपडे त्याला वसतिगृहाच्या भांडारातून मिळतात, वैद्यकीय मदत दवाखान्यातून मिळते आणि तो राहतोही वसतिगृहातच. हे धोरण हेतुपूर्वकच अनुसरलेले आहे कारण त्याचा उद्देश मुलाची वडिलांवरील आर्थिक परावलंबनाची भावना नाहीशी करणे हा आहे. किबुट्झच्या समजुतीप्रमाणे बूर्झ्वा समाजातील पितृसत्तेचे सर्वांत महत्त्वाचे मूळ मुलांच्या या आर्थिक परावलंबनात आहे. फेडरेशनने प्रसिद्ध केलेल्या शिक्षणावरच्या अधिकृत पुस्तकात स्पष्ट म्हटले आहे :

> सामूहिक शिक्षणाच्या पद्धतीचा एक परिणाम असा झाला आहे की पितृसत्तेपासून मुलांची मुक्तता झाली आहे …… पितृसत्ताक कुटुंबात मूल आर्थिकदृष्ट्या आणि कायद्याने पित्यावर, तो आपले पालनपोषण करणारा म्हणून आणि एकूण "घराचा धनी" म्हणून, अवलंबून असते; किबुट्झमध्ये असे नसते. कोणत्याही वस्तुनिष्ठ अर्थाने मूल समग्र किबुट्झ सोडून दुसऱ्या कशावरही अवलंबून नसते.

याच पुस्तकात पुढे असे म्हटले आहे की :

> … किबुट्झमधल्या कुटुंबाची आर्थिक घडणच अशी आहे की तीमुळे पितृसत्तेला पूर्णविराम मिळाला आहे … सर्वसामान्य समाजात "भरणपोषणकर्ता" म्हणून बापाला जे उच्च अधिकार प्राप्त झालेले असतात ते येथे त्याला मिळत नाहीत.

अशा रीतीने पित्याच्या सत्तेचे आसनच नाहीसे करून रूढ कुटुंबसंस्था क्षीण करण्याचा किबुट्झचा हेतू होता आणि त्यात त्याला यश आले आहे.

परंतु किबुट्झने कुटुंबातील स्त्रीची भूमिकाही बदलण्याचा यत्न केला आहे. आपण पूर्वीच पाहिले आहे की संस्थापक स्त्रीमुक्तिवादी होते. त्यांच्या स्त्रीमुक्तिवादाच्या तत्त्वज्ञानाची एक बाजू वर विचारात घेऊन झालीच आहे. ती म्हणजे, स्त्रीची पुरुषावर व पत्नीची पतीवर "अवलंबून" असण्याची रूढी नाहीशी करणे. पण या स्त्रीमुक्तीच्या तत्त्वज्ञानाला दुसरीही एक बाजू आहे आणि कुटुंबसंस्थेच्या स्वरूपाशी तिचाच विशेष जवळचा संबंध आहे. ती बाजू म्हणजे जिला "स्त्रीची जीवशास्त्रीय शोकांतिका" ("बॉयालॉजिकल ट्रॅजिडी ऑफ वूमन") असे म्हटले जाते तिचे परिणाम टाळण्याची इच्छा. स्त्रीला अपत्यजन्म आणि अपत्यसंगोपन यांची जबाबदारी घेणे भाग असल्याने तिला सांस्कृतिक, राजकीय वा कलात्मक आविष्काराला संधीच मिळत नाही. या वेळ घालविणाऱ्या जबाबदाऱ्यांतून आणि धुणीभांडी, स्वयपाक असल्या इतर घरकामातून तिची सुटका झाली तर तिला इतर विषयांत लक्ष घालण्यास सवड मिळेल व ती पुरुषाच्या बरोबरीला येईल. हेच दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर "घरकामाच्या जोखडातून स्त्रीला मुक्त करणे" हाच या समस्येचा गाभा होता. सामूहिक समाजसंस्करणाच्या पद्धतीचा अंगीकार केला म्हणजे मुले वाढविण्याच्या व्यापातून स्त्रीची सुटका करण्याचे ध्येय अंशतः तरी साध्य होईल असा त्यांचा विश्वास होता आणि व्यावसायिक परिचारिकेकडून मुलांचे संगोपन होऊ लागले तर

स्त्रीची केवळ त्याच एका जबाबदारीतून मोकळीक होईल असे नव्हे तर तिची इतरही घरगुती कामे कमी होतील कारण मग तिला आणि तिच्या नवऱ्याला राहण्यासाठी जागाही कमी लागेल, असेही त्यांना वाटत होते.

मात्र स्त्रीला संपूर्ण " स्वातंत्र्य " मिळायला हवे असेल तर केवळ हेच नव्हे तर तिच्या मागचे सगळे घरकाम काढून टाकले पाहिजे. किबुट्झ मधल्या वेगवेगळ्या सामायिक संस्थांमार्फत हे ध्येय साध्य केले गेले आहे. सामायिक धुलाईघर, स्वयंपाकघर आणि जेवणघर यामुळे धुणे, स्वयंपाक, भांडी घासणे असल्या कामातून तिची सुटका झाली आहे. अशा प्रकारे, स्त्रीच्या मागचा मुलांच्या संगोपनाचा आणि रूढीने ठरलेल्या घरकामाचाही व्याप संपला आहे.

थोडक्यात, रूढ कुटुंबसंस्थेची बहुतेक वैशिष्ट्ये आणि कार्ये नाहीशी करून टाकण्यात किबुट्झला यश आले आहे. मुलांच्या शारीरिक आरोग्याची किंवा त्यांच्या सामाजिक संस्करणाची जबाबदारी आई-बापांवर जवळ जवळ नसतेच; जोडीदारांच्या परस्पर-संबंधात आर्थिक सहकार्याचा अंतर्भाव नसतो; आणि आईबाप व मुले यांचे राहण्याचे ठिकाण एकत्र असत नाही. फक्त एवढ्याच गोष्टी विचारात घेतल्या तरीसुद्धा असे म्हणता येईल की, मुरडॉकने केलेल्या व्याख्येच्या अर्थाची कुटुंबसंस्था किबुट्झमध्ये अस्तित्वात नाही. मात्र हे लक्षात ठेवले पाहिजे की कुटुंबसंस्था तिच्या रचनात्मक आणि कार्यकारी अर्थाने अस्तित्वात नसली तरी मानसशास्त्रीय अर्थाने ती अस्तित्वात आहेच. आईबाप व मुले एकत्र राहात नसली तरी त्यांच्यात एकमेकांबद्दल फार जिव्हाळा असतो आणि त्यांचा एक निराळा व ओळखण्याजोगा गट बनतो. इतकेच नव्हे तर सभासद स्वतःच अशा गटाचा "कुटुंब " ( मिश्पाहा ) म्हणून उल्लेख करतात.[७]

किबुट्झच्या ज्या एका वैशिष्ट्याबाबत सर्व निरीक्षकांचे एकमत आहे ते म्हणजे सर्वच किबुट्झमधील आईबापांना आपल्या मुलांबद्दल वाटणारे प्रेम. इतर किबुट्झप्रमाणे किर्यात येदिदिम हा सुद्धा मुलांना आपल्या जीविताचा केंद्रबिंदू मानणारा एक समाज आहे. इतर कशाहीपेक्षा मुलांचे मोल अधिक असते. किबुट्झचे निरीक्षण करताना आणि आईबापांच्या मुलाखती घेताना असे स्पष्ट ध्यानात आले की मुलांसाठी कोणत्याही पराकोटीच्या त्यागाला ते तयार होतील. मुलांना चांगल्या विटांची वसतिगृहे मिळावीत म्हणून सुमार दर्जाच्या घरात राहायला प्रौढांची तयारी असते. किबुट्झच्या सर्व प्रौढांसाठी मिळून फक्त दोन स्नानगृहे आणि दोन शौचकूप –एक पुरुषांसाठी व एक स्त्रियांसाठी–असतात. उलट मुलांच्या प्रत्येक वसतिगृहाला स्वतंत्र स्नानगृह व शौचकूप असतो. मुलांना मांसाहार व प्रत्येक जेवणात मिष्टान्न मिळावे म्हणून प्रौढ साधा आहार व अगदी क्वचित मिष्टान्न घेतात. मोठी माणसे शेतावर

---

७. ह्या समग्र प्रश्नाचे विस्तृत विवेचन आणि त्याचा उलगडा करण्याचा प्रयत्न यासाठी Spiro, " Is the Family Universal ? " हा लेख पहा.

खूप वेळ काम करतात आणि त्यांची वार्षिक सुटीही लहान असते, मुलांना मात्र उन्हाळ्याची तीन महिन्यांची भरपूर सुटी असते. प्रशालेतल्या वरच्या वर्गातल्या विद्यार्थ्यांनासुद्धा दिवसाचे थोडेच तास काम करावे लागते, त्यांना प्रशालेचे शिक्षण मिळते व त्या शिक्षणात अनेक बाह्य कार्यक्रमांचा अंतर्भाव होतो. आईबापांना संध्याकाळी उशीरापर्यंत मुलांबरोबर वेळ घालविता यावा म्हणून उन्हाळ्यातसुद्धा किबुट्झचे काम भर दुपारी उन्हात चालते. एरव्ही दुपारची झोप घेऊन उन्हाचा कडकपणा कमी झाल्यावर संध्याकाळच्या कामाला त्यांना सुरुवात करता आली असती. पण तसे ते करीत नाहीत.

किर्यात येदिदिमची आपल्या मुलांकडे बघण्याची ही सर्वसाधारण वृत्ती म्हणजे आईबापांच्या आपल्या स्वतःच्या मुलांबद्दल असणाऱ्या वृत्तीचेच प्रतिबिंब आहे. इतर समाजांतील आईबापांना आपल्या मुलांबाबत ज्या अनेक जबाबदाऱ्या असतात त्या खरे म्हणजे ह्या आईबापांना नसतात. परंतु मातापित्यांचे मुलांमधले पाश कमी होण्याऐवजी किबुट्झमधल्या " सामूहिक शिक्षण " पद्धतीने ते अधिकच बळकट केले आहेत. बहुतेक आईबाप संध्याकाळी मुलांना भेटण्याच्या वेळाकडे दिवसभर डोळे लावून बसलेले असतात. कामावरून परततात ( हिवाळ्यात ४–३० वाजता व उन्हाळ्यात ५–३० वाजता ) आईबाप स्नान करतात, कपडे बदलतात आणि मुलांना भेटण्यासाठी मुलांच्या खोल्यांकडे–ती आधीच आईवडिलांच्या खोल्यात आलेली नसतील तर–धाव घेतात. यानंतरच्या दोन तासांच्या अवधीचे वर्णन केवळ ' पवित्र ' या शब्दानेच करणे प्राप्त आहे. कारण हा वेळ सर्वस्वी मुलांसाठीच असतो. इतर कोणतीही गोष्ट या भेटीच्या आड येणार नाही. किबुट्झमधली सर्व कामे या " मुलांच्या वेळात " जागच्या जागी थांबलेली असतात. एकाने विनोदाने म्हटले आहे की सीमेवरच्या अरब देशाने जर या वेळात किबुट्झवर हल्ला केला तर त्याला सहज विजय मिळू शकेल कारण सभासदांना आपल्या मुलांपासून कोणी बाजूला करू शकेल हे असंभव-नीय आहे. उन्हाळ्यात आईवडील मुलांबरोबर गवतावर बागडतात, खेळ खेळतात, प्राणी बघायला जातात, शेतांतून हिंडतात. हिवाळ्यात त्यांना आपल्या खोल्यांतच राहावे लागते त्यामुळे बैठे खेळ, वाचन, गाणी ऐकणे इत्यादींत किंवा गप्पांत वेळ घालवतात. मुलांची आपल्या खोल्यांतून परत जायची वेळ झाली की आईवडील त्यांच्याबरोबर त्यांच्या खोल्यांपर्यंत जातात आणि शेवटचा निरोप घेणे दोघांनाही अतिशय जड जाते. मुले आणि आईबाप रोज संध्याकाळीच एकत्र असतात असे नाही तर शनिवारी व सुटीच्या दिवशीही एकत्र येतात.

आईवडील मुलांना भेटायला जेवढे अधीर झालेले असतात तेवढीच मुलेही आईवडिलांना भेटायला अधीर झालेली असतात. यात काहीच आश्चर्य नाही. वसति-गृहात मुलांना त्यांच्या परिचारिकेची माया मिळते खरी पण ती इतर मुलांबरोबर

विभागून मिळते आणि त्यांना तिची शिस्तही पाळावी लागते. इतकेच नव्हे तर वसतिगृहाची ठराविक दिनचर्या आणि तिचे नियम यांचे पालन त्यांना करावे लागते. उलट, आईवडिलांच्या खोलीत मात्र आईवडील सर्वस्वी त्यांचे असतात–( बहुतेक मुलांना फारतर एकदोन भावंडे असतात ) – तेथे त्यांना कसलीही शिस्त नसते, आणि त्यांचे इतके लाड केले जातात की सभासद त्यांना " चिघळली " असे म्हणतात. त्यामुळेच मुले जेव्हा " माझी खोली " असे म्हणतात तेव्हा त्यांच्या मनात आई-वडिलांची खोली असते, आणि आपल्या समाजातील मुलांप्रमाणेच ती आईवडिलांच्या खऱ्या वा कल्पित, कर्तृत्वाबद्दल व मोठेपणाबद्दल प्रौढी मिळवितात.[८]

---

८. ज्या अभ्यासकांना नात्याच्या संबंधांचा तुलनात्मक अभ्यास करायचा आहे त्यांना किर्यात येदिदिमचा सध्या तरी फारसा उपयोग नाही. विभक्त कुटुंबातले सोडले तर इतर प्रकारचे नातेवाईक येथे इतके कमी आहेत की त्यावरून आप्त-संबंधांच्या रचनेविषयी सर्वसामान्य निष्कर्ष काढता येणार नाहीत. पाश्चात्त्य समाजातील आप्तसंबंधांत समाविष्ट होणाऱ्या निरनिराळ्या नातलगांना त्यांचे संबंध दर्शविणाऱ्या ज्या संज्ञा असतात त्याच येथेही वापरल्या जातात. किबुट्झ ज्या मोठ्या इस्रायली समाजाचा भाग आहे त्यातील संज्ञा आणि या संज्ञा एकच आहेत. किर्यात येदिदिममध्ये यांपैकी काही संज्ञा फक्त संबोधनासाठी, काही निर्देश करण्यासाठी आणि काही आप्तसंबंधाबाहेरच्या व्यक्तींच्या उल्लेखासाठी वापरल्या जातात. नेमके सांगायचे तर आईवडील यांना समानार्थी शब्द ( *अब्बा, इम्मा* ) हे हाक मारण्या-पुरतेच वापरतात आणि ते जनक किंवा दत्तक आई-वडिलांपुरते मर्यादित असतात. कधीकधी मात्र परिचारिकेला " आई " म्हणून एखादे लहान मूल हाक मारते पण अर्थात त्यात आप्तवाचक संज्ञेचा अजाणतेपणी अतिदेश झालेला असतो. अल्पवयीन आणि प्रौढ " साब्रा " ह्या आईवडीलवाचक संज्ञा निर्देशासाठी व संबोधनासाठी अशा दोन्ही प्रकारे वापरतात; मात्र बहुधा प्रौढ साब्रा आपल्या आईवडिलांची विशेषनामेच त्यांचा उल्लेख करताना घेतात.

मुलगा आणि मुलगी यांना समानार्थी शब्द ( *बेन, बात* ) फक्त स्वतःच्या अगर दत्तक मुलांपुरतेच वापरतात, मात्र अशा वेळी अमुक एका व्यक्तीचा मुलगा किंवा मुलगी असा संदर्भ मनात असतो आणि या संज्ञा केवळ निर्देशासाठी वापरण्यात येतात. सर्वच किबुट्झ मुलांचा निर्देश करताना याच संज्ञा वापरतो पण त्या वेळी अमुक व्यक्तीची मुले असा अर्थ मनात नसतो किंवा असलाच तर सर्व किबुट्झची असा असतो.

" अंकल " आणि " आँट " या शब्दांनी पाश्चात्त्य समाजातील आप्तसंबंधां-तील ज्या नातेवाइकांचा निर्देश होतो त्याच सर्वांचा तत्समानार्थी शब्दांनी ( *डॉड, डॉड्डा* ) किबुट्झमध्येही होतो. पण संबोधन किंवा निर्देश या दोन्ही कारणांस्तव ते

( पान नं. १०० पहा. )

वर वर्णन केलेले आईवडील-मूल हे दृढ नाते मुले प्रशालेमध्ये प्रवेश करीपर्यंत टिकून राहते. नंतर ते पुष्कळ कमी होते, तर काहींच्या बाबतीत अजिबात नाहीसेही होते. इतक्या काळपर्यन्तचे हे घट्ट मायापाश कमी होण्याचा हा प्रकार बहुधा नेहमी एकाच बाजूने (म्हणजे मुलांकडून) घडतो, त्यात आईवडिलांचा वाटा नसतो. मुले प्रशालेत गेली की ती क्वचितच भेटतात आणि जेव्हा ती भेटतात तेव्हा त्यांच्यात आणि आपणांत फारच थोड्या गोष्टी समान अशा उरलेल्या असतात अशी आई-बापांची तक्रार असते. हा बदल घडून येण्याची कारणे संमिश्र स्वरूपाची असतात. त्यांची कारणमीमांसा यानंतरच्या एका ग्रंथात केली जाईल.

---

( पान नं. ९९ वरून चालू. )

क्वचितच वापरले जातात. संबोधन आणि निर्देश यांसाठी विशेषनामे वापरली जातात. उलट, हेच शब्द मात्र पुष्कळदा अपरिचित प्रौढांचा निर्देश करतानाही वापरतात.

पुतण्या, भाचा, पुतणी, भाची यांना समानार्थक संज्ञा (*बेन आह*, *बेन आहॉत*, *बात आह*, *बात आहॉत*) संबोधनासाठी केव्हाही वापरण्यात येत नाहीत, निर्देशासाठीही क्वचितच वापरण्यात येतात. त्यांचा उपयोग नाते स्पष्ट करण्या-पुरताच असतो.

भावंडांसाठी असणाऱ्या समानार्थक संज्ञा (*आह*–भाऊ *आहॉत*–बहीण) संबोधनासाठी कधी वापरीत नाहीत. फक्त नाते स्पष्ट करण्यापुरताच त्यांचा उपयोग करतात. इंग्रजीतील " कझिन " या शब्दासाठी असलेल्या संज्ञा (*बेन*-*डॉड* अंकलचा मुलगा, *बेन*–*डॉड्डा* आँटचा मुलगा, *बात*–*डॉड* अंकलची मुलगी, *बात*–*डॉड्डा* आँटची मुलगी) कुठल्याही संदर्भात वापरल्या जात नाहीत.

आजी-आजोबा यांना समानार्थी संज्ञा (*साबा*–आजोबा, *साव्ता*–आजी) यांनी सख्ख्या आजीआजोबांचा निर्देश होतो आणि विशेषतः लहान मुले तरी संबोधन आणि निर्देश या दोन्हींसाठी त्याचा उपयोग करतात. आप्त-संबंधाच्या पलीकडे कोठल्याही वृद्ध व्यक्तीसाठी हे शब्द वापरले जाऊ शकतात. शिवाय, संस्थापकांच्या आणि किबुट्झमध्ये नंतर प्रवेश केलेल्या मध्यमवयीन साथींच्या आईवडिलांचा निर्देशही सगळेजण आजोबा आणि आजी या संज्ञांनीच करतात. मात्र अशा वेळी त्यांच्या विशेषनामांना जोडून हे शब्द वापरले जातात. उदाहरणार्थ, साबा आर्ये (आर्ये आजोबा) किंवा साबता मिर्यम (मिर्यम आजी). सर्वच मुले हे शब्द संबोधना-साठी वापरतात.

नातवंडांसाठी समानार्थक संज्ञा (*नेहेद*–नातू, *नेहदा*–नात) निर्देशासाठी वापरतात पण संबोधनासाठी नाही. सर्वसाधारणपणे लहान मुलांना हाक मारताना इतर सर्वजण आणि मोठी मुलेसुद्धा त्यांना *हामुदी* (लाडक्या, सोन्या इ.) म्हणून संबोधतात. विशेषनामे वापरीत नाहीत.

किबुट्झची " सामूहिक शिक्षण " म्हणून ओळखली जाणारी शिक्षणपद्धती हा अनेक घटकांचा संयुक्त परिपाक आहे. कार्ल ब्ल्यूहरच्या प्रभावाखाली युरोपातील युवक चळवळीने सामूहिक शिक्षणपद्धतीचे प्रयोग नव्हे तरी तत्त्वज्ञान आधीच विकसित केले होते. किबुट्झचे स्त्रीमुक्तीचे ध्येय आणि पारंपरिक पितृसत्ताक आणि पतिसत्ताक कुटुंबाला असलेला त्याचा विरोध यांच्याशी ह्या तत्त्वज्ञानाची सांगड घातली गेली. संस्थापकांनी देशात प्रथम प्रवेश केला तेव्हा तत्त्वज्ञान आणि ध्येयनिष्ठा यांची प्रत्यक्ष व्यावहारिक गरजेशी गाठ बांधली गेली. आर्थिकदृष्ट्या टिकाव लागायचा तर त्यांना आपले सगळेच्या सगळे मनुष्यबळ उत्पादक कार्याला लावणे भाग होते हे स्पष्ट आहे. ज्या स्त्रिया एरवी घरकामात अडकून पडल्या असत्या त्यांना सामूहिक शिक्षणपद्धतीमुळे शेतावर काम करणे शक्य झाले. हा अभिनव शैक्षणिक उपक्रम अमलात आणण्यामागे असलेले उद्देश हे सारांशाने असे होते.

ही शिक्षणपद्धती निर्माण झाल्यावर शिक्षणतज्ज्ञांच्या असे ध्यानात आले की तिच्या निर्मितिमागचे हेतू काहीही असले तरी तिचे प्रस्तुतचे कार्य किबुट्झच्या सातत्याच्या दृष्टीने आणि त्यातल्या मुलांमध्ये काही इष्ट गुणांची जोपासना होण्याच्या दृष्टीने अगदी निर्णायक महत्त्वाचे आहे. फेडरेशनचा एक शिक्षणतज्ज्ञ लिहितो,

'सामूहिक शिक्षणपद्धती' सामूहिक समाजातून अपरिहार्यपणे उदय पावते.... मानवी संस्थाजीवन व वर्तन यात बदल करू पाहणाऱ्या क्रांतिकारी चळवळींच्या साखळी-मधला तो एक दुवा आहे...तिचे ऐतिहासिक कार्य म्हणजे उगवत्या पिढ्यांना किबुट्झचा ध्येयवाद संक्रामित करणे आणि हा ध्येयवाद प्रत्यक्षात अमलात आणील असा एक नवीन प्रकारचा मानव घडविणे.

या शिक्षणपद्धतीत ज्या " नव्या मानवा "ची घडण व्हावी असे किबुट्झला वाटते त्याची वैशिष्ट्ये तज्ज्ञांच्या मते पुढील प्रकारची असतील.

... ( तो ) किबुट्झचा क्रियाशील आणि जबाबदार सभासद असेल. तो विरोध-विकासवादी तत्त्वज्ञानाचा उपासक, स्वजननिष्ठ आणि किबुट्झच्या इतिहासात पारंगत असेल. मातृभूमीशी एकनिष्ठ आणि तिच्या रक्षणासाठी सिद्ध असेल. कामगार चळवळ, समाजवादी राष्ट्र आणि मानवी बंधुभाव यांवर त्याची श्रद्धा असेल. देशाचे व जगाचे प्रश्न यांची त्याला पुरेपूर माहिती असेल व त्यांच्यामध्ये घडणाऱ्या घटनांबाबत तो जागरूक असेल. विज्ञानाची मूलतत्त्वे त्याला पूर्ण अवगत असतील आणि त्याची सौंदर्याभिरुची सुसंस्कृत असेल.

नवजात अर्भक चार दिवसांचे असते, म्हणजेच जेव्हा ते हॉस्पिटलमधून आईबरोबर परत येते, तेव्हापासूनच किबुट्झच्या शिक्षणपद्धतीचे संस्कार त्याच्यावर होऊ लागतात. त्यावेळी ते किबुट्झच्या " अर्भकगृहा " त प्रवेश करते आणि किबुट्झचे नव्हे पण त्यातील " बालक समाजा "चे अधिकृत सभासद बनते. या समाजात ते त्याचे प्रशालेय शिक्षण पूर्ण होऊन किबुट्झचा सभासद म्हणून त्याची निवड होईपर्यंत राहते. या बाबतीत किर्यात येदिदिमचे साम्य एखाद्या धार्मिक पंथाशी आहे कारण

किबुट्झमध्ये व्यक्तीला सभासदत्वाचा जन्मसिद्ध हक्क नसतो. उलट संमतीचे वय झाल्यावर व्यक्तीला किबुट्झची मूल्ये आणि जीवनमार्ग पटले, तिने ते आपखुषीने व जाणीवपूर्वक पत्करले तर गट तिला बहाल करतो असा तो एक विशेष अधिकार आहे. त्यामुळे मुले किर्यात येदिदिममध्ये राहत असली आणि किर्यात येदिदिमने वाढविलेली असली तरी, त्यांची उमेदवारी जाहीर होऊन सभासद म्हणून त्यांची औपचारिक निवड होईपर्यंत त्यांना किबुट्झचे सभासद म्हणून गणले जात नाही.

"अर्भकगृहा"त चार दिवसांपासून एक वर्षापर्यंतच्या वयाची जास्तीत जास्त सोळा अर्भके असतात. ती एका "मुख्य परिचारिके"च्या ताब्यात असतात. ( **मेतापेलेत**–परिचारिका–याचा शब्दशः अर्थ काळजी घेणारी असा आहे. ) तिला मदतनीस म्हणून दोन पूर्णवेळ "परिचारिका" असतात. किर्यात येदिदिममधल्या मुलांच्या या "परिचारिका" व्यावसायिक वैद्यकीय शिक्षण घेतलेल्या परिचारिका नसतात तर ज्यांना विशेष प्रकारचे प्रशिक्षण मिळाले आहे अशा किबुट्झच्या स्त्री सभासद असतात. ज्या वयगटाची मुले त्यांच्याकडे सोपविलेली असतात त्या मुलांचे संगोपन आणि वाढ नीट व्हावी यासाठी या स्त्रियांना शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र आणि वैद्यकशास्त्र यातील काही विषयांचे शिक्षण पद्धतशीर रीतीने मिळालेले असते.

याशिवाय, सुरुवातीच्या या अभ्यासक्रमानंतर संघाने चालविलेल्या शिक्षण-केंद्रावर छोटे अभ्यासक्रम, उजळणीवर्ग इत्यादींसाठी या परिचारिकांना वेळोवेळी पाठविले जाते. अर्भकगृहातल्या दोन परिचारिकांचा अपवाद सोडल्यास बाकीच्यांना अगदीच थोडे वैद्यकीय शिक्षण मिळालेले आहे किंवा मुळीच मिळालेले नाही.

अर्भके सहा महिन्यांची होईपर्यंत त्यांना आईवडिलांच्या खोल्यात न्यायचे नसते त्यामुळे दुधाखेरीज त्यांच्या जवळजवळ सर्वच शारीरिक गरजा आणि इतर बहुतेक गरजा मुख्यतः परिचारिकांकडून भागविल्या जातात. साधारणपणे आठव्या महिन्यापर्यंत मुलांची अंगावर पिण्याची सवय हळूहळू सुटलेली असते, परंतु तोपर्यंत मुले मातेच्या दुधावरच वाढविली जातात आणि त्यांच्या पिण्याच्या वेळा ठरलेल्या असतात. या वेळापत्रकाप्रमाणे सुरुवातीला दिवसाकाठी सहा वेळा दूध पाजावे लागत असल्यामुळे या काळात मुलाची व आईची भेट दिवसाकाठी पुष्कळ वेळा होते. पुढे या वेळा हळूहळू कमी होत होत मुले अंगावरून सोडविली जातात. शिवाय पाजण्याच्या वेळी साधारण तासभर लागतो. पाजण्याआधी व नंतर बहुधा आई मुलाशी थोडा वेळ खेळते, त्याचे लंगोट बदलते, त्याला बिछान्यावर झोपविते. त्यामुळे किबुट्झमधल्या मुलाला आईचा सहवास कमी मिळतो असे नसून खाजगी घरांतून वाढणाऱ्या मुला-इतकाच मिळतो.

वडील दिवसभर कामावर असतात त्यामुळे फक्त संध्याकाळी भेटण्याच्या वेळातच काय तो त्यांचा मुलाशी संबंध येतो. या वेळात आणि शनिवारी भेटण्याच्या

वेळात जेव्हा आईवडील दोघेही मुलांना एकत्र भेटतात तेव्हा अर्भकगृह, पोर्च आणि हिरवळीच्या जागा मुलांशी खेळणाऱ्या आणि त्यांच्याबरोबर वागवणाऱ्या प्रौढ माणसांनी फुलून गेलेल्या असतात.

मूल सहा महिन्यांचे होते तेव्हा संध्याकाळी तासभर त्याला आईवडिलांच्या खोलीत नेण्यात येते. हा मुलाच्या आयुष्यातील पहिला महत्त्वाचा बदल. त्यानंतर दुसरा महत्त्वाचा बदल मुलाला एक वर्ष पूर्ण झाल्यावर ते अर्भकगृहातून "चालत्या" मुलांच्या (Toddlers) "शिशुगृहा"त जाते तेव्हा होतो. ही घटना त्याच्या आयुष्यात फार महत्त्वपूर्ण बदल करणारी ठरते कारण या वेळी एका नव्या वातावरणाशी, निदान एका नव्या परिचारिकेशी, त्याच्याहून वयाने जरा मोठ्या मुलांशी, एका नव्या दिनक्रमाशी व एका नव्या शिस्तीशी त्याला जमवून घ्यावे लागते. शिशुगृहात दोन परिचारिका आणि आठ मुले असतात. इथे मुलाला आपल्या-आपण दूध प्यायला व प्रातर्विधी करायला हलके हलके शिकविले जाते आणि सवंगड्यांबरोबर जमवून घेण्यासही ते शिकते. या वयात मूल संध्याकाळी दोन तास आईवडिलांच्या खोलीत राहू शकते. हा दोन तासांचा वेळ अगदी काटेकोर ठरविलेला नसतो; आईवडिलांची कामावरून येण्याची आणि मुलाची झोपेची वेळ यामध्ये मिळेल तेवढा वेळ इतकी त्याची मर्यादा असते. शिवाय, मुलाला आईवडिलांच्या खोलीत फक्त शनिवारीच नेण्यात येते असे नसून इतर दिवशीही त्यांना रिकामा वेळ असेल तेव्हा नेण्यात येते.

इतर मुलांच्या झोपण्याच्या खोल्यांत असते तशाच पद्धतीची व्यवस्था शिशु-गृहातही असते. फक्त त्या वयाच्या मुलांना सोईस्कर असे बिछाने, टेबले, खुर्च्या, भांडी इत्यादी सगळे काही छोटेखानी असते, शिवाय, इतर ठिकाणच्याप्रमाणे येथेही मुलांच्या गरजा नीटपणे भागतील अशीच सर्व व्यवस्था असते. मुले तेथेच झोपतात एवढेच नव्हे तर खाणे-खेळणे हेही सर्व तेथेच चालते. त्यामुळे, शालेय वयाच्या आतल्या मुलांसाठी बांधलेली प्रत्येक इमारत, एक किंवा अधिक झोपण्याच्या खोल्या, जेवणघर व खेळघर एकत्र, न्हाणीघर व कपडे करायची खोली, अशा सर्वसाधारण नमुन्याची असते. प्रत्येक वसतिगृहाच्या भोवती वयोगटाप्रमाणे खेळाच्या साधनांनी सुसज्ज अशी मोकळी जागा असते. नुकतेच चालायला लागलेल्या या मुलांच्या जागेला कुंपण असते, कारण परिचारिका सारखीच जवळ असेल असे नाही. कोणत्याही शेतावरती असणारे धोके येथेही असतातच आणि मुले तिकडे केव्हा जातील हे सांगता येत नाही.

क्वचित् शिशुशाळेत जाईपर्यंत शिशुगृहातील आठ मुलांचा गट एकाच परि-चारिकेच्या ताब्यात राहतो. त्यानंतर मात्र त्यांच्या इमारतीच बदलतात असे नव्हे तर त्यांच्या परिचारिकादेखील बदलतात. मात्र बहुधा असे घडते की मुले दोन ते तीन

वर्षांची होईपर्यंतच एका परिचारिकेच्या ताब्यात असतात. शिशुशाळेत गेल्यावर मात्र त्यांची पहिली परिचारिका जाऊन तिची जागा शिशुशाळेची शिक्षिका घेते. मुलांच्या शारीरिक आणि मानसिक गरजांची काळजी परिचारिका पूर्वीसारखीच घेत राहते, परंतु मुलांच्या सामाजिक आणि बौद्धिक वाढीकडे लक्ष पुरविण्याचे काम खास प्रशिक्षित शिक्षिकेकडे जाते. कधी कधी मुलांच्या चौथ्या आणि पाचव्या वर्षांच्या मध्ये मुलांच्या जीवनात आणखी एक महत्त्वाचा फरक होतो. यावेळी या मुलांचा गट शिशुशाळेत जातो. त्यांची राहण्याची इमारत बदलते, नवी परिचारिका किंवा शिक्षिका त्यांना मिळते आणि विशेष म्हणजे त्यांचा मूळचा आठांचा गट जाऊन एकदम सोळाजणांचा मोठा गट होतो. दोन शिशुगटांचा एक बालगट केल्यामुळे असे होते. हे एकीकरण ही मुलांच्या आयुष्यात फार महत्त्वाची घटना ठरते. कारण हा मोठा बनलेला गट प्रशालेय वयाचा होईपर्यंत एकत्र राहातो. हा गट ( कवुट्झा ) अनेक अर्थांनी मुलांचा अतिशय महत्त्वाचा सामाजिक गट असतो. तो केवळ दीर्घकाळ टिकतो म्हणूनच नव्हे तर त्यातल्या अंतर्गत परस्परसंबंधांचा घनिष्ठपणा आणि बाहुल्य यामुळेही तो महत्त्वाचा ठरतो.

मुले जेव्हा चालणाऱ्या मुलांच्या गृहातून ( म्ह. शिशुगृहातून ) शिशुशाळेत जातात तेव्हा त्यांच्या भावनिक व बौद्धिक पातळ्या खूपच बदललेल्या असतात. तरी-सुद्धा जिचा आपल्याला इथे विचार करायचा आहे ती त्यांच्या आयुष्याची संस्थात्मक बाजू मात्र बदललेली नसते. मुले गटांमधूनच राहात असल्यामुळे त्यांच्या जीवनक्रमाला गटाचे सदस्य म्हणून पुष्कळशी चाकोरी ठरवून देणे आवश्यक असते आणि मुलांच्या वेगवेगळ्या वसतिगृहांमधील दिनचर्या सारखीच नेमून दिलेली असते.

सगळी मुले सकाळी एकाच वेळी उठतात आणि न्याहारीच्या वेळेपर्यंत मुक्तपणे खेळतात. न्याहारीनंतर बहुधा संघटित असा गटाचा कार्यक्रम परिचारिकेच्या किंवा शिशुशाळेतील शिक्षिकेच्या देखरेखीखाली होतो आणि त्याचे स्वरूप मुलांच्या वयो-मानाला योग्य अशा प्रकारचे असते. हे कार्यक्रम विविध असतात : खेळ, कला ( चित्रकला, नाच, गाणी, शिल्प इ. ), शिक्षिकेने वाचून दाखविलेल्या किंवा सांगितलेल्या गोष्टी ऐकणे, शेतात फिरणे, पशूंच्या गोठ्यांमधून हिंडणे, वगैरे. सकाळच्या वेळात मध्ये पुन्हा मुले थोडासा खाऊ खातात आणि त्यानंतर पुन्हा ती मोकळेपणाने खेळू लागतात किंवा त्यांचा पहिला एकत्रित कार्यक्रम पुढे चालू होतो. दुपारच्या जेवणानंतर मुलांनी सुमारे दोन तास झोपले पाहिजे किंवा विश्रांती घेतली पाहिजे. झोपेतून उठल्यावर ती " चांगले कपडे " घालतात व त्यांना पुन्हा काहीतरी खायला देण्यात येते. उरलेली दुपार ती मनाला येईल तसे किंवा नियोजित खेळ खेळण्यात घालवितात. इतर दोन जेवणांप्रमाणेच संध्याकाळचे जेवण ( सपर ) सामुदायिक असते आणि त्या जेवणानंतर मुलांचे आईवडील त्यांना आपल्या खोल्यांत घेऊन जाण्यासाठी येतात. मुले जवळ जवळ दोन तास आईवडिलांजवळ असतात आणि त्यांची परतायची वेळ होते तेव्हा आईवडील त्यांना त्यांच्या

झोपण्याच्या जागेपर्यंत आणून पोचवितात. झोपण्यापूर्वी बहुधा मुलांना सीकरस्नान ( शॉवर ) घालतात. शिवाय दिवसा त्यांची आंघोळ झालेलीच असते. त्यानंतर मुलांची परिचारिका त्यांना अंथरुणात ठेवते, त्यांना एखादी गोष्ट सांगते किंवा गाणे म्हणून दाखविते, आणि मग दिवे घालवून टाकते. त्यानंतर सकाळ होईपर्यंत मुले एकटीच ठेवली जातात. फक्त वसतिगृहाचा रखवालदार ठराविक वेळी येऊन लक्ष ठेवून जातो.

दैनंदिन जीवनक्रमात मुले आणि मुली असे फारसे फरक केलेले आढळत नाहीत. ती एकाच खोलीत झोपतात, एकाच स्नानगृहात आंघोळी करतात आणि एकच शौचकूप वापरतात हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. त्यांच्या खेळांतही काही विशेष फरक असतात असे नाही.

आईवडिलांच्या भूमिका काय असतात याचे विवरण अगोदर करून झालेच आहे. आईवडिलांच्या जोडीला परिचारिका, शिशुगृहातल्या आणि शिशुशाळेतल्या शिक्षिका आणि त्याच्या केवुट्झामधले छोटे सहकारी ह्या व्यक्ती मुलांच्या आयुष्यात महत्त्वाच्या असल्याचे दिसते. बहुतेक सगळा वेळ परिचारिका आणि शिक्षिका यांच्या सहवासात जात असल्यामुळे मुलाला त्या सर्वार्थाने आईवडिलांच्या जागी असतात. मुलाच्या जवळजवळ सगळ्या शारीरिक इच्छा व गरजा त्याच भागवितात. त्याला जेवू घालतात, आंघोळ घालतात, कपडे करतात आणि आजारात त्याची शुश्रूषा करतात. मुलांना वाढविण्याचे काम त्यांच्याकडेच असल्यामुळे त्याच्या बहुतेक सामाजिक गरजाही त्याच भागवितात. भोवतालचा परिसर, निरनिराळी कौशल्ये, स्वतःच्या ( किबुट्झच्या ) संस्कृतीची मूल्ये, वागण्याच्या पद्धती आणि तंत्रे इत्यादींबद्दलचे सर्व ज्ञान या स्त्रियांकडूनच मुलांना मिळते. शिवाय मुलाला मानसशास्त्रीयदृष्ट्या त्याच महत्त्वाच्या व्यक्ती असल्याने त्याच्या भावनिक विकासातही त्यांचा मोठा वाटा असतो. परिचारिका आणि शिशुशाळा शिक्षिका याच त्याला शिस्त लावतात, त्याच्यावर बरीचशी बंधने घालतात, गरज भागविण्याची किंवा शारीरिक वेगांचा निचरा करण्याची साधने वापरायला प्रोत्साहन देतात किंवा शिकवितात, सगळा वेळ त्याला शाबासकी देत असतात किंवा शिक्षा करीत असतात, पसंती किंवा नापसंती दाखवीत असतात, त्याचे लाड करीत असतात, किंवा त्याच्यावर रागावत असतात.

मुलाच्या आयुष्यातील महत्त्वाच्या व्यक्तींचा दुसरा गट म्हणजे त्याचा केवुट्झा. मुलांचे जवळजवळ सगळे दैनंदिन कार्यक्रम इतरांच्या बरोबर होतात व अनुभवही इतरांबरोबर घेतले जातात; वस्तूही समवयस्कांबरोबर, स्वेच्छेने किंवा सक्तीने वाटून घ्याव्या लागतात. त्यामुळे मुलांची एकमेकांशी वागणूक द्विधा असते यात फारसे आश्चर्य नाही. एक अनुभव सर्वांनी मिळून घेण्यात विलक्षण आनंद असतो पण आपली आवडती परिचारिका दुसऱ्याकडे लक्ष द्यायला लागली, निद्रागृहातली

किंवा खेळातली एकुलती एक मोटार अगर एकुलते एक गिळेपिवळे पुस्तक दुसऱ्याने घेतले तर हिरमोडही होतो. ह्या प्रकारच्या वस्तूंची वाटणी मुले स्वेच्छेने अर्थातच करीत नाहीत; प्रौढांच्या सक्तीतून किंवा समजावणीतून ती होते. त्यातून वारंवार केवुट्झामध्ये जोरदार मारामाऱ्या व भांडणे होतात. ह्याचा परिणाम असा होतो की मुलाचे आईवडिलांविषयीचे बंध अधिक घट्ट होतात. कारण ( भावंड नसेल तर ) आईवडील ही एकच गोष्ट त्याची एकट्याची असते, कुणीही त्यात वाटेकरी नसतो. परंतु संध्याकाळी निद्रागृहात ती उत्साहाने परत येतात, आणि आत आल्याबरोबर आनंदाने एकमेकांना भेटतात. इतका वेळ आईवडील होते ते ठीक होते पण आता मात्र मित्रच हवेत. एकत्रित अनुभव घेण्याची इच्छा पुन्हा जागी होते हेच याचे कारण आहे.

वयाच्या पाच आणि सहा वर्षांच्या दरम्यान शिशुशाळेतील मुले नव्या वसतिगृहात जातात, तेथे त्यांचे पहिले औपचारिक बौद्धिक शिक्षण सुरू होते. त्यात वाचणे व लिहिणे समाविष्ट असते. या " संक्रमण वर्गा "त त्यांचे एक वर्ष पूर्ण झाल्यावर ती प्राथमिक शाळेत प्रवेश करण्यायोग्य होतात. शाळेची इमारत मोठी असून झोपण्याच्या जागांची व वर्गखोल्यांची सोय केलेली असते. केवळ आपल्याच ( सर्वसाधारण ) वयाच्या नव्हे तर सात ते बारा वर्षांपर्यंतच्या दुसऱ्या मुलांबरोबर एका इमारतीत राहण्याची मुलांना ही पहिलीच वेळ असते. प्रत्येक केवुट्झा म्हणजे सोळा मुलांचा वेगळा गट बनवतात. गटाला त्याची स्वतःची वेगळी शिक्षिका, वर्ग आणि झोपायची खोली असते. परंतु खाणेपिणे, खेळ आणि अभ्यासाव्यतिरिक्त इतर कार्यक्रम सगळे विद्यार्थी एकत्र करतात. म्हणून कायद्याच्या पाहिले तर या मुलांच्या " बालक समाजा " मध्ये फक्त त्यांचा केवुट्झाच नव्हे तर शाळेतल्या सगळ्या मुलांचा समावेश होतो. शाळेतल्या सर्व मुलांच्या गटाला हेव्हरा असे नाव आहे.

ह्या शाळेत प्रवेश ही मुलांच्या आयुष्यातील एक महत्त्वाची घटना असते, कारण गंभीर विषयांच्या औपचारिक अभ्यासाला येथून सुरुवात होते व त्यांचा परस्परसंबंध येणारा गट विस्तृत होतो, एवढेच नव्हे तर सामाजिक जबाबदारी व काम यांचीही मुलांना येथेच ओळख होते. ह्या शाळेत प्रवेश करीपर्यंत मुलांना काम असे नसतेच. त्यांच्या वसतिगृहाच्या मालकीची कोंबडीची पिले किंवा एखादे बदक असले तर शिक्षिकेसह त्याला खाऊ घालण्याचे काम मुले करतात एवढेच. पण एकदा मूल शाळेत आले की साधारणतः दिवसाकाठी एक तासभर काम करावे लागेल एवढी काही विशिष्ट जबाबदारी प्रत्येक मुलावर टाकली जाते. गाद्या घालणे, झोपण्याच्या व वर्गाच्या खोल्या साफ करणे, जेवणघरातील टेबले लावणे आणि शाळेच्या भाजीच्या वाफ्यात किंवा कोंबडी-बदकांच्या खुराड्यात काम करणे, अशा गोष्टी यात येतात.

वर्गातील वागणूक अनौपचारिक असते. शिक्षण " प्रॉजेक्ट " ( उपक्रम ) पद्धतीने दिले जाते व कोणता प्रॉजेक्ट अभ्यासाला घ्यायचा हे ठरविताना मुलांचे मतही लक्षात

घेतात. मुले शाळेत ज्या प्रमाणे परिचारिकांना नावानेच हाक मारतात तशीच शिक्षकांनाही मारतात व सबंध शिक्षण संपेपर्यंत ही पद्धत राहते. ह्या अनौपचारिकपणामुळे समतेचे वातावरण निर्माण होते व शिक्षणपद्धतीतही अनौपचारिकपणा येतो. परीक्षा नसतात की मार्क नसतात, त्यामुळे एका इयत्तेतून मुले आपोआप दुसऱ्या इयत्तेत जातात. अमेरिकन ग्रेड स्कूलसारखाच अभ्यासक्रम असतो.

मुले बारा वर्षांची होतात तेव्हा सहावी इयत्ता पूर्ण होते आणि मुलांच्या आयुष्यातले एक नवे पर्व–प्रशाळेत प्रवेश–सुरू होते. हे पर्व अनेक कारणांमुळे महत्त्वाचे ठरते. पहिले म्हणजे मुलांची वेगवेगळी वसतिगृहे असलेल्या लहानशा आवारातून अगदी वेगळ्या ठिकाणी मुले जातात, आणि हे ठिकाण किबुट्झच्या मुख्य वस्तीपासून जरासे दूर असते. त्यांचा सातआठ वर्षे एकत्र राहिलेला गट ( केवुट्झा ) आता विभागला जातो, इतर किबुट्झमधल्या आणि शहरातल्या मुलांशी त्यांची सरमिसळ होते व दोन किंवा तीन नवे गट तयार होतात. शिवाय त्यांच्या सामाजिक संस्करणाच्या शिक्षणात पुरुषांना प्रथमच महत्त्वाचे स्थान मिळते, आणि त्या मानाने स्त्रियांचे महत्त्व कमी होते. ग्रेड शाळेत सर्व शिक्षक व परिचारक स्त्रियाच असतात, इतकेच नव्हे तर, अजूनही मुलांना परिचारिका आईच्या जागी असतात, आणि त्यांचे मुलांशी नाते अत्यंत जिव्हाळ्याचे आणि विश्वासाचे असते. प्रशाळेत मात्र, झोपण्याच्या जागेची व्यवस्था बघणाऱ्या स्त्रिया यापेक्षा त्यांना अधिक महत्त्व नसते, आणि विशेष म्हणजे सगळे शिक्षक पुरुष असतात. परिचारिकेऐवजी मुलाच्या आयुष्यात आता महत्त्वाची जागा घेणारी व्यक्ती म्हणजे त्यांचा " संगोपक " ( **मेहानिक** ). संगोपक हा केवुट्झाचा वर्गशिक्षक असतो, तो मुख्य विषयांपैकी एक विषय शिकवतो, आणि बहुधा प्रशाळेतून मुले उत्तीर्ण होईपर्यंत केवुट्झाबरोबर राहतो. तो आपल्या केवुट्झाच्या सभासदांच्या फक्त बौद्धिक वाढीलाच जबाबदार असतो असे नसून, त्यांच्या सामाजिक आणि भावनिक स्वास्थ्याचीही जबाबदारी त्याच्यावर असते. त्यांच्या अडचणींची तो चर्चा करतो, गैरवर्तनाबद्दल त्यांना धारेवर धरतो आणि साधारणपणे " स्थानिक आईवडिलां"ची भूमिका सांभाळतो.

मुलांच्या प्रशाळेतील प्रवेशाबरोबरच सुरू होणारा चवथा महत्त्वाचा बदल म्हणजे कामाच्या स्वरूपात होणारा बदल. प्रशाळेच्या आवारात बागबगीचा करणे, भाजीपाला लावणे आणि स्वयंपाकघरातील कामे करणे यांच्या जोडीला दररोज त्यांना किबुट्झच्या अर्थव्यवस्थेतील जवळ जवळ प्रत्येक शाखेत काम करावे लागते. ज्या शाखेचे काम त्यांना सांगितलेले असेल त्या शाखेच्या प्रौढ सभासदांबरोबर विद्यार्थी दुपारी शेतावर जातात आणि त्यांच्या देखरेखीखाली काम करतात. ठराविक मुदतीने त्यांच्या कामाची पाळी बदलत असते त्यामुळे प्रत्येक विद्यार्थ्याला प्रशाळेचा पदवीधर होईपर्यंत किबुट्झच्या जवळ जवळ प्रत्येक शाखेत काम करण्याची संधी मिळालेली असते. या विस्तृत अनुभवाचा परिणाम असा होतो की विद्यार्थी जेव्हा किबुट्झचा सभासद

होतो तेव्हा अर्थव्यवस्थेच्या कोणत्या शाखेत काम करणे आपल्याला आवडेल हे त्याला कळून येते. सातव्या इयत्तेतील मुलांना एक ते दीड तास आणि बाराव्या इयत्तेतील मुलांना तीन तास अशा प्रकारे काम करावे लागते. प्रशाळेतील जवळ जवळ सगळ्या इतर कार्यक्रमांबाबत असते तशीच कामाचे वाटप करण्याबाबतही विद्यार्थ्यांकडेच संपूर्ण सत्ता असते. प्रौढांच्या किबुत्झसारखीच त्यांचीही एक कामाचे वाटप करणारी समिती असते आणि ही समिती प्रशाळेच्या जेवणघरात सर्व विद्यार्थ्यांच्या रोजच्या कामाचे तक्ते लावून ठेवते.

पाचवा महत्त्वाचा बदल म्हणजे किबुत्झ संघाच्या युवक "आंदोलना"त प्रवेश. मुलांच्या आईवडिलांनी युरोपात संघटित केलेली तीच ही चळवळ होय. आपण "नुसती शेतकऱ्यांची" मुले नाहीत ही वस्तुस्थिती मुलांच्या मनावर अगोदरच बिंबविलेली असते. वर्गातल्या चर्चांमधून, नाट्यप्रवेशांतून, शाळेच्या समारंभांतून, आणि इस्रायली सण व कामगारांचे उत्सव साजरे करताना समाजवादी आणि झिऑनवादी आदर्शवादाचे मुलांच्या मनावर संस्कार झालेले असतात. आता होते ते असे की त्यांना ध्येयवाद केवळ शिकविला जातो एवढेच नव्हे तर ते स्वतःच किबुत्झच्या ध्येयवादाला वाहून घेतलेल्या "आंदोलना"चे अधिकृत सभासद बनतात.

शेवटचा महत्त्वाचा बदल म्हणजे आता आपल्या आवडीनिवडी व गरजा प्रशाळेच्या वैविध्यपूर्ण जीवनातच भागविल्या जाऊ शकतात हे त्यांच्या लक्षात येते, आणि आपल्या आईवडिलांच्या खोल्यांकडे त्यांचा राबता कमी होतो.

किबुत्झचीच लहानशी प्रतिकृती अशी प्रशाळेची सामाजिक रचना असते. एक मंडळ व पुष्कळशा समित्या यांचा समावेश असलेले विद्यार्थिमंडळ हे विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमाबाहेरील सर्वच गोष्टींना जबाबदार असते व शिस्त राखण्याची जबाबदारीही त्यांच्याकडेच असते. विद्यार्थ्यांना पुष्कळच सत्ता असते–हकालपट्टी करण्याचा अधिकारही त्यात येतो. काही वर्षांपूर्वी एका मुलीच्या बाबतीत या विशेष अधिकाराचा वापर करण्यात आला होता.

बहिःशाल कार्यक्रम खूप आणि विविध प्रकारचे असतात, त्यात घोषपथक ( बँड ) वाद्यवृंद, आनंद मेळे, खेळ, अभ्यासगट, आंदोलन, मंडळाच्या सभा या सर्वांचा समावेश असतो. ज्यामुळे मुला-मुलींच्या जोड्या जमून त्या सामूहिक व्यवहारातून अलग होण्याचा संभव असतो अशा गोष्टी व प्रेमप्रकरणे यांच्याकडे किबुत्झ जरा डोळे वटारून बघतो हे मागे सांगितले आहेच. तरीसुद्धा मुलामुलींच्या जोड्या बनतातच आणि प्रणयक्रीडा सुरू होतेच; परंतु अशा गोष्टी किबुत्झमध्येच होतात, किंवा शिबिरसहलीमध्ये किंवा दूरवरच्या सहलीत होतात. "डेटिंग" म्हणजे एखाद्या मुलीला नृत्याला, सिनेमाला अगर मेजवानीला घेऊन जाणे हा प्रकार अस्तित्वात नाही. किबुत्झमध्ये सर्वांना लोकनृत्य आवडते पण चैनी समाजातले कोणतेच नृत्यप्रकार

तेथे नाहीत. डेटिंगच्या अभावाबरोबरच दुसरीही गोष्ट दिसते ती म्हणजे प्रसाधन न करणे, आणि मुलामुलींनी झकपक कपडे न घालणे. कोणत्याही प्रसंगी---वर्गात, कामावर, उत्सवप्रसंगी किंवा इतर कुठेही, दोघांचा पोशाख एकसारखा ठराविक असतो---अर्ध्या तुमानी व ब्लाऊझ. थंडीमध्ये मुली स्कर्ट्स् आणि मुले खाकी लांब तुमानी घालतात.

प्रशालेचा अभ्यासक्रम अगदी सखोल असतो आणि याबाबतीत तो अमेरिकन पब्लिक हायस्कूलपेक्षा युरोपमधील "जिमनॅशियम"शी अधिक जवळचा वाटतो. जरी विद्यार्थी शेवटी शेतकरी व कामगारच व्हायचे असले तरी त्यामानाने "तांत्रिक" विषय थोडेच असतात आणि "गृह-अर्थशास्त्र" तर नसतेच. चौरस मनोविकास करणारे शिक्षण आणि मानव्यविद्या---विशेषतः इतिहास, साहित्य, आणि गायन, चित्र इत्यादि कला---यांवर भर देण्यात येतो.

प्रशालेतून उत्तीर्ण झाल्यावर विद्यार्थी आपोआप किबुट्झच्या जीवनात प्रवेश करीत नाहीत. किर्यात येदिदिम हा स्वयंस्फूर्तीने बनलेला असल्याने सभासदत्व निवडणुकीने मिळतं. म्हणून असे ठरविण्यात आले आहे की सभासदांच्या मुलांना किबुट्झबाह्य समाजात राहण्याचा अनुभव येऊ द्यावा आणि नंतरच त्यांनी प्रवेशाकरिता आपली उमेदवारी जाहीर करावी. इस्रायलचे स्वतंत्र राज्य प्रस्थापित होण्यापूर्वी मुलांना एक वर्षभर शहरात काम करण्यासाठी पाठवीत पण प्रशालेतील सगळ्या पदवीधर विद्यार्थ्यांनी दोन वर्षे लष्करात काम केलेच पाहिजे असा नियम राष्ट्र स्थापनेनंतर झाला आहे. त्यानंतर ते आपली उमेदवारी जाहीर करतात. किबुट्झच्या सबंध इतिहासात एकाही मुलाने किबुट्झच्या बाहेर राहणे पसंत केलेले नाही आणि आपल्या मुलाला किबुट्झने सभासदत्व नाकारल्याचे एकही उदाहरण नाही. सभासदत्वाचा स्वीकार सर्व मुलांनी केला आहे. इतकेच नव्हे तर कितीतरी उदाहरणे अशी आहेत की प्रौढांनी किर्यात येदिदिममधून राजीनामे दिले पण त्यांची तरुण मुले प्रशालेतच राहिली आणि नंतर किर्यात येदिदिमची सभासद बनली.

सभासदत्व मिळाल्यानंतर या तरुण लोकांना त्यांच्या वडीलमंडळींसारखेच अधिकार आणि जबाबदाऱ्या असतात.

## सण-समारंभ

किर्यात येदिदिममधल्या समारंभांची विभागणी अनौपचारिक स्नेहसंमेलने किंवा मेजवान्या, आणि औपचारिक गट समारंभ अशी दोन प्रकारांत करता येईल. पहिल्याचे कार्य म्हणजे विशिष्ट व्यक्ती किंवा विशिष्ट गट यांचा सत्कार करणे. उदाहरणार्थ, प्रस्तुत लेखकाच्या किबुट्झमधल्या वास्तव्यात ज्या मेजवान्या झाल्या त्या अशा-- दोन वर्षांच्या रजेवर अमेरिकेत जाणाऱ्या एका सभासदाच्या

सन्मानार्थ, स्वतःच्या नव्या किबुदझची स्थापना करण्याकरिता किर्यात येदिदिम सोडून निघालेल्या एका तरुणांच्या गटाकरिता, किर्यात येदिदिममध्ये काम करत असलेल्या लष्करी गटाने आपले काम पूर्ण करीत आणले म्हणून त्यांच्याकरिता, प्रशाळेचे नवे पदवीधर किबुट्झचे सभासद म्हणून प्रवेश करणार होते त्यांच्यासाठी, आणि प्रस्तुत लेखक व त्याची पत्नी यांना निरोप देण्याच्या वेळी.

उलट, औपचारिक गट समारंभामध्ये गटाच्या मूल्यांचा आणि परंपरांचा उत्सवरूपाने आविष्कार केला जातो. त्यात किर्यात येदिदिमचा स्थापना-दिन आणि राष्ट्रीय, राजकीय व शेतीविषयक महत्त्वाचे सण अशांचा समावेश होतो. अर्थात् नेहमीचा "सबाथ" असतोच.

"धर्म" या शब्दाच्या रूढ अर्थाने किर्यात येदिदिम धार्मिकतेच्या विरुद्ध आहे. त्याच्या झिऑनवादी प्रेरणा राष्ट्रीय आणि सामाजिक आहेत, धार्मिक नाहीत आणि आपल्या संस्कृतीमधून ज्युडाइझमचे "धार्मिक" स्वरूप काढून टाकण्याचे त्याने सतत प्रयत्न केले आहेत. म्हणून, सबाथ आणि ज्यूधर्माचे इतर बरेचसे पारंपरिक उत्सव आणि सण साजरे केले जात असले तरी त्यांना आपल्या धर्मनिरपेक्ष दृष्टिकोणाला अनुरूप असा निराळा अर्थ त्यांनी दिला आहे.

सबाथ हा आठवड्यातला धार्मिक दिवस न मानता विश्रांतीचा दिवस म्हणून पाळला जातो. गाईंचे दूध काढणे, जनावरांची काळजी घेणे अशी जी कामे अगदी केलीच पाहिजेत ती सोडून इतर सर्व कामे शुक्रवारी संध्याकाळी थांबविण्यात येतात आणि रविवारी सकाळपर्यंत परत सुरू होत नाहीत. सबाथचा धार्मिक अर्थ नाहीसा केलेला असला तरी अद्याप त्याचे पारंपारिक उत्सवी स्वरूप कायम आहे. आठवड्यातील इतर दिवसांच्या मानाने शुक्रवारी संध्याकाळच्या जेवणाचा बेत विशेष प्रकारचा असतो. आठवड्यातल्या इतर दिवशी जेवणाची टेबले ओकीबोकी असतात आणि त्यांवरच सभासद जेवतात, पण शुक्रवारी त्यांच्यावर आच्छादने घातलेली असतात. शहरातले मित्र, शहरांत काम करणारे व सबाथच्या दिवशी परत येणारे सभासद, आणि किबुट्झमधले लष्करात काम करणारे तरुण आठवडाअखेर सुटी घेऊन आलेले असतात त्यामुळे जेवणघर अगदी गच्च भरलेले असते. शुक्रवारी संध्याकाळच्या जेवणाच्या वेळी गटाच्या वृत्तीमध्ये ध्यानात येण्याजोगा बदल झालेला असतो.

बहुधा शुक्रवारी रात्री एखादे व्याख्यान किंवा जलसा ठेवलेला असतो. दुसऱ्या दिवशी लवकर उठण्याचे कारण नसल्यामुळे इतरांच्या गाठीभेटी घेण्याची संधी लोक याच वेळी साधतात. अशा वेळी चहादाणी बाहेर काढली जाते आणि विशेष प्रकारचे केक किंवा खाद्यपदार्थ आणि एखाद्या वेळी कँडीसुद्धा पाहुण्यांना वाढली जाते.

शनिवार आरामात घालविला जातो—वाचन आणि विश्रांती यात, आणि

ज्यांना मुले असतात ते मुलांना प्राणी दाखवीत, फळबागेत हिंडून, खेळून असा मुलांबरोबर दिवस घालवितात. पारंपरिक सबाथ जसा नियमाने धार्मिक प्रवचनाने संपावयाचा, तसा किबुट्झ सबाथ हा ग्रामसभेच्या साप्ताहिक बैठकीने संपतो आणि त्यामुळे सभासद पुन्हा एकदा नेहमीच्या धकाधकीच्या जीवनाच्या वास्तवात परत येतात.

परंतु शनिवार हा नेहमीच सबाथ नसतो. बहुतेक सभासद जरी शनिवारी विश्रांती घेत असले तरी पुष्कळजण विविध कारणांमुळे आठवड्यातल्या दुसऱ्या एखाद्या दिवशी आपला सबाथ घेतात. शनिवारीसुद्धा काही विशिष्ट कामे करावीच लागतात. उदाहरणार्थ, गाईचे दूध काढणे, पिकांची कापणी संपविणे, मुलांची काळजी घेणे, स्वयंपाक करणे, ही कामे करणाऱ्यांना दुसऱ्या एखाद्या दिवशी सबाथ घेणे जरूर ठरते. मात्र बहुतेक शाखांत पाळी पद्धत असल्याने त्यांतून कामे करणाऱ्यांना कधीकधी शनिवारचा सबाथ मिळू शकतो. शनिवारी सबाथ नको असल्यामागे आणखीही काही कारणे आहेत. उदाहरणार्थ, एखाद्याला शहरात जायचे असले तर शनिवारी त्याला प्रवास करणेच अशक्य आहे कारण इस्रायलमध्ये सार्वजनिक वाहतूक शनिवारी बंद असते. तेव्हा हा प्रश्न सोडवायचा तर शनिवारी काम करून आठवड्यात दुसऱ्या एखाद्या वारी सुटी घेणे हाच मार्ग असतो.

किर्यात येदिदिममध्ये सबाथखेरीज ज्यूंच्या धार्मिक पंचांगातील पुढील दिवस साजरे केले जातात : **रॉश हशाना**, ( नव वर्षदिन ); **हानुका** ( मक्काबींची मेजवानी ); **पुरीम** ( ईस्थरची मेजवानी ); **पेसाह** ( पासोव्हर ); **शाव्हुऑत**, **पेंटेकॉस्ट**. मात्र सगळ्या सणांना नवा राष्ट्रीय, सामाजिक आणि शेतीविषयक अर्थ देण्यात आला आहे.

रॉश हशाना, किंवा पाडवा, सप्टेंबरमध्ये येतो; ज्यूधर्माच्या[१] परंपरेप्रमाणे हा मोठ्या सणांपैकी एक आहे. सिनॅगॉगमध्ये धार्मिक विधी असतात. त्यांमध्ये पूर्वीच्या अपराधाबद्दल पश्चात्ताप व्यक्त करून परमेश्वराकडे क्षमायाचना करणाऱ्या प्रार्थनांचे वाचन होते. या दिवशी प्रत्येकाचे भावी वर्षातील भवितव्य परमेश्वर ठरवितो अशी श्रद्धा असते. आपल्या धर्मनिरपेक्ष तत्त्वाला अनुसरून किर्यात येदिदिम रॉश हशाना हा आपला नूतन वर्षदिन म्हणून साजरा करतो. पण त्याचे धार्मिक महत्त्व वगळून. नूतन वर्षाच्या आदल्या संध्याकाळी जेवणघर चित्रांनी, लतावेलींनी आणि आकृतींनी सजविलेले असते; भिंतीवर लावलेल्या पताका " नूतन वर्ष सुखाचे जावो ! " अशा संदेशाने जेवायला येणारांचे स्वागत करतात. पांढऱ्या शुभ्र कापडाने आच्छादलेल्या

---

१. पारंपरिक ज्युडाइझमच्या ह्या व इतर सणांच्या वर्णनासाठी व इतिहासासाठी, Strauss, The Jewish Festivals पाहा.

जेवणाच्या टेबलावर खाद्यपदार्थांनी सरगच भरलेली पात्रे मांडलेली असतात ( खाद्यपदार्थांचे वैपुल्य वर्षातून अशा एखाद्याच वेळी असते ), आणि एरव्ही दुर्मिळ असणारी बिअरही असते. रात्री एक समारंभ ( **मेसिबा** ) असतो. प्रस्तुत लेखक हजर होता त्या वेळच्या कार्यक्रमात एका सभासदाने पियानोवरची स्वतः रचलेली एक बंदिश; अर्थव्यवस्थापकाने वाचलेला एक दीर्घ आणि तपशीलवार अहवाल; एका युवक गटाने गायिलेल्या गीतांचा कार्यक्रम; आणि एका हुशार सभासदाने सादर केलेला विनोदी व्यक्तिचित्रांचा प्रयोग हे कार्यक्रम समाविष्ट होते. हा कार्यक्रम अगदीच पडला ––जवळजवळ सगळा प्रेक्षकवर्ग, विशेषतः तरुणवर्ग कार्यक्रमाच्या मधूनच उठून गेला, आणि जे उरले होते ते केवळ सौजन्यापायी बसले होते, त्यांना कार्यक्रमात रस वाटत होता म्हणून नव्हे. " धार्मिक " सणांच्या प्रश्नाबाबत किबुट्झ अद्यापही चाचपडत असल्याची पुष्कळशा सभासदांनी तोंडी कबुली दिली होती ती खरी असल्याचे प्रत्यंतर लेखकाला या कार्यक्रमाच्या प्रतिक्रियेवरून आले. असे सण साजरे करायलाच हवेत का ? की अजिबात टाळावेत ? आणि जर ते करायचेच असतील तर ते कोणत्या स्वरूपात करावेत ? या एका बाबतीत किर्यात येदिदिम आज तीस वर्षांनंतरही अद्याप संभ्रमावस्थेतच आहे.

रॉश हशाना हा विश्रांतीचा दिवस असला आणि प्राथमिक शाळेमधल्या मुलांना सुटी असली तरी प्रशाळेतल्या मुलांना नेहमीप्रमाणेच शाळा असते. प्रस्तुत अभ्यासाच्या काळात दिसून आलेली वस्तुस्थिती म्हणजे प्रशाळेतल्या विद्यार्थ्यांना रॉश हशाना इतका तोंडावर आलेला असल्याची जाणीव नव्हती आणि एका शिक्षकाने ती बातमी सांगेपर्यंत तो सुरू झालेला आहे हेही त्यांच्या गावी नव्हते. याबरून किर्यात येदिदिमध्ये रॉश हशानाला किती कमी महत्त्व आहे हे सिद्ध होते.

ज्यूंच्या पंचांगाप्रमाणे अत्यंत पवित्र असा दिवस " डे ऑफ ॲटोनमेंट " ( पश्चात्तापाचा दिवस )– हा तर किर्यात येदिदिमध्ये अजिबात साजरा करीत नाहीत. त्याचा परंपरागत अर्थ सर्वस्वी धार्मिक असल्याने त्याला नवे स्वरूप देण्याचा मार्गच नाही असे सभासदांना वाटते. त्यामुळे अधिकृतपणे त्याची दखल घेतली जात नाही आणि त्याला इतर दिवसांसारखाच एक दिवस मानतात. देशाच्या बाकीच्या भागात असते तशी इथल्या मुलांच्या शाळेला सुटी नसते; कारण जर मुलांना सुटी दिली तर ती का दिली हे त्यांना सांगावे लागते असे शाळेच्या मुख्याध्यापकाने एका आईला सांगितले. निरीश्वरवादाचे शिक्षण ज्यांना दिले जाते अशा मुलांना ईश्वराशी व आपल्या देशबांधवांशी केलेल्या पापाचे परिमार्जन करण्यासाठी हा दिवस आहे असे कसे सांगणार ? मात्र अधिकृतपणे या दिवसाला मान्यता नसली तरी सभासदांना त्याचे विस्मरण झालेले नसते. त्या दिवशी उपास करण्याची परंपरा असल्याने " उपासाने कसे काय वाटते ? " ही तोंडी विचारपूस चेष्टेने एकमेकांजवळ करणारे सभासद लेखकाने

वारंवार पाहिले आहेत; त्यावरून कदाचित् काहीजणांना त्या दिवशी उपास मोडल्या-बद्दल अपराधाची भावना वाटत असावी असे वाटते.[10]

नववर्षदिनानंतर पंधरा दिवसांनी **सुकॉट**चा सण येतो. प्राचीन काळी पॅलेस्टाइन-मध्ये हा रब्बी पिकांचा उत्सव गणला जात असे, परंतु नंतरच्या काळात त्या उत्सवात "पालां" मध्ये राहण्याची–चाळीस वर्षे रानावनांतून हिंडताना इस्रायली लोक पालांमध्ये राहात होते त्याची आठवण म्हणून–प्रथा सुरू झाली. परंतु किबुट्झचा पिकांचा हंगाम या सणाच्या वेळी येत नसल्याने कियीत येदिदिममध्ये सुकॉटला शेतीच्या दृष्टीने अर्थ नाही, आणि मुळातच या सणाला कृषिविषयक काही महत्त्व आहे असे त्याला वाटत नाही. म्हणून सणाचे जेवण नसते व कामही बंद नसते. मात्र, शाळेतील मुलांना एका दिवसाची सुट्टी देतात आणि छोटी पाले शाळेच्या आवारात उभी करण्यात येतात.

**हानुका** (दीपोत्सव), म्हणजे मक्कबींनी ग्रीकांवर मिळविलेल्या विजयाचे स्मरण. डिसेंबरमध्ये येत असल्यामुळे तो नेहमी मुलांचा सण म्हणून गणला जातो, आणि म्हणून तो मुलांच्या निरनिराळ्या वसतिगृहातून मुलांसाठी मेजवान्या देऊन साजरा केला जातो [11].

मार्चमध्ये **पुरीम** हा सण येतो. या दिवशी इराणमधल्या ज्यूंनी मोरडेकाय व राणी एस्थर यांच्या नेतृत्वाखाली दुष्ट हमानवर विजय मिळविला म्हणून ही घटना परंपरेने आनंदाने साजरी केली जाते. पुढे ज्यूविरोधकांच्या अंतिम नाशाचा उत्सव असे स्वरूप त्याला देण्यात आले. या दिवशी मुलांनी एकमेकांना भेटी द्यायच्या, रस्त्यावर लोकनाट्ये सादर करायची आणि एस्थरची पोथी सिनॅगॉगमध्ये वाचायची अशी परंपरा होती. हानुकाप्रमाणे यातही मुलांनी सहभागी होण्यावर भर दिला जातो. या भावनेनेच किबुट्झमध्ये पुरीम साजरा करतात. बालमंदिरातील मुलांना विशिष्ट तऱ्हेचे पोशाख घालतात व मेजवानी देतात. प्राथमिक शाळेमधली मुले प्रौढांकरिता प्रहसनांचा व नाचगाण्यांचा कार्यक्रम करून दाखवितात; प्रशाळेतही अशाच तऱ्हेचा कार्यक्रम असतो त्याला पुष्कळसे प्रौढ हजर राहतात; नंतरच्या रात्री प्रौढांचेही प्रहसन वगैरे कार्यक्रम असतात. सगळ्या कार्यक्रमात तऱ्हतऱ्हेची वेषभूषा, हास्यविनोद आणि मौज दिसून येते.

---

१० सभासदांचे वृद्ध आईवडील हा दिवस इतर धार्मिक दिवसांसारखा पाळतात हे लक्षात घेतले पाहिजे. त्यांच्या स्वतःच्या कोशेर जेवणघरात धार्मिक प्रार्थना केल्या जातात आणि धार्मिक वृत्तीच्या कुटुंबातून आलेली तरुण गटांची पुष्कळ मुलेमुली या समारंभाला हजर राहतात.

११. हानुका उत्सवाच्या वेळी लेखक हजर नसल्याने त्याचे सविस्तर वर्णन देता येत नाही.

किर्यात येदिदिममधला सर्वांत महत्त्वाचा ज्यूंचा पारंपारिक सण म्हणजे पेसाख किंवा पासोव्हर. एप्रिलमध्ये येणारा हा सण मुळात वसंतोत्सव होता. नंतर इजिप्त-मधून इस्रेलाइट लोकांनी केलेले जे महानिर्गमन ( एक्झोडस ) त्याचे स्मारक असे त्याला स्वरूप आले. दैवी चमत्काराने मुक्ती असा महानिर्गमनाचा जो मूळ अर्थ तो बदलून स्वातंत्र्य आणि त्याची नैसर्गिक साधनांनी सिद्धी असा अर्थ त्याला देणे फारसे अवघड नव्हते. अशा रीतीने निसर्गप्रेम आणि स्वतंत्रता या किबुत्झ संस्कृतीच्या दोन महत्त्वाच्या मूल्यांचा ज्यात संयोग झाला आहे असा हा सण किर्यात येदिदिममध्ये विशेष उत्साहाने पाळला जावा हे अगदी स्वाभाविक आहे. कित्येक महिने अगोदरपासून या सणाची तयारी सुरू होते आणि साखर, मांस व इतर दुर्मिळ जिन्नस या प्रसंगासाठी साठवून ठेवले जातात. पासोव्हरच्या अगोदरच्या संध्याकाळी जेवणघर फुलापानांनी सजविले जाते आणि वसंतवर्णन करणाऱ्या बायबल मधल्या ओळी भिंतीवर लटकतात.

पासोव्हर सणामधली मोठी घटना म्हणजे सेडर. यात परंपरेने चालत आलेली एक मोठी मेजवानी असते आणि हग्गदा नावाच्या एका विधीतील एक लांबलचक धार्मिक प्रार्थना गायिली जाते. पूर्वापार चालत आलेल्या हग्गदामधून आपल्या धर्मनिरपेक्ष तत्त्वज्ञानाला साजेसे असे वेचे निवडून संघाने आपले स्वतःचे हग्गदा रचले आहे. त्यात बायबलमधील व पारंपरिक ज्यू वाङ्मयातील काही उतारे आधुनिक हिब्रू कविता, आणि किबुत्झच्या सभासदांनी लिहिलेले काही साहित्य यांची भर घातली आहे. या सर्व वेच्यांत वसंत ऋतू आणि स्वातंत्र्य या दोन कल्पनांवर भर दिलेला आहे. शाळेच्या मोठ्याथोरल्या आणि नव्याने बांधलेल्या जेवणघरात सेडर भरवितात. किबुत्झची आतिथ्यशीलता ह्याच वेळी जास्तीत जास्त भरघोसपणे व्यक्त होते. पूर्वी युरोपमधली ज्यू कुटुंबे ज्याप्रमाणे काही मित्रांना या समारंभासाठी आपल्या घरी बोलावीत त्याचप्रमाणे किर्यात येदिदिममध्येही गर्दी होणार असते आणि अडचणीचे असते तरीसुद्धा, स्नेही, नातलग अशी पुष्कळदा शंभराहून अधिक माणसे या मेजवानीत सहभागी व्हायला आणि रात्री राहायला बोलावलेली असतात. सेडर समारंभा बरोबरच उत्कृष्ट आणि भरपूर जेवण यांमुळेही ही संध्याकाळ अविस्मरणीय ठरते. वर सांगितलेच आहे की देशाच्या इतर भागांप्रमाणे किबुत्झमध्येही शिधानियंत्रण कडक आहे. त्या तुलनेने सेडर मेजवानी म्हणजे अगदी राजशाही मेजवानी असते. शिधानियंत्र-णाच्या कडक पद्धतीमुळे ज्यांची पोटेच आकरसली आहेत अशा माणसांना हे अन्न कसे संपणार ? अन्न इतके असते की ते सगळे खाऊन संपत नाही. पण सभासदांच्या दृष्टीने या जेवणाला उदरभरणापलीकडचा एक अर्थ असतो. आपल्या जवळ इतके अन्न आहे की त्यातले काही वाया गेले तरी हरकत नाही अशी भावना वर्षाकाठी एकदा तरी उत्पन्न होणे याला महत्त्व आहे. प्रस्तुत लेखक ज्या एका सेडर समारंभाला हजर होता त्यामध्ये स्वातंत्र्याचे समकालीन महत्त्व या विषयावर एका सभासदाचे प्रास्ताविक

भाषण, गायक संघाची निवडक गाणी, मुलांचे आधुनिक नृत्य आणि किबुट्झमधल्या सभासदांनी व मुलांनी केलेले हग्गदातील वेच्यांचे वाचन असा कार्यक्रम होता. आपला सेडर समारंभ उत्कृष्ट रीतीने साजरा होतो पण आपल्या बालपणातील पारंपरिक सेडरचे सौंदर्य, साक्षेपाने केले जाणारे समारंभ व धार्मिक विधी ह्या सगळ्यांची सर त्याला नाही आणि "पुन्हा तसला बघायला आपण वाटेल ते देऊ" असे उद्गार काही सभासदांनी प्रस्तुत लेखकाजवळ काढले.

शॅव्हुऑत, किंवा **पेंटेकॉस्ट** हा पासोव्हनंतर सात आठवड्यांनी येणारा सण हा पारंपरिक सणांमधला शेवटचा सण असतो. रूढीने, शॅव्हुऑट हा पासोव्हर व **टॅबरनॅकल्स** यांच्याप्रमाणेच शेतीबद्ध व इतिहासबद्ध सण आहे. शेतीच्या दृष्टीने हा सण म्हणजे "पहिल्या फळांचा" ( **हाग हाबिक्कुरीम** ) तर इतिहासाच्या दृष्टीने सिनाई पर्वतावरील साक्षात्काराची स्मृती साजरा करणारा असतो. अर्थात् किर्यात येदिदिम फक्त पूर्वोक्त स्वरूपात हा सण साजरा करतो. इतर सर्व सणांप्रमाणेच आदल्या संध्याकाळी तो नव्या फळांनी शृंगारित केलेल्या जेवणघरातील मेजवानीने सुरू होतो, दुसऱ्या दिवशी दुपारी काम थांबवितात, आणि मुख्य समारंभ हा ज्यूइश राष्ट्रीय फंडाला पहिली "फळे" अर्पण करण्याचा होतो. ( प्राचीन पॅलेस्टाइनमध्ये ही फळे "मंदिराला" अर्पण करीत असत. ) ह्या अर्पणविधीचे स्वरूप असे असते की प्रत्येक शाखेचे सभासद आपला "तराफा" सजवितात, त्यावर फळफळावळ मांडतात आणि अशा तराफ्यांची मिरवणूक निघते. जेवणघराच्या समोरील विस्तीर्ण पटांगणावर एक खास मंच उभारलेला असतो, प्रत्येक शेतीशाखेचे प्रतिनिधी, त्यांच्यामागून लहान मुले, व त्यांच्याही मागून नुकतीच चालू लागलेली छोटी मुले अशी मिरवणूक किबुट्झच्या मुख्य दरवाजातून निघून मंचापर्यंत पोचते. प्रत्येक शाखेचे नाव पुकारले जाते आणि तिचा प्रतिनिधी आपला "नैवेद्य" परीक्षकांपुढे मंचावर आणतो. तीन सर्वोत्कृष्ट नैवेद्यांना बक्षिसे वाटण्यात येतात. प्रस्तुत लेखकाने पाहिलेल्या स्पर्धेमध्ये एक भाजलेले कोकरू आणि दोन केक यांना बक्षिसे होती. परीक्षकांच्या निर्णयानंतर पटांगणावर एकामागून एक नृत्ये सुरू होतात. प्रत्येक वयगट क्रमाने नृत्य करतो. शिशुशाळेतील मुले, प्राथमिक शाळेतील मुले, प्रशाळेचे विद्यार्थी, आणि तरुण सभासद, या पाठोपाठ एक मोठाथोरला नाच असतो आणि त्यात आईबाप आपल्या मुलांना जोडीदार घेऊन मोठ्या मजेने नाचतात. हा शेवटचा नाच म्हणजे समारंभाचा कळसच होय आणि त्यात भाग घेणारे सगळेजण उत्साहाने भाग घेतात. यानंतर नेहमीची लोकनृत्ये आणि अल्पोपाहार होतो.

किर्यात येदिदिममध्ये ज्या पद्धतीने ज्यूंचे सण साजरे केले जातात ती पद्धत पुष्कळ सभासदांना समाधानकारक वाटत नाही आणि आपल्या सामाजिक जीवनाच्या या क्षेत्राचा आणखी विचार केला पाहिजे असे त्यांना वाटते हे पूर्वी नमूद केलेच

आहे. लेखकाच्या किबुट्झमधल्या वास्तव्यात या प्रश्नाची चर्चा करण्याकरिता एक खास सभा घेण्यात आली होती. त्या वेळी सांस्कृतिक समितीच्या अध्यक्षाने सभासदांचे सणांकडे दुर्लक्ष होत असल्याची टीका केली आणि जुने नष्ट करण्यात आले आहे पण त्याच्या जागी नवीन काहीही आणले जात नाही अशी तक्रार केली. किबुट्झच्या एका बुद्धिमंताने किर्यात येदिदिममध्ये सबाथबद्दल औदासीन्य असल्याची तक्रार केली. आपल्या लहानपणी आईवडिलांच्या घरात सबाथच्या वेळी कसे " अद्भुत वातावरण " असे हे त्याने सांगितले आणि किबुट्झमध्ये तसेच वातावरण पुन्हा निर्माण करणे का शक्य होऊ नये असे त्याने विचारले. सबाथच्या दिवशी इतक्या सभासदांना काम करण्याची काय जरूरी आहे असा त्याने प्रश्न केला. धार्मिक किबुट्झ वसाहती[12] किर्यात येदिदिमपेक्षा जास्त श्रीमंत आहेत असे नसूनसुद्धा त्यातल्या सभासदांना सबाथच्या दिवशी सुट्टी घेणे परवडते असे त्याने पुढे सांगितले. शिवाय, शुक्रवारी रात्री मेणबत्त्या लावण्याला आक्षेप घेण्याचे काही कारण आपल्याला दिसत नसल्याचेही त्याने म्हटले. काही लोकांच्या मते मेणबत्त्या लावणे ही गोष्ट " बूर्झ्वा " ठरते; पण कितीतरी " बूर्झ्वा " गोष्टींचा किबुट्झमध्ये प्रवेश झालेला असताना फक्त मेणबत्त्या लावणे ह्या एकाच गोष्टीला तुच्छ लेखण्याच्या प्रवृत्तीचा त्याने निषेध केला.

ज्यू पंचांगातील या " मुख्य " सणा-उत्सवांच्या जोडीला किर्यात येदिदिमने एक पारंपरिक पण धार्मिक अर्थ नसलेली तिथी पुन्हा प्रचारात आणली आहे, पॅलेस्टाइनच्या एका जुन्या " लहानश्या " धार्मिक सणाला नवा अर्थ दिला आहे, आणि प्राचीन पॅलेस्टाइनमधील एक विधी नव्या स्वरूपात पुनरुज्जीवित केला आहे. तु बिश्वात ( अक्षरशः अर्थ, हिब्रूंच्या श्वात महिन्याचा पंधरावा दिवस ) हा दिवस परंपरेने " आर्बर डे " म्हणजे " वृक्षांचे नवे वर्ष " म्हणून ओळखला जाई. जानेवारीत येणारा हा दिवस, साजरा करायचाच झाला तर, पूर्वीचे पॅलेस्टाइनमधले लोक फळे खाऊन साजरा करीत असत. पण आताच्या पॅलेस्टाइनमध्ये तु बिश्वात हा दिवस देशाला आवश्यक असलेल्या वनविकासाचे प्रतीक म्हणून महत्त्वाचा बनला आहे. किबुट्झमध्ये हा दिवस वृक्षारोपणाचा असतो. प्रत्येक वर्षी किबुट्झच्या एका वेगळ्या विभागाची झाडे लावण्यासाठी निवड करतात आणि सगळ्यांच्या सगळे लोक हातात तांबड्या पताका आणि आंदोलनाची निशाणे घेऊन त्या विभागाकडे कूच करतात. मिरवणुकीच्या अग्रभागी केसात फुलांच्या माळा घातलेली आणि हातात कोवळी रोपे धरलेली लहान मुले असतात आणि प्रशालेच्या बॅण्डच्या तालावर मिरवणूक चालत

---

१२. इस्रायलमध्ये काही थोडे धार्मिक किबुट्झ आहेत आणि त्यांचा स्वतःचा वेगळा संघ आहे. सनातन ज्यू धर्माचे सर्व आचार ते पाळतात व तालमुदच्या आदेशांप्रमाणे आपल्या जीवनाचे नियमन करतात.

असते. ठरलेल्या ठिकाणी पोचल्यावर वृक्षांची वाढ आणि फुलांचे उमलणे यांची प्रतीके असलेली मुले प्रथम नाच करतात, आणि नंतर किबुट्झच्या सर्व गटांचे---सर्व प्रौढ घर आणि मुलांचे गट यांचे---प्रतिनिधी प्रतीकात्मक समारंभाने रोपे लावतात. शेवटी बहुतेक प्रत्येक जोडप्याला रोप लावण्याची संधी मिळते; एक जोडीदार खळगा खणतो व दुसरा जोडीदार त्यात रोप लावतो.

प्राचीन पॅलेस्टाइनमध्ये पहिल्या धान्याची ( बार्लीची ) पहिली पेंढी मंदिराच्या धर्मगुरूला पासोव्हरच्या दुसऱ्या दिवशी अर्पण करायची पद्धत असे. ह्याला ओमर म्हणत. मंदिराचा नाश झाल्यावर हा समारंभ बंद पडला तरी सिनॅगॉगमधल्या प्रार्थनांमध्ये त्याची आठवण ठेवली जात असे. आज ओमरचा सण हा किबुट्झच्या पंचांगात एक मोठा सण गणला जातो. पण त्याचा जुन्या काळच्या विधींशी फक्त शेतीच्या अर्थानेच संबंध जोडलेला असतो. अमेरिकेतल्या ग्रामीण जत्रेची पुष्कळशी वैशिष्ट्ये या समारंभात आढळतात. कामावरून अर्ध्या दिवसाची सुट्टी मिळालेले सभासद अनेक कार्यक्रम बघण्यासाठी किंवा त्यात भाग घेण्यासाठी शेतावर जमतात. सुरुवातीला प्रत्येक शेतीशाखेने आपापल्या सभासदांसाठी स्पर्धा ठेवलेल्या असतात. घमनसाला संरक्षक आवरण घालणे, अरबी पद्धतीच्या नांगराने सरळ रेषेत नांगरट करणे, डोळे बांधून ट्रॅक्टर सुरू करणे, कोंबडीचे पिल्लू पकडणे, इत्यादी. यानंतर सर्वांचा अर्थबोधक असा नाचाचा कार्यक्रम होतो. शेवटी किबुट्झमधल्या निरनिराळ्या गटांचे प्रतिनिधी ओमर---पहिली पेंढी---कापतात.

लाग बोमेर म्हणजे रूढीने पासोव्हर आणि पेंटेकॉस्ट यांच्या मधल्या सात आठवड्यांच्या सुतकातला एक अपवादात्मक असा आनंदाचा दिवस समजला जाई. ( ह्या दिवशी विविध पौराणिक घटना घडल्यामुळे त्याला आनंददायक रूप लाभले आहे असे समजले जाते. ) एरवी सुतकाच्या काळात लग्नसमारंभ बंद असतात पण या एका दिवसाचा अपवाद केल्यामुळे या दिवशी लग्ने होत आणि मुले दूरच्या सहलीवर जात. किबुट्झमध्ये हा दिन फक्त युवक आंदोलन साजरा करते, प्रौढ त्यात भाग घेत नाहीत. श्टेट्लमधल्याप्रमाणे मुख्य कार्यक्रम म्हणजे संपूर्ण दिवसाच्या सहलीचा असतो. आदल्या रात्री किर्यात येदिदिममधल्या आंदोलनाच्या शाखेच्या सगळ्या विभागांची म्हणजे "वरच्यांची" बैठक असते. या सभेच्या वेळी आंदोलनाचे नेते सर्व विभागांच्या राजकीय कर्तृत्वाची आणि ध्येयनिष्ठेची चाचणी घेतात. सबंध दिवसाची रपेट ही बालवीरांच्या जांबोरीसारखी असते, तीत बालवीर चळवळीची निरनिराळी कसबे दाखविली जातात. आणि रात्री एका गांभीर्यपूर्वक साजऱ्या होणाऱ्या समारंभात नव्या तरुणांना अधिकृतपणे आंदोलनात प्रवेश दिला जातो व इतरांना बक्षिसे वाटली जातात.

ज्यूंच्या या परंपरागत सणांबरोबर किर्यात येदिदिममध्ये चार आधुनिक सण साजरे करतात, त्यांपैकी दोन मेमध्ये आणि दोन नोव्हेंबरमध्ये येतात. मेमधले दोन

म्हणजे मे दिन आणि इस्रायलचा स्वातंत्र्य दिन. प्रस्तुत लेखकाच्या अभ्यासकालात राष्ट्रस्थापना झाल्याला फक्त तीनच वर्षे झाली असल्याने स्वातंत्र्यदिन सोहळ्याची काही ठरीव पद्धत निर्माण झालेली नव्हती. फक्त थिओडोर हर्झल् या आधुनिक झिऑनवादाच्या संस्थापकाचा फोटो जेवणघरात लावला गेला, रेडिओवरून शहरातील सरकारी उत्सवाचे वर्णन ऐकविण्यात आले आणि किबुट्झच्या स्मशानभूमीतील[13] थडग्यांवर फुले वाहिली गेली. मे दिन हा मात्र फार वर्षांचा जुना सण आहे. जेवण-घरात आंतरराष्ट्रीय कामगार चळवळीचे नेते म्हणून लेनिन व स्टालिन यांचे फोटो लावतात ( अर्थात् ही स्टालिनच्या मृत्यूपूर्वीची गोष्ट आहे ). किबुट्झचे काम फक्त अर्धा दिवसच चालते आणि दुपारी व संध्याकाळी त्या भागातील दुसऱ्या किबुट्झ बसाहतींना घेऊन सर्व प्रदेशांचा एकत्र समारंभ करतात. त्यात बहुधा आंतरराष्ट्रीय कामगार व समाजवादी चळवळीच्या महत्त्वाबद्दल व्याख्यानमाला असतात आणि एक जलसा असतो.

नोव्हेंबरमध्ये किर्यात येदिदिमचा स्वतःचा आणि रशियन क्रांतीचा असे दोन वर्धापन दिन साजरे होतात. यांपैकी प्रस्तुत लेखकाने हजर राहून पाहिलेल्या पहिल्यात ( किर्यात येदिदिमचा वर्धापन दिन ) काही गंभीर व विनोदी असे दोन्ही प्रकारचे उतारे एका सभासदाने वाचून दाखविले व या प्रसंगाचे महत्त्व सांगणारी व्याख्याने काही संस्थापकांनी दिली. कार्यक्रमानंतर अल्पोपाहार झाला.

दुसरा समारंभ अधिक विस्तृत प्रमाणावर करतात. कोणत्याही प्रकारचे जेवण नसते पण जेवणघर लाल निशाणांनी व झिऑनवादी पताकांनी, आणि लेनिन व स्टालिनच्या चित्रांनी शृंगारलेले असते आणि सोव्हिएत प्रचार चित्रांचे प्रदर्शन असते. क्रांती आणि सोव्हिएत संस्कृती यांचे महत्त्व कथन करणारी भाषणे होतात.

हे सगळेच समारंभ सारख्याच उत्साहाने साजरे होतात असे नाही, तरीसुद्धा त्यांमुळे पाच मोठी प्रयोजने किर्यात येदिदिममध्ये साधली जातात. पहिले म्हणजे, दैनंदिन कामाच्या चाकोरीत एक मोठा व हवाहवासा वाटणारा बदल घडून येतो. सभासदांना आठवडाभर दिवसाचे नऊ ते दहा तास याप्रमाणे सहा दिवस भरपूर काम करावे लागते आणि जरी ते निष्ठेने काम करीत असले तरी इस्रायलच्या कडक

---

१३. मृत्यू आणि दफन विधींचा एक ठरीव साचा तयार होण्याइतकी किर्यात येदिदिम ही वसाहत जुनी नाही. आमच्या अभ्यासाच्या काळात एकही मृत्यू घडून आला नाही, त्यामुळे दफनविधींचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्याची संधी आम्हाला मिळाली नाही; आणि दुर्दैवाने किबुट्झ संस्कृतीच्या या बाजूबद्दल चौकशी करण्याचे आमच्याकडून राहून गेले. गावाच्या कडेच्या एका दफनभूमीत मृतांना पुरतात आणि एक धर्मक्रियाविरहित विधी करतात एवढेच आम्हाला ठाऊक आहे. पण या विधीचा नेमका आशय काय ते सांगता येत नाही याबद्दल लेखक दिलगीर आहे.

उन्हाचा त्यांच्यावर परिणाम व्हायचा तो होतोच. खूप कष्टांनंतर आवश्यक अशी विश्रांती या सणांच्या सुटीमुळे मिळण्याची सोय होते. परंतु सणांमुळे कामाच्या चाकोरीतून सुटका होते इतकेच नसून, रोजच्या ठराविक जीवनक्रमातही बदल होतो. दुसऱ्या काही उपायांनी अटकाव केला नाही तर लहानशा खेडेगावातील जीवन हे स्वभावतःच कंटाळवाणे ठरण्याची शक्यता असते. सण अनेकविध उपायांच्या एकत्रित योजनेने हा अटकाव करतात. भरपूर व अधिक रुचकर अशा खास पक्वान्नांचे जेवण, सुशोभित केलेले जेवणघर, स्वच्छ आणि कधीकधी नवेही कपडे, सांस्कृतिक करमणूक आणि किबुट्झमध्ये राहायला आलेल्या पाहुण्यांशी गाठीभेटी ह्या गोष्टी सणावारीच होतात. सबाथ व सणांच्या वेळचे किबुट्झमधले हे विशेष वातावरण सहज बघणाराच्या नजरेलासुद्धा दिसून येते.

सणांमुळे सामाजिक ऐक्य दृढ होते हेही स्पष्ट आहे. दैनंदिन कामाच्या रगाड्यात किबुट्झमध्ये पुष्कळसे ताण निर्माण होतात आणि अनेकदा सभासदांमध्ये वैमनस्यही उत्पन्न होते. सणांच्या वेळी यातला पुष्कळसा ताण हलका होतो एवढेच नव्हे तर खराखुरा बंधुभाव त्याची जागा घेतो. शरीराला विश्रांती मिळाल्याचा, प्रहसने, गायन, नाटके इत्यादींमध्ये एकत्रपणे भाग घेण्याचा आणि समान ध्येयांना सर्वांनी पुन्हा वाहून घेण्याच्या प्रतिज्ञेचा हा परिणाम असतो. हा शेवटचा भाग — समान ध्येयाला पुन्हा वाहून घेणं — आणखीही एक कार्य साधतो. भविष्य काळावरची आणि किबुट्झच्या ध्येयवादावरची अंतिम श्रद्धा पुन्हा नव्याने उजळून निघते. काही वेळा अश्या येतात की सभासदांमध्ये एक खोल मरगळ आल्याचे पाहाणाऱ्याच्या ध्यानात येते. आर्थिक प्रश्नाबाबत निराशा, आपली सामाजिक ध्येये गाठता येण्याबाबतची असमर्थता, राष्ट्रीय व्यवहारावर ठसा पाडण्याच्या बाबतीतला राजकीय दुबळेपणा, अश्या कारणांमुळे ही मरगळ उत्पन्न झालेली असते. परंतु पासोव्हर सेडरनंतर उचंबळून येणाऱ्या खरोखरीच्या उत्साहाने, मे दिन उत्सवाच्या वेळच्या राजकीय नेत्याच्या स्फूर्तिदायक भाषणाने किंवा वार्षिक समारंभाच्या वेळी किबुट्झ संघटनेत्याने केलेल्या भावना हलविणाऱ्या वक्तृत्वाने ही विकल अवस्था नाहीशी झाल्याचे दृष्टोपत्तीस येते.

सगळ्याच समारंभांमुळे होणाऱ्या या कार्यांच्या जोडीला ज्यूंचे म्हणून जे सण आहेत ते आणखी एक विशेष प्रयोजन साधतात. एका अर्थाने सभासद एका अस्थिर मानसिक अवस्थेत असतात. ते झिऑनवादी आहेत. पूर्वजांचा वारसा आणि पूर्वजांची विशिष्ट ज्यू विचारसरणी यांचा त्यांनी त्याग केलेला आहे आणि त्यामधून निर्माण झालेल्या प्रश्नांना ( व इतर प्रश्नांना ) सोडवणूक म्हणून त्यांनी झिऑनवादाचा स्वीकार केलेला आहे. म्हणून जरी ते स्वतःला ज्यू म्हणवून घेत असले तरी त्यांच्या ज्यूपणात काही मूलभूत ज्यूविरोधी घटक आहेत. ज्यूंच्या सणातले धार्मिक भाग गाळून ते साजरे करतात हे खरे पण ते साजरे करण्यामुळे त्यांना ज्यू वंश आणि ज्यूंचा

गतकालीन इतिहास यांच्याशी तादात्म्य पावता येते. आणि अशा तादात्म्याची त्यांना खोलवर गरज आहे असे स्पष्ट दिसते. नाहीतर ज्यांत इतकी आमूलाग्र सुधारणा करावी लागते आणि ज्यांना इतका नवा अर्थ द्यावा लागतो असे सण साजरे करण्याची तसदी त्यांनी घ्यावी याचे दुसरे कारण काय असणार?

## शेतकऱ्यांहून अधिक काहीतरी

आपण एक कामगारांचा समाज आहो याचा आणि आपल्या दृष्टीने शेतीच्या कामाला एक नैतिक मूल्य आहे याचा किबुट्झला जरी अभिमान असला तरी सभासद हे शेतकरी या शब्दाच्या मानसशास्त्रीय आणि सांस्कृतिक अर्थाने शेतकरी नव्हेत आणि आपण तसे भासू नये याचा ते जाणूनबुजून प्रयत्न करतात. ते खेड्यात राहतात, उपजीविकेसाठी जमिनीची मशागत करतात आणि धावपळ व अवघड कामसुद्धा कुणाची मदत न घेता आपण स्वतःच करण्याचा आग्रह धरतात हे खरे आहे. पण किबुट्झच्या अर्थव्यवस्थेमधील काम हा त्यांच्या जीवनाचा फक्त एक भाग झाला; जीवनात आणखीही काही महत्त्वाची मूल्ये आहेत आणि त्यांचाही अनुभव घेतला पाहिजे. म्हणून, श्रम हे जरी अंतिम मूल्य असले तरी व्यक्तीचा सगळा वेळ कामातच खर्ची पडू नये अशी काळजी घेतली जाते आणि सगळ्या मानसिक शक्ती केवळ कामाने व्याप्त राहू दिल्या जात नाहीत. शेतकाम हा आदर्श व्यवसाय असला तरी "शेतकरी" हा काही आदर्श व्यक्तिमत्त्वाचा नमुना नव्हे. पुष्कळसे सभासद, आणि विशेषतः संस्थापक, बुद्धिवंत होते आणि त्यांच्या दृष्टीने बौद्धिक मूल्यांना फार महत्त्व होते. बौद्धिक जीवनाकडे पाठ फिरवून कामगारांचे जीवन त्यांनी पत्करलेले असले तरी बौद्धिक विषयांमध्ये त्यांना अजूनही रस आहे हे वाचकांच्या ध्यानात असेलच. शारीरिक श्रम आणि भूमी यांच्या संपर्कापासून तुटलेले बौद्धिक जीवन हे ज्याप्रमाणे कृत्रिम आणि परोपजीवी असते त्याप्रमाणे बौद्धिक आणि कलात्मक मूल्यांपासून अलग केलेले शारीरिक श्रम हे असंस्कृतपणाचे आणि कुचकामी असतात असे किबुट्झचे मत आहे. गरज होती ती या दोहोंना समन्वय साधण्याची, आणि यातूनच आंदोलन ज्याला "समन्वित किंवा एकसंध व्यक्तिमत्त्व" म्हणते त्याचा उगम झाला. भूमिप्रेम, श्रमातील आनंद आणि कला, शास्त्र आणि साहित्य यांमधील निर्मितिक्षमता नसली तरी निदान त्यांचा आस्वाद घेण्याची रसिकता, या सर्व गोष्टी सुसंगतपणे एकत्र करू शकणारी व्यक्ती म्हणजेच "एकसंध व्यक्तिमत्त्व". किबुट्झची आत्मप्रतिमा "भूमिजन" ही नसून "भूमिनिष्ठ बुद्धिमंत" ही आहे.

असे असल्यामुळे सर्वसाधारण सभासदाला विद्यापीठीय शिक्षणाचा लाभ मिळालेला नसला, किंबहुना अनेकांचे प्रशालेय शिक्षणही पूर्ण झालेले नसले तरी किर्यात येदिदिमची बौद्धिक पातळी सर्वसामान्य नागरी समाजापेक्षा बहुधा वरची आहे आणि सर्वसामान्य ग्रामीण समाजापेक्षा तर तुलनादेखील मनात येऊ नये इतकी

श्रेष्ठ आहे. शेतावरील कामात सहज कानावर पडलेल्या संभाषणात साहित्य, राजकारण, विज्ञान, आंतरराष्ट्रीय प्रश्न आणि इतर बौद्धिक विषय ऐकायला सापडतात. " गप्पाटप्पा " क्वचितच. सभासदांची सगळ्यात उल्लेखनीय बौद्धिक कर्तबगारी म्हणजे त्यांचे भाषाविषयक नैपुण्य. साब्रांचा अपवाद वजा करता ( त्यांतल्या पुष्कळांना हिब्रूच्या जोडीला निदान थोडे इंग्रजी येते ) ज्याला तीन भाषा लिहिता व वाचता येत नाहीत असा माणूस दुर्मिळ आणि अनेकांना तर जवळ जवळ सहा-सात भाषा येतात. अर्थात, हे भाषानैपुण्य हा काही अंशी आपल्या मायदेशातून केलेल्या स्थलांतराचा परिणाम म्हणता येईल. उदाहरणार्थ यिडिश आणि पोलिश या बहुतेकांच्या मातृभाषा आहेत आणि पॅलेस्टाइनमध्ये आल्यावर हिब्रू जोडीला आली. शिवाय शास्त्रीय आणि वाङ्मयीन कृती मूळ भाषेतून वाचता याव्यात म्हणून पुष्कळश्या सभासदांनी स्वतःच जर्मन, इंग्रजी, रशियन इत्यादि भाषा शिकून घेतल्या आहेत. दैनंदिन व्यवहारासाठी फक्त हिब्रू भाषाच वापरायची हा निर्णय घेण्यात सभासदांनी त्याचप्रमाणे प्रारंभीच्या इतर स्थलांतरितांनी मोठीच बौद्धिक झेप आणि निष्ठा दाखविली असे म्हणावे लागेल. कारण हिब्रू ही भाषा पाश्चिमात्त्यांना कठीण आहे आणि विशेषतः दिवसभर शेतामध्ये कष्टाची कामे केल्यानंतर तरी आपल्या मातृभाषेत एकमेकांशी बोलणे त्यांना केव्हाही अधिक सोपे गेले असते.

सर्वसाधारण सभासदाची बौद्धिक पातळी तर उच्च असतेच पण त्याचबरोबर असाधारण बौद्धिक छंद आणि गुणवत्ता असलेलेही अनेक सभासद आहेत. भाजी-पाल्याच्या बागेत काम करणाऱ्या एका संस्थापिकेने प्रायोगिक बागकामात मूलभूत स्वरूपाचे काम केले आहे. तिने कलिंगडाची एक नवीनच जात शोधून काढली आहे व ती सबंध देशभर प्रसिद्ध झाली आहे. परंतु तिचे प्रावीण्य वैज्ञानिक कुतूहलापुरतेच मर्यादित नाही. तिने कविता लिहिल्या आहेत, पुष्कळ भाषा अवगत करून घेतल्या आहेत, आणि जगातील सर्वश्रेष्ठ वाङ्मयीन कलाकृतींचा तिने मुळातून परिचय करून घेतला आहे. दुपारचे रोजचे बागकाम करीत असताना ती फ्रॉयड, शिलर, गॉइटे, स्टाइनबेक, ट्वेन आणि आर्थर मिलर यांसारख्या लेखकांवर अभ्यासपूर्ण आणि सूक्ष्म दृष्टीची चर्चा करू शकते.

याखेरीज, कियांत येदिदिममध्ये कितीतरी नवनिर्मिती करणारे कलावंत आहेत: त्यात एक संगीतरचनाकार, एक चित्रकार व एक नाटककार आहे. मात्र, हे कलावंत इतर सगळ्यांसारखेच कामगार आहेत व आपली कामे करूनही आपल्या कलेसाठी काही मोकळा वेळ काढून ठेवतात.

मात्र पुष्कळ सभासदांची बौद्धिकता चटकन दिसून येण्यासारखी असली तरी त्यांच्या विचारात आग्रहीपणाचा भाग असल्याचेही तितक्याच स्पष्टपणे दिसून येते. आपले विधान सावधपणे किंवा जपून केले पाहिजे, त्याला काही बाबतीत मुरड

घालायला पाहिजे याची जाणीव त्यांना नसते हे त्यांच्याशी चर्चा करताना कुणाच्याही ध्यानात येईल. हे वैशिष्ट्य त्यांच्या बौद्धिकतेच्या एका वैशिष्ट्यातून निर्माण झाले असण्याचा संभव आहे. त्यांची बुद्धिमत्ता निर्मितिप्रवण असण्यापेक्षा उपयोगप्रवण आहे. "संस्कृती"चे कोणतेही क्षेत्र घ्या, सभासद मुख्यतः उपयोजकाची भूमिका करीत असलेले दिसतात, सर्जकाची नव्हे. त्याचप्रमाणे ते आपल्या मुलांनाही कला, विज्ञान, आणि विद्वत्ता यांचे रसग्रहण करायला शिकवितात. पण निर्मिती करायला शिकवीत नाहीत. खरे म्हणजे एखाद्याची बौद्धिक व कलात्मक निर्मितिक्षमता आर्थिक उत्पादनक्षमतेत व्यत्यय आणीत असेल तर किबुट्झमध्ये त्याला फारसा मान मिळत नाही. सर्जक ज्ञानक्रियेत ते स्वतःला गुंतवीत नाहीत आणि खरे म्हणजे अशा प्रकारच्या विद्वत्तेला अवश्य अशा बौद्धिक साधनांशीही त्यांचा परिचय नसतो त्यामुळे दुराग्रहाला थारा न देणारी प्रमुख गोष्ट जी संशोधक वृत्ती तिचीच वाण किबुट्झ बुद्धिमंतांमध्ये आढळून येते.

सांस्कृतिक आणि कलात्मक अनुभवांवर भर असूनही किर्यात येदिदिमची बुद्धिमंतांकडे बघण्याची दृष्टी वर सूचित केल्याप्रमाणे निःसंदिग्ध आदरभावनेची नाही. बुद्धिमंत हा बुद्धिमंत म्हणून कौतुकाचा विषय असला तरी जोपर्यंत आपल्या बुद्धिमत्तेला तो शारीरिक कार्यक्षमतेची जोड देत नाही तोपर्यंत त्याला सार्थ म्हणून मोठ्या आदराचे स्थान मिळत नाही. "एकसंध व्यक्तिमत्त्व" असलेली व्यक्ती बुद्धिमंत असते व श्रमिकही असते आणि दोन्ही प्रकारची कार्ये ती उत्कृष्टपणे पार पाडते. मात्र, फारच थोड्या लोकांना समन्वित व्यक्तिमत्त्व संपादन करून घेण्याची आस्था किंवा पात्रता असते. किर्यात येदिदिमने आपल्या सभासदांची सर्वसाधारणपणे **तारबुतनिकीम** म्हणजे ज्यांना किबुट्झच्या बौद्धिक व राजकीय बाबींतच अधिक आस्था आहे असे, आणि **मिशकिस्तिम** म्हणजे ज्यांचे किबुट्झच्या आर्थिक व्यवहारातच सर्वात जास्त लक्ष आहे असे, अशा दोन विभागात विभागणी करून ह्या गोष्टीची दखल घेतली आहे. समन्वित व्यक्तिमत्त्वच आदर्श मानले जाते खरे, पण एखाद्या तारबुतनिकाला कधी अर्थव्यवस्था समितीवर घेतले आहे किंवा एखाद्या मिशकिस्ताला सांस्कृतिक समितीवर घेतले आहे असे क्वचितच घडत असल्याची तक्रार (स्वतः तारबुतनिक असलेल्या) एका सभासदाने एका जाहीर सभेत केली होती.

"एकसंध व्यक्तिमत्त्वाचे" ध्येय गाठणे बहुतेक सभासदांना अशक्य असल्यामुळे, काहीजण उत्तम कामगार असतील पण त्यांचा बौद्धिक दर्जा कमी असेल आणि काहीजण बुद्धीने चांगले असले तरी श्रम करण्याची कुवत त्यांच्यात कमी असेल. किबुट्झ संस्कृतीमधील श्रमाची नैतिक प्रतिष्ठा ध्यानात घेतली तर हे साहजिकच असल्याचे ध्यानात येईल की जे उत्तम कामगार आहेत पण बुद्धिमंत नाहीत त्यांना मोठा मान असतो; अणि बुद्धिमंतांच्याकडे मात्र बहुधा संशयाने व

उपहासाने बघण्यात येते. उदाहरणार्थ सार्थींपैकी एकजण मोठ्या रंगतदार व्यक्तिमत्त्वाचा आणि ज्याला जगन्मित्र म्हणावे अशा स्वभावाचा आहे. कितीतरी भाषा त्याच्या जिव्हाग्री आहेत; साहित्य, संगीत, चित्रकला एवढेच नव्हे तर मुस्लिम संस्कृती यांवर तो जाणकारीने आणि मर्मग्राहीपणे बोलू शकतो. तो अमेरिकेत असता तर त्याला यश आणि प्रतिष्ठा मिळवायचे कितीतरी मार्ग उपलब्ध झाले असते. पण इतर सभासदांजवळ प्रस्तुत लेखकाने त्या माणसाच्या विद्वत्तेची व विनोदबुद्धीची तारीफ केली की, " हां, खरं आहे, त्याला थोडेफार कळतं, पण तो **बातलान** आहे" असा शेरा ताबडतोब ऐकायला मिळे. त्याला अतिशय कष्टाची कामे येत असती आणि *शिवाय* जर तो सुसंस्कृत, बुद्धिमान असा असता तर त्याने फार मोठे आदराचे स्थान कमावले असते. पण चित्रकला, शिल्पकला, वाचन किंवा बागकाम यांची त्याला ओढ असल्यामुळे तो उरीपोटी काम करीत नाही. म्हणून किबुट्झने त्याची कोणत्याच ठराविक कामावर नेमणूक केलेली नाही व तो आरोग्यखाते, पाणीपुरवठा, आणि भाजीपाल्याची बाग यांमध्ये लंबकासारखा हेलकावे खात असतो.

प्रशालेतील एका बुद्धिमान विद्यार्थ्याला शहरातल्या एका खाजगी शाळेत पाठवावे की नाही असा प्रश्न एकदा उत्पन्न झाला त्यावेळी बुद्धिमंतांकडे बघण्याचा हा सर्वसाधारण दृष्टिकोण स्पष्टपणे व्यक्त झाला. त्याला पाठविण्याबाबत किबुट्झमध्ये बराच विरोध होता आणि विरोधकांचे नेतृत्व करणारे गृहस्थ हे एक अतिशय आदरणीय संस्थापक होते. ग्रामसभेच्या बैठकीत त्यांनी असा मुद्दा मांडला की बुद्धिमंतांपेक्षा शेतकरी तयार करणाऱ्या शिक्षणाचा किबुट्झला जास्त उपयोग आहे, बुद्धिमंतांना बाहेरून आणता येते. शेवटी त्या विद्यार्थ्याला पाठविण्याचा निर्णय ग्रामसभेने घेतला, पण तरीसुद्धा संस्थापकाने दाखविलेली वृत्ती जास्त सार्वत्रिक होत आहे. ह्या वृत्तीचा वरचष्मा चालू राहिला तर किबुट्झची स्वतःबद्दलची एकसंध व्यक्तिमत्त्वांचा समाज ही प्रतिमा बदलून शेतकऱ्यांचा समाज अशी होईल. असे झाले तर किर्यात येदिदिम म्हणजे नुसती एक सर्वसाधारण शेतवाडी उरेल, " किबुट्झ " नाही.

थोडक्यात, ज्ञान आणि कला यांच्याकडे पाहण्याचा किबुट्झचा दृष्टिकोण अतिशय उपयुक्ततावादी आहे, आणि कलावंत व बुद्धिमंत यांना किबुट्झकडून फारसे प्रोत्साहन मिळत नाही. एका अर्थी ह्यात फार मोठा विरोधाभास आहे. उदाहरणार्थ, इतर किबुट्झ वसाहतींप्रमाणेच किर्यात येदिदिममध्ये कलात्मक कार्यक्रमांचे खूप कौतुक केले जाते. किबुट्झमधले जलसे आणि कलाप्रदर्शने यांना तोबा गर्दी होते, आणि किबुट्झइतका उत्साही श्रोतृवर्ग अन्य कुठेही नाही असा परदेशी कलावंतांचा एकमुखी अभिप्राय आहे. पण इतर किबुट्झ वसाहतींप्रमाणे किर्यात येदिदिमही स्वतः कला निर्माण करण्याऐवजी ( जरूर असेल तेव्हा ) तिची बाहेरून आयात करायला

अधिक उत्सुक असतो. म्हणून जेवणघरातील सजावट, नाटकांसाठी पडदे व नेपथ्य हवे असते तेव्हा, किंवा स्थानिक नाटकांचे दिग्दर्शन व त्यांत भूमिका, संघगायनाचे संचालन, वाद्यवादन, संगीत संयोजन इत्यादी गोष्टींसाठी कलावंत हवे असतात तेव्हा किबुट्झ आपल्यामधील कलावंतांना आवाहन करते खरे, पण त्यांना त्यांच्या कलेच्या व्यासंगासाठी सवड देत नाही किंवा केवळ कलेच्या बळावर त्यांना प्रतिष्ठाही बहाल करीत नाही. प्रतिष्ठा हवी असेल तर कलावंताला शारीरिक श्रमातच नैपुण्य आणि तत्परता दाखवावी लागेल.[१४]

या वृत्तीचे तोटे काही सभासदांना जाणवतात आणि ती बदलली पाहिजे असे त्यांना वाटते. एका भाषणात एका सभासदाने कलावंतांना आपल्या कलेचा विकास करण्यासाठी आवश्यक ती सवड दिली पाहिजे असे मत इतरांसमोर मांडले. " किबुट्झची संस्कृती तेल अव्हिव्हमध्ये निर्माण होणार नाही, ती फक्त किबुट्झमध्येच निर्माण होईल " असे तो म्हणाला. म्हणून जर किर्यात येदिदिमने आपल्यातल्या कलावंतांना, लेखकांना सवड मिळवून दिली नाही तर किर्यात येदिदिमला मुळी संस्कृतीच उरणार नाही असा निष्कर्ष त्याने मांडला. खरे म्हणजे या वृत्तीला कंटाळून दोन कलावंत किबुट्झमधून राजीनामे देऊन निघून गेले आहेत.

किर्यात येदिदिममध्ये जरी कलावंतांना आपापल्या कलेचा पाठपुरावा करता यावा म्हणून दैनंदिन कामाच्या चाकोरीतून त्यांची सुटका केली जात नसली तरी त्यांना अभ्यास आणि कलेचा विकास यांसाठी मधूनमधून संधी जरूर देण्यात येते. उदाहरणार्थ, किर्यात येदिदिममधल्या एका नाट्यलेखकाने आपण इमानी व कुशल शेतकामगार असल्याचे दाखवून दिले होते आणि त्याचे एक नाटक इस्रायलमधल्या एका मोठ्या नाटककंपनीने रंगभूमीवर आणल्यामुळे त्याची निर्मितिक्षमताही सिद्ध झाली होती. तेव्हा किर्यात येदिदिमने त्याला सहा महिन्यांची रजा देऊन युरोपमध्ये नाटक आणि रंगभूमी यांचा अभ्यास करण्यासाठी पाठविले आणि त्याचा सर्व खर्च भागविला. अशाच प्रकारची रजा एका संगीतरचनाकारालाही देण्यात आली होती, मात्र त्याचा प्रवासखर्च किबुट्झला करावा लागला नाही. अमेरिकेतील झिओनवादी

---

१४. ही वृत्ती किर्यात येदिदिमच्या शिक्षणपद्धतीतल्या एका गमतीदार विसंगतीला जबाबदार आहे. उदाहरणार्थ, संगीत या विषयाला शाळेच्या अभ्यासक्रमात महत्त्वाचे स्थान आहे आणि आपल्या प्रशालेच्या वाद्यवृंदाचा आणि बँडचा किबुट्झला अभिमान आहे परंतु तरीसुद्धा एक विद्यार्थी पदवीधर झाला आणि आपल्याला संगीताचे अधिक शिक्षण घ्यायचे आहे अशी त्याने इच्छा व्यक्त केली तेव्हा किबुट्झने त्याला हव्या असलेल्या वाद्यासाठी आवश्यक ती रकम मंजूर करण्याचे नाकारले आणि अशा रीतीने त्याच्या शिक्षणात आगाऊ गुंतविलेले भांडवल शांतपणे वाया जाऊ दिले.

युवक चळवळीला प्रतिनिधी म्हणून किर्यात येदिदिमने त्याला पाठविण्याची व्यवस्था केली आहे आणि जरी त्याला आपला पुष्कळसा वेळ अधिकृत जबाबदारीच्या कामामध्ये घालवावा लागणार असला तरी आपल्या दोन वर्षांच्या वास्तव्यात त्याला अमेरिकेतील गायनशाळेत अभ्यास करता येईल आणि उत्कृष्ट संगीतही ऐकता येईल अशी संधी लाभलेली आहे.

किबुट्झमधल्या शिक्षकांच्या कामाचे स्वरूपच असे असते की त्यांना सबंध वेळ बौद्धिक कामालाच द्यावा लागतो आणि वर वर्णन केलेली वृत्ती त्यांच्यापर्यंतही पोचते. कारण, शारीरिक श्रम करणारांपेक्षा शिक्षकांना कमी लेखण्यात येते ह्या आरोपाचा वारंवार आणि अधिकृतरीत्या इन्कार करण्यात येत असला तरी तो खरा आहे यात काही शंका नाही. शिक्षक व्हायला बहुतेक सभासद तयार का नसतात आणि बहुधा त्यासाठी सक्ती का करावी लागते याला त्या कामाच्या अंगभूत अडचणींच्या जोडीला हेही एक कारण आहे. शिक्षकाचा पेशा पत्करण्यास साब्रांची तयारी नसते, तीही ही यामुळेच. शिक्षणावर किबुट्झ विशेष भर देतो आणि आपली शिक्षणपद्धती हा आपल्या नव्या संस्कृतीचा एक मध्यवर्ती महत्त्वाचा घटक आहे अशी त्याची दृष्टी आहे त्यामुळे त्याची ही वृत्ती विशेषच आश्चर्यकारक वाटते. आपल्या श्टेटेल वारसाचा एक अंश म्हणून ही वृत्ती सभासदांनी कायम ठेवली असणे शक्य आहे. कारण श्टेटेलमध्ये विद्वत्तेवर भर असला तरी शिक्षकांबद्दल फारसा आदर नसे. श्टेटेल शिक्षकांकडे " सबंध समाज तुच्छतेने पाहात असे... साधारणपणे अशी समजूत असते की ज्याला दुसरे काही जमत नाही तो लहान मुलांना शिकविण्याचे काम पत्करतो. "[१५]

शिक्षकाकडे बघण्याचा हा रूढ दृष्टिकोण मुलांच्या नजरेतूनही सुटलेला नाही; आणि सभासद पुनःपुन्हा त्याबद्दलच्या छोट्या कथा आवडीने सांगतात. अर्थातच या गोष्टींच्या खरेपणाची लेखकाला खात्री देता येत नाही. जरी त्या दंतकथा आहेत असे समजले तरी किबुट्झमध्ये शिक्षकाचे स्थान काय आहे ते त्यावरून स्पष्टपणे कळते. पाच वर्षे वयाची मुले आपल्या वडिलांच्या मोठेपणाच्या बढाया मारीत होती. त्यातल्या एकाचे वडील शिक्षक होते व त्यांना टक्कल होते. एक म्हणाला, " माझे वडील किबुट्झमध्ये सर्वांत उत्तम ट्रॅक्टर चालवतात; " दुसरा म्हणाला, " माझे वडील गाईचे दूध काढण्यात फार पटाईत आहेत; " तिसरा म्हणाला, " माझे वडील सर्वांत मोठे माळी आहेत." शिक्षकाच्या मुलाने सांगितले " माझ्या वडिलांना सर्वांत मोठे टक्कल आहे. " दुसरी एक गोष्ट सांगतात ती अशी की मुले आपापल्या वडिलांचे व्यवसाय सांगत होती. एकजण म्हणाला, " माझे वडील ट्रॅक्टर चालवितात; " दुसरा म्हणाला, " माझे वडील गुराखी आहेत; " तिसरा म्हणाला,

१५. Zborowski and Herzog, पृष्ठ ८९.

माझे वडील विजेचे काम करतात, " आणि शिक्षकाचा मुलगा मात्र म्हणाला, " माझे वडील झाडूकाम करतात. " ( खरे म्हणजे, हे काम त्या शिक्षकाचे दुय्यम काम होते. )

आपल्या कमीपणाच्या स्थानाची जाणीव शिक्षकांनाही टोचत असते आणि आपणही कामगारांच्या बरोबरीने काम करू शकतो हे संधी मिळेल तेव्हा " सिद्ध " करण्याचा ते प्रयत्न करतात. शाळेला रजा असते त्या काळात शिक्षकांना तात्पुरती कामे नेमून दिलेली असतात. अशा एका प्रसंगी प्राथमिक शाळेमधल्या एका शिक्षिकेवर स्वयंपाकघरातील काम सोपविलेले होते. प्रस्तुत लेखकाला तिने अनेकदा सांगितले, " आपण इतर कुणाहीप्रमाणे भांडी घासण्याचे काम दिवसभर करू शकतो हे लोकांना दिसावे म्हणून मी स्वयंपाकघराच्या खिडकीसमोर मुद्दाम उभी राहणार आहे. "

किर्यात येदिदिम नुसत्या बुद्धिमंतांना फार मोठी प्रतिष्ठा बहाल करीत नाही तरीसुद्धा प्रतिष्ठा आणि त्याबरोबरच नेतृत्व मिळविण्यासाठी इतर गुणांच्या जोडीने बौद्धिक गुणांनाही महत्त्व आहे. अतिशय कष्टाने आणि निष्ठेने केलेल्या कामाचे किबुट्झ संस्कृतीच्या दृष्टीने अतिशय महत्त्व असले तरी, प्रतिष्ठा व नेतृत्व मिळवायला तेवढी एकच गोष्ट पुरेशी नाही. असा माणूस आदरणीय समजला जातो इतकेच. तो निष्ठावान कामगार असून शिवाय कुशलही असेल तर त्याच्या शाखेचा मुकादम होईल किंवा महत्त्वाचा आर्थिक अधिकारीही होईल. त्यातही, जर त्याची वागणूक किबुट्झ संस्कृतीच्या आदर्शांना धरून असेल तर तो विशेष कौतुकाचा आणि अभिमानाचा विषय होईल. मात्र असे असूनही ग्रामसभेत उत्पादनासंबंधी सोडून इतर विषयांबाबत त्याचा सल्ला विचारला जात नाही किंवा जाहीर वादविवादात त्याच्या मतांना इतर कोणत्याही सर्वसाधारण सभासदांच्या मतांपेक्षा अधिक किंमत दिली जात नाही. आणि हीच गोष्ट सर्वांत महत्त्वाची आहे; ग्रामसभेमध्ये एखाद्याचे मत किती प्रमाणात विचारात घेतले जाते यावरच किबुट्झमध्ये त्याची प्रतिष्ठा ठरते आणि नेतृत्वपदी चढण्याचे तेच साधन बनते. परंतु मत बनवायचे तर त्याच्यासाठी ज्ञान हवे आणि आपले विचार लोकांपर्यंत स्पष्टपणे पोचतील यासाठी भाषेवर प्रभुत्व हवे; आणि ज्याच्याजवळ बुद्धिमत्ता आहे तोच माणूस हे करू शकणार. सारांश, कामातील कसब, आणि निष्ठा, किबुट्झच्या मूल्यांशी सुसंगत अशी वागणूक, अधिक बौद्धिक पात्रता या सर्वांचे एकीकरण ( थोडक्यात " एकसंध व्यक्तिमत्त्व " ), हाच किबुट्झमध्ये प्रतिष्ठा व नेतेपद लाभण्याचा मार्ग आहे.

नुसत्या बुद्धिमंतांना कमी प्रतिष्ठा असली तरीसुद्धा पुष्कळसे सभासद सांस्कृतिक गोष्टींमध्ये खूप रस घेतात. आणि सांस्कृतिक समितीच्या कार्यक्रमांमधून या आस्थेचे चीज करण्याचे प्रयत्न किबुट्झ करतो. सांस्कृतिक समिती यासाठी वर्षभर विविध

कार्यक्रम चालू ठेवते. किबुट्झचे सभासद इंग्रजी, रशियन, बायबल, हिब्रू साहित्य, जीवशास्त्र ह्या आणि ज्यांना मागणी असते अशा इतर विषयांचे औपचारिक वर्ग चालवितात. सांस्कृतिक समिती एक चांगले ग्रंथालय चालविते त्यात निरनिराळ्या भाषांमधली सांस्कृतिक व शास्त्रीय पुस्तके असतात. शिवाय त्यात एक वाचनालयही असून त्यामध्ये दैनिक वर्तमानपत्रे, त्याचप्रमाणे महत्त्वाची साहित्यविषयक व राजकीय नियतकालिके ठेवलेली असतात.

सांस्कृतिक समितीकडून विविध विषयांवर व्याख्यानेही आयोजित केली जातात. एखाद्या विशेष क्षेत्रात कामगिरी केल्याबद्दल प्रसिद्धी पावलेल्या एखाद्या किबुट्झच्या सभासदाची व्याख्याने मधूनमधून होत असली तरी किबुट्झच्या बाहेरूनही व्याख्याते बोलावण्यात येतात. प्रस्तुत लेखकाच्या वास्तव्यात जी व्याख्याने झाली त्यांपैकी काही अस्तित्ववाद, जननशास्त्र, हागाल, इस्रायलच्या आर्थिक समस्या, पोलंडमधले नवे सरकार, अमेरिकन संस्कृती, समकालीन रशियन कादंबरी, इत्यादी विविध विषयांवर होती. सांस्कृतिक समिती संगीताचे कार्यक्रमही आयोजित करते त्यात छोट्या मैफिली किंवा व्हायोलिन वादनाचे जलसे होतात. हे संगीताचे कार्यक्रम म्हणजे किर्यात येदिदिममधले करमणुकीचे अत्यंत लोकप्रिय प्रकार असतात व त्यांना श्रोत्यांची बेसुमार गर्दी होते. साथींची संगीताभिरुची उच्च प्रतीची आहे आणि एखादा कार्यक्रम वाईट झाला तर बेदरकारपणे जलशामधून उठून जाऊन ते आपली नापसंती व्यक्त करतात.

" हबिमा " या इस्रायलच्या सुप्रसिद्ध नाट्यसंचाच्या वार्षिक दौऱ्यात किर्यात येदिदिमचा नेहमी समावेश होतो. ही एक पर्वणीच असते आणि नाट्यप्रयोग बघण्यासाठी सबंध सभासदवर्ग हजर होतो. प्रस्तुत लेखकाच्या मुक्कामात कंपनीने " डेथ् ऑफ ए सेल्समन् " या नाटकाचा ( अर्थात्, हिब्रूमध्ये ) प्रयोग केला.

सांस्कृतिक समिती आठवड्याला एक चित्रपटही दाखविते. या कार्यक्रमाबाबत सभासदांची प्रतिक्रिया संमिश्र स्वरूपाची असते. एका परी ते सिनेमाच्या रात्रीची उत्सुकतेने वाट बघत असतात आणि दुसरी कितीही महत्त्वाची गोष्ट सिनेमा बघण्याच्या आड येऊ देत नाहीत. दुसऱ्या परी किबुट्झमध्ये दाखविण्यात येणारे सगळे चित्रपट हॉलिवुडमध्ये तयार झालेले असल्यामुळे त्यांच्या कथानकांवर सभासद नेहमी विरोधी शेरे मारतात. पुष्कळदा चित्रपट चालू असताना, " वेळ फुकट गेला ! " म्हणून मध्येच उठून जातात आणि तरीही दर आठवड्याला पुन्हा सिनेमाला येतातच.

किर्यात येदिदिम आयोजित करीत असलेल्या कार्यक्रमांखेरीज वेगवेगळ्या किबुट्झ संघांनी आणि विविध सांस्कृतिक गटांनी पुढाकार घेऊन केलेले सांस्कृतिक कार्यक्रम सादर केले जातात आणि त्यांना किर्यात येदिदिमचे सभासद बहुसंख्येने हजर

होतात. प्रस्तुत अभ्यासाच्या काळात किबुट्झ सारिदच्या नाट्यशाखेने सादर केलेल्या होवार्ड फास्टच्या " माय ग्लोरिअस ब्रदर्स " या नाटकाचा प्रयोग; किबुट्झ डेलिया-मधला वार्षिक राष्ट्रीय नृत्याचा उत्सव; आइन हॅरॉड या किबुट्झच्या कलासंग्रहालयात भरलेले मार्क शागालच्या कलाकृतींचे भव्य प्रदर्शन; आणि त्याच कलासंग्रहालयात झालेला एक बॅले नृत्याचा कार्यक्रम असे विविध प्रकार होते. हे कार्यक्रम होऊन गेल्यानंतर पुढे कित्येक दिवस त्यांच्यावर चर्चा चालू राहते.

सामूहिकपणे घ्यावयाच्या या अनुभवांशिवाय सर्वसाधारण सार्थी काही सांस्कृतिक आणि कलात्मक अनुभव वैयक्तिकपणे घेतो. जवळजवळ प्रत्येक खोलीत छोटे वाचनालय असते आणि पुष्कळसे सभासद जो तुटपुंजा वेळ त्यांच्या वाट्याला येतो त्यात शक्य होईल तेवढे वाचन करतात. इस्रायल आकाशवाणी संगीताचे पुष्कळ कार्यक्रम दररोज रेडिओवर सादर करते आणि अनेक सभासद ते नियमितपणे ऐकतात. शहरांत गेल्यावर एखादा नाटकाचा किंवा संगीताचा कार्यक्रम न ऐकताच सभासद परत आला आहे असे क्वचितच घडते. रोजचे वर्तमानपत्र सर्वजण वाचतात आणि या वृत्तपत्रांतून सर्वसामान्य सांस्कृतिक आणि राजकीय स्वरूपाचे लेख प्रसिद्ध होतात. अमेरिकेतल्या रविवारच्या आवृत्तीसारखी इस्रायलमध्ये शुक्रवारची आवृत्ती असते आणि तिच्या अर्ध्या अंकात कला, संगीत, साहित्य आणि राजकारण यावरच चर्चा व टीकालेख असतात शिवाय चालू अमेरिकन, रशियन, आणि युरोपीय मासिकातील लेखांची भाषांतरे असतात.

थोडक्यात सांगायचे तर, सभासद हा नुसता शेतकरी नसून अधिक काहीतरी असतो. तो बौद्धिक विषयात रस असलेला असा शेतकरी असतो. याचाच अर्थ असा की तो मुळी [ रूढार्थाने ] शेतकरी नसतोच. " नुसतेच शेतकरी " असण्याला सभासदांचा हा जो विरोध आहे तो त्यांच्या पेहरावात आणि इतर वागणुकीत मोठ्या अर्थपूर्ण रीतीने प्रतिबिंबित होतो. या बाबतीत किबुट्झमधले सभासद आणि इतर शेतकरी, एवढेच नव्हे तर इस्रायली सहकारी वसाहतींमध्ये राहणारे इतर शेतकरी यांच्या वागणुकीमधला फरक फारच बोलका आहे. सर्वसामान्य शेतकरी हा अनेकदा दाढी वाढलेला असतो आणि दिवसाचे काम संपल्यावर चांगला पोशाख करण्यासाठी कामावरचे कपडे काढीत नाही. कियॉत येदिदिममधला पुरुष दाढी न करता क्वचितच राहील. दिवसाचे काम संपल्यावर तो प्रथम स्नानगृहाशी थांबेल, दाढी-आंघोळ करील आणि कामावरचे कपडे बदलून उरलेल्या दुपारभर आणि संध्याकाळपर्यंत दुसरे चांगले कपडे करील.

पण आपण चांगले दिसायला हवे हा हट्टामागे केवळ आपल्याला तसे केल्याने बरे वाटते एवढाच हेतू नसतो. दैनंदिन जीवनाविषयीची त्यांची जी कल्पना असते तिच्या दृष्टीनेही या हट्टाला महत्त्व आहे. दिवसा ते कामगार असतात पण

संध्याकाळी नागरिक. सभासदाचे कामानंतरचे जीवन म्हणजे एक वेगळेच जीवन असते. त्यावेळी तो आपल्या मुलाबाळांत असतो व समूहाच्या सांस्कृतिक व बौद्धिक कार्यक्रमात, त्याचप्रमाणे सामाजिक जीवनात भाग घेतो. याच वेळात तो वाचन करतो, मित्रांच्या भेटीगाठी घेतो, व्याख्याने किंवा जलसे ऐकतो, आणि हीच वेळ अशी असते की सभासद शेतकऱ्यासारखा दिसतही नाही आणि वागतही नाही.

त्यांच्या खोल्या सुंदर आणि बागा आकर्षक असण्यामागे त्यांची ही आत्म-प्रतिमा हेच कारण आहे; त्यांच्या शाळांतील विविध सांस्कृतिक विषयांचा अभ्यासक्रम अमेरिकेतील कोणत्याही चांगल्या खासगी शाळेशी बरोबरी करणारा असतो याचेही कारण हेच आहे. तांत्रिक किंवा " गृहअर्थशास्त्र " पद्धतीच्या व्यवहारोपयोगी अभ्यास-क्रमांचा अभाव हा सर्वसाधारण ग्रामीण प्रशाळेपेक्षा किबुट्झच्या प्रशाळेचे वेगळेपण स्पष्टपणे दाखविणारा फरक आहे. हे शिक्षण कितपत " उपयोगी " पडते हा प्रश्न वेगळा; या अभ्यासक्रमात किबुट्झची स्वतःबद्दलची जी प्रतिमा दिसून येते ती येथे महत्त्वाची आहे.

मात्र, वरील वर्णनावरून साथींचे अवास्तव चित्र काढल्यासारखे होऊ नये यासाठी हे आवर्जून सांगितले पाहिजे की प्रत्येक साथीला बौद्धिक विषयात रस असतोच असे नाही. स्थलांतराचा निर्णय घेण्यापूर्वी बहुतेक संस्थापक युरोपमध्ये विद्यार्थीच होते हे खरे असले तरी, ते पॅलेस्टाइनला आले ते फार लहान वयात आणि फारच थोड्यांचे औपचारिक शिक्षण पूर्ण झालेले होते. शिवाय, त्यांच्याही नंतर राहायला आलेल्या स्थलांतरितांचे शिक्षण तर संस्थापकांच्या इतकेही झालेले नव्हते आणि त्यांपैकी पुष्कळांचे तर फक्त माध्यमिक शिक्षणच झालेले होते. तरीसुद्धा, किबुट्झ समजावून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे ते सभासदांचे बौद्धिक नैपुण्य नव्हे, तर त्यांचे बौद्धिक कुतूहल. औपचारिक शिक्षण कितीही झालेले असो, सर्वसाधारण सभासद अशा सांस्कृतिक वातावरणात राहतो की बौद्धिक आणि कलात्मक मूल्यांना त्यात विशेष महत्त्व दिले जाते. त्यामुळे पुस्तके वाचावी, व्याख्याने, जलसे ऐकावे, आणि रोजच्या संभाषणात बौद्धिक व राजकीय विषयांवर चर्चा करावी अशी प्रेरणा त्याला होते.

मात्र, या सांस्कृतिक वातावरणात राहूनसुद्धा काही सभासदांमध्ये संकुचित दृष्टी, भोळेपणा आणि सनातनीपणा ही कोणत्याही ग्रामीण समाजात आढळून येणारी वैशिष्ट्ये दिसून येतात. आपले ते चांगले अशी सभासदांची संकुचित दृष्टी कितीतरी प्रकारांनी व्यक्त होते. येथे त्यातले एक उदाहरण द्यायचे म्हणजे त्यांचा कपड्यां-बाबतचा दृष्टिकोण. किबुट्झमधल्यापेक्षा जरा वेगळ्या कपड्यांवर तुच्छतेने टीका केली जाते. सभासद ठराविक पद्धतीची खाकी तुमान किंवा अर्धी विजार व शर्ट असे कपडे

घालतो. टाय, सूट आणि हॅट्स ( कामावर असताना घालावयाच्या असतात त्याहून वेगळ्या ) ह्या गोष्टी " बूर्झ्वा " समजल्या जातात आणि कामाव्यतिरिक्त इतर वेळी-सुद्धा हे कपडे वापरले जात नाहीत. स्त्रीसभासदांचा ठराविक वेष म्हणजे कामावर असताना ब्लाऊझ व स्कर्ट किंवा अर्ध्या विजारी अगर बायकांच्या तुमानी, आणि संध्याकाळी कधीकधी एखादा छापील कापडाचा पोशाख. प्रसाधन वगैरे गोष्टी "बूर्झ्वा" म्हणून टाळायच्या. माणसांच्या दर्जातील फरक कपड्यांमुळे ध्यानात येतो हे सुपरिचित आहे आणि पुष्कळदा त्यांना महत्त्वाचा प्रतीकात्मक अर्थही असतो. त्यामुळे सभासदांनी " बूर्झ्वा " पोशाखाला तुच्छ लेखावे हे समजण्यासारखे आहे. पण काम करताना वापरायचे कपडेसुद्धा किबुट्झच्या पद्धतीपेक्षा वेगळे असले तर सभासद तेवढीच कडक टीका करतात. उदाहरणार्थ, लेखकाच्या पत्नीने एकदा जाड पट्ट्यांचा शर्ट घातला होता तेव्हा तिला खूप टीका ऐकून घ्यावी लागली, कारण फक्त अमेरि-केतले लोकच ते वापरतात अशी समजूत आहे. नुकताच अमेरिकेहून परतलेला एक सभासद अमेरिकन जीन्स घातलेला दिसताच त्याच्यावर अशीच टीका झाली आणि " आपण किती अमेरिकन झालो आहो हे दाखविण्यासाठीच " त्याने हा प्रकार केला असा एकाने शेरा मारला. लेखकाच्या पत्नीने एकदा अर्धी विजार घातली त्यावेळीही अशीच कडक टीका झाली. किबुट्झमधल्या स्त्रियाही अर्ध्या विजारी घालतात पण त्यांच्या मुरड पट्टीत रबर घातलेले असते त्यामुळे त्या मांड्यांना घट्ट आवळून बसतात आणि लेखकाच्या पत्नीने वापरलेली अमेरिकन अर्धी विजार लांबीला जास्त होती तरी तीत रबर नव्हते. त्यामुळे झालेली टीका इतकी सार्वत्रिक होती की शेवटी त्या विजारीच्या पायात रबर शिवून घेणे तिला भाग पडले.

सनातनीपणा हे स्त्रियांचे एक खास वैशिष्ट्य म्हणावे लागेल. उदाहरणार्थ, किबुट्झला एकदा एका प्रेशर कुकरची भेट आली. सामूहिक स्वयंपाकघरात खरे म्हणजे हे वरदानच ठरायला हवे होते. जागेची आणि वेळाची बचत झाली असती व या दोन्हींमुळे स्वयंपाकघरातल्या कामाचा किचकटपणा कमी झाला असता. परंतु असे असूनही स्वयंपाकघरातल्या कामगार वर्गाने तो वापरण्याचे नाकारले; पूर्वी त्यांनी प्रेशर कुकर कधीच वापरलेला नव्हता आणि आता वापरायचा त्यांचा इरादा नव्हता. किबुट्झमध्ये डबाबंद अन्न व भाज्या वापरल्या जात नाहीत याचे कारणही याच वृत्तीत सापडते. हिवाळ्याच्या दिवसात किबुट्झमध्ये आवश्यक ती सर्व फळे व भाज्या असतात. परंतु उन्हाळ्याच्या दिवसात अशी एक वेळ येते की कोणतीही फळे व भाज्या मिळत नाहीत. हंगामात फळे व भाज्या भरपूर असतात तेव्हा ती डबाबंद करून ही टंचाई दूर करता येईल असे लेखकाच्या पत्नीने सुचविले. त्यावर, किबुट्झने पूर्वी असे कधी केलेले नाही, आणि भविष्यकाळात असे काही करण्याची योजनाही नाही असे तिला सांगण्यात आले. " पूर्वी कधीही डबे भरलेले नाहीत एवढ्या एकाच

कारणास्तव ते आताही भरले जाणार नाहीत" असे एक सदस्या काहीसे चिडून म्हणाली.

स्त्रियांच्या सनातनीपणाचे एक उत्तम उदाहरण म्हणून एक गोष्ट सांगता येईल, ती म्हणजे मुलांच्या स्वयंपाकघराची जमीन साफ करण्याविषयीची. जमीन दररोज घासली जाते ती अशा ठराविक पद्धतीने की एका विशिष्ट भिंतीपासून घासायला सुरुवात करून विरुद्ध दिशेच्या भिंतीपर्यंत घासत जायचे. एका दिवशी एकीला वाटले की उलट्या दिशेने सुरुवात करावी. तसे करणे फार सोयीचे होते असे नव्हे पण रोज त्याच त्याच तऱ्हेने काम करून येणारा कंटाळा घालवायला हा बदल बरा आहे असे तिला वाटले. पण ह्या सुधारणेमुळे इतरजणींना धक्काच बसला. जमीन नेहमी एकाच भिंतीकडून सुरुवात करून घासायची असते आणि तीच पद्धत बरोबर असे त्यांचे म्हणणे. शेवटी प्रकरण इतके विकोपाला गेले की एक सदस्या निषेध म्हणून चालती झाली आणि पूर्वीच्याच रीतीने जमीन घासली जाईपर्यंत आपण काम करणार नाही असे तिने जाहीर केले.[१६]

किबुत्झचा भाबडेपणा सर्वांत उघड होता तो त्याच्या बाहेरच्या जगाबद्दलच्या कल्पनांमध्ये. ह्या भाबडेपणाचा काही अंश ध्येयवादातून येतो, पण बाहेरच्या जगा-बद्दलची तुटपुंजी माहिती हीही त्याला पुष्कळ अंशी कारण आहे. उदाहरणार्थ, एका चांगल्या समजूतदार स्त्रीसभासदाशी अमेरिकेतील ज्यूविरोधाबद्दल चर्चा करीत असताना तिने अमेरिकन विद्यापीठात ज्यू विद्यार्थ्यांना ठराविक प्रमाणातच प्रवेश दिला जातो या वस्तुस्थितीकडे लक्ष वेधले. हा दोष दूर केला पाहिजे हे प्रस्तुत लेखकाने मान्य केले पण त्याबरोबरच अशीही माहिती दिली की काही विद्यापीठांनी ही पद्धत बंद केली आहे आणि लेखक ज्या विद्यापीठात शिकवतो त्या विद्यापीठाने त्याच वर्षी सर्व संलग्न कॉलेजातून ही बंधने उठविली आहेत. यावर सदस्या म्हणाली, " ते बरोबर आहे; अटलांटिक करारासाठी ट्रूमनला ज्यूंचा पाठिंबा हवा आहे ना ! "

---

१६. स्त्रियांच्या ह्या सनातनीपणाचे स्पष्टीकरण त्यांच्या असुरक्षिततेच्या भावनेच्या आधारे अधिक चांगल्या रीतीने करता येईल. पुढच्या एका प्रकरणात या भावनेचा विचार येणार आहे. ठराविक दिनक्रम आणि धार्मिक विधी या दोन गोष्टी म्हणजे अस्थिरतेपासून संरक्षण करण्याचे एक साधन असते हे सुप्रसिद्ध आहे आणि कोणताही अचानक घडून येणारा दैनंदिन व्यवहारातला बदल म्हणजे ह्या सुरक्षिततेला खरेखुरे नव्हे पण प्रतीकात्मक आव्हान असते. सर्वसाधारणपणे ( आणि विशेषतः वरच्या दोन उदाहरणांतला ) अशा प्रकारचा सनातनीपणा त्यांच्यात ज्यांना ' निजाण ' ( प्रिमिटिव्ह ) म्हणतात, अशा म्हणजे ज्यांचे औपचारिक वा अनौपचारिक शिक्षण कमी आहे अशा स्त्रियांमध्ये दिसून येतो.

ग्रामीण संस्कृतीचे हे सगळे आविष्कार लक्षात घेऊनही असे म्हणायला हवे की किबुट्झबाबत अगोदर केलेल्या विधानांच्या सत्यत्वाला त्यामुळे धक्का पोचत नाही. सर्वसाधारण ग्रामीण समाजापेक्षा या समाजाचे जगाबद्दलचे ज्ञान वरच्या दर्जाचे आहे; आणि त्याचे बौद्धिक कुतूहल आणि नैपुण्य हे सर्वसाधारण पाश्चिमात्य देशातल्या ग्रामीण किंवा नागर समाजापेक्षाही पुष्कळच वरच्या पातळीचे आहे.

* * *

प्रकरण : ६ :

# किबुट्झ – एक राजकीय समाज

*समवायाचे ऐक्य टिकून राहायचे तर त्यातल्या सभासदांचे एखाद्या धार्मिक तत्त्वावर, किंवा तसे तत्त्व नसेल तर त्यांच्या दृष्टीने धर्माइतक्याच महत्त्वाच्या अशा दुसऱ्या एखाद्या तत्त्वावर एकमत असले पाहिजे...*

**The Communist Societies of the United States**
Charles Nordhoff

## आदर्शवादी पंथाकडून राजकीय समाजाकडे

किर्यात येदिदिमच्या प्रारंभीच्या इतिहासावरून वा प्रागितिहासावरूनही हे स्पष्ट दिसून येते की प्रारंभीच्या संस्थापकांची ( झिऑनवाद सोडता इतर ) मूल्ये किंवा ध्येये आणि एकोणिसाव्या शतकात अमेरिकेत स्थापन झालेल्या अनेक आदर्शवादी सामवायिकांची मूल्ये व ध्येये यांत फारसा फरक नाही.[1] त्या आदर्शवादी सामवायिकांमधील सभासदांप्रमाणेच ह्या तरुण प्रवर्तकांचाही खाजगी मालमत्ता, सामाजिक विषमता, मनुष्याने केलेले मनुष्याचे शोषण आणि नागरी राहणीतील चैन व "सवंगपणा" यांना विरोध होता. आदर्शवाद्यांप्रमाणेच किबुट्झच्या प्रवर्तकांचीही अशी श्रद्धा होती की ज्या समाजात मालमत्ता सामूहिक मालकीची आहे; ज्यात संपत्ती, आप्तसंबंध किंवा सत्ता यांच्या पायावर केल्या जाणाऱ्या कृत्रिम भेदांना प्रतिबंध करून सामाजिक समतेची हमी दिली जाते; भाडोत्री मजुरांचा उपयोग निषिद्ध ठरवून सगळे काम सगळे सभासद स्वतःच करतात व शोषण टाळतात; ज्यात सदस्य राहतात, जमिनीवर काम करतात आणि शक्यतो आपल्या सर्व आर्थिक गरजा भागविल्या जातील इतके उत्पादन करतात – अशा समाजातच माणूस आपल्या सुप्त

---

1. सामाजिक वर्तणुकीचे शास्त्र तयार करण्याच्या दृष्टीने सामग्री म्हणून ह्या आदर्शवादी प्रयोगांना फार महत्त्व आहे. तरीही त्यांचा प्रमाणभूत मानता येईल असा विश्लेषणात्मक अभ्यास झालेला नाही. त्याअभावी वाचकांनी पुढील ग्रंथांचे अवलोकन करण्यास हरकत नाही : Nordhoff, **The Communist Societies of the United States;** Gide, **Communist and Co-operative Colonies;** Holloway, **Heavens on Earth.**

शक्तींचा पुरेपूर विकास करू शकेल. आणखी असे की, या आदर्शवादी सामवायिकां-प्रमाणेच सुरुवातीचा किबुट्झ हाही एक " पंथ[२] " म्हणजे " बाह्य " जगाला विरोध करणारा, आणि ज्याचा सभासद वर्ग गटाच्या सर्वश्रेष्ठ ध्येयाशी स्वखुशीने वचनबद्ध झालेला आहे असा समूह होता.

मात्र, येथे हे स्पष्ट करायला पाहिजे की प्रारंभीचे किबुट्झ आणि हे आदर्शवादी समवाय यांमध्ये काही मूलभूत फरक आहेत. आदर्शवादी समूहांपैकी बऱ्याचश्या समूहांचे सदस्य हे मुख्यतः कामगारवर्गातून आलेले होते. त्यांना बौद्धिक विषयात विशेष रस नसे आणि त्यांचे सांस्कृतिक क्षितिजही फारसे विस्तृत नसे; उलट किबुट्झमध्ये जे आले ते मुख्यतः बुद्धिमंत असून त्यांनी मुद्दाम कामगारांचे जीवन पत्करले होते आणि त्यांची सांस्कृतिक क्षितिजे " बंधनातून मुक्त " झालेल्या मध्यमवर्गाची होती. कियीत येदिदिम आणि आदर्शवादी समाज यांमधील दुसरा एक मोठा फरक म्हणजे त्यांची धर्माकडे बघण्याची वेगवेगळी दृष्टी. आदर्शवादी समाजांपैकी बहुतेक धार्मिक स्वरूपाचे होते आणि मूलस्वरूपातल्या ख्रिश्चन धर्माचे पुनरुज्जीवन करण्याच्या इच्छेने प्रवृत्त झालेले होते. उलट, कियीत येदिदिमने धर्माला नेहमीच उघड विरोध केलेला आहे, किंवा निदान असे म्हणता येईल की रूढ अर्थाने ज्या गोष्टींना धार्मिक म्हणतात त्यांना विरोध केला आहे. जीवनाला भावनात्मक अंग पुरविण्यासाठी ज्यात धर्मा-ऐवजी निसर्गाची प्रतिष्ठापना केलेली आहे आणि बौद्धिक व कार्यकारणभावात्मक अंग पुरविण्यासाठी विज्ञानाची प्रतिष्ठापना केलेली आहे असा एक धर्मातीत समाज निर्माण करण्याची त्यांची मनीषा होती.

कियीत येदिदिम आणि आदर्शवादी समवाय ( ओनीडा समाजाचा अपवाद वगळून ) यांतील दुसरा फरक म्हणजे त्यांची लैंगिक प्रश्नाकडे आणि स्त्रीपुरुषांमधील संबंधाच्या सर्वसामान्य प्रश्नाकडे बघण्याची दृष्टी. आदर्शवाद्यांपैकी काहींनी पुरुष आणि स्त्रिया यांतील संबंधाबाबतचा पारंपरिक दृष्टिकोणच कायम ठेवला होता आणि नव्या समाजातही तोच संबंध पुढे चालू ठेवण्यास ते राजी होते. याचा अर्थ असा की लैंगिक वर्तणूक, कुटुंबाची रचना, श्रमविभागणीतील लैंगिक भेदभाव, आणि मुलांचे सामाजिक संस्करण या गोष्टी बाहेरच्या जगात ज्या पद्धतीने चालतात त्याच पद्धतीने आदर्श समाजातही ठेवायच्या. उलट, काही आदर्शवाद्यांच्या ( उदाहरणार्थ, शेकर पंथीयांच्या ) मते लैंगिक संबंध आणि लग्न या गोष्टी पापमय असल्यामुळे ब्रह्मचर्य

---

२. " पंथ " या संकल्पनेचे स्पष्टीकरण Troeltsch च्या **The Social Teachings of the Christian Churches** मध्ये पाहा.

किबुट्झच्या बदलत्या मूल्यांचे ह्या व पुढच्या प्रकरणांतून जे विवेचन केले आहे त्याची बरीचशी सैद्धांतिक चौकट ट्रौएल्श्च्या " पंथ प्रकार " व " चर्च प्रकार " यांच्या मर्मग्राही विश्लेषणावर आधारलेली आहे.

आणि स्त्रीपुरुषांमध्ये कमीत कमी संपर्क या पायावर त्यांनी आपल्या समाजाची उभारणी केली होती. ओनीडा समवायाने मात्र रूढ लैंगिक संबंधांत क्रांती केली. या समवायाने एकपति ( किंवा एकपत्नी ) पद्धतीऐवजी गटविवाह पद्धतीचा आणि किबुट्झप्रमाणेच मुलांच्या सामूहिक संगोपनाच्या पद्धतीचा अवलंब केला. पण या पद्धतींची उभारणी लैंगिक संबंध, प्रजोत्पत्ती आणि सुप्रजाजनन[3] यांविषयी जॉन हम्फे नोयेसचे जे धार्मिक स्वरूपाचे विचार होते त्यांवर आधारलेली होती. किर्यात येदिदिम व ओनीडा यांत हा फरक आहे. किर्यात येदिदिमनेही परंपरागत चालीरीतींचा त्याग केला पण तो धार्मिक कारणांसाठी न करता राजकीय, सांस्कृतिक आणि मानसशास्त्रीय अशा ( धर्मनिरपेक्ष ) कारणांसाठी केला. ह्या कारणांची चर्चा आपण मागे केलेलीच आहे.

सारांश, बंधुभावावर आधारित अशा समाजात सामूहिक जीवनामधून आपली वैयक्तिक मुक्ती साध्य करायची आहे असा उद्देश असलेला आदर्शवादी पंथ म्हणून किबुट्झची सुरुवात झाली. पंथ पद्धतीच्या समाजाचे ट्रोएल्शने पुढील उताऱ्यात जे वर्णन केले आहे ते प्रारंभकाळातील किबुट्झला चपखलपणे लागू पडणारे आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे पंथ हे

> ...तुलनेने लहानसे गट असतात; व्यक्तींची आंतरिक परिपूर्णता आणि गटाच्या सभासदांत प्रत्यक्ष व्यक्तिगत बंधुभाव असे त्यांचे ध्येय असते. त्यामुळे अगदी सुरुवातीपासून आपली लहानशा गटात संघटना करणे आणि जगावर स्वामित्व गाजविण्याची इच्छा सोडून देणे त्यांना भाग पडते. बाहेरचे जग, राज्यसंस्था, बाहेरचा विशाल समाज यांकडे ज्या भावनेने ते बघतात ती उदासीनत्वाची, फार तर सहिष्णुत्वाची किंवा क्वचित शत्रुत्वाचीही असते. कारण बाह्य समाजाला काही वळण लावण्याची किंवा त्याच्या सामाजिक पद्धती आत्मसात करण्याची त्यांची इच्छा नसते; उलट त्याच्यापासून चार हात लांब राहण्याचीच त्यांची प्रवृत्ती असते.[4]

आपल्या वैयक्तिक आणि सामूहिक अनुभवातच जीवनाचा अर्थ शोधू पाहणाऱ्या या किबुट्झच्या संस्थापक तरुणांनाही जगावर पाठ फिरविणे अवश्य आहे असे वाटले. जग वाईट आहे असे आढळल्यावर ते बदलायला प्रवृत्त होणाऱ्या इतरांपेक्षा या तरुणांनी वेगळा मार्ग चोखाळला. त्यांनी बाह्य जगातून आपले लक्ष काढून घेतले आणि बंधुभाव व प्रेम यांवर आधारलेले आपले विश्व उभे करण्यात आणि त्यातच वैयक्तिक मुक्ती मिळविण्याच्या प्रयत्नात ते रममाण झाले.

मात्र हळूहळू सुरुवातीचा वैयक्तिक मोक्ष मिळविण्याचा हेतू बदलत गेला आणि आता किर्यात येदिदिमचे मुख्य ध्येय सामाजिक क्रांतीला गती देणे हे झाले आहे.

---

३. ओनीडा प्रयोगासंबंधी तपशीलवार अभ्यास अजून कोणीच केला गेलेला नाही पण काही सर्वसाधारण वर्णनात्मक हकिकती सापडतात. पाहा Parker, **A Yankee Saint,** आणि Noyes, **My Father's House.**

४. Troeltsch, **Christian Churches,** पृ. ३३१

आपली धार्मिक रूपकाचीच भाषा पुढे चालू ठेवून असे म्हणता येईल की "परावृत्त" पंथातून "लढाऊ" पंथात त्याचे रूपांतर झाले आहे.[5] थोडक्यात, अद्याप "जगाला" विरोध असूनही किर्यात येदिदिम जगापासून माघार घेण्याऐवजी आता "जग" बदलण्याची, आपल्या प्रतिमेप्रमाणे त्याला आकार देण्याची महत्त्वाकांक्षा बाळगत आहे. हे रूपक फार न ताणता असे म्हणता येईल की त्यांचा ऐतिहासिक ज्यू आदर्श आता "इसीन"[6] हा राहिला नसून "प्रेषित" (प्रॉफेट) हा झाला आहे.

धार्मिक परिभाषा सोडून नेहमीच्या भाषेत हेच सांगायचे तर किर्यात येदिदिम हा एक राजकीय समाज बनला आहे, किबुट्झच्या सभासदांपेक्षा बाहेरच्या जगात बदल घडवून आणणे हे त्याचे मुख्य ध्येय झाले आहे. विचारसरणीतला हा बदल फार पूर्वी म्हणजे किबुट्झ संघाची दुसरी जागतिक परिषद भरली त्याच वेळी झाला. या परिषदेने संमत केलेल्या एका ठरावात म्हटले आहे :

> आमच्या शिक्षणाचा मध्यबिंदु व्यक्ती हा आहे. उलट, आमच्या ध्येयाचा ध्रुवतारा म्हणजे समाज—किबुट्झ समाज आहे. आमची व्यक्तीवर श्रद्धा आहे पण ती केवळ व्यक्ती म्हणून नव्हे. नव्या मानवाचे व्यक्तित्व ज्या प्रमाणात ते नवा समाज उभारायला साहाय्य करील त्या प्रमाणातच मोलाचे आहे.

विचारसरणीत हा बदल का घडून आला याची मीमांसा करणे सोपे नाही. परंतु बदल घडायला ज्या अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या त्यांपैकी तीन गोष्टींचा येथे विचार केला पाहिजे. त्या म्हणजे किबुट्झ-अंतर्गत परिस्थिती, किबुट्झ-बाह्य परिस्थिती आणि युरोपीय युवक चळवळीचा परिणाम. किबुट्झ अस्तित्वात आल्या-वरच्या सुरुवातीच्या काही वर्षांनंतर असे ध्यानात आले की सहलींमधली भटकंती, नवसमाजाची पायाभरणी, नागर रूढींच्या जाचातून मुक्तता आणि रात्ररात्र चालणारी नाचगाणी यांतली प्रारंभीची रोमहर्षक धुंदी उतरल्यावर प्रत्यक्ष वस्तुस्थितीला तोंड देण्याचा प्रश्न लांबणीवर टाकणे शक्य होईना. समाजरचना बदलली तरी "मनुष्य-स्वभाव" एकदम बदलत नाही हे लक्षात आले होते. समाजजीवनातील ज्या समस्यां-मधून संस्थापकांनी स्वतःची सुटका करून घेतली होती त्या समस्या आपण स्थापन केलेल्या समाजातही उत्पन्न होत आहेत असे दिसून येत होते आणि ज्या समस्यांचा निरास झाला होता त्यांच्या जागी नव्या समाजाचे म्हणून काही नवेच प्रश्न निर्माण

---

५. हे शब्द ("Withdrawing" व "Militant") Nottingham याने पृष्ठ ६३ वर सुचविले आहेत.

६. प्रस्तुत लेखकाच्या माहितीप्रमाणे इसीनांशी असलेले हे साम्य प्रथमतः एडमंड विल्सनने **The Scrolls from the Dead Sea** ह्या ग्रंथात लक्षात आणून दिले आहे.

होत होते.[७] युवक चळवळीत आणि नेव्ही गिलामध्ये आलेल्या रोमांचकारी आणि भावनोद्दीपक अनुभवातून ज्यांची किबुट्झची प्रतिमा जन्माला आली होती त्या तरुण आणि स्वप्नाळू संस्थापकांना या सत्यदर्शनाने मोठा धक्का बसला. मात्र नैराश्याला किंवा वैफल्याला बळी पडण्याऐवजी संस्थापकांनी इतर किबुट्झ वसाहतींप्रमाणेच असा निष्कर्ष काढला की यात किबुट्झच्या समाजपद्धतींचा किंवा मनुष्यस्वभावाचा-सुद्धा काही दोष नाही तर आपण ज्या व्यापक समाजाचा एक भाग आहोत त्याचाच हा दोष आहे. बाहेरचे जगच जर अपूर्ण असेल आणि जगाचा जर आपल्यावर मोठा प्रभाव पडत असेल तर आपल्या स्वतःपुरतेच परिपूर्ण असे जग निर्माण करणे पुरेसे नाही. मोठ्याथोरल्या दुष्ट जगात एक छोटासा युटोपिया यशस्वी होणे शक्य नाही, म्हणून, सबंध जगाचेच युटोपियात रूपांतर केले पाहिजे.

अनेक किबुट्झ-बाह्य अडचणीही अशा होत्या की त्यांच्यामुळे सभासदांना स्वतःच्या वैयक्तिक मुक्तीच्या विचाराकडून सामाजिक मुक्तीच्या विचाराकडे वळावे लागले. पॅलेस्टाइनमधील ब्रिटिशांची राजवट व तिचे जू झुगारून देण्याची ज्यूंची इच्छा यामधून काही प्रश्न निर्माण झालेले होते; अरब आणि ज्यू यांच्यामधल्या संबंधांची समस्या सोडविण्याचा उत्तम उपाय कोणता हा एक प्रश्न होता, आणि शेवटी, पॅलेस्टाइनमधल्या निरनिराळ्या ज्यूंच्या गटातील संबंधांचा एक मोठा थोरला प्रश्न होता. सगळ्या ज्यूंना झिऑनवादाबद्दल आस्था नव्हती आणि सगळ्याच झिऑनिस्टांना किबुट्झ प्रवर्तकांच्या ध्येयाविषयी सहानुभूती नव्हती. ह्या वस्तुस्थितीला तोंड देण्याचा प्रश्न सभासदांसमोर देशात पोचल्यापासूनच उभा होता. सभासद ज्यू मळेवाल्यांच्या मळ्यांत कामासाठी अर्ज करीत तेव्हा त्यांना बहुतेक वेळा नकार मिळे, कारण मळेवाल्यांना अरब मजूर स्वस्तात मिळत आणि त्यांचे शोषण करण्यात त्यांना कसलीही आडकाठी नव्हती. यामधून ज्यू मळेवाल्यांशी बखेडे होत आणि त्याचा शेवट पोलिसांशी धक्काबुक्की होण्यात होई. या आर्थिक झगड्यातून संस्थापकांनी, त्याचप्रमाणे पॅलेस्टाइनमधल्या इतर कामगार गटांनी असा धडा घेतला की आपले हक्क वाढवायचे व सुरक्षित ठेवायचे असतील तर ते फक्त बळकट संघटनेमार्फतच शक्य होईल. म्हणून **हिस्ताद्रुत** ( जनरल फेडरेशन

---

७. Maletz च्या **Young Hearts** या कादंबरीत ह्या विषयाची संवेदनाशील रीतीने हाताळणी केलेली आहे व ती लेखकाच्या स्वानुभवावर आधारलेली आहे. Mosensohn च्या *Derech Gever* कादंबरीतही ह्या प्रश्नाच्या काही बाजू दाखविल्या आहेत.

ऑफ लेबर ) नावाच्या मध्यवर्ती कामगार संघाची १९२० मध्ये स्थापना झाली. पुढे असे दिसून येऊ लागले की पॅलेस्टाइनच्या सर्वसाधारण आर्थिक आणि राजकीय आन्दोलनात आपल्याशी एकजुटीने राहतील अशा आणखी पुष्कळ किबुट्झ वसाहती अस्तित्वात आल्या तर आपल्या स्वतःच्या किबुट्झची प्रगती होईल आणि ती सुरक्षित राहील. अशा रीतीने या सर्व कारणांमुळे मजूर चळवळीशी त्यांचे संघटन वाढत गेले आणि विशेषतः किबुट्झ चळवळीचे सामर्थ्य वाढविले पाहिजे अशी महत्त्वाकांक्षा त्यांच्यात निर्माण झाली.

---

८. हिस्ताद्रुत म्हणजे नऊ कामगार संघ ( ट्रेड यूनियन्स ) आणि कामगार संघटना ( लेबर ऑरगनायझेशन्स ) यांचा देशव्यापी संघ. ते म्हणजे ( १ ) शेतमजुरांचे फेडरेशन ( यात किबुट्झ सभासद असतात ); ( २ ) कारकून आणि कचेरीतील इतर नोकर यांची यूनियन; ( ३ ) इंजिनियर्स, आर्किटेक्ट्स आणि सर्व्हेयर्स यांची यूनियन; ( ४ ) बांधकाम खात्यातील मजुरांचे फेडरेशन; ( ५ ) रेल्वे, पोस्ट आणि तारखाते यांतील कामगारांची यूनियन; ( ६ ) दवाखान्यातील नोकरांची यूनियन; ( ७ ) ' वर्किंग यूथ फेडरेशन; ' ( ८ ) मध्यवर्ती कामगार स्त्रियांचे कौन्सिल; ( ९ ) पॅलेस्टाइन लेबर लीग. या नऊ संघटना हिस्ताद्रुतच्या सर्वसाधारण मंडळाला ( जनरल कन्व्हेन्शन ) निवडून देतात व हे मंडळ सर्वसाधारण समितीला ( जनरल कौन्सिल ) निवडून देते. सर्वसाधारण समितीची कार्यकारी प्रतिनिधी म्हणजे सेंट्रल एक्झिक्युटिव्ह कमिटी. मात्र हिस्ताद्रुत ही केवळ कामगार संघटना नाही. इस्रायलमधील मोठ्या उद्योगप्रवर्तक संघटनांपैकी ती एक असून देशातील काही महत्त्वाचे व्यवसाय तिच्या मालकीचे आहेत. या सर्व व्यवसायांचे एकत्रीकरण करणाऱ्या मंडळाचे नाव हेव्हरात ओव्हडिम असे असून ते हिस्ताद्रुतशी समव्याप्त आहे—म्हणजे एकाचे सभासदत्व असले की दुसऱ्याचेही आपोआपच मिळते.

किर्यात येदाइम हिस्ताद्रुतची मेंबर असून हिस्ताद्रुतच्या जनरल कौन्सिलने आपल्या अखत्यारातील राष्ट्रीय व श्रमिक प्रश्नांविषयी व कामगारांच्या कामाच्या सोयीसवलतींविषयी जे निर्बंध घातले आहेत ते त्याला लागू असतात. त्याचबरोबर हिस्ताद्रुतची मेंबर असल्याचे अनेक फायदेही किबुट्झला मिळतात. हिस्ताद्रुतच्या ग्राहक सहकारी संघाकडून माल विकत घेता येतो व त्याच्या विक्रय संघामार्फत आपला माल विकता येतो. शिवाय वाहतूक संघाचाही लाभ घेता येतो. हिस्ताद्रुतने उत्कृष्टपणे चालविलेल्या राष्ट्रीय वैद्यकीय सेवेचा लाभही त्याला मिळतो. या सेवे-मार्फत किबुट्झला एक परिचर्यागृह, एक निवासी डॉक्टर, एक दंतवैद्य, एक परिचा-रिका आणि रुग्णालयीन सेवा धरून सर्व वैद्यकीय सेवा मिळतात. हिस्ताद्रुत आपल्या सभासदांना वार्धक्यनिर्वाहही देते. अधिक माहितीसाठी पाहा: Kurland, Co-operative Palestine, आणि Muenzner, Labor Enterprise in Palestine.

त्याच वेळी वैयक्तिक प्रश्न सोडविण्याआधी प्रथम सामाजिक प्रश्न सोडवायला हवा असा विचारही मूळ धरू लागला. काहीजणांना असे वाटू लागले की " मनोविश्लेषण " व " युटोपियन समाजवाद " या गोष्टी व्यक्तींचे प्रश्न सोडविण्याच्या कामासाठी ठीक असल्या तरी त्यांमुळे सामाजिक प्रश्न सुटणे शक्य नाही. याकरिता ते " शास्त्रीय समाजवादा " कडे वळले. " आम्हाला पॅलेस्टाइनमधल्या राजकीय वास्तवाचे शास्त्रीय स्पष्टीकरण हवे होते आणि त्याच्या शोधात असताना आमची मार्क्सवादाशी गाठ पडली " असे एका संस्थापकाने सांगितले.

किबुट्झवरील मार्क्सवादाच्या ह्या प्रभावाचे मूळ १९२०–२५ च्या काळात युरोपीय युवक आंदोलनाच्या स्थलांतरितांची जी दुसरी मोठी लाट आली तीत होते. कारण आंदोलनाच्या स्वयंसेवकांवर युरोपियन साम्यवादी चळवळीचा मोठा प्रभाव पडला होता. या काळात आंदोलनातील सगळ्या सभासदांचा ज्यात समावेश होईल अशी एक राजकीय संघटना तयार करण्यासाठी एक सभा घेण्यात आली होती. परंतु हा प्रयत्न फसला कारण युवक आंदोलनाची सुरुवातच राजकारण–विरोधातून झाली होती आणि प्रारंभीच्या ह्या विचारसरणीचा असर त्यांच्यावर अजूनही होता असे कित्येक सभासद कोणतीही राजकीय हालचाल करण्याच्या विरुद्ध होते. यानंतर काही वर्षांनी त्या वेळी अस्तित्वात असलेल्या सगळ्या किबुट्झ वसाहतींना सामाजिक, शैक्षणिक आणि राजकीय विषयांसाठी एकत्र आणून त्यांचा एक संघ ( फेडरेशन ) बनविण्याचा प्रयत्न ह्या आंदोलनाच्या सभासदांनी केला. हाही प्रयत्न फसला कारण संघामध्ये राजकीय कार्यक्रमांना अंतर्भाव करायला काहींचा विरोध होता. शेवटी १९२७ मध्ये अशा तऱ्हेचा संघ – " फेडरेशन " – अखेरीस स्थापन झाला. संघाची जी विचारप्रणाली तयार करण्यात आली तिच्यामुळे किर्यात येदिदिमचे ' परावृत्त ' पंथातून ' लढाऊ ' पंथात व आदर्शवादी समाजातून राजकीय समाजात रूपांतर झाले.[१]

---

१. किबुट्झ ध्येयवादाच्या दृष्टीने संघाचे महत्त्व चिरस्थायी स्वरूपाचे आहे हे खरेच. पण संघ आणखीही काही कार्ये करतो. कामाच्या परिसरातील सोयी, शैक्षणिक धोरण आणि अभ्यासक्रम, भांडवली सामानाची वाढ, कपडे, सुट्टया, सुट्टीचे भत्ते यांची किमान प्रमाणे आणि किबुट्झ जीवनातील अशी अनेक तपशिलाची कलमे यांबाबत संघ आपल्या समित्यांमार्फत देखरेख करतो. शिवाय प्रत्येक किबुट्झसाठी संघ इतर अनेक सेवा देतो. कृषिविषयक व अर्थविषयक प्रश्नांबाबत तांत्रिक सल्ला, आर्थिक मदत, शिक्षकांच्या प्रशिक्षणाची सोय, पुस्तके व नियतकालिके यांचे प्रकाशन, व्याख्याने व जलसे यांचे आयोजन, आणि नव्या किबुट्झ वसाहतींना सामाजिक व आर्थिक बाबतीत मार्गदर्शन – इत्यादी गोष्टींचा या सेवांत अंतर्भाव होतो.

## ध्येयवादाचे स्वरूप आणि कार्ये

किर्यात येदिदिममधील जीवन बिकट आहे. कामाचा दिवस लांब आणि कष्टाचा असतोच पण हवामान अनेकदा त्रासदायक असल्यामुळे तो अधिकच दुःसह वाटतो. कामाचा आठवडा सहा दिवसांचा असतो आणि आठवडाअखेर मोठी सुट्टी नसते किंवा दीर्घ मुदतीच्या सुट्ट्या नसतात. त्यामुळे शुक्रवारची रात्र होते तेव्हा लोकांना शारीरिक थकवा आलेला असतो. शिवाय, किबुट्झने आपले राहणीमान सुधारण्यासाठी आपले क्षेत्रफळ वाढविले असले तरी त्या प्रमाणात आपले मनुष्यबळ त्याला वाढविता आलेले नाही; आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणे भाडोत्री मजूर लावणे किबुट्झच्या ध्येयवादात बसत नाही. त्यामुळे श्रमिकांची टंचाई हा किबुट्झला सतत भेडसावणारा प्रश्न आहे. हा प्रश्न सोडविण्यासाठी अनेकदा कापणीच्या हंगामात विश्रांतीवर पाणी सोडावे लागते. असे केले नाही तर उभे पीकच जमिनीत कुजून जाईल अशी भीती असते.

अशा कामाच्या पद्धतीने अपरिहार्यपणे शारीरिक थकवा येतो आणि राहण्याच्या व्यवस्थेतील काही गैरसोयींनी त्यात अधिकच भर पडते. जेवणघरात गर्दी व गोंगाट आणि शौचकूप व स्नानगृहांची नीच अवस्था. स्नानगृहादी सोयी राहण्याच्या जागेपासून फार लांब असतात आणि तेथे पोचायचे म्हणजे कधीकधी चिखल व पाऊस यांतून वाट काढीत जावे लागते.

असे असूनही ज्यांना बाहेर चांगल्या मिळकतीचे उद्योग किंवा सरकारी नोकऱ्या मिळतील असे लोकसुद्धा सहसा किबुट्झ सोडून जात नाहीत. मात्र, किर्यात येदिदिम ज्याच्याशी संलग्न आहे त्या संघामधल्या सर्व किबुट्झ वसाहतींच्या बाबतीत हे सामान्यतः खरे असले तरी इतर किबुट्झ संघांच्या बाबतीत तसे नाही; तेथील पुष्कळ सभासद सोडून जात आहेत. जे मागे उरतात त्यांच्यावर या गोष्टींचा फार गंभीर परिणाम होतो. ते खचून जातात.

दुसऱ्या किबुट्झ संघामधले सभासद अलीकडे राजीनामे का देत आहेत? किबुट्झमधले जीवन कठीण असले तरी सुस्थापित अशा किबुट्झ वसाहतींमध्ये पूर्वी होते त्यापेक्षा ते आज पुष्कळच सुकर झाले आहे; असे असूनही पूर्वी फार कमी लोक राजीनामे देत असत. एका किबुट्झचे लोक जेव्हा प्रथम देशात आले तेव्हा ज्यूइश एजन्सीने त्यांना दक्षिणेकडच्या सुपीक जमिनीच्या व लोकवस्ती असलेल्य प्रदेशात वसाहत करायला सांगितले. परंतु त्यांनी ते नाकारले व उष्णकटिबंधातील एका दरीमध्ये वसाहत करण्याचा हट्ट धरून निकृष्ट जमीन, गुदमरून टाकणारे ऊन आणि अरब हल्ल्यांची शक्यता असे तिहेरी आव्हान स्वीकारले! कारण काही झाले तरी ते प्रवर्तक होते! आज अरब गेले आहेत, जमीन सुपीक आहे व सावल्या देणारी झाडे, सीमेंटची घरे, नळाचे वाहते पाणी, स्नानगृहे इत्यादींमुळे उन्हाचा कडकपणा

पूर्वीपेक्षा कितीतरी कमी झाला आहे. तरीसुद्धा, प्रस्तुत अभ्यास सुरू करण्यापूर्वीच्या वर्षी त्याच किबुट्झमधल्या लोकसंख्येच्या २५ टक्के लोक राजीनामे देऊन गेले होते.

ह्या घटनेचे केवळ एकच स्पष्टीकरण आहे असा आभास उत्पन्न करणे चुकीचे ठरेल. सबंध किबुट्झ चळवळीतच आज एक पेचप्रसंग निर्माण झाला आहे व या सर्व-साधारण विधानाला किर्यात येदिदिम अपवाद नाही.[10] पण ताबडतोब लक्षात येणारी एक गोष्ट ह्या संदर्भात महत्त्वाची आहे. कोणत्याही किबुट्झमध्ये जवळ जवळ प्रत्येकाच्या अनुभवाला येणारी इतकी वैफल्ये आहेत की केवळ वैयक्तिक सुखाचीच अपेक्षा ज्याला आहे असा कोणीही माणूस तेथे फार दिवस राहणे चालू ठेवणार नाही. वैयक्तिक वैफल्य असूनही जो राहतो त्याची दुसरी कोणतीतरी प्रेरणा अधिक प्रबळ असते. ही प्रेरणा पुढीलपैकी एक किंवा दोन्ही असू शकतील: भविष्यातील सुखासाठी वर्तमानकाळी त्याग करण्याची तयारी; किंवा काही उच्चतर मूल्याच्या किंवा अंतिम साध्याच्या दृष्टीने व्यक्तिगत वैफल्यालाही काही अर्थ आहे अशी श्रद्धा. दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर स्वतःच्या सुखापेक्षा श्रेष्ठ अशी काही मूल्ये आहेत असा ज्याचा विश्वास आहे किंवा वर्तमान काळापेक्षा भविष्यकाळ अधिक चांगला असणार आहे अशी ज्याची श्रद्धा आहे, किंवा या दोन्ही गोष्टी ज्याला प्रेरित करतात, असाच माणूस किबुट्झच्या जीवनात रमू शकतो. संघाच्या सदस्यांजवळ या दोन्ही प्रेरणा आहेत. त्यांच्या **हाश्काफात ओलाम** किंवा "जीवनदृष्टी" तून ( Weltanschaung ) त्यांना हा विश्वास आणि ही श्रद्धा मिळते. हाश्काफात ओलाम ही किर्यात येदिदिममधली अत्यंत महत्त्वाची संकल्पना आहे आणि त्यांच्या प्रेरणावाचक शब्दसंग्रहात तिला सर्वश्रेष्ठ स्थान आहे. पुढे दिलेली उदाहरणे प्रातिनिधिक समजायला हरकत नाही.

एक सदस्या म्हणाली की किबुट्झमधले जीवन फार कठीण आहे पण इतके सोसावे असे मोलही त्याला आहे. "अडीचशे वर्षांनंतर लोक आमचे पवाडे गातील."

दिवसभर काम करून दमलेली एक सदस्या अंथरुणावर पडल्या पडल्या आता आपल्याला काम सोसत नाही असे म्हणाली. लेखकाने तिला गमतीने म्हटले, "तुमचे काम एका महत्कार्यासाठी आहे." त्यावर तिने गंभीरपणे प्रत्युत्तर दिले, "बरोबर आहे. आम्हांला आमच्या ध्येयाचा निदिध्यास नसता तर इथलं आमचं काम आम्हाला करवलंच नसतं. त्याच्या प्रेरणेनेच तर आम्ही तगून राहतो आहोत."

प्रशाळेतील मागास विद्यार्थ्यांच्या प्रश्नावर चर्चा चालली असता एका शिक्षकाने त्यांना धंदेशिक्षणाच्या शाळेत पाठवायची जरूर पडेल असे सुचविले, मात्र तेथेही त्यांना तेवढ्याच प्रमाणात ध्येयवादसुद्धा शिकवला गेला पाहिजे असेही त्याने सांगितले. "ही गोष्ट प्राणभूत महत्त्वाची आहे. ध्येयवादाशिवाय आपण जगूच शकणार नाही."

---

१०. प्रकरण ७ पाहा.

शेतावर काम करणारा एक सदस्य प्रस्तुत लेखकाजवळ किबुट्झमधल्या राहणीचे फायदे वर्णन करीत होता तेव्हा सदस्याच्या पत्नीने त्याला मध्येच थांबवीत म्हटले की त्यातले तोटे तर त्याहूनही मोठे आहेत व ते जर सांगितले नाहीत तर दिशाभूल केल्यासारखे होईल. तेव्हा नवऱ्याने किबुट्झ जीवन कठीण असल्याचे मान्य केले पण एखाद्याने फक्त आपल्या 'शारीरिक सुखाचाच' विचार केला तर तो किबुट्झ जीवन जगू शकणार नाही असे त्याने सांगितले. बाहेरच्या लोकांमध्येच नव्हे तर किबुट्झमधल्या मुलांमध्येसुद्धा किबुट्झबद्दल आकर्षण निर्माण करायचे असेल तर ते स्वसुखाच्या पायावर करता येणार नाही. अंतिम अर्थाने "किबुट्झ जीवन हे एका ध्येयवादाच्या पायावर उभारलेले आहे आणि त्याच्या उच्च ध्येयवादावरच त्याचे आकर्षण अवलंबून आहे."

किबुट्झमधल्या एका "बुद्धिमंता"ने वर्तमानपत्रातील एका लेखातील मार्क्सवादी भाष्याशी मतभेद व्यक्त केला आणि शेवटी म्हटले "तरीसुद्धा मी मार्क्सवादाला अतिशय मानतो. आजच्या आपल्या श्रद्धाही नाही अन् देवही नाही अशा काळात मार्क्सवाद आपल्याला एक जीवनदृष्टी देतो. प्रत्येक सिद्धान्त व प्रत्येक शास्त्र तो एका सुसंगत चौकटीत बसवतो आणि अशा रीतीने गोंधळातून व्यवस्था निर्माण करतो."

वरील अवतरणे आपल्याला या प्रकरणाच्या मुख्य विषयाशी आणून सोडतात–तो विषय असा की रूढ धर्माला औपचारिक विरोध, उघड निधर्मीपणा, सामाजिक समस्यांचे विश्लेषण आणि भविष्यकालीन सामाजिक प्रवाहांचा अंदाज "वैज्ञानिक" पद्धतीने करण्याचा आग्रह–असे सर्व असूनही कियांत येदिदिम प्रत्यक्षात एक "धार्मिक" समाजच आहे. आणि इतर संघांतील किबुट्झच्या मानाने या किबुट्झमध्ये जो जिवटपणा दिसतो तो या "धार्मिक" स्वरूपाच्या श्रद्धेतूनच आलेला आहे.[११]

धर्म आणि काही विशिष्ट राजकीय चळवळी यांच्यामध्ये साम्य असल्याचे अनेक वेळा दाखविले जाते, परंतु हे साम्य बहुधा बाह्यात्कारीच खरे असते. मात्र,

११. पण हा अलग झालेला समूह नाही. उलट, संघाचे सदस्य असणाऱ्या किबुट्झ वसाहतींचा एक विशाल गोतावळा आहे. म्हणून कियांत येदिदिमची "धार्मिक" निष्ठा फक्त त्याच्याच संस्थापकांमध्ये विकास पावली होती किंवा ती फक्त त्यांच्या एकट्यापाशीच होती असे नाही. उलट ती संघाच्या नेतृत्वामुळेच विकसित झाली आणि संलग्न असलेल्या वसाहती त्यात सहभागी झाल्या. येथे वर्णन केलेली निष्ठा म्हणजे फक्त कियांत येदिदिमचीच निष्ठा असे नव्हे तर त्याच्या संघाची निष्ठा होय, म्हणून या निष्ठेचा "किबुट्झची निष्ठा" म्हणून उल्लेख केला जाईल.

किर्यात येदिदिमची " धार्मिकता " हे त्याचे मूलभूत वैशिष्ट्य आहे.[१२] त्यामुळे रूढ धार्मिक निष्ठांची मीमांसा करण्यासाठी सामाजिक-मानसिक-गतिशास्त्राची जी तत्त्वे उपयोगी पडतात त्याच तत्त्वांचा किबुट्झच्या ध्येयवादाचे विश्लेषण करण्यासाठीही अतिशय प्रभावी साधने म्हणून उपयोग होतो.

किर्यात येदिदिम ( आणि संघातील इतर किबुट्झ वसाहती ) यांच्याकडे " धर्म " म्हणून नव्हे पण " पंथ " म्हणून पाहता येईल हे अगोदर सांगितले आहेच. " जग " व त्यातले अशिव यांपासून अलग राहण्याचा आग्रह, सत्य फक्त आपल्यालाच गवसले आहे ही खात्री, आणि श्रद्धेच्या पायावर स्वखुषीने येऊ पाहणाऱ्या प्रौढांनाच सभासद होऊ देण्याने आपोआप मर्यादित होणारे सभासदत्व, या गोष्टींतून त्याचे पंथ-स्वरूप स्पष्टपणे ध्यानात येते. आपला गट हा ह्या जगात " ईश्वरी कृपे "ला आणि यानंतरच्या ( किंवा क्रांतीनंतरच्या ) जगात मोक्षाला पात्र ठरणाऱ्या काही " निवडक " माणसांचा गट आहे अशी त्यांची धारणा आहे आणि ही धारणा हेच त्यांचे बलस्थान आहे. आजच्या किबुट्झने जरी " जगा "चा एका अर्थी त्याग केलेला असला तरी पूर्वीच्या किबुट्झप्रमाणे वा इतर काही समकालीन " पराङ्मुख " संप्रदायांप्रमाणे फक्त आपल्याच मार्गाने जाण्यात, फक्त आपलीच मुक्ती साधण्यात आजचा किबुट्झ धन्यता मानीत नाही. उलट, " जग " बदलू पाहणारा आणि आपल्या स्वतःच्या कल्पनेप्रमाणे त्याची पुनर्निर्मिती करू पाहणारा तो लढाऊ पंथ आहे.

किर्यात येदिदिमची श्रद्धा थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येईल : ऐतिहासिक उत्क्रांतीची अटळ परिणती समाजवादाचा अंतिम विजय ही आहे. मानवी इतिहासातील समाजवादी अवस्थेत सगळे सामाजिक अशिव नाहीसे होईल, आणि त्याचा परिणाम म्हणून मानवांमधीलही सर्व अशिव नाहीसे होईल. मात्र दुर्दैवाने हे साध्य गाठण्याचा मार्ग विजयश्री आणि वेदना या दोन्हींनी भरलेला असेल. संघाच्या एका पुढाऱ्याने पुढील शब्दात हे सांगितले आहे :

> [ आम्ही एका क्रांतिकारी युगात राहात आहोत, त्यात ]... व्यक्तींचे आणि समूहाचे भवितव्य एकमेकांवर अवलंबून आहे. प्रत्येक व्यक्तीला येथे एका महत्त्वाच्या विकल्पाला तोंड द्यावे लागणार आहे. एक तर, काळाच्या प्रवाहावरोबर वाहात जाऊन मृत भूतकाळात गडप व्हायचे, नाही तर ज्याची उभारणी सुरू झाली आहे अशा नव्या जीवनाकडे नेणाऱ्या प्रवाहात स्वतःला झोकून द्यायचे.

---

१२. किर्यात येदिदिममध्ये सात वर्षे राहिल्यानंतर त्यातल्या पशुवैद्याने ( तो सभासद नव्हता ), एका सहकारी शेतीच्या खेड्यात ( मोशॅव्ह ) राहायला जायचे ठरविले. " पंथवाद्यांबरोबर राहायचा मला अगदी कंटाळा आलाय, आणि शेतकऱ्यां-बरोबर राहावंसं मला वाटतंय् " असे तो म्हणाला.

युद्धाच्या नरकयातना भोगल्यानंतर का होईना, समाजवादाचा विजय होणार आहे. तिसऱ्या जागतिक युद्धात सबंध देशच्या देश किंवा कदाचित् खंडच्या खंड उद्ध्वस्त होतील. राष्ट्रे आणि मानवी संस्कृती जमीनदोस्त होतील. ज्यांची आपल्या मनाशी कल्पनाही करता येणार नाही असा रक्तपात व यातना यांनी समाजवादाकडे जाणारा रस्ता भरलेला असेल. त्या मानाने दुसरे महायुद्ध हा एक पोरखेळच म्हणता येईल. याच कारणामुळे सर्व स्वातंत्र्यप्रेमी लोक शांततेसाठी एवढा झगडा करीत आहेत. मात्र त्यातूनही जर का हे अरिष्ट यायचेच असेल तर जुन्या समाजव्यवस्थेच्या अमलाखालची ती अखेरची लढाई ठरेल. या समाजव्यवस्थेने मानवाच्या विनाशासाठी वैज्ञानिक प्रगती राबविण्याचा कितीही प्रयत्न केला तरी तिला यश येणार नाही. धापा टाकणारी, रक्तबंबाळ झालेली पण विजयी आणि दास्यमुक्त मानवता सामाजिक न्यायाचे जग पुन्हा उभारण्याच्या प्रचंड कामाला आरंभ करील.

किबुट्झ म्हणजे भविष्यातील मानवसमाजाची एक छोटी प्रतिमा आहे, त्यामुळे त्याचे सदस्य हे इस्रायलमधले वर्गजागृत ज्यू कामगार राष्ट्रीय आणि सामाजिक मुक्तीसाठी जो लढा लढत आहेत त्यातले विनीचे शिपाई आहेत. त्याच पुढाऱ्याच्या शब्दात पुन्हा सांगायचे तर :

इस्रायलच्या इतिहासातील सर्वांत निर्णायक पिढी ठरण्याचे सद्भाग्य आम्हाला लाभले आहे. हे भाग्य मोठे उज्वल आहे. पण त्याच्याबरोबर येणाऱ्या जबाबदाऱ्याही अवघड आहेत. त्यांच्यामुळे आम्ही निराश झालो नाही तरच आमच्यावर पडलेल्या या राष्ट्रीय आणि सामाजिक कार्याचा आमच्याकडून विश्वासघात होणार नाही.

... [ ह्या लढ्यात होणारी आत्मप्रतीती वेगवेगळ्या परीची आहे, पण ] प्रवर्तक म्हणून सर्वांत श्रेष्ठ प्रकारची आत्मप्रतीती झाल्याने सभासदाला कोणताही जादा हक्क मिळत नाही. उलट, त्यामुळे त्याच्यावर अधिकच मोठी जबाबदारी येते. प्रवर्तकत्वाचे वाण घेतलेल्यांचा विशेष अधिकार एवढाच की त्यांनी नेहमी पुढे राहायचे, घ्यायचे काही नाही; नवे रस्ते काढायचे, पूर्वीच दुसऱ्यांनी आखून दिलेल्या रस्त्याने जायचे नाही...आणि प्रवर्तकांच्या आत्मप्रतीतीची सर्वांत श्रेष्ठ पायरी म्हणजे किबुट्झ...राष्ट्रीय व वर्गीय लढ्याच्या रणांगणावरील ती आघाडीची चौकी आहे. प्रत्येक नव्या हल्ल्याची पहिली फैर ह्या आघाडीवरून सोडली जाते आणि राष्ट्राच्या आणि वर्गाच्या प्रत्येक शत्रूच्या मुसंड्याही येथेच छातीवर झेलल्या जातात.

नवा समाज किबुट्झप्रमाणेच सामूहिक जीवनाच्या पायावर संघटित झालेला असेल. जेव्हा तो दिवस उगवेल, तेव्हा आजच्या किबुट्झ राहणीतील सर्व अडचणी नाहीशा झालेल्या असतील. कारण या अडचणी प्रामुख्याने किबुट्झ हे "भांडवलशाहीच्या सागरामधले समाजवादी बेट" असल्याच्या व "दुष्टाव्याच्या वातावरणात" त्याला राहावे लागत असल्याच्या विसंगतीतून निर्माण झालेल्या आहेत. संक्रमणाच्या काळात आपण इस्रायलला आणि सर्व मानवजातीला अंतिम ध्येयाकडे नेत आहोत या जाणीवेत व अडचणी मान्य करूनसुद्धा भविष्यकाळच्या समाजात जे पुष्कळ प्रकारचे समाधान मिळावयाचे आहे ते आजच किबुट्झमध्ये मिळत आहे या जाणीवेत त्याला संतोष मानता येईल.

…[ हे खरं आहे की ] किबुट्झमध्ये जे राहतात त्यांना ते आपले घर वाटले पाहिजे. मात्र, जो किबुट्झ फक्त घरच आहे व दुसरे काहीही नाही त्याच्या कपाळी अधोगती आणि फाटाफूट लिहिलेली आहे. भांडवलशाहीच्या कठोर वास्तवतेने वेढलेल्या समाजवादी बेटावरील जीवन हे युद्धभूमीवरील जीवनासारखेच भयाण असणार हे अपरिहार्य आहे…जो किबुट्झ कामगारांच्या हातातील विजीचे अस्त्र म्हणून अस्तित्वात असतो अशाच किबुट्झमध्ये भांडवलाच्या समाजव्यवस्थेच्या गढूळलेल्या प्रवाहाला तोंड देण्याचे सामर्थ्य असते. एक लढाऊ व ध्येयनिष्ठ सामवायिक म्हणून अस्तित्वात असलेल्या किबुट्झमध्येच आपल्या सभासदांना सुरक्षित घर देण्याची शक्ती असते…
[ किबुट्झमधले दैनंदिन जीवन पुष्कळदा कठीण आणि निराशामय असते पण यावर मात करता येते ती ] स्पष्ट जीवनदृष्टीमुळे, निश्चित प्रकारच्या राजकीय तत्त्वज्ञानाने… किबुट्झ चळवळ जे ध्येय बाळगीत आहे त्याच्या जाणीवेने. ही जाणीव म्हणजे झिऑन-वादाच्या स्वप्नाचे प्रत्यक्षीकरण, पारंपरिक समाजरचनेचे विसर्जन आणि समाजवादी समाजाची निर्मिती या ध्येयांसाठी ज्यू कामगारांचा जो लढा चालू आहे त्याचे किबुट्झ चळवळ हे पूर्वी अतिशय मोठे विजीचे शस्त्र होते व आजही आहे याबद्दलची अविचल श्रद्धा.

वर आपण किर्यात येदिदिमच्या निष्ठेची मूळ तत्त्वे मांडली. आता जरा तपशिलात जाऊन त्याच्या श्रद्धा व त्याची मानस-गति-क्रियात्मक अधिष्ठाने यांचे परीक्षण करू.

**सत्याचे मूळ : प्रेषित आणि पवित्र ग्रंथ.** या श्रद्धेचा प्रेषित कार्ल मार्क्स आहे. आपल्या अगोदरच्या प्रेषितांप्रमाणेच मार्क्सनेही पुढील ऐतिहासिक घटनांचे भाकित केले आहे; ह्या घटनांची दिशा इतरांना कळावी म्हणून त्याने आपले पवित्र लिखाण मागे ठेवले आहे. परंतु इतर प्रेषितांप्रमाणेच मार्क्सचे लिखाण सुस्पष्ट नाही आणि त्याचा नेमका अभिप्राय काय आहे हे नेहमीच ध्यानात येत नाही, म्हणून एका भाष्यकाराची गरज निर्माण होते आणि ती लेनिन पुरवितो. पण लेनिनचे लिखाणसुद्धा नितळ नाही; त्याचाही उलगडा करावा लागतो. म्हणून लेनिनच्या आणि त्याचप्रमाणे मार्क्सच्याही ग्रंथांचा अधिकृत भाष्यकार म्हणजे सोव्हिएत यूनियन असे समजले जाते. उदाहरणार्थ, एकदा एका विरोधी राजकीय नेत्याने एका नेत्याशी वाद घालताना लेनिनची विधाने उद्धृत केली तेव्हा तो नेता म्हणाला की "योग्य" रीतीने भाष्य केल्याशिवाय लेनिनच्या उताऱ्यांचा आधार देणे निरर्थक आहे. मार्क्सवाद – लेनिन-वादाचा फक्त एकच अधिकृत प्रकार संभवतो आणि तो म्हणजे सोव्हिएत यूनियनकडून येणारा; दुसरा कोणताही प्रकार म्हणजे थोतांड असे त्याने आपल्या विरोधकाला बजावले.

सदस्यांचा आपल्या पवित्र ग्रंथाकडे पाहण्याचा दृष्टिकोण आणि त्यांच्या श्टेट्लमधील पूर्वजांचा आपल्या धर्मग्रंथांबद्दलचा दृष्टिकोण यांत लक्षणीय साम्य आहे.

बायबल पवित्र खरे, पण त्याला भाष्याची जरूर आहे हे उघड दिसत होते. हे काम 'तालमुद'ने केले. मात्र, तालमुदलासुद्धा स्पष्टीकरणाची गरज होती, आणि त्याच्यावरच्या अनेक व परस्परविरोधी अशा भाष्यांपैकी जोसेफ कारोचे भाष्य अधिकृत ठरले. प्रयोजनदृष्ट्या विचार केला तरी हे ध्यानात येते की धार्मिक ग्रंथांतून जे कार्य श्टेट्लमध्ये साधले जाई तेच कार्य मार्क्सिस्ट वाङ्मयातून किबुट्झमध्ये साधले जाते. पारंपरिक ज्यू वाङ्मयाची तीन कार्ये होती. माणसाला आपले भोवतालचे विश्व समजावून देणारे बौद्धिक वाङ्मय असे त्याचे एक स्वरूप होते. भविष्यकाळी एक मुक्तिदूत (मेसाया) येणार आहे अशी श्रद्धा निर्माण करून वैरभावयुक्त जगातील जीवनकलहावर मात करण्यासाठी स्फूर्ती देणारे वाङ्मय असे त्याचे दुसरे स्वरूप होते. परमेश्वरी प्रेरणेने व म्हणूनच अंतिम सत्याच्या स्वरूपाची शिकवण देणाऱ्या संतांच्या व प्रेषितांच्या सुवचनांचा संग्रह त्यात असल्यामुळे पवित्र ठरलेले वाङ्मय असे त्याचे तिसरे स्वरूप होते.[१४] मार्क्सवादी वाङ्मयाकडूनही हीच कार्ये होतात. जगाचे बिनचूक विश्लेषण करणारे ते एकमेव बौद्धिक वाङ्मय आहे. मजूर वर्गाच्या क्रांतीचा अंतिम विजय होणार याबद्दल श्रद्धा निर्माण करून सध्याच्या राजकीय व आर्थिक लढ्यात स्फूर्ती देणारे ते आहे. शिवाय ते पवित्र व निर्दोष आहे. किर्यात येदिदिमचे सदस्य देव मानीत नाहीत आणि त्यांचे श्टेट्लमधले पूर्वज मात्र देव मानीत होते हे खरे असले तरी ते तसे एकमेकांपासून फार लांब नाहीत. सार्थीनी धर्मविरुद्ध बंड केलेले असले आणि सामाजिक विश्लेषण "वैज्ञानिक" पद्धतीचे असले पाहिजे असा त्यांचा आग्रह असला तरीही त्यांनी फक्त ज्यूधर्माच्या जागी मार्क्सवादाची स्थापना केली हे सत्य उरतेच. त्यांच्या श्रद्धेचा आशय वेगळा आहे पण तिची मनोगतिक्रिया एकच आहे–ती म्हणजे वर्तमानकाळातील दुःखांना अर्थ प्राप्त करून देणाऱ्या आणि अंतिम मोक्षाची ग्वाही देणाऱ्या श्रद्धेची त्यांना भासत असलेली गरज. जे कधीही चूक असणे शक्य नाही अशा पवित्र लिखाणातून या श्रद्धेला पाठबळ मिळते. मानसशास्त्रीय दृष्ट्या बोलायचे तर श्टेट्लमधले तालमुदिक पिलप्युलिस्ट (कॅजुइस्ट) आणि किबुट्झमधले मार्क्सवादी भाष्यकार यांच्यात कसलाच फरक नाही.

**कवल्ये :** किबुट्झच्या श्रद्धाव्यवस्थेत सोव्हिएत यूनियनला अपरिमित महत्त्व आहे. एकाच वेळी ते धर्मपीठही आहे व नंदनवनही आहे : महत्त्वाच्या सामाजिक,

---

१४. ज्यूंच्या पवित्र ग्रंथाच्या ह्या व इतर वैशिष्ट्यांचे उत्कृष्ट वर्णन Zborowski and Herzog, प्रकरण तीनमध्ये पाहा.

राजकीय आणि बौद्धिक घटनांवर[१५] सोव्हिएत युनियनमधून प्रसृत होणारी जाहीर निवेदने अधिकृत मानली जातात; भूमीवरच्या सर्व पददलितांच्या उत्कंठित नजरा त्याकडे वळलेल्या असतात; सोव्हिएत यूनियन म्हणजे शांती, न्याय आणि स्वातंत्र्य यांचे केंद्रस्थान आहे; इतकेच नव्हे तर सोव्हिएत यूनियनमधील प्रत्येक गोष्ट–त्यातली कला साहित्य, शास्त्र, तंत्रविद्या सर्व काही–जगातल्या इतर देशांपेक्षा श्रेष्ठ आहे.[१६] एका अर्थी तो धर्मातीत असा स्वर्ग आहे कारण किबुट्झ जे मिळवायचा अद्याप प्रयत्न करीत आहे ते त्याने अगोदरच मिळविलेले आहे. त्यामुळे हे नंदनवन बघण्यासाठी सोव्हिएत युनियनला भेट देण्याची जवळ जवळ प्रत्येकालाच इच्छा असते. सोव्हिएत प्रचारी मासिकांतून येणारी सोव्हिएत प्रगतीचा वैभवशाली आणि रोमांचकारी चित्र संपूर्ण सत्य म्हणून स्वीकारली जातात. सोव्हिएतची इस्रायलशी आणि किबुट्झशी तुलना अटळपणे केली जाते आणि अशा तुलनेतून किबुट्झचा गौणपणा दाखविला जातो. आदर्श अशा समाजव्यवस्थेत राहणाऱ्या जवळ जवळ आदर्श अशा व्यक्ती असे जे सोव्हिएत यूनियनचे चित्र सभासदांनी रंगविलेले असते त्याचा त्यांना एक मानसिक उपयोग होतो. पाश्चात्य साम्राज्यशाही किंवा "शत्रुभाव बाळगणारे सरकार" यांचे

---

१५. सोव्हिएत यूनियनचा बौद्धिक प्रभाव किबुट्झमध्ये वाचली जाणारी पुस्तके, ग्राह्य मानले जाणारे शास्त्रीय सिद्धान्त आणि आस्वादिली जाणारी कला यांवरून स्पष्टपणे दिसून येतो. उदाहरणार्थ लायसेंकोच्या सिद्धान्ताचा स्वीकार तावडतोब करण्यात आला आणि मेंडेलवादाची "बूर्झ्वा जननशास्त्र" म्हणून हेटाळणी करण्यात आली. मनोविश्लेषणशास्त्राला सोव्हिएत यूनियनमध्ये मान्यता नाही व किबुट्झमध्येही त्याच्यावर प्रखर हल्ला केला जात आहे. उलट पाव्हलॉव्ह आणि त्याच्या "प्रतिक्षिप्त क्रिया" यावर खूप चर्चा होत आहे. किर्यात येदिदिममध्ये वाङ्मयीन व कलासंबद्ध विषयावर "मार्क्सवादी दृष्टिकोणातून" अनेक भाषणे होतात––आणि "मार्क्सवादी दृष्टिकोण" याचा या संदर्भात बहुधा सध्याचे सोव्हिएत धोरण असाच अर्थ असतो.

१६. ही वृत्ती सर्वसाधारण साथी त्याचप्रमाणे किबुट्झमधले बुद्धिमंत या दोघांमध्ये दिसून येते. सोव्हिएत यूनियन व इस्रायल किंवा सोव्हिएत यूनियन आणि किबुट्झ अशी तुलना ते करतात आणि ही तुलना इस्रायल किंवा किबुट्झ यांना कमीपणा देणारी असते. एक प्रसिद्ध अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ किर्यात येदिदिमच्या प्रशाळेस भेट द्यायला आला होता आणि संघाचे शैक्षणिक अधिकारी व स्थानिक शिक्षक मंडळाचे सभासद त्याच्या समवेत हिंडत होते. त्याने विचारलेल्या प्रश्नांना त्यांनी दिलेली बहुतेक उत्तरे पुढीलप्रमाणे होती : "आम्ही अजून त्या टप्प्यापर्यंत आलो नाहीत, पण सोव्हिएत यूनियन......", "आमच्याकडे अजून चांगली पाठ्य-पुस्तके नाहीत, पण सोव्हिएत यूनियनमध्ये......", "शिक्षकांच्या प्रशिक्षणाची अजून आमच्याकडे पुरेशी व्यवस्था नाही, पण सोव्हिएत यूनियनने......" इत्यादी.

अडथळे जेव्हा येत नाहीत तेव्हा समाजवादी श्रद्धेतले परिपूर्ण जग आणि परिपूर्ण मानव्य समाजवादी चळवळीतून निर्माण होऊ शकते, असे त्यामुळे सिद्ध होते. आपली श्रद्धा साधार आहे असे आश्वासन त्यांना मिळते व त्यातून त्यांना पुढे जाण्यास धीर मिळतो. सोव्हिएत युनियनवरची ही श्रद्धा नष्ट झाली तर त्यांचा आपल्या स्वतःच्या प्रयोगावरचा विश्वास पार ढासळून पडेल हे अगदी शक्य आहे. पुढे मी जे मुद्दे मांडणार आहे ते लक्षात घेतले तर साथींची श्रद्धा केव्हाच छिन्नभिन्न झाली असती; तरीही सोव्हिएत यूनियनवरील या श्रद्धेला ते इतक्या चिकाटीने धरून राहतात याचे कारण त्यांचा स्वतःच्या प्रयोगावरील विश्वास त्या श्रद्धेवरच अवलंबून आहे हेच नव्हे काय?

ही श्रद्धा म्हणजे दूरच्या भविष्यकाळात घडणाऱ्या एखाद्या घटनेविषयीचे दिवास्वप्न नव्हे हे लक्षात ठेवले पाहिजे. एका अर्थाने किबुट्झ म्हणजे एक साक्षात्कार वादी पंथ आहे; भांडवलशाहीचा शेवट आणि समाजवादाचा विजय अगदी नजीकच्या काळातच होणार आहे अशी त्याची धारणा आहे. त्याला हजारो शेकडो वर्षे तर सोडाच पण काही दशकेसुद्धा लागणार नाहीत. इतिहासाची ही परिणती आपल्या आयुष्यातच साकार होणार आहे अशी सभासदांची खात्री आहे. कदाचित् पुढच्या पाच वर्षांतच सोव्हिएत यूनियनने शीत आणि उष्ण युद्ध जिंकलेले असेल, लाल सैन्याने इस्रायलमध्ये प्रवेश केलेला असेल आणि इस्रायलच्या व जगातील इतर सगळ्या देशांच्या मुक्तिदिनाची पहाट उगवलेली असेल. येथे मुद्दाम सांगितले पाहिजे की हा नुसता राजकीय प्रचार किंवा केवळ कविकल्पना नाहीत. तो एका व्यावहारिक निष्ठेचा अविभाज्य भाग आहे आणि रोजच्या जीवनात ही निष्ठा व्यक्त होत असते. उदाहरणार्थ, प्रशाळेच्या अभ्यासक्रमावर चर्चा करताना एक शिक्षक म्हणाला की विद्यार्थ्यांना अरबी भाषा शिकण्याची हौस नाही, पण त्यामुळे फारसे काही बिघडत नाही; कारण निकट पूर्वेतील राष्ट्रांचा सोव्हिएतसंघ स्थापन झाला--आणि आता तो लवकरच होणार--की त्यांना आपोआपच अरबीमध्ये गोडी वाटू लागेल.

सोव्हिएत युनियनकडे ज्या भक्तिभावाने बघितले जाते त्याच भक्तिभावाने रशियन नेत्यांच्या मोठेपणाचे चित्रही रंगविले जाते. स्टॅलिनचे व्यक्तिमत्त्व, त्याची कामगिरी, त्याची हुषारी, रशियात त्याने घडवून आणलेले चमत्कार याबद्दल सभासद इतक्या भीतियुक्त गौरवाच्या भाषेत बोलत असताना प्रस्तुत लेखकाने ऐकले आहे की अशा भाषेत एखादा हासिदच आपल्या रेबेबद्दल बोलू शकेल.[१७] पुष्कळ सभासदांना असे वाटते की स्टॅलिन हा केवळ आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा नेता नाही. तो त्याहून अधिक काही आहे--तो जवळ जवळ देवतुल्य, सर्वांचा पिता, सर्वहितकर्ता, आणि सर्वज्ञ आहे व त्याचा प्रत्येक निर्णय योग्य आणि हितकारक मानला पाहिजे.

---

१७. हासिद म्हणजे चमत्कार करणाऱ्या राबाय ( धर्मगुरु ) किंवा 'रेबे' चा अनुयायी.

सोव्हिएत यूनियन आणि त्याचे नेते यांबद्दलचा हा भक्तिभाव किबुट्झच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या आदर्शाशी उघडपणे विसंगत आहे; आणि ह्या विसंगतीतून सुटण्यासाठी त्यांना फार मोठा बौद्धिक खटाटोप करावा लागतो. अशा प्रकारचा खटाटोप अत्यंत खोल श्रद्धेवर किंवा तीव्र श्रद्धा ठेवण्याबद्दलच्या इच्छाशक्तीवर आधारलेला असेल तरच यशस्वी होतो. अखेर सभासदांनी टरटुलियनप्रमाणे ठासून सांगितले पाहिजे की "ते हास्यास्पद आहे म्हणूनच आमची त्याच्यावर श्रद्धा आहे." कारण ज्या समाजाने स्वातंत्र्याच्या ध्येयाला इतक्या तळमळीने वाहून घेतले आहे त्याच समाजाने हुकुमशाहीवर श्रद्धा ठेवावी आणि जे झिऑनवादी आहेत त्यांनी सतत झिऑनवादाला विरोध करणाऱ्या देशावर विश्वास ठेवावा हे हास्यास्पद आहे. ही श्रद्धेची इच्छा त्यांच्या दोन मानसिक गरजांवर आधारित आहे असे दिसते. एक म्हणजे 'कैवल्या'ची गरज आणि दुसरी म्हणजे आपण ज्याचा त्याग केला आहे त्या पित्याच्या जागी एका समर्थ आणि परमदयाळू अशा पित्याची स्थापना करण्याची गरज.

ही गरज भागविण्यासाठी सोव्हिएत यूनियनचीच निवड का झाली याचे स्पष्टीकरण किबुट्झच्या "समाजवादा"च्या संकल्पनेच्या संदर्भात करता येईल. साथी हे तीन परंपरांचे आध्यात्मिक वारस आहेत : अठराव्या शतकातील प्रबोधन, फ्रेंच राज्यक्रांती, आणि एकोणिसाव्या शतकातील उदारमतवाद. या चळवळींमधून त्यांनी धर्मातीत मानवतावाद, सामाजिक न्याय आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य ही मूल्ये घेतली. "समाजवाद" हा शब्द ते फक्त एक विशिष्ट अर्थव्यवस्था अशा अर्थाने न वापरता, या तीन मूल्यांचा ज्यात समन्वय होईल अशा सर्वंकष जीवनमार्गाला उद्देशून वापरतात. उदाहरणार्थ, एखाद्या साथीला विचारले की न्याय, शांती, समाजवाद, बंधुभाव, स्वातंत्र्य यांपैकी कोणते मूल्य आपल्या मुलात जास्तीत जास्त उतरवण्याचा तू प्रयत्न करतोस, तर त्याचे उत्तर "ती सर्व सारख्याच महत्त्वाची आहेत; ती सगळी मूल्ये 'समाजवादा'त येतात" असे तो देतो.

साथी ज्या तीन परंपरांचे वारस आहेत त्यांच्या मूल्यांचा समन्वय म्हणजे समाजवाद आहे तर रशियन क्रांती हा ( त्यांच्या दृष्टीने ) या परंपरांचा ऐतिहासिक कळस आहे. आणि ज्याअर्थी ह्या क्रांतीने सोव्हिएत यूनियनमध्ये समाजवाद स्थापन केला आहे त्याअर्थी–किबुट्झप्रमाणेच–सोव्हिएत यूनियननेही न्याय, शांती, स्वातंत्र्य आणि बंधुभाव या तत्त्वांना वाहून घेतलेले असले पाहिजे.

हा युक्तिवाद– आणि त्यातील मुख्य गृहीतकृत्याचा ( आपल्या दृष्टीने ) खोटेपणा–लक्षात घेतला तर सोव्हिएत यूनियनला बाजूला सारणे हे साथींच्या दृष्टीने फारच धोक्याचे आहे हे समजून येईल. कारण सोव्हिएत यूनियनला नाकारणे म्हणजे समाजवाद नाकारणे आणि समाजवाद नाकारणे याचा अर्थ किबुट्झ ज्या मूल्यांच्या पायावर उभा आहे तीच नाकारणे असा होईल. म्हणून सोव्हिएत यूनियन

हा समाजवादी समाज आहे हे मुख्य गृहीतकृत्य नाकारण्याऐवजी सार्थी सोव्हिएत युनियनच्या सत्प्रवृत्तीवर चमत्कारिक श्रद्धा ठेवून बसले आहेत; आणि त्यांच्या विचारांतील विसंगतींना या श्रद्धेमुळेच तयार उत्तरे मिळतात. "खरा" साम्यवाद सोव्हिएत युनियनने अद्याप गाठलेला नाही, तेथे लोकशाही नाही हे सभासदांना माहीत आहे इतकेच काय, काही बाबतीत सोव्हिएत युनियनमधले जीवन म्हणजे "नरक" आहे असेही ते मान्य करतात. तरीसुद्धा, "अमेरिका म्हणजे मूर्खांचा स्वर्ग आहे; तर सोव्हिएत युनियन हा शहाण्या माणसांचा नरक आहे" हे प्रत्येकाने लक्षात घेतले पाहिजे, असे एक सार्थी म्हणाला. सोव्हिएत युनियनमध्ये हुकुमशाही आहे हे खरे असले तरी ती मजुरांची हुकुमशाही आहे; आणि जरी या हुकुमशाही-खाली रशियन जनता अत्यंत हालअपेष्टा सोशीत असली तरी ती जनतेच्या हिता-साठीच चालवलेली आहे आणि तिची पुढे जी फळे मिळणार आहेत त्या दृष्टीने ही व्यवस्था योग्यच आहे. आणखी असे की, साम्यवादी समाजात एकाहून अधिक पक्ष असणे अनावश्यक असते; कारण राजकीय प्रश्नांवर सर्व कामगारांना एकच मत असते, आणि त्या मताचेच प्रतिनिधित्व साम्यवादी पक्ष नेहमी करतो. एक संस्थापक म्हणाला, "सोव्हिएत युनियनला विरोध करणे ही गोष्ट ज्याचे डोके जाग्यावर आहे अशा कोणाच्याही मनात येणारच नाही, कारण विरोध करण्यासारखे त्यात काही नाहीच." हुकुमशाही नष्ट करणे हा सोव्हिएत युनियनचा अंतिम हेतू आहे; हा हेतू प्रत्यक्षात उतरायला विलंब होत आहे याचे कारण मुख्यतः पाश्चात्त्य राष्ट्रांची कारस्थाने हे आहे आणि सोव्हिएत युनियनला त्यांच्यापासून आपले संरक्षण करणे भाग आहे. हुकुमशाही शेवटी नाहीशी होणार हे मात्र अटळ आहे.

सोव्हिएत युनियनने झिऑनवादाशी सतत वैर केले आहे हे लक्षात घेतले म्हणजे सभासदांची सोव्हिएत युनियनच्या सत्प्रवृत्तीबद्दलची निष्ठा किती असमंजस-पणाची आहे हे स्पष्ट होते. हिब्रू संस्कृतीवर सोव्हिएत युनियनने बंदी घातली आहे, झिऑनवादी नेत्यांना तुरुंगात टाकले आहे आणि ज्यूंना इस्रायलमध्ये स्थलांतर करण्यास किंवा जगातल्या इतर ज्यूंशी संबंध ठेवण्यास बंदी केली आहे. परंतु सभासद म्हणतात, ही वर्तणूक वरकरणी झिऑनवादविरोधी दिसते पण खरोखर ती तशी नाही; तिच्यामागचे खरे उद्देश ज्यांना समजत नाहीत त्यांना फक्त ती तशी दिसते. सोव्हिएत युनियन झिऑनवादविरोधी असल्यासारखे भासते याचे कारण तुर्की आणि ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या संदर्भात झिऑनवादी चळवळीच्या प्रारंभीच्या हालचाली घडल्या आणि या चळवळीवर अमेरिकन ज्यू भांडवलदारांचे वर्चस्व होते. सोव्हिएत झिऑनवाद विरोधाची ही कारणे आहेत हे पुढील उदाहरणांवरून स्पष्ट दिसते. जेव्हा १९४७ मध्ये ब्रिटिश लोक पॅलेस्टाइन सोडण्याच्या बेतात होते तेव्हा रशियन प्रतिनिधी आंद्रे ग्रोमिको याने संयुक्त राष्ट्रसंघातील एका भाषणात "ज्यू

लोकांना " पॅलेस्टाइनमध्ये स्वदेश असण्याचा " हक " आहे असे म्हटले होते."[१८] शिवाय, इस्रायलच्या स्वातंत्र्ययुद्धात ज्यूंना शस्त्रे पुरविली ती झेकोस्लोव्हाकियाने. तेव्हापासून मात्र सोव्हिएत यूनियनने झिऑनवादावर सतत शस्त्र धरले आहे हे खरे आहे, पण सध्याच्या इस्रायली सरकारची सोव्हिएतविरोधी वृत्तीच त्याला कारण आहे. किबुट्झ ज्याच्याशी संलग्न आहे अशा पक्षाच्या हाती सत्ता आली तर सोव्हिएतची वृत्ती बदलेल. रशियन ज्यूंना इस्रायलमध्ये स्थलांतर करण्यास सोव्हिएत यूनियन का परवानगी देत नाही ह्याचेसुध्दा सहज स्पष्टीकरण देता येईल. सध्याचे इस्रायली सरकार सोव्हिएतविरोधी आहे आणि ते अमाप्याने इस्रायलला अमेरिकी वसाहतींच्या दर्जाला आणू पाहात आहे. अशा परिस्थितीत रशियन ज्यूंना ह्या वेळी सोडले तर रशियाविरुद्ध अमेरिका ज्या भावी युद्धाची तयारी करीत आहे त्यामध्ये हे ज्यू सोव्हिएत यूनियनविरुद्ध लढतील.

सोव्हिएत यूनियन व उपग्रह-राष्ट्रे यांमधील अलीकडच्या ( १९५२ ) ज्यूविरोधी घटना पाहूनही किबुट्झची वृत्ती बदललेली नाही. स्लान्स्की खटल्यातील प्रखर ज्यू-विरोध आणि झिऑनवादविरोध; किबुट्झच्या स्वतःच्या राजकीय पक्षाच्या एका नेत्यावर सोव्हिएतविरोधी हेर असा आरोप करून त्यास झेक सरकारने केलेली कैद; आणि मॉस्कोमधील डॉक्टरांच्या धरपकडीतील ज्यूविरोधी ध्वनी – यांपैकी कोणत्याही घटनेने त्यांचा कम्युनिस्टांच्या ' न्याया ' वरचा आणि ' समाजवादा ' वरचा विश्वास डळमळला नाही. किबुट्झ ज्या पक्षाशी संलग्न आहे त्या पक्षाने एका जाहीर निवेदनात प्रतिज्ञेवर सांगितले की सोव्हिएत यूनियनच्या ' चुकी 'च्या कृत्यांनी विचलित न होता पक्ष आपल्या झिऑनवादी महत्त्वाकांक्षेशी एकनिष्ठ राहील, एवढेच नव्हे तर जागतिक शांती आणि आंतरराष्ट्रीय बंधुभाव यांचे केंद्र असलेल्या सोव्हिएत यूनियनशीसुद्धा तो एकनिष्ठ राहील. स्टॅलिनच्या मृत्यूनंतर सोव्हिएत डॉक्टर मुक्त

---

१८. झिऑनवादाला सहानुभूती व्यक्त करणे यापेक्षा ब्रिटिशांचे स्थान दुबळे करणे हा ग्रोमिकोचा हेतू असू शकेल; झेकोस्लोव्हाकिया हे सोव्हिएतचे उपग्रह-राष्ट्र असल्यामुळे निकट-पूर्वेत अशांतता निर्माण करणे, त्याचप्रमाणे अमेरिकन डॉलर मिळविणे—झेकोस्लोव्हाकियाने केलेला शस्त्रपुरवठा मोफत नव्हता, आणि किंमत डॉलरमध्ये वसूल केली जात होती—हा त्याचा हेतू असू शकेल, अशी पर्यायी स्पष्टीकरणे किबुट्झच्या सदस्यांना संभाव्य वाटत नाहीत. सोव्हिएत यूनियनने आपले झिऑन-वादविरोधी धोरण बदललेले नव्हते याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे कदाचित् संघापेक्षाही सोव्हिएत यूनियनला जवळ असलेल्या इस्रायली कम्युनिस्ट पक्षाने अत्यंत जहरी अशा झिऑनवादविरोधी धोरणाचा पाठपुरावा चालू ठेवला होता.

केले गेले तेव्हा पक्षाने जगाला ( आपल्या वर्तमानपत्राद्वारे ) जाहीरपणे सांगितले की पुन्हा एकदा " समाजवादी न्यायपद्धतीचे समर्थन झाले आहे."[१९]

भक्ताची परमेश्वराबद्दलची वृत्ती असते तशाच प्रकारची ही सोव्हिएत युनियन-कडे बघण्याची वृत्ती दिसते. परमेश्वर सदैव न्यायीच असतो आणि त्याची न्यायबुद्धी नेहमीच दिसून येत नसली तर त्याचे कारण ईश्वरी लीला अतर्क्य असते आणि माणसाला ती नेहमीच कळते असे नाही. धार्मिक वृत्तीचा माणूस ज्याप्रमाणे प्रत्येक क्षुल्लक घटनेत परमेश्वरी कृपेची सूचना शोधतो त्याप्रमाणे साथी झिऑनवादाला अनुकूल अशी जराशीही सूचना सोव्हिएत नेत्यांच्या प्रत्येक वक्तव्यात शोधून बघत असतात. खराखुरा धार्मिक आत्मच्छल असे या वृत्तीचे वर्णन करता येईल. परमेश्वर आपल्याशी कितीही निष्ठुरपणे वागला तरी निष्ठावंत भक्ताचे त्याच्यावरचे प्रेम कायमच राहते. बाप आपल्या मुलांना शिक्षा करतो कारण त्याचे त्यांच्यावर खरे प्रेम असते; त्याचप्रमाणे परमेश्वराची निष्ठुरता ही सुद्धा प्रेमाची खूण म्हणूनच समजण्यात येते.

**अशिव** : अमेरिका आणि तिचे मित्र म्हणजे जगातील अशिव शक्ती होत. इस्रायलच्या बहुतेक वाईट गोष्टींना विशेषतः अमेरिका जबाबदार आहे. अमेरिकेने इस्रायली प्रतिनिधींना ( आणि यात किबुट्झ संघाचे प्रतिनिधीही येतात ) स्थलांतरा-साठी अमेरिकेत पैसा उभा करायला परवानगी दिली आहे; इस्रायली सरकारला पुष्कळ कर्ज दिले आहे; अमेरिकन नागरिकांना दरवर्षी इस्रायलला दशलक्षावधी

---

१९. अनेक विसंगतींच्या पोतडीत आणखी एका विसंगतीची भर घालायची तर असे सांगता येईल की, वरच्याप्रमाणे स्थिती असली तरी संघाने इस्रायलमधल्या छोट्या कम्युनिस्ट पक्षाला सतत आणि प्रखर विरोध केला आहे आणि कॉमिंटर्न व त्याचा वंशज कॉमिनफॉर्म यांच्याशी सहकार्य करण्याचे नाकारले आहे. एखादा कम्युनिस्ट पक्षाचा सभासद झाला किंवा त्याने नुसता त्याच्याशी वरवरचा संपर्क ठेवला तरी त्याची संघामधून किंवा संलग्न किबुट्झमधून ताबडतोब हकालपट्टी होते. या वर्तणुकीमागचे कारण अगदी उघड आहे : समाजवाद *आणि* झिऑनवाद या दोन तत्त्वांवर संघाची उभारणी झाली आहे; दोन्ही तत्त्वे सारख्याच महत्त्वाची आहेत, एक मुख्य आणि दुसरे गौण असे नाही. याउलट कम्युनिस्ट पक्ष विचाराने व कृतीने झिऑनवादविरोधी आहे आणि नेहमीच तसा राहिला आहे. संघाला जसा कम्युनिस्ट पक्षाविषयी वैरभाव आहे तसा कम्युनिस्ट पक्षालाही संघाविषयी आहे. कम्युनिस्ट पक्षाचे असे मत आहे की सबंध किबुट्झ चळवळ ही भांडवलशाही स्वप्नरंजनातून निर्माण झालेली आहे, वर्गसंघर्षाच्या राजकीय युद्धभूमीवरून पळून जाणाऱ्यांना आश्रय देणे एवढेच तिचे कार्य आहे. कम्युनिस्ट पक्षाचे **कोल-हा आम** हे मुखपत्र पक्ष आणि संघ यांच्यावर हल्ला करताना जळजळीत भाषा वापरते.

डॉलर्सच्या देणग्या पाठवायला परवानगी देत आहे. उलट, या सर्व गोष्टी सोव्हिएत यूनियनमध्ये बेकायदा आहेत. तरीही अमेरिकेला शिव्या आणि सोव्हिएत यूनियनला ओव्या असा प्रकार आहे.

हा आणि पूर्वी वर्णन केलेले इतर विरोधाभास कियर्ति ग्रेदिदिमच्या श्रद्धा-व्यवस्थेच्या संदर्भातच समजून घेणे शक्य आहे. किबुट्झ आणि त्याचे संघ यांच्या दृष्टीने लोकांचे[1] दोनच प्रकार संभवतात : भांडवलदार आणि मजूर. भांडवलदार हे भांडवलदार आहेत म्हणूनच नैतिकदृष्ट्या वाईट आहेत त्यामुळे त्यांचा पाडाव करणे हे नैतिक कर्तव्यच ठरते. उलट कामगार हे केवळ कामगार आहेत म्हणूनच सद्‌गुणांचे पुतळे आहेत; त्यांच्यात सर्व सत्प्रेरणा एकवटल्या आहेत म्हणून त्यांच्यासाठी लढणे व त्यांना पाठिंबा देणे हेही नैतिक कर्तव्य आहे. त्यांचे काज न्याय्य आहे एवढेच नव्हे तर ते स्वतःही न्यायी आहेत.

आणि सोव्हिएत यूनियन हे "कामगारांचे राज्य" आहे. अर्थात् ती हुकुमशाही आहे आणि ही एक दुर्दैवाची गोष्ट आहे. पण ती हुकुमशाही कामगारांची व कामगारांसाठी आहे; ती दलितांची हुकुमशाही आहे. शिवाय भविष्यकाळात हुकुमशाही नष्ट झालेली असेल व सोव्हिएत यूनियन म्हणजे न्याय, समता आणि स्वातंत्र्य या तत्त्वांवर आधारलेली कामगारांची लोकशाही झालेली असेल.

उलट अमेरिका हा भांडवलशाही समाज आहे. तो बाह्यात्कारी लोकशाही दिसत असला तरी खरोखर तो समाज म्हणजे भांडवलदारांनी भांडवलदारांसाठी चालवलेली 'हुकुमशाही' आहे. आणि जर का लढाऊ कामगार चळवळीने या भांडवलदारांच्या सत्तेला दहशत बसविली तर लोकशाहीचा हा दर्शनी भाग कोलमडून पडेल आणि 'हुकुमशाही'चे खरे स्वरूप उघड होईल.

म्हणून सध्याचे 'शीतयुद्ध' हे मजूर वर्ग म्हणजे "शांतता आणि प्रगती यांच्या प्रेरणा" आणि भांडवलदार म्हणजे "युद्ध आणि गुलामी यांच्या प्रेरणा" यांच्यातील संघर्ष, म्हणूनच एक नैतिक संघर्ष आहे असे किबुट्झला वाटते. अमेरिका ही या अशिवशक्तींची अग्रणी म्हणून समजली जात असल्यामुळे साथींच्या दृष्टीने जे जे घृणास्पद त्या सगळ्याचे अमेरिका हे प्रतीक ठरते.

धार्मिक श्रद्धेच्या मानसगतिक्रियेच्या दृष्टीतून विश्लेषण केले तर असे दिसते की साथींना आपले विश्व सत् व असत्, ईश्वर आणि सैतान अशा दोन ध्रुवांमध्ये विभागण्याची गरजच असते. थोडक्यात, त्यांना पराकाष्ठेचे प्रेम आणि पराकोटीचा द्वेष करण्याची मानसिक गरज असते; शिवाय, त्यांना अनिश्चिततेचा तिटकारा असतो व गुळमुळीतपणा चालत नाही. त्यामुळे त्यांचा सर्व द्वेषभाव एका दिशेने आणि सर्व प्रेमभाव दुसऱ्या दिशेने वाहतो. मनोविश्लेषणाच्या भाषेत बोलायचे तर त्यांच्या संश्लिष्ट पितृ-प्रतीकाचे दोन तुकडे पडले आहेत; एक 'चांगले' पितृ-प्रतीक की ज्याच्याकडून कोणतीही चूक होणे शक्य नाही आणि ज्याच्यावर सर्वस्वाने प्रेमच करायचे, आणि दुसरे 'वाईट' पितृ-प्रतीक की ज्याच्याकडून कधीही काही चांगले

होणार नाही व ज्याचा सर्वस्वाने द्वेषच करायचा. भावनांचे असे ध्रुवीकरण करण्याच्या या मानसिक गरजेतून सोव्हिएत यूनियन व अमेरिका यांच्याकडे बघण्याचे हे विपर्यस्त दृष्टिकोण उगम पावले असावे.

बिगर-सोव्हिएत जगाकडे ज्या पराकोटीच्या संशयी वृत्तीने साथी बघतात त्यालासुद्धा हा विपर्यस्त दृष्टिकोणच कारणीभूत आहे. जग आपल्याबद्दल वैरभाव बाळगून आहे आणि किबुत्झ चळवळ नष्ट करण्याचा त्याचा हेतू आहे असे मानले जाते. वर्तमानपत्रांतून आणि नियतकालिकांतून, त्याचप्रमाणे संभाषणातही पुन्हा पुन्हा ध्रुवपद हेच असते की आपण एका वैरभावयुक्त वातावरणात राहत आहो. अर्थात हे खरे आहे की इस्रायलमधले व बाहेरचेही पुष्कळ लोक किबुत्झ गहर्णाला विरोध करतात. हेही खरे आहे की एका विरोधी राजकीय पक्षाचे सदस्य म्हणून संघाने सरकारचे शत्रुत्व ओढवून घेतले आहे. या प्रश्नाची चर्चा करताना पुष्कळ साथी या शत्रुत्वाला अर्थ पुढीलप्रमाणे लावतात: अमेरिकन सरकारकडून इस्रायली सरकारला कर्जे हवी आहेत. अमेरिकेचा किबुत्झ चळवळीला विरोध आहे आणि किबुत्झ वसाहती नष्ट नाही तर निदान कमजोर होणार असतील तरच इस्रायलला आवश्यक ती कर्जे द्यायला अमेरिका कबूल झाली आहे. अशा रीतीने, इस्रायली सरकार कर्जे मिळविण्यासाठी किबुत्झ वसाहतींशी शत्रुत्व करीत आहे.

आणखी असेही मानले जाते की अमेरिकन सरकार आपल्या स्टेट डिपार्टमेंट-तर्फे किबुत्झ वसाहतींवर पाळत ठेवण्यासाठी हेर नेमते. किर्यात येदिदिममध्ये आल्यावर आम्ही हेर आहो अशा समजुतीने काही काळ आम्हांला आमच्या अभ्यासासाठी सहकार्य मिळणे अवघड झाले होते. अखेरीस मात्र आम्ही संशोधक आहो हा आमचा दावा मान्य करण्यात आला व जे सुरुवातीला उघड शत्रुत्व करीत होते त्यांपैकी बहुतेकजण आमचे मित्र बनले. परंतु हा अभ्यास पूर्ण झाला त्यावेळी सुद्धा काही लोकांच्या मनात आमच्याबद्दलचा संशय घर करून होताच आणि दोन सभासदांनी आम्हांला अगदी मोकळेपणाने सांगितले की अद्यापही आम्ही त्यांना हेरच वाटत होतो.

तेव्हा राजकीय प्रश्न हे नुसतेच राजकीय प्रश्न राहात नाहीत, ते ध्येयवादाचे प्रश्न बनतात,[२०] आणि रूढ धर्माच्या अभावी ध्येयवाद हाच धर्म बनतो. साथी आपली

२०. राजकारण व ध्येयवाद यांचे हे नाते एकूण इस्रायली लोकांबाबतही खरे आहे अशी प्रस्तुत लेखकाची धारणा आहे. राजकारण किंवा राजकीय चर्चा यांनी इस्रायली माणूस किती भावनाविवश होतो हे पाहून परदेशी माणूस आश्चर्यचकित होतो. ( हे म्हणत असताना इस्रायली लोकांचा हा " राष्ट्रीय स्वभाव " आहे असे सुचवायचे नाही. ) अमेरिकन लोक चार वर्षांनी एकदा राजकारणाच्या बाबतीत खवळून उठतात. पण निदान १९४८ पूर्वी ( म्हणजे " पौर्वात्य " ज्यूंच्या आगमना-पूर्वी ) वस्तीला आलेल्या इस्रायलींच्या दृष्टीने राजकारण हा केवळ फावल्या वेळचा छंद नसून ती एक गंभीरपणे लक्ष घालावे अशी दैनंदिन क्रिया आहे.

भावनात्मक शक्ती राजकारणात इतकी का खर्चितात याचे उत्तर हेच आहे. राजकीय सभांना धार्मिक परिषदांचे स्वरूप येते आणि राजकीय वक्तव्यांतून धार्मिक उद्गारांचा ध्वनी उमटतो; कारण निवडणुका जिंकणे, इतरांवर आर्थिक कृपावर्षाव जेथून करता येईल अशी स्थाने हस्तगत करणे, आपले राजकीय स्थान बळकट करणे – इत्यादी उद्देशाने केलेल्या तात्पुरत्या व व्यावहारिक हालचाली असे एरव्ही जे राजकीय निर्णयाचे स्वरूप असते ते येथे राहात नाही. त्या नैतिक महत्त्वाच्या घटना असतात, मानवजातीच्या अंतिम मुक्तीचे प्रश्न त्यांत गुंतलेले असतात. राजकीय विरोध म्हणजे नुसता मतामतांतील फरक राहात नाही; सत्य आणि असत्य, शिव आणि अशिव यातले ते फरक ठरतात. मतभिन्नता चालवून घेता येते, तिला मान राखता येतो, तिच्याशी तडजोडीने जुळवून घेता येते; परंतु जे अशिव आहे ते कोणी ही सहन करू शकत नाही, आणि सत्याच्या बाबतीत तडजोड तर अशक्यच आहे. अशी वृत्ती असल्यामुळे भिन्न-मतांच्या लोकांशी साथी जेव्हा राजकीय चर्चा करतात तेव्हा त्यात त्यांचा भावनात्मक आवेग दिसून येतो आणि भिन्न राजकीय दृष्टिकोण असलेल्या व्यक्तींशी वैयक्तिक मैत्री होणे ही गोष्ट अगदीच अशक्य नाही तरी अवघड ठरते. प्रस्तुत लेखकाचे एका सभासदाशी मैत्रीचे संबंध होते परंतु लेखक मार्शल योजनेच्या बाजूचा आहे हे कळताच त्या सभासदाने अबोला धरला. एका सदस्येच्या दुसऱ्या एका किबुट्झमध्ये पुष्कळ मैत्रिणी होत्या आणि त्यांच्याबरोबर ती पूर्वी पुष्कळ वेळ घालवायची, पण आता आपण त्यांच्याबरोबर दोन दिवसांपेक्षा अधिक राहूच शकत नाही कारण त्यांची राजकीय मते ऐकून आपण " बेचैन " होतो असे ती म्हणाली. एक एरवी अतिशय सौम्य प्रकृतीचा सदस्य अमेरिकेबद्दल बोलू लागल्यावर त्याचे वैर इतके उफाळून आले आणि तो इतका बेफाम झाला की हा तोच की दुसरा कोणी अशी शंका यावी. थोडक्यात म्हणजे, अंतिम जीवननिष्ठांशीच ज्या भावना बहुधा निगडित असतात त्या किबुट्झमध्ये साध्या राजकीय बाबींनीही उद्दीपित होतात.

या पार्श्वभूमीवर आता किर्यात येदिदिमच्या संबंध जीवनव्यवहारात त्याच्या श्रद्धाव्यवस्थेला जे अत्युच्च स्थान आहे त्याची आपल्याला तपासणी करता येईल. किर्यात येदिदिमचे एक अंग शेतकऱ्यांची एक वसाहत हे आहे; अर्थातच या वसाहतीतली माणसे किबुट्झ सोडून गेली तर शेतकरी वसाहत म्हणून त्याचे अस्तित्व संपुष्टात येईल. परंतु प्रत्येक किबुट्झ हे निदान त्याचा उगम आणि त्याची मूळ कल्पना लक्षात घेता निव्वळ शेतकरी वसाहतीपेक्षा अधिक काही असते हे ध्यानात येते. सामुदायिक मालमत्तेवर आधारलेला बंधुभाव, सामाजिक समता आणि स्वश्रम यांच्या पायावर नवसमाजाची निर्मिती करण्याला वाहून घेतलेल्या स्वप्नद्रष्ट्यांचा तो समुदाय आहे. म्हणून, जर किबुट्झने आपल्या मूळ ध्येयाचा त्याग केला आणि जरी त्याची सदस्य संख्या कायम राहिली, तरी त्याचे किबुट्झ म्हणून अस्तित्व संपून जाईल. कोणत्याही समाजाचा दैनंदिन जीवनक्रम अनेकदा कंटाळवाणा असतो

आणि किबुट्झसारख्या पायाभरणीचे काम करणाऱ्या समाजात तर तो अतीव कष्टाचा आणि दमछाक करणारा असतो: अशा स्थितीत सभासदांना मूळ ध्येयाचा विसर पडावा आणि त्यांना किबुत्झकडे एक::शेतांची वसाहत- म्हणून प्रामुख्याने पाहावे हे अगदीच अस्वाभाविक नाही. किबुट्झ सभासदांनी जी काही थोडी पुस्तके लिहिली आहेत त्यातून याला पुरावा मिळतो.[21] जेव्हा असे होते तेव्हा किबुट्झमागचे हेतू आणि कोणत्याही सर्वसाधारण पाश्चात्य समाजाचे हेतू यात काहीच फरक राहात नाही; ते हेतू म्हणजे अधिक बरचे राहणीमान आणि अधिक व तात्काळ मिळणारे वैयक्तिक सुख. किबुट्झच्या रूढ सामाजिक रचनेमध्ये या गरजा भागविल्या जात नसतील तर कुणालाही (इतर गोष्टी सारख्या असल्या तर) किबुट्झच्या बाहेर जाऊन त्या भागवाव्या अशी इच्छा होईल किंवा या गरजा भागविल्या जातील अशा-तऱ्हेने किबुट्झची सामाजिक रचना बदलावी असे वाटू लागेल.

अगदी थोडक्यात सांगायचे तर सबंध किबुट्झ चळवळीमधला समकालीन "पेचप्रसंग" हाच आहे.[22] एका बाजूने ज्यांच्या "स्वाभाविक" गरजा भागविल्या जात नाहीत असे लोक काळजी करण्याइतक्या मोठ्या संख्येने काही किबुट्झमधून राजीनामे देऊन बाहेर पडत आहेत. दुसऱ्या बाजूने हे राजीनाम्यांचे प्रमाण वाढू नये म्हणून असंतोष काबूत ठेवण्यासाठी पुष्कळ किबुट्झ वसाहतींनी नवीन सुधारणा केल्या आहेत आणि त्यामुळे किबुट्झचे किबुट्झ म्हणून अस्तित्व धोक्यात येऊ घातले आहे. उद्योगधंदे, भाडोत्री मजुरीची पद्धत आणि खाजगी मालमत्ता यांना नुसती परवानगीच नव्हे तर प्रोत्साहनसुद्धा देऊन ह्या किबुट्झ वसाहतींनी संपत्ती, सत्ता आणि प्रतिष्ठा यांच्यावर आधारलेली सामाजिक वर्गांची श्रेणी निर्माण करण्यास प्रारंभ केला आहे. जमीन कसणाऱ्या आणि स्वतःच्या हातांनी श्रम करून जीवन जगणाऱ्या भ्रातृभावी माणसांचा एक समाज असे जे किबुट्झचे मूळ स्वरूप त्याचा अंतच या पद्धतीने होण्याचा संभव आहे.

या "पेचप्रसंगा"ची झळ जरी सर्व किबुट्झ वसाहतींना लागली असली तरी दोन संघांना संलग्न असलेल्या किबुट्झ वसाहतींना तुलनेने कमी धोका आहे — त्यातल्या राजीनाम्यांचे प्रमाण अगदी अल्प आहे आणि स्वश्रम व सामुदायिक मालमत्ता ही मूळची ध्येये अधिकच निष्ठेने जपली जात आहेत. हे दोन संघ म्हणजे धार्मिक किबुट्झ वसाहतींचा छोटा संघ आणि किर्यात येदिदिम ज्याचा सभासद आहे

---

२१. अगोदर उल्लेख केलेल्या Maletz आणि Mosensohn यांच्या कादंबऱ्या पाहा. प्रस्तुत ग्रंथ पूर्ण झाल्यानंतर प्रकाशित झालेल्या व एका "अमेरिकन" किबुट्झ सभासदाने लिहिलेल्या एका पुस्तकात हाच मुद्दा स्पष्ट होतो. Weingarten, **Life in a Kibbutz.**

२२. प्रकरण ७ पाहा.

तो संघ.[२२] धर्माकडे पाहण्याचे त्यांचे दृष्टिकोण वेगळे असले तरी दोन्ही संघात एक महत्त्वाचे वैशिष्ट्य समान आहे : दैनंदिन जीवनक्रमातील कंटाळवाणेपणा आणि अडचणी व झगडे यांना अर्थ देणारी आणि आपले मूळ स्वप्न वर्तमानकाळात नसले तरी भविष्यकाळी मुक्तिदूताच्या आगमनानंतर प्रत्यक्षात उतरणार आहे असे आश्वासन देणारी सर्वोच्च निष्ठा. यामुळेच किबुट्झच्या रूढ सामाजिक रचनेत बदल घडवून आणायला त्यांचा तात्त्विक विरोध आहे. एकाची सर्वोच्च निष्ठा ज्यू धर्म ( आणि ज्यू धर्माचा देव ) ही आहे आणि दुसऱ्याची मार्क्सवाद आणि त्याने घडविलेला इतिहासाचा साक्षात्कार ही आहे.

राष्ट्रस्थापना होण्यापूर्वी सगळ्या किबुट्झना निदान एक तरी सर्वोच्च मूल्य समान होते ते म्हणजे झिऑनवाद. आपले जीवन हे या ध्येयप्राप्तीचे केवळ साधन आहे असे ते मानीत होते आणि ज्यामधून त्यांना आता जावे लागत आहे तो " पेचप्रसंग " त्यावेळी अगदी अर्धस्फुट अशा अवस्थेत होता. मात्र " ज्यू लोकांचे राज्य " हे झिऑनवादाचे एक महत्त्वाचे ध्येय साध्य झाल्यावर ज्यांची ज्यू धर्मावरही श्रद्धा नाही आणि मार्क्सवादावरही नाही अशा किबुट्झमध्ये हा " पेचप्रसंग " सध्या फार गंभीर स्वरूपाला पोचला आहे. प्रस्तुत लेखकाची अशी समजूत आहे की बंधुभावाच्या स्वप्निल कल्पनेत अर्थ भरील अशा काही लोकातीत मूल्यश्रेणीवर श्रद्धा नसेल तर ती कल्पना तगून राहणार नाही आणि तिच्या जागी दैनंदिन जगाच्या रोखठोक " ऐहिक " व्यवहारी कल्पना स्थानापन्न होतील. निरनिराळ्या किबुट्झमध्ये आपल्या पारंपरिक संस्थांना चिकटून राहण्याबाबत जे कमी अधिक फरक आढळतात त्यांचे हेच स्पष्टीकरण असावे. आणि ही समजूत खरी असेल तर, किर्यात येदिदिमची निष्ठा हा त्याचा सामाजिक एकसंघपणा टिकवून ठेवणारा एक निर्णायक घटक आहे असे म्हणावे लागेल. आणि ह्या घटकात त्याची मानव्यवादी संस्कृती प्रतिबिंबित झाली आहे असे म्हणण्याऐवजी हा घटक त्या संस्कृतीत भिनून राहिला आहे असे म्हणणे अधिक बरोबर होईल.

सारांश, किर्यात येदिदिम ही नुसती शेतकी वसाहत नाही; तो एक धार्मिक समाज आहे. त्याचे राजकीय ध्येय मान्य असेल तरच त्या समाजाचे सभासदत्व मिळू शकते. याचा अर्थ असा की किबुट्झमध्ये सर्वांना मुक्तद्वार नाही, काही निवडक लोकांचा तो समाज आहे. परंतु किबुट्झला जर एक वेचक मंडळींचा पंथसदृश समाज म्हणून टिकून राहायचे असेल तर निवडक लोकांना सभासदत्व देणे एवढेच पुरेसे नाही, कारण यामुळे फार तर ध्येयवादाच्या बाबतीत सभासदांत एकजिनसीपणा राहील. पण हा एकजिनसीपणा टिकवायचा असेल तर आणि ध्येयाबाबत मतभेद

---

२२. धार्मिक किबुट्झ वसाहतींच्या मूल्यांना पूर्णपणे विरोध असूनही किर्यात येदिदिमचे सभासद त्यांच्याविषयी अत्यंत कौतुकाने बोलतात हा काही योगायोग नव्हे.

होऊन निष्फळ होऊ द्यायच्या नसतील तर आणखी काहीतरी तंत्र शोधणे जरूर आहे. ही समस्या सर्वसामान्य खेड्यासमोर उभीच राहात नाही, कारण त्यामध्ये कुठल्याही राजकीय किंवा धार्मिक मताच्या माणसाला राहाता येते. आपले एकजिनसीपण टिकविण्याला संघाचा मार्ग म्हणजे "ध्येयवादात्मक समुदायशाही". याचा अर्थ किबुट्झ संघ आणि पक्ष यांनी बहुमताने घेतलेला निर्णय मान्य करण्यास किर्यात:येदिदिमचे सभासद वचनबद्ध असतात. कोणताही निर्णय घेण्यापूर्वी, त्या विषयावरील चर्चेत कोणाही माणसाला आपल्या स्वतःच्या मतासाठी लढण्याचा हक्क असतो. मात्र, एकदा निर्णय घेऊन झाला म्हणजे त्याला तो मान्य करणे भागच असते आणि त्या निर्णयाची काही व्यावहारिक उद्दिष्टे असतील तर त्यांच्या प्राप्तीसाठी व अंमलबजावणीसाठी त्याला काम करावेच लागते. याचाच परिणाम असा होतो की किबुट्झ आणि संघ राजकीय व ध्येयवादात्मक प्रश्नांवर नेहमीच एक बळकट आघाडी उभी

---

२४ संघ "ध्येयवादात्मक समुदायशाही"चा अवलंब करीत असल्यामुळे त्याचे राजकीय विरोधक त्याच्यावर सर्वग्रासी ( Totalitarian ) व हुकुमशाही प्रवृत्तींचा आरोप करतात. किबुट्झ हे एक सर्वसामान्य खेडे असते तर हा आरोप यथार्थ ठरला असता. पण किबुट्झ हा एक धार्मिक समाज आहे त्या दृष्टिकोणातून त्याच्याकडे पाहिले तर ध्येयवादात्मक समुदायशाहीची संकल्पना त्याच्याशी सुसंगत आहे हे ध्यानात येते. कोणताही धार्मिक समाज आपल्या मूलभूत श्रद्धेबाबत मतभेदांना वाव ठेवणार नाही; तसे त्याने केले तर ती श्रद्धाच नष्ट होईल. उदाहरणार्थ, मेथॉडिझम, ज्युडाइझम, कॅथॉलिसिझम इत्यादींची मूलतत्त्वे ज्याला मान्य नाहीत असा माणूस त्या त्या धर्मात राहूच शकणार नाही. किर्यात येदिदिमबद्दलही हेच म्हणता येईल. शिवाय हेही लक्षात घ्यायला हवे की किबुट्झचे निर्णय लोकशाही पद्धतीने घेतले जातात आणि त्याच पद्धतीने फिरविलेही जाऊ शकतात.

२५. इस्रायलचा खोलात जाऊन अभ्यास करणारे जे विशेषज्ञ आहेत त्यांना महत्त्वाचा वाटेल असा एक तपशील येथे नोंदवून ठेवण्यास हरकत नाही. तो म्हणजे दुसरी लाट ( सेकंड अलिया ) व तिसरी लाट ( थर्ड अलिया ) यांचा सततचा संघर्ष. वाचकांच्या लक्षात असेल की दुसऱ्या लाटेचे लोक प्रामुख्याने रशियन असून ते पॅलेस्टाइनमध्ये १९०४ ते पहिल्या महायुद्धाचा प्रारंभ-यांच्या दरम्यानच्या काळात स्थलांतरित झाले होते. उलट तिसऱ्या लाटेचे लोक पहिल्या महायुद्धानंतरच्या काळात आलेले व प्रामुख्याने पोलिश होते. दुसरी लाट प्रामुख्याने राजकीय क्रांतिकारकांची तर तिसरी लाट मध्यमवर्गीय स्वप्नरंजनवाद्यांची होती. यातले पूर्वोक्त लोक वास्तववादी असल्यामुळे सोव्हिएत यूनियनचे खरे स्वरूप त्यांच्या ध्यानात आले व ते सोव्हिएत धोरणांचे कट्टर शत्रू बनले. उत्तरोक्त लोक त्यांच्या स्वप्नरंजनवादामुळे

( पृष्ठ १५९ वर पाहा )

करू शकतात. या एकजिनसीपणामुळेच संघाला त्याच्या संख्याबळाच्या मानाने किती तरी जास्त सामर्थ्य लाभते. शिवाय, जरी हे तंत्र सर्वग्रासी[२४] नसले तरी "ध्येय-वादात्मक समुदायशाही" मुळे कोणत्याही प्रश्नावर अगदी टोकाचे निर्णय घेणे किबुट्झला शक्य होते, कारण अल्पसंख्य गटाला खूष करण्यासाठी तडजोड करण्याची त्याला आवश्यकता नसते. संघाने नेमके हेच केले आहे; तो नेहमीच टोकाची भूमिका घेत आला आहे; त्याने तडजोड कधीही केलेली नाही.[२५] किबुट्झला आपल्या हेतूच्या सत्यतेबद्दल व योग्यपणाबद्दल खात्री आहे आणि आपल्या निष्ठांशी त्याने तडजोड केलेली नाही. म्हणून आपल्याला जे "सत्य" प्रतीत झाले आहे त्याचा त्याने सतत पाठपुरावा केलेला आहे, मग त्यात कितीही टोकाची भूमिका घ्यावी लागो. एका संस्थापकाने म्हटले आहे त्याप्रमाणे :

---

पृष्ठ १५८ वरून चालू

सोव्हिएत यूनियनच्या प्रचाराला भुलले. दुसऱ्या लाटेची मंडळी वयाने ज्येष्ठ असल्या-मुळे हिस्ताद्रुत ही वजनदार संस्था आणि ज्यूईश एजन्सीची पॅलेस्टाइन शाखा यांमध्ये नेतेपदास चढली. दुसऱ्या लाटेला प्राप्त झालेली सत्ता व प्रतिष्ठा यांबद्दल तिसऱ्या लाटेच्या मनात नेहमीच कडवट वास करून राहिलेले आहे आणि तिच्यातील जहाल घटकांनी मुख्यत्वे दुसऱ्या आलियाच्या लोकांनी जो राजकीय पक्ष स्थापन केला त्यात सामील होण्याचे नाकारून आपल्या वेगळ्या 'पक्षा'ची स्थापना केली आहे. (ज्याचा या ग्रंथात 'पक्ष' असा उल्लेख आहे तोच हा पक्ष.) शिवाय त्यांनी दुसऱ्या लाटेच्या राजकीय पक्षाबरोबर संयुक्त सरकारात सामील व्हायलाही नकार दिला आहे. त्या पक्षाचा नेता बेन गुरियन याच्याबद्दल त्यांच्या मनात विशेष तीव्र वैरभावना आहे आणि बेन गुरियनमुळे त्यांच्या मनात ज्या तीव्र प्रतिक्रिया उमटतात त्यावरून असा विचार मनात येतो की बेन गुरियन हा त्यांचा केवळ राजकीय प्रतिस्पर्धी आहे की ज्याचा त्यांनी मागेच इन्कार केला आहे अशा पित्याचे तो प्रतीक आहे? ते काहीही असो, आपल्या राजकीय प्रतिस्पर्ध्यांच्या तीव्र सोव्हिएत विरोधाची प्रति-क्रिया म्हणून संघाचे सोव्हिएत प्रेम निर्माण झाले असणे संभवनीय आहे. (हा मजकूर छापायला दिल्यानंतर लेखकाने न्यूयार्क टाइम्समध्ये असे वाचले की 'पक्षा'ने बेन गुरियनच्या नेतृत्वाखाली संघटित होऊ घातलेल्या नव्या सरकारात भागीदारी करण्याचे मान्य केले आहे. पूर्वी पृ.... वर 'पक्षा'च्या नेतृत्वाचे लेखकाने जे वर्णन केले आहे त्याला या घटनेमुळे मुरड घालणे जरूर आहे असे वाटेल. पण तरीही ते वर्णन बरोबर आहे असे त्याला वाटते. 'पक्ष' नव्या सरकारात पूर्ण मुदतीपर्यंत राहिला तरच आपले मत बदलण्यास तो तयार होईल. त्याचे भाकित असे आहे की मुदतीच्या पूर्वीच 'पक्ष' सरकारातून राजीनामा देईल. अपवाद एकच– इस्रायल आणि अरब यांच्यात पुन्हा युद्ध सुरू झाले तर मात्र ही जोडी टिकून राहील.) [हे भाकित चूक ठरल्याची लेखकाने नव्या प्रस्तावनेत कबुली दिली आहे. – अनुवादक]

आम्ही नेहमीच टोकाची भूमिका घेत आलो आहोत. विदेशात झिऑनिस्ट म्हणून जगणाऱ्यांनजी आम्ही हाकाटी (म्ह. पॅलेस्टाइनला स्थलांतर करून आत्मसाक्षात्कार करून घेण्याची) ऐकांतिक मागणी केली. पॅलेस्टाइनमध्ये आल्यावरही भूमीकडे धाव घेण्याची व शेती करण्याची आमची मागणी ऐकांतिक होती. शेतीत वसाहत करायची तर ती किबुट्झ पद्धतीचीच हा आमचा आग्रहही ऐकांतिकच. आमचा किबुट्झही देशाच्या सरहद्दीवर हवा ही आमची इच्छाही आमचा आत्यंतिक स्वभावच दर्शवितं. आमच्या राजकीय आत्यंतिकतेची मानसिक मुळं अशी खोल गेलेली आहेत. आम्ही सतत सीमेवरच उभे आहोत.

* * *




प्रकरण : ७ :

# किबुट्झमधील संकटावस्था

*संकल्प आणि सिद्धी यांच्यामध्ये*
*भावना आणि प्रतिसाद यांच्यामध्ये*
*एक सावली पडलेली असते.*

T. S. Eliot, **The Hollow Men**

## संकटावस्थेची लक्षणे आणि त्यांचा अर्थ

सबंध किबुट्झ चळवळीप्रमाणेच किर्यात येदिदिमही आपल्या इतिहासातील एका संकटाच्या अवस्थेमधून जात आहे. ही त्याच्या विकासातील एक तात्पुरती अवस्था असेल किंवा या घटनेला अधिक गंभीर अर्थही असू शकेल. काहीही असो, चळवळीला एका गंभीर पेचप्रसंगाला तोंड द्यावे लागत आहे हे सत्य कोणीही नाकारीत नाही. इतर किबुट्झ वसाहतींसमोर उभ्या असलेल्या संकटांच्या मानाने किर्यात येदिदिमवरच्या संकट प्रसंगाची तीव्रता कमी आहे[1] परंतु तरीसुद्धा ती गंभीर स्वरूपाची आहे. या ' पेचप्रसंगाची ' लक्षणे सांगताना त्यांचे पुढीलप्रमाणे वर्गी-करण करता येईल : कोणत्याही समाजात कमी अधिक प्रमाणात आढळून येणाऱ्या विकृतींची लक्षणे, आणि या समाजाच्या विशिष्ट सांस्कृतिक आकृतिबंधामधून उत्पन्न झालेल्या विकृतींची लक्षणे.

पहिल्या प्रकारच्या संकटप्रसंगाचे पहिले लक्षण किबुट्झमधल्या अंतर्गत ताणात दिसून येते. या बाबतीत हे लक्षात घेतले पाहिजे की सामान्यतः सर्व इस्रायलमध्येच एक ताणलेली मनःस्थिती दिसून येते तशी किर्यात येदिदिममध्येसुद्धा दिसते; पण इथे ज्या " ताणा "चा उल्लेख केला आहे त्याचे मूळ हे नाही. किर्यात येदिदिममध्ये प्रत्येक दिवस उगवतो तो एक नवी संकटावस्था घेऊनच आणि त्यातून पार पडावे न पडावे तोच एक नवी संकटावस्था समोर उभी राहाते. पपनसांच्या हंगामात फळे ताबडतोब उतरविली नाहीत तर ती झाडावरच कुजून जातील, पण कामाला तर पुरेशी माणसे नसतात. द्राक्षांची तोड ताबडतोब करायला हवी आहे नाही तर त्यांच्या किमती बाजारात तळ गाठतील, म्हणून प्रशालेच्या विद्यार्थ्यांना वर्गातून खास कामगिरीसाठी " आता अगदी शेवटचे " म्हणून सांगून नेण्यात येते आणि एका

---

१. या फरकाची कारणे वर सूचित केली आहेत. पृष्ठ १४०–१४१.

महिन्यानंतर पुन्हा " अखेरची वेळ " म्हणून परत बोलावून नेण्यात येते. शेतात सभासद एखाद्या " महत्त्वाच्या " मुद्द्यावर चर्चा करू लागतात ती अशा पद्धतीने की जणू काही किर्यात येदिदिमला एक वर्षच झाले आहे; खरे म्हणजे " महत्त्वाच्या " मुद्द्यावर चर्चा करायला आठवड्यात दोनदा ग्रामसभेची बैठक होतच असते. एखाद्या मुकादमाने दिलेली राजीनाम्याची धमकी, इस्रायलबाबत अमेरिकेचे नवे धोरण, कामगारांविरुद्ध दुजाभाव दर्शविणारी सरकारची एखादी ताजी कृती, आणि अशाच प्रकारच्या संभाषणाच्या शेकडो विषयांतून तणावाची मनःस्थिती रोजच्या रोज निर्माण होते.

किबुट्झ समजावून घेण्याच्या दृष्टीने हे " संकटावस्थेचे मानसशास्त्र " कितीही महत्त्वाचे असले तरी येथे ज्यांना सामाजिक अस्वास्थ्याचे निदर्शक मानले आहे असे ताण त्यामधून उत्पन्न होत नाहीत. कारण "तणावाची मनःस्थिती" फक्त एकट्या किबुट्झच्याच वाट्याला आलेली नाही; शिवाय या मनःस्थितीचा एकूण परिणाम सामाजिक चैतन्य कमी करण्याऐवजी वाढवण्यातच होण्याचा संभव असतो.

या चर्चेच्या दृष्टीने महत्त्वाचा ताण तो की जो किबुट्झची सामाजिक रचना व त्याची विशिष्ट मूल्ये यांच्या संदर्भात उत्पन्न होत आहे आणि ज्यामुळे सभासदांचे मानसिक स्वास्थ्य कमी होत आहे. कारण अशा ताणांच्या विपरीत परिणामांची सभासदांना पूर्ण जाणीव आहे. उदाहरणार्थ, एक अमेरिकन पाहुणी कशी दिसते ह्यावर बोलताना एक स्त्री सभासद म्हणाली की तिचा चेहरा " अगदी मॅडोनासारखा दिसतो; किती शांत चेहरा आहे ! असा चेहरा किबुट्झमध्ये दिसायचा नाही." कारण विचारले असता तिने सांगितले की जेव्हा लोक एकत्र राहतात व काम करतात तेव्हा पुष्कळ ताण अटळपणे उत्पन्न होतात, आणि प्रत्येकजण भांडतो, ओरडतो. आणखी एक उदाहरण. या अभ्यासाच्या काळात एकदा बरेचसे सभासद दक्षिणेकडे सुटी घालविण्यासाठी एकत्र प्रवास करीत होते तेव्हा गटातील सर्व साथींमध्ये बंधुत्वाची भावना पूर्ण भरून राहिल्याचा अनुभव त्यांना आला. " आपल्या भोवतालचे लोक हे आपले साथी आहेत हे कळून यायला घरापासून शंभर मैल दूर सहलीला यावं लागलं, आणि पूर्वी ज्याची फक्त तोंडदेखली विचारपूस केली असेल असा एखादा माणूस इतका छान सोबती असेल हेही ज्ञान नव्याने झालं " असे एकजण म्हणाला. या अचानकपणे प्रतीत झालेल्या भ्रातृभावाचे कारण म्हणजे " ताण नाही. कसल्यातरी ओझ्याखाली दुसऱ्याबरोबर काम करावं लागणं, वादविवाद, आणि ताण यांमधून एकदम मुक्तता मिळाली. एकदाच मला खरी शांती आणि मैत्री लाभली " असे एक सदस्या म्हणाली.

वर वर्णन केलेली किर्यात येदिदिममधली ताणाची कारणे " वस्तुनिष्ठ " दृष्टीने पाहिले तर बिनमहत्त्वाची आहेत आणि एक काळ असा होता की सभासदांनी त्यांकडे

दुर्लक्ष केले असते. आज किबुट्झ आपल्या अस्तित्वालाच आव्हान देणाऱ्या संकट प्रसंगात असल्याने ही कारणे मानसशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाची ठरतात. अशा प्रकारचा एक ताण म्हणजे कपड्यांची टंचाई. एका सदस्येने याचे पुढीलप्रमाणे वर्णन केले :

आपल्याला एक नवा पोशाख हवा असतो आणि मिळायची पाळीही आपली असते, पण वस्त्रभांडाराची व्यवस्थापिका सांगते की "पॉईंट्स्" शिल्लक नाहीत (त्यावेळी इस्रायलमध्ये कपड्यांचे रेशन होते), किंवा युवक गटाने सगळे कापड संपविले आहे, किंवा पुष्कळांच्या ऑर्डरी अद्याप पडून आहेत. पण मला माझा पोशाख आताच हवा असतो आणि तो आता मिळण्याचा माझा हक्क आहे ही एकच गोष्ट फक्त मी जाणते. आणखी दोन महिने थांबायची माझी तयारी नसते.

काहीजण जेवणघरातील ताणांवर भर देतात. अन्नाचा पुरवठा कमी असतो त्यामुळे करावी लागणारी धडपड, गर्दीमुळे होणारा आवाज, गोंगाट हे सर्व कधीकधी असह्य होते. स्वयंपाकघरातील काम करणारी माणसे अतिशय दमलेली असतात आणि त्यामुळे ती चिडलेली असतात. याचा परिणाम असा की कोणी नेहमीपेक्षा वेगळा पदार्थ मागितला की ती संतापतात आणि उलट बाजूने सभासदही कामगारांवर रागावतात. आणखी एक नेहमीचाच प्रकार म्हणजे एखाद्या दिवशीचा जेवणाचा बेत सर्वांनाच आवडेल असा नसतो. एक सभासद सांगतो,

तुम्ही जेवणघरात येता आणि अंडी व कांदेच आहेत असं दृष्टीला पडतं. तुम्हाला कांदे नको असतात; फक्त अंडीच हवी असतात. तेव्हा तुम्ही वाढप्यांना कांद्याशिवाय नुसता अंडीच आणायला सांगता. पण ते कामात असतात, तुमच्याकडे फिरकत नाहीत. मग तुम्ही काही न खाताच बाहेर पडता. असं एकदा दोनदा झालं की तुमचं डोकं फिरतं. काही झालं तरी हे तुमचं घर आहे. तुम्ही इथं काम करता आणि तुम्हाला खायला तर मिळालं पाहिजे. क्षुल्लक गोष्ट पण संताप आणणारी ठरते.

मनःस्थिती नसतानासुद्धा परस्परसंपर्क अखंड सहन करावा लागण्याची गरज हेसुद्धा ताणाचे एक मूळ म्हणून काहीजण सांगतात.

शहरात, तुमचं तुमच्या व्यवसायातल्या सहकाऱ्याशी भांडण झालं तर त्यामुळे फारसं बिघडत नाही; काही झालं तरी तुमचा फक्त कामाच्या वेळातच संबंध येतो. इथं तुमचं सभासदाशी भांडण होतं तेव्हा तो फक्त कामापुरताच सहकारी असतो असं नव्हे. तो किबुट्झचा सभासद असतो, तो तुमचा मित्र असतो, आणि तुम्हाला त्याच्याबरोबर राहायचं असतं, दररोज भेटायचं असतं. हे काही मोठं सुखाचं नसतं.

या प्रकारच्या परस्परसंपर्कातून उत्पन्न होणारा मानसिक व सामाजिक एकांताचा अभाव यावर काहीजणांचा भर असतो. "सर्वांच्या समोर उघडं असणं ही काही मजेची गोष्ट नाही" असे एक हळवी सदस्या उद्गारली. दुसऱ्या एका सदस्येच्या एकटीच्याच वाट्याला स्नानगृह येण्याचा चमत्कार एकदा घडला. तेव्हा त्यातून बाहेर आल्यावर ती उद्गारली, "शांतपणे आणि स्वस्थपणे आंघोळ करायला मिळाली! केवढं मोठं सुख आहे हे!"

समाजवादाच्या काही टीकाकारांच्या मते नियोजनबद्ध समाजात अंगभूतच असलेले "बराकीकरण" किर्यात येदिदिममध्ये नसले तरी अश्या प्रकारच्या समाजरचनेत प्रत्येकाच्या आवडीनिवडींना मर्यादा पडतात यात शंका नाही. अश्या प्रकारच्या मर्यादा इतर समाजात असतात त्यापेक्षा किर्यात येदिदिममध्ये जास्त आहेत की काय हे त्या विशिष्ट प्रश्नांचा खोल अभ्यास केल्याशिवाय सांगणे अवघड आहे. पण त्या जास्त नसल्या तरी वेगळ्या असतील हे निश्चित. उदाहरणार्थ, एखाद्या स्त्रीला नवा पोशाख हवा असला तर तो कोणत्या पद्धतीचा याची निवड तिला करता येत नाही, फक्त शिवणखोलीत जे काही दोन-तीन प्रकार असतील त्यातून एक निवडणे एवढीच गोष्ट तिला शक्य असते. एखाद्या जोडप्याला दुसऱ्या घरात राहायला जायची इच्छा असेल तर "सामाजिक समिती"च्या परवानगीखेरीज जाता येत नाही, आणि त्याची मागणी योग्य आहे की नाही हे समिती ठरविते. किबुट्झ-मधून एखाद्याला तात्पुरती रजा हवी असेल तर ग्रामसभेची मंजुरी मिळवावी लागते. थोडक्यात, समानता टिकवायची म्हणजे काही प्रकारचे वैयक्तिक निर्णय गटाच्या किंवा त्याने निवडलेल्या समितीच्या मंजुरीवर अवलंबून ठेवावे लागतात. आपल्याला जीवनाचा जो भाग खाजगी वाटतो त्यावरसुद्धा गटाचे नियंत्रण असावे हे पुष्कळ सभासदांना संतापजनक वाटते.

या आणि दुसऱ्या समस्यांवर सभासदांशी चर्चा करताना लेखकाने त्यांच्या असे ध्यानात आणून दिले की यांपैकी बऱ्याच समस्या किर्यात येदिदिमच्या एकट्या-च्याच आहेत असे नसून शहरी जीवनातही त्या उत्पन्न होतात. त्यांना ते पटले; पण त्यांत एक फरक आहे असे एक सदस्या म्हणाली. आपण शहरात आपल्या खाजगी घरात राहात असतो तर यातला कोणताच त्रास आपल्याला झाला नसता. आपण किबुट्झमध्ये राहतो म्हणूनच आपल्याला हे त्रास होतात असे सभासदांना वाटते. असा नागरी जीवनाचा पर्याय नेहमीच अस्तित्वात असल्याने ते या त्रासदायक गोष्टींबद्दल किबुट्झला दोष देतात.

इतर किबुट्झच्या मानाने किर्यात येदिदिममधून राजीनामे देऊन जाणारांचे प्रमाण अल्प असले तरी राजीनामे देऊन जाणाऱ्यांच्या संख्येत सारखी होणारी वाढ हे संकटावस्थेचे दुसरे एक लक्षण दिसत आहे. किर्यात येदिदिमच्या अस्तित्वाची सुरुवातीची वीस वर्षे भौगोलिक परिस्थिती मागासलेली आणि बिकट होती तेव्हा दहा लोक सोडून गेले, नंतरच्या दहा वर्षांत किबुट्झचे राहणीमान उंचावत गेले आणि आर्थिक परिस्थिती निदान शहरातल्या इतकी सुधारली तरीही तेवढेच लोक सोडून गेले. आमच्या अभ्यासाच्या काळात दोन जोडपी किर्यात येदिदिम सोडून शहरात गेली. राजीनामा हे एकाच वेळी किर्यात येदिदिममधल्या संकटावस्थेचे चिन्ह आणि कारणही असते. किबुट्झचा जीवनमार्ग श्रेष्ठ असल्याच्या दाव्याला राजीनामा हे उघड आव्हान असते त्यामुळे त्यातून किबुट्झचा मनोभंग होतो.

पूर्वीपेक्षा आता किबुट्झ सोडून जाणारांची संख्या वाढते आहे एवढेच नव्हे तर कितीतरी सभासदांनी अशा नोकऱ्या पत्करल्या आहेत की ज्यामुळे त्यांचा बहुतेक दिवस किंवा आठवडा किबुट्झच्या बाहेर जातो. किबुट्झमधल्या संकटावस्थेचे हे तिसरे चिन्ह होय. किर्यात येदिदिम हा तीन मोठ्या संघटनांचा—दि जनरल फेडरेशन ऑफ लेबर ( हिस्ताद्रुत ) एक किबुट्झ संघ आणि एक राजकीय पक्ष—यांचा घटक सभासद आहे हे लक्षात घेतले पाहिजे. या संघटनांना व्यवस्थापनकुशल अधिकाऱ्यांची जरुरी असते आणि सगळ्या किबुट्झमधून काही सभासदांना या संघटनात कामाला पाठवितात. मात्र, किर्यात येदिदिमने यात आपल्या वाट्यापेक्षा अधिक भार उचलला असल्याने सभासदांत बराच असंतोष आहे. कारण खुद्द किबुट्झमध्येच कामगारांची अतिशय टंचाई आहे हे उघड दिसत आहे. बाहेर जाऊन काम करणाऱ्या कामगार सभासदांच्या निष्ठेचा भाग मान्य करूनसुद्धा, काहीजणांना या कामामुळे शहरात राहायला मिळते व किबुट्झमधून मिळणारे फायदे तेवढे त्यांच्या पदरात पडतात; उलट किबुट्झ जीवनाचा कष्टाचा भाग टाळता येतो हे सत्य उरतेच. यातले बहुतेक कामगार हे किबुट्झचे संस्थापक, पुढारी यांपैकी आहेत हे लक्षात घेतले की या बाहेरच्या कामांमुळे केवढी गंभीर संकटावस्था उत्पन्न होते हे समजून येईल.

ह्या तीन गोष्टी म्हणजे खचलेल्या मनोधैर्याच्या सार्वत्रिक खुणा आहेत; म्हणजे असे की ज्या समाजातील गटांमध्ये बराच अंतर्गत ताण दिसून येतो आणि दुसऱ्या कुठे तरी राहायला जाण्याची इच्छा व्हावी एवढेच असमाधान असते असा कोणताही समाज गंभीर संकटाच्या अवस्थेत असतो असे म्हणता येते.

पण समाजाचे स्वास्थ्यपूर्ण जीवन धोक्यात आणणाऱ्या ज्या गोष्टी असतात त्यांनीच सामाजिक संकटावस्थेचे प्रमाण मोजले जाऊ नये, तर त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण सांस्कृतिक वारशाला धोकादायक ठरणाऱ्या गोष्टीही विचारात घ्यायला पाहिजेत. काही विशिष्ट नीतिमूल्ये प्रत्यक्षात आणण्यासाठी किर्यात येदिदिमचा जन्म झाला. या मूल्यांना लागणारा कोणताही अंतर्गत धोका म्हणजे त्याच्या अस्तित्वाला धोका होय—आणि येथे अस्तित्व म्हणजे नुसता समाज म्हणूनच अस्तित्व नव्हे तर एक किबुट्झ म्हणून अस्तित्व हे ध्यानात ठेवले पाहिजे. अशा धोक्यांची किर्यात येदिदिममध्ये गंभीर चिन्हे उमटू लागली आहेत.

यांपैकी किर्यात येदिदिम जिच्यामुळे भयग्रस्त झाला आहे अशी पहिली आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे हलके—हलके प्रवेश करणारी खाजगी मालमत्तेची भावना आणि हा प्रश्न सोडवण्याबाबत दिसून येणारी किबुट्झची असमर्थता. पूर्वी किर्यात येदिदिममध्ये खाजगी मालमत्ता नव्हती. हळूहळू मात्र आपल्या सभासदांना पुस्तके आणि फौंटनपेने अशा वैयक्तिक वस्तू बाळगण्यास परवानगी देण्यास आरंभ झाला.

अलीकडे खाजगी मालमत्ता संचित करण्याकडचा कल फारच वाढला आहे; अर्थात इतर किबुट्झच्या मानाने प्रमाण बरेच कमी आहे. तरीसुद्धा रेडिओ, कपडे किंवा फर्निचर अशा वस्तू भेटीदाखल मिळाल्या तर त्या आपल्याजवळच ठेवण्यात पुष्कळ सभासदांना संकोच वाटत नाही. पूर्वी अशा वस्तू त्यांनी किबुट्झला देऊन टाकल्या असत्या ( आणि त्यांनी तशा द्याव्यात अशी किबुट्झनेही अपेक्षा केली असती ).

सध्या किर्यात येदिदिममध्ये असलेली खाजगी मालमत्तेची दोन ढळढळीत उदाहरणे म्हणजे एक रेफ्रिजरेटर व एक मोटार. एका जोडप्याला बाहेरगावी असणाऱ्या नातेवाईकांकडून एक छोटा रेफ्रिजरेटर भेटीदाखल आला आणि त्यांनी तो फक्त स्वतःकरिताच ठेवला आहे. यामुळे त्यांना बर्फाचे पाणी–एक खरोखुरी चैनीची बाब–तर मिळू शकतेच पण शिवाय पुरुष शहरात कामावर जात असल्याने त्यांना आइस्क्रीम किंवा थंड बिअर मिळण्याची सोय होते. रेफ्रिजरेटरचा मालक इस्रायलमध्ये येईपर्यंत आपण त्या रेफ्रिजरेटरचे फक्त रखवालदार आहो असे समर्थन हे जोडपे कितीही करो; सामुदायिक मालकी, भागीदारी, आणि समानता या किबुट्झमूल्यांचा असा भंग पूर्वी कल्पनेतही शक्य झाला नसता हे मात्र खरे. मोटार एका सभासदाला त्याच्या युरोपातील नातलगांकडून वारसाहक्काने आलेली आहे; आपण ती मोटार का ठेवली याचे कारण तो असे सांगतो की आपली पत्नी शहरात राहते आणि कामाचा दिवस फुकट न घालविता आपण तिला संध्याकाळी भेटू शकतो. हे कारण कितीही खरे असले तरी, असंबद्ध आहे; किबुट्झ संस्कृतीच्या प्राणभूत मूल्यांना या कृत्याने भंग होतो ही यात महत्त्वाची गोष्ट आहे.

काही अत्यंत महत्त्वाच्या मूल्यांचा भंग झाला आहे यापेक्षा अधिक महत्त्वाची बाब ही आहे की किर्यात येदिदिमला या बाबतीत काही करता आलेले नाही. पूर्वी यापेक्षा क्षुल्लक नियमभंगाबद्दल एखाद्या सभासदाला जाहीर रीत्या दोषी ठरविण्यात आले असते, परंतु आज इतक्या मोठ्या मूल्यांचा भंग होऊनसुद्धा त्याविरुद्ध कारवाई करण्यात येत नाही. काहीजण याचे समर्थन असे करतात की, ज्याअर्थी सध्या आपल्या सभासदांना आपली इच्छा आहे त्या प्रमाणात सुखसोयी पुरविण्यास किबुट्झ असमर्थ आहे त्याअर्थी एखाद्या सभासदाला स्वतःसाठी काही करण्याची संधी मिळाली तर अशा घटनांकडे तो डोळेझाक करतो. हे समर्थन फारसे प्रत्ययकारी नाही. उलट, या निष्क्रियतेचे कारण असे दिसते की काही कारवाई केली तर दारूगोळ्याच्या कोठाराला ठिणगी लागेल अशी किर्यात येदिदिमला भीती वाटते. किबुट्झमध्ये जवळजवळ प्रत्येकापाशी काही ना काही खाजगी मालमत्ता जमा झालेली आहे आणि विशेष नियमभंग करणारांना काही शिक्षा करायची झाली तर किरकोळ नियमभंग करणारांनाही त्यात गोवावे लागेल. यातून काय उद्भवेल हे भाकित करण्याचे धाडस कुणालाच नसल्याने काहीही केले जात नाही. सत्य उरते ते इतकेच की खाजगी मालमत्तेकडे

वळणारा हा कल वाढत राहिला तर किर्यात येदिदिमचा किबुट्झ म्हणून अंत होईल. तेव्हा, खाजगी मालमत्तेची ही वाढती अभिलाषा संकटावस्थेची महत्त्वाची खूण ठरते.[२]

गटविशिष्ट अनुभवांची थोरवी हे जे दुसरे प्रमुख मूल्य त्याचे भवितव्यसुद्धा आता धोक्यात आले आहे. संपूर्णपणे समूह-केंद्रित समाजापासून, ज्यात बऱ्याच प्रमाणात एकांताला मोकळीक आहे अशा समाजापर्यंतच्या प्रवाहात मध्यभागी कोठेतरी किर्यात येदिदिम आहे यात फारशी शंका नाही. हे पुष्कळशा गोष्टींतून उघड होते. पहिली बाब म्हणजे साथींच्या सर्व कार्यक्रमांचे केंद्र जे जेवणघर तेथून त्यांच्या खाजगी राहण्याच्या खोल्यांकडे एक केंद्रापसारी प्रवाह सुरू झाला आहे. सुखद स्मृतींना कुरवाळणारे संस्थापक " ते हि नो दिवसा गताः " असे म्हणतात; संध्याकाळी सभासद जेवणघरात जमून गात, नाचत आणि गप्पा करीत असत त्याच्या आठवणी काढतात. आज जेवणघर संध्याकाळी रिकामे असते, सभासद आपल्या खोल्यांत आपल्या मुलाबाळांत किंवा थोड्याशा स्नेह्यांसमवेत वेळ घालविणे अधिक पसंत करतात. काहीजण तर जास्त एकांत मिळावा म्हणून जेवणघरात आपले ताट वाढून घेऊन आपल्या खोल्यांत जातात. व तेथे एकट्यानेच किंवा आपल्या जोडीदाराबरोबर ( किंवा जोडीदारणीबरोबर ) जेवतात. आणखी काहीजण सामूहिक स्नानव्यवस्थेवर आक्षेप घेऊ लागले आहेत आणि लाकूड व नळ मिळवून त्यांनी आपल्या स्वतःच्या खोलीबाहेर खाजगी न्हाणीघरांची रचना केली आहे. हा कल जेव्हा सार्वत्रिक प्रथात होण्याचा धोका निर्माण झाला तेव्हा ग्रामसभेने सर्व खाजगी न्हाणीघरे–ती डोळ्यात खुपतात या सबबीवर–बंद केली.

आपल्या सभासदांकडून एकांताची जी अधिकाधिक मागणी होत आहे तिची किर्यात येदिदिमने दखल घेतली आहे. उदाहरणार्थ पूर्वी जेव्हा सभासद संध्याकाळचा वेळ जेवणघरात घालवीत असत तेव्हा टेबलावर अल्पोपाहार ठेवला जाई. आता ते आपापल्या खोल्यात आपल्या मित्रांसह असतात तेव्हा त्यांना चहा किंवा कॉफी आणि क्वचित् त्याबरोबर एखादे बिस्किट किंवा केकचा तुकडा असावासा वाटतो. ही पद्धत किबुट्झने अधिकृतपणे मान्य केली आहे; इतकी की त्यासाठी दर महिन्याला साखर व चहाकॉफी यांच्या खाजगी वाटपाची सोय केली आहे. सभासदांची अधिक एकांताची गरज किबुट्झने अधिकृतरीत्या मान्य केल्याचे याहून अधिक अर्थपूर्ण लक्षण नव्या घरबांधणीच्या विस्तारात दिसून येते. नवीन घरात प्रत्येक जोडप्याला स्वतंत्र स्नानगृह व संडास आहे, आणि खोल्यांची रचना " L " या इंग्रजी अक्षरासारखी असल्याने जोडप्यापैकी प्रत्येकाला अधिक एकांत मिळण्याचीही सोय झाली आहे.

---

२. ह्या प्रवृत्तीला महत्त्वाचा प्रतिबंध म्हणजे सात्रांची या बाबतीतली वृत्ती. सात्रांना खाजगी मालमत्तेची फारशी अभिलाषा असत नाही. ते आपल्या वडील मंडळींच्या या च्युतीवर नेहमी टीका करतात.

अशा सवलती देऊनसुद्धा महानुभवाकडून वैयक्तिक अनुभवाकडे झुकणारा हा कल कियीत येदिदिमच्या आणि संघाच्या नेत्यांना भयावह वाटतो. कारण त्यांच्या दृष्टीने किबुट्झच्या एका मूलभूत निष्ठेचे त्यात उल्लंघन होते. उदाहरणार्थ, आमच्या अभ्यासाच्या काळात कियीत येदिदिममध्ये एक सर्वंथ सभा या मुद्द्यावरच चर्चा करण्याकरिता घेतली होती; लोक त्याबद्दल सतत बोलतात; आणि त्यावर किबुट्झच्या निरनिराळ्या प्रकाशनांतून लेखही लिहिले जातात. या " केंद्रापसारी " प्रवृत्तीच्या मंडळींचे वर्णन करण्यासाठी त्यांचे विरोधक " कमकम ! " ( चहाची किटली ) हा शब्द वापरतात. आपल्या मित्रांसमवेत आपल्या स्वतःच्या खोलीत खाजगी रीत्या चहा पिण्याची इच्छा ही गतकाळच्या किबुट्झमधल्या भ्रातृभावाचे व कौटुंबिक वातावरणाचे विसर्जन झाल्याची खूणच ठरलेली आहे.

अधिक एकांताकडे वाढणारा हा कल पाहून संघही अस्वस्थ झाला आहे. अलीकडच्या एका वार्षिक मेळाव्यात दोन मुख्य प्रश्नांवर चर्चा केंद्रित झाली : खाजगी मालमत्ता व एकांत या दोन्हींतली वाढ, खाजगी न्हाणीघर व प्रसाधनकक्ष आणि जेवणघराचे सामूहिक केंद्र म्हणून कमी झालेले महत्त्व या गोष्टी हा मेळाव्याचा विशेष चिंतेचा विषय झाला होता. किबुट्झमध्ये युवक गट आणि नवे स्थलांतरित यांची गर्दी होत आहे आणि त्याचा परिणाम म्हणून सभासदांना आता आपल्या स्वतःच्या किबुट्झबद्दल " घर " ही भावना राहिलेली नाही ह्या गोष्टी ह्या स्थितीला कारणीभूत आहेत अशी कारणमीमांसा मेळाव्यात करण्यात आली. ह्या मीमांसेत थोडे तथ्य असले तरी ते पूर्णपणे समाधानकारक नाही हे पुढे येईलच.

किबुट्झमधल्या अधिकृत जबाबदारींच्या जागा स्वीकारण्याबद्दल पुष्कळशा सभासदांची अनिच्छा हे संकटावस्थेचे आणखी एक चिन्ह म्हणता येईल. ह्या अनिच्छे-कडे सभासद काहीशा अभिमानाने बघतात हे आपण मागे पाहिलेच आहे. इतर समाजांमध्ये लोक सत्तेसाठी व प्रतिष्ठेसाठी धडपडतात, उलट किबुट्झमध्ये ते असल्या गोष्टी टाळतात असे त्यांचे म्हणणे. पण ह्या अनिच्छेबरोबरच ग्रामसभेच्या बैठकींना उत्तरोत्तर कमी होत जाणारी उपस्थिती ही गोष्टही लक्षात घेतली तर या घटनेला एक निराळाच अर्थ प्राप्त होतो आणि तो निश्चितच किबुट्झला गौरवास्पद नाही. पूर्वीच्या काळी किबुट्झचे सगळे सभासद ग्रामसभेला नियमितपणे हजर राहात असत; आज सरासरी हजेरी पन्नास टक्क्यांहून कमी असते. आणि जे हजर असतात त्यातलेही फारच थोडे त्यात प्रत्यक्ष भाग घेतात आणि बाकीचे सभा कंटाळवाण्या होतात अशी तक्रार करतात. ह्या सर्व गोष्टी लक्षात घेतल्या म्हणजे सार्वजनिक अधिकारपदे स्वीकारण्याची अनिच्छा हे उदासीनतेचे आणि सामाजिक बेजबाबदारपणाचे चिन्हच म्हणावे लागेल. खरी गोष्ट अशी आहे की जबाबदाऱ्या सोपविल्या नाहीत तर कोणताही व्यामिश्र समाज जगू शकणार नाही; आणि या जबाबदाऱ्या पत्करायला लोक तयार नसले

तर – कळत अथवा नकळत – ते आपल्या गटाच्या कल्याणाबद्दल व भवितव्याबद्दल काहीसे बेफिकीर आहेत असे स्पष्ट होते. किबुट्झपेक्षा इतर समाजात अशा बेफिकीरीचे प्रमाण पुष्कळच जास्त असते हे खरे आहे. परंतु किबुट्झचे अस्तित्व-कारणच इतर समाजांपेक्षा त्यात असलेल्या वेगळेपणात आहे. परस्परसाहाय्य आणि गटाचे महत्त्व यांवर ते उभारलेले आहे. इतर समाजांतून आढळून येणारी बेफिकीरी जर किबुट्झ-मध्येही त्याच प्रमाणात आढळू लागली तर मुळातल्या ह्या मूल्यांचा त्याग करण्यात आला आहे एवढेच सूचित होईल असे नाही तर किबुट्झ चालविण्यासाठी धंदेवाईक व्यवस्थापकांची नेमणूक करावी लागेल. असे झाले तर समता आणि स्वातंत्र्य या मूल्यांना आज साथींच्या दृष्टीने जो अर्थ आहे तो नष्ट होईल. शिवाय, कियॉत येदिदिमचे किबुट्झ म्हणून अस्तित्वच संपुष्टात येईल.

तेव्हा कियॉत येदिदिमचे सामाजिक आणि सांस्कृतिक अस्तित्व गंभीरपणे धोक्यात आले आहे यात शंका नाही. मात्र या पेचप्रसंगाची कारणमीमांसा कशा प्रकारे करायची याबाबत पुष्कळ मतभेद आहेत. पृथक्करण करू गेले तर असे ध्यानात येते की किबुट्झच्या अंतर्गत व बाह्य अशा दोन्ही परिस्थिती सध्याच्या अवस्थेला कारणीभूत झाल्या आहेत.

किबुट्झमधल्या सगळ्या समस्यांना बाहेरची परिस्थिती, आणि विशेषतः सरकारी विरोध या गोष्टी कारण आहेत असे मानण्याची साथींची वृत्ती आहे. सरकारमध्ये "सुधारणावादी" पक्ष प्रमुख आहे आणि तो किबुट्झ चळवळीला सक्रिय विरोध करतो असा दावा ते करतात. त्याला काही अर्थही आहे. सध्याच्या संयुक्त सरकारला इतर कोणत्याही सरकारप्रमाणेच सत्ता टिकवून राहायचे आहे, आणि किबुट्झ वसाहतींचे बहुसंख्य सभासद हे विरोधी पक्षात आहेत त्यामुळे त्यांच्याकडे एक राजकीय धोका म्हणून बघण्याची सरकारची दृष्टी आहे. शिवाय, सरकार सोव्हिएत-विरोधी असल्याने, तत्त्वतःच पुष्कळशा किबुट्झ वसाहतींच्या सोव्हिएत-पक्षपाती वृत्तीला सरकारचा विरोध आहे. तरीसुद्धा किबुट्झवसाहतींना दुर्बळ करण्यासाठी सरकारने नेमक्या कोणत्या गोष्टी केल्या आहेत असे विचारले तर सभासदांना फारच थोड्या कृतींकडे बोट दाखविता येते. ज्या एका कृतीचा सतत उल्लेख केला जातो ती म्हणजे राष्ट्रीय स्वातंत्र्ययुद्धात महत्त्वाची भूमिका केलेली धडक सेना "पालमाह" हिचे विसर्जन. पालमाहचे बहुतेक सभासद किबुट्झ वसाहतींचे सभासद होते हे खरे आहे, पण तिचे विसर्जन किबुट्झ-विरोधी हेतूंनी झाले की काय हा वादग्रस्त मुद्दा आहे. या आक्षेपाचा खरेपणा मान्य केला तरीसुद्धा या कृतीने किंवा सरकारच्या इतर कोणत्याही कृतीने किबुट्झमधल्या एकूण संकटावस्थेच्या कोणत्याही अविष्कारांना विशेष रीतीने हातभार लावला आहे असे म्हणणे कठीण आहे.

सरकारची भूमिका वादग्रस्त म्हणून सोडली तरी किबुट्झवर जिचा परिणाम झालेला आहे अशी एक बाह्य परिस्थिती आहे ती म्हणजे किबुट्झ चळवळीसंबंधी सर्व देशभर बदललेले वातावरण. पूर्वी जेव्हा देश अगदी प्राथमिक आणि पायाभरणीच्या अवस्थेत होता तेव्हा सर्व देश किबुट्झ चळवळीकडे अतिशय आदराने बघत असे आणि किबुट्झ–सभासद असणे म्हणजे राष्ट्रीय वीर असल्यासारखेच होते. कारण किबुट्झ–सभासद म्हणजे पायाभरणी करणारा नेता, नव्या ज्यूचा आदर्श नमुना अशी त्याची प्रतिमा होती. देशातील अतिशय धोक्याच्या प्रदेशात वसाहती वसविणे, अरब हल्लेखोरांपासून सीमारक्षण करणे, दलदलीच्या प्रदेशातील पाण्याचा निचरा करणे, आणि वाळवंट सुपीक करणे–ही सर्व कामे त्यानेच केली आहेत. त्यामुळे तो जाईल तेथे आदरणीय ठरत होता. परंतु स्वातंत्र्यानंतर हे चित्र बदलले आहे. एक तर अगदी पहिले स्थलांतरित आता पायाभरणी करायला, लढायला, आणि त्यागाला कंटाळले आहेत. आता सर्वसामान्य निवांत जीवन जगावे ही एकच इच्छा त्यांना आहे आणि पायाभरणी करणाऱ्या वीरांना आता प्रतीक म्हणून महत्त्व राहिले नाही. दुसरे असे की अलीकडे आलेल्या पौर्वात्य स्थलांतरितांच्या मोठ्या समूहाला किबुट्झचे काही महत्त्व नाही, कारण या स्थलांतरितांची स्वतःची सांस्कृतिक मूल्ये अशी नाहीत की ज्यात किबुट्झजीवन वा किबुट्झ ध्येयवाद यांना महत्त्व असावे. त्यामुळे त्यांचा दृष्टिकोण फार तर उदासीनतेचा आहे असे म्हणता येईल.

या बदललेल्या वातावरणाचा किर्यात येदिदिमवर खोल परिणाम झाला आहे. पुष्कळदा दुखावलेल्या स्वरात सभासद सांगतात की ते आता शहरात जातात तेव्हा त्यांची कोणी आदराने विचारपूस करीत नाही आणि त्यांचे खाकी कपडे हे पूर्वी जे प्रतिष्ठेचे चिन्ह होते ते आता कमीपणाचे चिन्ह झाले आहे. शिवाय, उष्ण वाळवंटात आणि धोक्याच्या सरहद्दीवर राहायचे ते त्यांनी, स्थलांतरितांना पुनर्वसन करण्यासाठी घेऊन आपले नित्याचे जीवन विस्कळ होऊ द्यायचे ते त्यांनीच आणि शहरात राहणारांनी मात्र चैनीच्या वस्तू आणि व्यवसायातील उत्कर्षासाठी स्पर्धा करायची, अशीही त्यांची तक्रार आहे.

काही सभासदांनी महत्त्वाच्या किबुट्झमूल्यांचा ज्या सहजतेने त्याग केला त्यामागे ही तक्रार–आणि ती खोटीही नाही–हा महत्त्वाचा घटक आहे. देशात आल्यापासून साऱ्यांना इतर ज्यू नागरिकांसह संकटांच्या अखंड मालिकेला तोंड द्यावे लागले आहे. सुरुवातीपासूनच त्यांना अतिशय बिकट भौगोलिक परिस्थिती काबूत आणावी लागली, अरबांच्या हल्ल्यांपासून आपले जीवित व संपत्ती यांचे रक्षण करावे लागले, आर्थिक व सामाजिक सुधारणांसाठी प्रयत्न करावे लागले. या कामात कधी एका क्षणाचीही उसंत नव्हती. आणि त्या सबंध्या कालात उच्च ध्येयवाद आणि दृढ श्रद्धा यांनी ते प्रेरित झालेले होते. ज्यूंचे स्वातंत्र्ययुद्ध आणि राज्यस्थापना या

घटना पॅलेस्टाइनच्या इतिहासाला वळण देणाऱ्या ठरल्या. कारण स्वातंत्र्याबरोबर झगड्याचे दीर्घ पर्व जसे संपावे तसे त्यागाचेही संपावे अशी आशा उत्पन्न झाली. ही भावना एका इस्रायली गृहस्थाने पुढीलप्रमाणे व्यक्त केली आहे, आणि ती प्रातिनिधिक स्वरूपाची आहे असे म्हणायला हरकत नाही :

> राज्यस्थापनेची घोषणा होईपर्यंत आम्ही सारखे एका आणीबाणीच्या अवस्थेमधून दुसरीत जात होतो. भावना शिगेला पोचलेल्या मनःस्थितीत आम्ही जीवन जगत होतो. आता आमचे सरकार झाले आहे. आता आम्ही थकलो आहोत. खरोखर थकलो आहोत. स्वस्थ बसावं आणि आराम करावा असं वाटतं. आमच्याकडून शक्य होता तेवढा त्याग आम्ही केला आहे. आणि आता वाटतं, बस्स !

जुन्या स्थलांतरितांचे भावनिक व नैतिक मांद्य दर्शविणारी ही आताची वृत्ती नव्याने देशात आलेल्यांची नेहमीची वृत्ती आहे आणि ऐहिक सुखसोयी, वैयक्तिक उत्कर्ष, भौतिक यश यांबद्दलच्या लालसेत ही वृत्ती प्रकट होते. या मोठ्या सामाजिक संदर्भात किबुट्झमधली संकटावस्था समजून घेतली पाहिजे. समाजातल्या इतर काही गटांनी संस्थापकत्वाच्या श्रद्धांवर पाणी सोडलेले असताना किबुट्झने मात्र आपल्याकडून त्यागाची अपेक्षा करावी आणि उच्च ध्येयांना अनुसरून राहण्याची मागणी करावी ही गोष्ट अनेक सभासदांना आवडत नाही. म्हणून त्यांचे म्हणणे असे की जर किबुट्झ आम्हाला अधिक सुखसोयी देणार नसेल तर आमच्या आम्हीच त्या मिळवायला काय हरकत आहे ?

किर्यात येदिदिममधल्या संकटावस्थेला जरी ही बाह्य परिस्थिती कारणीभूत असली तरी प्रस्तुत लेखकाची अशी धारणा झालेली आहे की संकटावस्थेची मूळ कारणे किर्यात येदिदिमच्या अंतर्गतच आहेत, आणि त्यांचे उगम किबुट्झची सामाजिक रचना, मूल्ये आणि सभासदांची बदलती मनोवृत्ती यात सापडतात.

या चर्चेच्या संदर्भात महत्त्वाचे असलेले मानसिक बदल म्हणजे वय होण्यामुळे घडून येणारे बदल होत. युवक चळवळीत किबुट्झचे मूळ होते. यामुळेच अधिक चांगल्या जगाच्या शोधात असलेल्या व समाजाची रचनाच बदलून टाकता आली तर असे जग आपल्या हयातीतच आपल्याला प्राप्त करून घेता येईल असा विश्वास बाळगणाऱ्या बेडखोर तरुणांना युवक चळवळीप्रमाणेच किबुट्झमध्येही आपल्या कर्तृत्वाच्या आविष्काराला वाव मिळाला आणि जीवनपद्धती लाभली. त्यांनी निवडलेला कष्ट, त्याग, सहभाग आणि समूहजीवन या सर्वांवर भर देणारा जीवनमार्ग ध्येयवादी किशोरांना विशेष मानवेल असाच होता. पण संस्थापक आता किशोरवयीन राहिलेले नाहीत, मग त्यांच्यातल्या पुढाऱ्यांना त्यांनी तसेच राहावे अशी कितीही इच्छा असो. ते आता मध्यमवयीन झाले आहेत, त्यांच्या आयुष्यातला बेडखोरीचा आणि ध्येयवादाचा काळ आता संपलेला आहे, आणि मध्यमवयात सुस्थित आयुष्य निवांतपणे चालवावे असे त्यांना वाटू लागले आहे. अद्याप त्यांचा न्यायाधिष्ठित

समाज, समूहजीवन, सामूहिक अनुभव आणि इतर मूळ ध्येयांवर विश्वास आहे. पण पूर्वी त्यांच्या जीवनाला प्रभावित करणाऱ्या ज्या अनिवार्य मानसिक प्रेरणा होत्या त्या आता उरलेल्या नाहीत. मूल्ये कायम आहेत पण त्यांच्याबद्दलचा आवेग गेला आहे. खरे म्हणजे, ज्यात धार्मिक सद्गुणांची वाखाणणी होते पण त्यांतला आतला अर्थ नष्ट झाला आहे अशा धर्मपाठासारखा किबुट्झ आता या बाबतीत झाला आहे. ज्या समाजवादी संज्ञांना प्रारंभीच्या काळी एक जिवंत वास्तवता होती त्यांची आता फक्त समारंभप्रसंगी म्हणायची पोकळ घोषवाक्ये झाली आहेत. तेच शब्द पुनः पुनः उच्चारले जात आहेत पण त्यांच्यातली मूल्यांची धग निघून गेली आहे. याचे कारण अर्थात हेच आहे की कोणीही अखंड क्रांतीच्या मनोवस्थेत राहू शकत नाही.

पण वय होण्यामुळे सभासदांच्या समाजवादी निष्ठांवरच परिणाम झाला आहे असे नसून त्यांच्या सामूहिक निष्ठांवरही विपरीत परिणाम झाला आहे. किबुट्झच्या सुरुवातीच्या इतिहासाचे वैशिष्ट्य बनून राहिलेले असे जे सामूहिक अनुभव --सायं-काळच्या बैठका, नृत्य, गायन, सामूहिक गप्पा आणि अनुभवांची देवघेव -- ते म्हणजे सर्व तारुण्यसुलभ घटना आहेत. आपापल्या खोल्यात निवांतपणे बसण्याची इच्छा आणि सामूहिक अनुभवांऐवजी खाजगी अनुभवांची गोडी या गोष्टी संघाच्या मेळाव्यात सुचविल्याप्रमाणे नव्या स्थलांतरितांच्या आगमनामुळे झालेल्या नाहीत. उलट, तारुण्यातील युवक चळवळीच्या समूहकेंद्रित कार्यक्रमांपासून स्वतःला निवृत्त करून घेऊन आता आपल्या वयाला साजेशा -- मुले, स्नेही आणि वैयक्तिक आवडी इत्यादी--गोष्टींत रमण्याची मध्यमवयीनांची जी स्वाभाविक वृत्ती, तीमधून निर्माण झाल्या आहेत.

थोडक्यात, सभासदांच्या तरुणपणाच्या म्हणून ज्या मानसिक गरजा होत्या त्या आता संपल्या आहेत, त्यामुळे त्या भागविण्यासाठी अस्तित्वात आलेल्या काही सामूहिक संस्थांना आता कार्यच उरलेले नाही आणि इतर कार्यविरोधी बनल्या आहेत. किबुट्झच्या नेत्यांना किबुट्झ संस्कृतीची तात्पुरती, तारुण्यसुलभ मूल्ये आणि चिरंतन स्वरूपाची नैतिक मूल्ये यांमध्ये भेद करता आला तर त्यांना ही समस्या सोडविणे शक्य होईल. कारण हे स्पष्ट आहे की जे नेहमीच एकमेकांशी सुसंगत असतात असे नाही आणि ज्या दोहोंमध्ये संबंध असण्याचीही जरुरी नाही, असे दोन घटक किबुट्झ जीवनात समाविष्ट आहेत. हे घटक म्हणजे एका बाजूला सहभाग आणि सहकार्य ही मूल्ये आणि दुसऱ्या बाजूला सामूहिक जीवन व सामूहिक अनुभव ही मूल्ये या दुसऱ्या दोन मूल्यांचा त्याग केल्याने पहिली दोन मूल्ये धोक्यात येतील असे मानण्याचे काही कारण नाही. खरे म्हणजे, याच्या उलट परिणाम घडून येईल असे मानण्यालाच जागा आहे. आतापर्यंत मात्र किबुट्झ नेत्यांनी हे किबुट्झ जीवनाचे दोन्ही घटक त्याच्या नैतिक अस्तित्वाच्या दृष्टीने निर्णायक महत्त्वाचे मानले आहेत. म्हणून

सामूहिक राहणी हा किबुट्झ जीवनाचा एक आवश्यक घटक बनून राहिला आहे. परंतु परस्परसंबंधातील अतिरिक्त जवळीक आणि सततचा संपर्क यांना जुन्या सभासदांच्या गरजांच्या दृष्टीने महत्त्व उरलेले नाही; उलट आज किर्यात येदिदिममधल्या बऱ्याचशा ताणांना ह्या गोष्टी कारण झालेल्या आहेत.

## समाजरचना आणि मानसिक ताण

वयोमानामुळे सभासदांच्या मूळ दृष्टिकोणात फरक पडून आला आहे हे तर खरेच पण आणखी एका प्रकाराने किर्यात येदिदिममधल्या पेचप्रसंगाला तो कारणीभूत झाला आहे. किबुट्झ समाजरचनेच्या दृष्टीने तो प्रकार महत्त्वाचा आहे.

किबुट्झ समाजरचनेने तारुण्यावर फार मोठा भर दिलेला आहे. वर वर्णन केल्याप्रमाणे किशोरवयीन दृष्टिकोण आणि वागणूक यांपासून माघार घेण्यात आलेली असूनसुद्धा, किर्यात येदिदिमच्या संस्कृतीवर, त्याचप्रमाणे त्यातल्या सभासदांच्या व्यक्तिमत्त्वावर तारुण्याशी साहचर्य असलेल्या पुष्कळशा गुणांनी आपला छाप वज्रलेप केलेला आहे. त्यांच्या तारुण्यातील युवक चळवळीचे नाव आता त्यांच्या राजकीय गटाला आहे. पन्नाशी उलटलेल्या सहकाऱ्यांनाही "बाहुर" आणि "बाहुरा" – तरुण पुरुष व तरुण स्त्री– असे संबोधिले जाते. यिडिश भाषेत लहान मुलाच्या नावाला लघुरूप देण्यासाठी "के" हा प्रत्यय लाविला जातो तो केस पांढरे झालेल्या साथीच्या नावालाही जोडला जातो. उघड्या कॉलरचा शर्ट आणि खाकी पँट हा पुरुषांचा आणि पांढरा ब्लाऊझ व स्कर्ट किंवा शॉर्टस् हा स्त्रियांचा किबुट्झमधला पोशाख म्हणजे युवक चळवळीचाच अवशेष आहे. आणि शेवटी सतत विरोध करीत राहण्याची प्रवृत्ती, सरकारी जबाबदारी पत्करण्याची-अनिच्छा, कायमची बंडखोरी व टीकाकाराची भूमिका ही जी किबुट्झ संघाच्या नेत्यांची स्वभाववैशिष्ट्ये दिसून येतात तीही परिपक्व बुद्धीच्या राजकीय पुढाऱ्यांपेक्षा बंडखोर किशोरांनाच अधिक शोभून दिसणारी आहेत.*

तारुण्याला फार उच्च मूल्य देणे हे किबुट्झचे जे वैशिष्ट्य आहे त्याचा मानसिक उगम बहुधा संस्थापकांनी जुन्या काळी आपल्या वडील माणसांविरुद्ध केलेल्या बंडात सापडेल. या वैशिष्ट्याचा फार मोठा प्रभाव तरुण आणि वृद्ध यांच्या एकमेकांशी वागण्याच्या पद्धतींवर झालेला आहे. किर्यात येदिदिममध्ये प्रतिष्ठा आणि सत्ता ही दोन्ही वयापेक्षा कर्तृत्वावर अवलंबून असतात, त्यामुळे, शेतीशाखेतील इतर कामगार वयाने मोठे असले तरी त्या शाखेचा मुकादम तरुण असू शकतो. तरुण लोक आपल्या वडील मंडळींच्या बरोबरीने सामाजिक समानता उपभोगतात, आणि किबुट्झच्या औपचारिक किंवा अनौपचारिक व्यवस्थेमध्ये जास्त वयाच्या माणसाला केवळ

---

* पृष्ठ १५८ वरील २५ वी तळटीप पाहा.

त्याच्या वयामुळे अधिक प्रतिष्ठा मिळेल अशी शक्यता फारच कमी असते. वय किंवा स्थान याचा विचार न करता सर्वजणांना पहिल्या नावानेच संबोधले जाते. लहानांनी वडील माणसांना संबोधताना आडनावाच्या मागे " मिस्टर " किंवा " मिसेस " लावून बोलणे आणि मोठ्यांनी लहानांशी बोलताना त्यांच्या नावाने संबोधणे ही युरोप–अमेरिकेत संबोधनाची जी असमान पद्धती आहे तिच्यामुळे निरनिराळ्या वयाची माणसे अलग राहून एक सामाजिक अंतर निर्माण होते ते येथे संभवत नाही. औपचारिक सभेमध्ये असो किंवा अनौपचारिक चर्चेमध्ये असो, तरुण लोकांची मते प्रौढांच्या मताइतकीच आदराने विचारात घेतली जातात.

परंतु तारुण्यावरचा हा भर आणि तरुण व वृद्ध यांच्यात असलेली समानता यांतून एक असमानता निर्माण होण्याची शक्यता असते–ही असमानता म्हणजे तरुण लोकांना श्रेष्ठ स्थान आणि प्रौढांना कनिष्ठ स्थान मिळणे. किर्यात येदिदिममध्ये या परिस्थितीमधूनच " वृद्धांची समस्या " उत्पन्न झाली आहे. कारण सगळी माणसे जर बरोबरीची असतील आणि जर प्रतिष्ठेची कसोटी क्षमता–विशेषतः शारीरिक कष्ट करण्याची क्षमता–ही असेल तर थोड्याच काळात हे स्पष्ट होईल की सगळी माणसे बरोबरची नाहीत; कारण कोणीहि माणूस म्हातारा होत जाईल तसतशी त्याची काम करण्याची शक्ती त्याच्यापेक्षा लहान असणाऱ्यांच्या मानाने कमीच होत जाईल.

तेव्हा समानतेवर अतिरिक्त भर देण्यामुळे एका विरोधी प्रक्रियेतून असमानतेकडे गेलेली अशी ही समाजपद्धती आहे. वयगटावर आधारलेल्या औपचारिक मान्यता श्रेणींचा किबुट्झ प्रौढांमध्ये अभाव आहे ( बालपणी मात्र वयानुसार रेखीव वर्गवारी केलेली असते ). त्यामुळे प्रतिष्ठेची जी एक पोकळी निर्माण झालेली आहे ती एका अनौपचारिक वयानुसारी प्रतिष्ठा–श्रेणीमुळे भरून निघाली आहे. ही अनौपचारिक प्रतिष्ठा-श्रेणी म्हणजे आपल्या उत्पादनविषयक क्षमतेमुळे तरुणांना वयस्कर माणसांपेक्षा अधिक मान मिळतो. पण याचा परिणाम म्हणून वृद्ध सभासदांना हळहळ आपण आपल्या आर्थिक स्थानांवरून बाजूला केले जात आहोत असे आढळते, आणि परिणामतः कामातील कुशलता हा जो त्यांचा प्रतिष्ठा मिळविण्याचा सर्वांत मोठा मार्ग, तो नाहीसा होतो. मानसिक असुरक्षिततेचे हे एक महत्त्वाचे कारण आहे.

या समस्येला किबुट्झची कुटुंबरचना आणखी कारणीभूत होते. विभक्त कुटुंब असा स्वतंत्र घटक किर्यात येदिदिमच्या रचनेत अस्तित्वात नाही त्यामुळे मुले आईबापांची ताबेदार नसतात, कारण ते स्वतः आणि त्यांचे आईवडील ज्यात समाविष्ट होतील अशा गटाशी म्हणजेच कुटुंबगटाशी ती बांधलेली नसतात. त्याऐवजी त्यांचे ऐकात्म्य दोन गटांशी झालेले असते–त्यांचा समवयस्कांचा गट हा एक आणि सबंध किबुट्झ हा दुसरा. दोन " सभासद गटांशी " त्यांचे जे मानसिक तादात्म्य झालेले असते त्याचे महत्त्वाचे सामाजिक परिणाम, नंतर जेव्हा ती तरुण मुले

किबुट्झचे अधिकृत सभासद बनतात आणि किबुट्झच्या अर्थव्यवस्थेत पूर्ण वेळ काम करणारे कामगार होतात तेव्हा दिसून येतात. आपल्या समवयस्कांच्या गटाचे सभासद म्हणून हे तरुण लोक प्रौढांपासून अलग राहतात, पण संपूर्ण किबुट्झचे सभासद म्हणून मात्र ते प्रौढांशी खुली स्पर्धा करतात. ह्या स्पर्धेत जो सर्वोत्कृष्ट असतो त्याला यशस्वी होण्याची मोकळीक असते; आणि बहुधा असे घडते की तरुण माणूसच त्याच्या बलश्रेष्ठत्वामुळे सर्वोत्कृष्ट ठरतो.

ह्या अवस्थेतून वृद्ध माणसांना तीव्र असुरक्षितता अनुभवावी लागते हे पुढील दोन उदाहरणांवरून ध्यानात येईल. वयाची पर्वा न करता एक आदरणीय संस्थापिका शेतावर काम करीत असते. भयानक उन्हात काम करणे अधिकाधिक कठीण होऊ लागल्याची तक्रार कडक उन्हाच्या दिवसात तिने एकदा केली. संस्थापक तरुण होते तेव्हा उन्हाचे काही वाटत नसे पण आता म्हातारपण येत चालल्याने उन्हाळ्याच्या दिवसात काम करणे जवळजवळ अशक्यप्राय होऊ लागले आहे असे ती म्हणाली. आणि तिने अशी सूचना केली की म्हाताऱ्या माणसांसाठी डोंगरावर एक लहानसे राहण्याचे ठिकाण बांधावे म्हणजे तेथे जाऊन त्यांना विश्रांती घेता येईल, तेथे त्यांना उन्हापासून निवारा मिळेल आणि त्याचबरोबर तरुण माणसांना म्हाताऱ्यांचे ओझे वाटणार नाही. अशा तक्रारी तिने केल्या खऱ्या, पण जास्त वेळ विश्रांती घेणे किंवा दुपारच्या कडक उन्हात खोलीवर जाऊन पडणे या गोष्टी करायला ती तयार होईना. त्या दिवशी नंतर एका पुरुषाने तिला सांगितले की तिच्यासाठी कामाला अगदी योग्य अशी एक सावलीची, थोडी फार गारव्याची जागा आपल्याला सापडली आहे. “ वा, छान ! ” असे एक तरुण स्त्री उद्गारली. तिच्याकडे वळून संस्थापिका कडवटपणे म्हणाली, “ त्यांत इतकं छान काय आहे ? तू असं बोलून मला का दुखावतेस ? ”

दुसरा एक संस्थापक आहे त्याची या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टी मात्र अधिक विवेकाची व कमी भावनाविवश आहे. बिगर-शेतीच्या एका कामावरून तो निवृत्त झाला होता. शेतावर काम करायला परत जाण्याचे त्याच्या मनात होते कारण तो एका महत्त्वाच्या शेती-शाखेतला तज्ज्ञ होता. साहजिकच त्या शाखेत परत जायची त्याला इच्छा होती. मात्र, त्याला हे ठाऊक होते की, या जागेसाठी त्याला झगडावे लागेल कारण त्या शाखेतील सभासदांना “ म्हातारी ” माणसे नको होती. ( तो बावन्न वर्षांचा होता ). शारीरिक बळ असलेली तरुण माणसेच त्यांना हवी होती; आणि त्याचा या शाखेतील बत्तीस वर्षांचा अनुभव त्या लोकांच्या लेखी विशेष महत्त्वाचा नव्हता कारण त्यांच्याकडे अगोदरच एक तज्ज्ञ होता. या बाबतीत त्याला फारसे काही करण्यासारखे नव्हते कारण :

…माणसाला स्वाभिमान असतो ना !……अर्थात्, मी आणि माझ्या वयाचे इतर यांच्यासाठी किबुट्झ कुठल्या तरी शाखेत जागा शोधून काढतोच. काहीतरी कंटाळवाणं,

निम्नमहत्त्वाचं काम करायला मिळतं. ह्या समस्येचं हे अर्थशास्त्रीय उत्तर झालं पण मानवी दृष्टीनं हे उत्तर नव्हे. किबुट्झच्या बाहेर कोणत्या ना कोणत्या अधिकाराची कामं मिळवलेली जी माणसं आहेत त्यांनाच फक्त हा प्रश्न समोर येत नाही. पण मला ( आठवडाभर आपल्या कुटुंबापासून दूर राहणं ) ही किंमत द्यायची नाही.

तेव्हा किबुट्झच्या बाहेर जाऊन काम करणारांची संख्या वाढायचे, त्याचप्रमाणे किबुट्झमधील अंतर्गत ताण तीव्र व्हायचे प्रमुख कारण येथे सापडते. जी प्रौढ माणसे किबुट्झच्या बाहेर कामावर जातात त्यांना " वृद्धत्वाची समस्या " भेडसावीत नाही. ते राजकीय, बौद्धिक, सरकारी किंवा ट्रेड युनियनच्या कामकाजात भाग घेतात, त्यामुळे तरुणांशी स्पर्धा करताना ते कमी पडत नाहीत. उलट, त्यांच्या जमेचा मोठा अनुभव आणि ज्ञान यांमुळे ते उजवेच ठरतात. त्यामुळे किबुट्झच्या बाहेरचे काम हे त्यांच्या स्वाभिमानाला धक्का लावीत नाही; उलट ते स्वाभिमान वाढविणारे असते. मात्र, जे किबुट्झमध्ये राहतात आणि आपली किंमत श्रमातील कार्यक्षमतेच्या ( किबुट्झच्या ) कसोटीवर करतात त्यांना सतत स्वाभिमान कमी होत असल्याची भीती असते आणि ही भीती किबुट्झच्या वाढत्या ताणाचा एक महत्त्वाचा घटक ठरते.

याहूनही एका जास्त गंभीर समस्येला किबुट्झची समाजरचना जबाबदार आहे. ती म्हणजे " स्त्रीची समस्या ". किर्यात येदिदिममधील संकटावस्थेवरील चर्चेमध्ये या संकटावस्थेला कारण होणाऱ्या गोष्टींचे लिंगभेदानुसार विश्लेषण करण्याचा प्रयत्न केलेला नव्हता. खरी गोष्ट मात्र अशी आहे की संकटावस्थेला त्या-बायकाच प्रामुख्याने कारणीभूत आहेत. जवळजवळ सगळे राजीनामे बायकांच्या चिथावणीने दिले जातात; खाजगी संपत्ती आणि अधिक एकांत यांच्यासाठी वाढती मागणी बायकांमध्येच अधिक जोराने होते. किबुट्झमधले बहुतेक ताण बायकांमुळेच उत्पन्न झाले आहेत. त्यामुळे किर्यात येदिदिममधल्या पुष्कळ बायका आपल्या भूमिकांबाबत असमाधानी आहेत याचे आश्चर्य वाटायला नको. म्हणून, राजकारणाचा अपवाद सोडल्यास, किबुट्झमध्ये " स्त्रीच्या समस्ये " इतका लक्ष वेधून घेणारा दुसरा विषय नाही. सभासदांच्या तोंडी अखंडपणे असणारी ही शब्दसंहती ग्रामसभेच्या कितीतरी बैठकांचा विषय झालेली प्रस्तुत लेखकाला किर्यात येदिदिममधील वास्तव्यात आढळली. जर कधी-काळी किर्यात येदिदिम छिन्नभिन्न झाले तर " स्त्रीची समस्या " हा त्यातील एक महत्त्वाचा कारणीभूत घटक असेल असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही.

ज्या समाजात स्त्रीपुरुषांची समानता हे मूलभूत तत्त्व आहे आणि स्त्रीदास्य-विमोचन हे ज्याचे ध्येय आहे त्या समाजात " स्त्रीची समस्या " अस्तित्वात आहे या विधानाचे थोडेफार स्पष्टीकरण जरूर आहे. पूर्वीच्या चर्चेवरून हे ध्यानात आलेलेच आहे की ज्या युवक चळवळीमधून किबुट्झने आपली मूल्ये तयार केली ती चळवळ स्त्री-मुक्तिवादी ( फेमिनिस्ट ) होती. भांडवलशाही समाजात स्त्रीला पुरुषाची ताबेदारी पत्करावी लागते आणि ती घर आणि कुटुंब यांना जखडली जाते असा युवक चळ-

वळीची धारणा होती. ही ' स्त्रीची जीवशास्त्रीय शोकांतिका ' तिला घराची स्वच्छता' स्वयंपाक आणि इतर गृहकृत्ये यांमध्ये नोकरासारखी कामे करावयास भाग पाडते आणि पुरुषांच्या बरोबरीने शेते, कारखाने, प्रयोगशाळा आणि व्यासपीठे यांमध्ये स्थान मिळविण्यापासून वंचित करते. नव्या समाजात हे सर्व बदलणार होते. सामूहिक जीवनातील विविध संस्थांमुळे तिचे गृहकृत्यांचे ओझे हलके होणार होते आणि त्यामुळे पुरुषाच्या बरोबरीची म्हणून ती जीवितातल्या सर्व गोष्टींत भाग घेणार होती. सामूहिक जेवणघरामुळे तिचे स्वयंपाक करण्याचे ओझे नाहीसे होणार होते; सामूहिक शिशुगृहे तिची बालसंगोपनाच्या कामातून सुटका करणार होती; लहान खोल्या तिचे स्वच्छतेचे काम कमी करणार होत्या. अशा रीतीने स्त्रीची " घरगुती कामाच्या जोखडातून मुक्तता " होणार होती.

औपचारिक अर्थाने ह्या कार्यात किबुट्झ यशस्वी झाले आहे. संघाने एका अधिकृत पत्रकात अभिमानाने जाहीर केले आहे:

> आम्ही तिला समान हक्क दिले आहेत, आम्ही तिची आर्थिक जोखडातून सुटका केली आहे, मुले वाढविण्याच्या भारातून आम्ही तिला मुक्त केले आहे, आपण आपल्या नवऱ्याच्या " मालकी " च्या आहोत, तो आपला भरणपोषण करणारा आणि आपल्यावर अधिकार गाजविणारा आहे या भावनेतून तिला आम्ही मोकळे केले आहे, आम्ही तिला एक नवीन समाज दिला आहे, तिच्या हातकड्या आम्ही तोडल्या आहेत. [3]

या अनेक चांगल्या गोष्टी प्राप्त होऊनही स्त्रीला आपली मुक्ती लाभलेली नाही असे पत्रकात पुढे ध्वनित झाले आहे. कारण पत्रकाचा शेवट या वाक्याने झाला आहे, " आणि हे हात शेकडो वर्षे शृंखलांत जखडलेले होते याचे आम्हाला विस्मरण झाले. इतका दीर्घ काळ जो अवयव आपले कार्य करीत नाही तो लुळा पडतो. " हे लुळेपण, की दुसरे काही हे आपण आता विचारात घेऊ.

किबुट्झमध्ये या " विमोचना "चा अनुभव घेऊनसुद्धा, स्त्रियांच्यात अशी एक भावना—अर्थात, काहीशी अजाण आणि अव्यक्त–दिसून येते की आपले "विमोचन" झाले नसते तर अधिक बरे झाले असते. किबुट्झ सोडून गेलेल्या जवळजवळ प्रत्येक जोडप्याने स्त्री सुखी नाही म्हणून किबुट्झ सोडण्याचा निर्णय घेतलेला आहे; आणि पुष्कळशा स्त्रिया अशा आहेत की त्यांना सोडून जायची इच्छा आहे पण त्यांच्या नवऱ्यांमुळे त्यांना राहणे भाग पडते आहे. एका संस्थापिकेला किर्यात येदिदिममधून बाहेर पडायचे फार मनात आहे पण ती तसे करीत नाही याचे कारण आपला नवरा दुसरीकडे कोठेही सुखी होणार नाही हे तिला माहीत आहे. दुसरी एक संस्थापिका बरेचदा सांगते की आपल्याला गृहिणी होण्याची इच्छा आहे, आणि आपले स्वतःचे घर व स्वयंपाकघर असावे असे आपल्याला वाटते. एका तत्त्वचिंतक स्त्रीनेही अशी

---

३. पूर्वोक्त Veteran Settler ने दिलेले अवतरण

कबुली दिली की कष्टाचे काम केल्यानंतर आपले स्वतःचे घर असते, आपण आपल्या मुलांची काळजी घेत असतो आणि आपलाच स्वयंपाक करीत असतो तर आयुष्य कितीतरी सुखाचे झाले असते असे आपल्यालासुद्धा कधीकधी वाटल्यावाचून राहात नाही. शेवटचे उदाहरण : "स्त्रीजातीच्या समस्ये'वर विचार करण्यासाठी घेतलेल्या एका ग्रामसभेत किबुट्झ नेत्याची पत्नी व किबुट्झमधील एक अतिशय आदरणीय स्त्री जाहीरपणे म्हणाली, "मुळात वाटले होते त्या मानाने किबुट्झमधल्या स्त्रियांना फार काही मिळालेले नाही. माझ्या स्वतःपुरते बोलायचे तर कियीत येदिदिममध्ये तीस वर्षे राहूनही शेवटी आपले आयुष्य निष्फळच ठरले असे मला म्हणावेसे वाटते."

हे शब्द फार कडक आहेत. मनोधैर्य इतके खालावण्याचे कारण काय? एक तर, पुष्कळ स्त्रिया सांगतात की किबुट्झमधले जीवन त्यांना शारीरिकदृष्ट्या अतिशय कष्टाचे वाटते. अडचणींची भौगोलिक परिस्थिती, साध्या साध्या सोयींचा अभाव, अस्वच्छाई, नेहमी प्रतिकूल वातावरणात पुष्कळ वेळ काम, निकृष्ट दर्जाच्या आरोग्य-सुविधा, सार्वजनिक ठिकाणची गर्दी आणि गोंगाट या सर्वांमुळे जीवन जास्तजास्तच बिकट बनले आहे. त्याचा परिणाम म्हणून पुष्कळ स्त्रिया शरीराने थकून गेल्या आहेत. पण हे उत्तर कितीही बरोबर असले तरी ते सर्वच उत्तर नव्हे. पूर्वीपेक्षा भौगोलिक परिस्थिती आज कितीतरी सुधारली आहे आणि गंमत अशी की पूर्वी आजच्यासारख्या तक्रारी नसत; स्त्रिया आता पूर्वीपेक्षा वयस्कर झाल्यामुळे त्यांना ही स्थिती जास्त कठीण वाटते हे उत्तरही पुरेसे नाही, कारण तरुण मुलींचे मनोधैर्य नेहमीच म्हाताऱ्या बायकांपेक्षा उच्च दर्जाचे असते असे नाही. मात्र, या संदर्भात लक्षात घ्यायला पाहिजे की तरुण स्त्रियांना ही परिस्थिती विशेष कठीण वाटते असे नाही.

स्त्रियांच्या निकृष्ट मनोधैर्याचे दुसरे कारण म्हणजे पुष्कळ स्त्रिया आपल्या आर्थिक भूमिकेबाबत असंतुष्ट आहेत. संघाचे म्हणणे–आणि ते थोडे समर्थनीयही आहे—असे की स्त्रीचा आर्थिक प्रश्न सुटला म्हणजे तिचे असमाधान नष्ट होईल. स्त्रीने "किबुट्झच्या अर्थव्यवस्थेत मूळ धरले पाहिजे" असे अलीकडच्या एका सभेने पुकारले आहे. "फक्त यामुळेच तिची किबुट्झमधली संपूर्ण भागीदारीची व नागरिकत्वाची भावना पुन्हा प्रस्थापित होईल."[४]

स्त्रीपुरुषांच्या आर्थिक समानतेवर भर देऊनही स्त्रिया किबुट्झच्या आर्थिक जीवनात "मूळ धरू" शकल्या नाहीत हे कसे! संस्थापकांनी जेव्हा प्रथम वसाहत केली त्या काळी श्रमांची स्त्रीपुरुष भेदावर विभागणी नव्हती हे पूर्वी सांगितले आहेच. स्त्रिया पुरुषांप्रमाणेच शेतावर कामे करीत, ट्रॅक्टर चालवीत; पुरुष स्त्रियांप्रमाणे स्वयंपाकघरात आणि धुलाईकेंद्रात कामे करीत. पुरुष आणि स्त्रिया समान आहेत

४. तत्रैव

आणि आपापली कामे सारख्याच चांगल्या प्रकारे करू शकतील असे गृहीत धरले जात होते. पण पुरुष आणि स्त्रिया समान नाहीत हे लवकरच दिसून आले. जीवशास्त्रीय कारणांमुळे स्त्रियांना काही शारीरिक कामे पुरुषांच्या इतक्या समर्थपणे पार पाडता येईनात; ट्रॅक्टर चालविणे, पिकांची कापणी आणि इतर अतिश्रमाची कामे स्त्रियांच्याने होईनात. शिवाय, कधीकधी आपल्याला शक्य असलेल्या शारीरिक श्रमाच्या कामामधूनही तात्पुरती रजा घेणे त्यांना भाग पडे. उदाहरणार्थ, गरोदर स्त्री भाजीपाल्याच्या बागेतसुद्धा फार काळ काम करू शकत नसे, आणि तान्ह्या मुलाच्या आईला अर्भकालयाच्या जवळपासचेच काम पत्करावे लागे कारण मुलाला पाजण्याच्या वेळा सांभाळाव्या लागत. त्यामुळे, किबुट्झ जुने होऊ लागले आणि त्यातले जन्मप्रमाण वाढू लागले तसतसे अधिकाधिक स्त्रियांना अर्थव्यवस्थेच्या "उत्पादक" शाखांमधले काम सोडणे भाग पडले आणि "सेवा" शाखांमध्ये प्रवेश करावा लागला. परंतु त्यांनी सोडलेल्या "उत्पादक" शाखांमधल्या जागा भरणे जरूर होते आणि त्या पुरुषांनी भरल्या. यांचा परिणाम म्हणजे ज्या कामातून स्त्रीची मुक्तता झाली असे समजण्यात येत होते त्याच कामांमध्ये म्हणजे स्वयंपाक, धुलाई, सफाई, शिकविणे, बालसंगोपन इत्यादींमध्ये आपण पुन्हा अडकलो आहो असे स्त्रियांना कळून चुकले. सारांश, त्या गृहकृत्यांच्या जबाबदारीच्या "जोखडा"तून सुटलेल्या नाहीत. पुढील तक्ता हेच दर्शवितो.

### किर्यात येडिदिममधील स्त्रियांचे कामाप्रमाणे वर्गीकरण १९५१

| कामाची शाखा | कायम नेमणुकांची संख्या |
|---|---|
| शिक्षण | ३५ |
| युवक नेतृत्व | २ |
| दवाखाना | २ |
| कचेरी | २ |
| धुलाई केंद्र आणि कपडे भांडार | ११ |
| प्रशाळेचे स्वयंपाकघर | १ |
| कुक्कुटपालन | ५ |
| भाजीपाल्याची बाग | ४ |
| परिसरशोभा | २ |
| फळबागा | २ |
| दुग्धपालन | १ |
| एकूण, कायम नेमणुका | ६७ |
| अनियमित नेमणुका | ४६ |
| एकूण | ११३ |

या आकडेवारीवर नजर टाकली तर एक महत्त्वाची गोष्ट अशी दिसून येते की ११३ कामगार स्त्रियांपैकी फक्त १४ म्हणजे १२ टक्के स्त्रिया कोणत्यातरी शेती-शाखेत कायमच्या कामाला आहेत आणि प्रचंड बहुसंख्या, ८८ टक्के, ही सेवा शाखेत काम करणारींची आहे. या आकड्यांचा अर्थ नीट ध्यानात घेतला तर स्त्रियांच्या असंतुष्टतेचे कारण समजू शकते. पहिले कारण म्हणजे जरी अतिश्रमाच्या शेतीच्या कामाकडे परतण्याची बहुतेक स्त्रियांना इच्छा नसते आणि बव्हंशी " स्त्रियांची कामे " म्हणून परंपरागत ठरलेल्या कामातच त्या गुंतलेल्या असतात ( ह्या विधानाला काही अपवाद आहेत त्यांचा उल्लेख पुढे येईलच ) तरी युवक चळवळीची सुरुवातीची मूल्ये अद्यापही बऱ्याच प्रमाणात आपला प्रभाव राखून आहेत; व ही " हलकी " कामे करावी लागल्यामुळे स्त्रियांमध्ये एक प्रकारची न्यूनगंडाची भावना वाढत जाते. ही भावना तीव्रतर होण्याचे कारण असे की ज्या शाखांमधून सर्वांत जास्त आर्थिक लाभ होतो त्या शाखांना किबुट्झ सर्वांत जास्त महत्त्व देतो आणि ज्या " सेवा " शाखांमध्ये स्त्रिया केंद्रित केल्या गेल्या आहेत त्या शाखांतून आर्थिक लाभ असा कोणताच नसतो, उलट किबुट्झचा बहुतेक खर्च याच शाखांवर होतो. ह्या दोन कारणां-मुळे आपण दुसऱ्या वर्गाच्या नागरिक आहोत असे त्यांचे त्यांनाच वाटत राहते.

दुसरे, या " सेवा " खात्यांची पुष्कळ कामे कंटाळवाणी असतात व कामाच्या सोयी निकृष्ट असतात त्यामुळे त्यातल्या कामगारांना कामामधून मिळायचे असे जे समाधान ते फारच कमी लाभते आणि कधीकधी तर कामाचा तिटकारा वाटतो. हे विशेषत्वाने प्रत्ययाला येत असेल तर ते स्वयंपाकघरातील कामाबाबत. हे काम इतके कठीण असते की कोणतीही स्त्री ते नियमित नेमणूक म्हणून पत्करायला तयार होत नाही. त्यामुळे ते पाळीपाळीनेच करणे भाग पडते. स्वयंपाकघरातील कामाची पाळी बहुधा एक किंवा दोन वर्षांची असते. तरीही ह्या मुदतीला त्या गुलामगिरीचा काळ मानतात. त्या अस्वस्थ होतात, चिडचिड्या बनतात आणि त्यांच्याशी कसे वागावे हे कुणालाच कळत नाही. एक स्त्री म्हणाली की स्वयंपाकघराची परिस्थिती सुधारली नाही तर स्त्रियांमध्ये स्फोट होईल, " पुरुषांना जागे करण्याचा एवढा एकच उपाय आहे. " अर्थात् " स्फोट " म्हणताना " मोठा स्फोट " असा तिच्या म्हणण्याचा रोख होता कारण लहानसहान स्फोट पुष्कळच होत असतात. उदाहरणार्थ, एका दुपारी स्वयंपाकघरातील ताण असह्य होऊन एक स्त्री ओक्साबोक्शी रडत धावत सुटली. ती नंतर दोन तास न्हाणीघरात सारखी रडतच बसली होती.

पण फक्त स्वयंपाकघरातच कामाच्या अशा गैरसोयी आहेत असे नव्हे. एका बालगृहात अगदी अलीकडेपर्यंत नळाचे पाणी नसल्यामुळे स्नानगृहाच्या सोयी नव्हत्या. त्यामुळे परिचारिकांना पाणी लागेल त्या प्रत्येक वेळी जिना उतरून खाली यायचे व भरलेली भांडी हातात घेऊन वर जायचे असे वरखाली हेलपाटे पडत. दुसऱ्या एका

नव्यानेच बांधलेल्या बालगृहात चुकून खेळासाठी क्रीडांगणाचीच सोय करायची राहून गेली होती. यामुळे मुलांना कधीही एकटे सोडणे तेथल्या परिचारिकेला शक्य नव्हते व तिचे काम अतिशय अवघड बनले होते. क्रीडांगण तयार करू असे आश्वासन तिला दिले गेले होते पण त्याची व्यवस्था होईपर्यंत कितीतरी महिने तिला थांबावे लागले. आणखी एक उदाहरण म्हणजे अर्भकालयात गरम पाण्याची सोय प्रस्तुत लेखकाच्या वास्तव्यापूर्वी तीन वर्षेपर्यंत नव्हती. त्यामुळे परिचारिकांना मुलांच्या आंघोळीसाठी स्वयंपाकघरातून गरम पाणी उचलून न्यावे लागे. अर्भकालयापासून स्वयंपाकघरापर्यंतचे अंतर म्हणजे शहरातल्या निदान दोन चौकांमधले तरी असेल.

अर्थात् या तांत्रिक उणीवा सुधारणे शक्य होते आणि तसे झाले असते तर स्त्रियांची स्थिती पुष्कळच सुधारता आली असती. पण या बाबतीत किर्यात येदिदिमची हालचाल मंद असण्याची निदान दोन कारणे आहेत. पहिले म्हणजे, वर सांगितल्या-प्रमाणे सेवा शाखा किबुट्झला उत्पन्न मिळवून देत नाहीत आणि जेव्हा नवीन ट्रॅक्टर की बशा धुण्याचे यंत्र, दूध काढण्याचे नवे यंत्र की अर्भकालयातला नळ, असे प्रश्न उभे राहतात तेव्हा पुरुषांना वाटते की " आर्थिक " गरजांना " सेवे"च्या गरजांपेक्षा अग्रमान मिळाला पाहिजे. स्त्रियांचे मानसिक स्वास्थ्य फार महत्त्वाचे आहे हे पुरुषांना कबूल आहे, परंतु किबुट्झ आर्थिक सुस्थितीत येईपर्यंत कोणत्याही प्रकारच्या स्वास्थ्याचा विचार करता येत नाही असे त्यांना वाटते. म्हणून शेतीशाखेच्या गरजा प्रथम भागविल्या पाहिजेत. शिवाय, या बाबतीत स्त्रिया एका दुष्ट चक्रात सापडलेल्या आहेत. खरेदी आणि भांडवल गुंतवणूक या बाबतचे निर्णय नेहमी आर्थिक समिती घेते. परंतु शेतीशाखेत थोड्याचजणी कामाला असल्याने आर्थिक समितीवर स्त्रियांचे प्रतिनिधी क्वचितच असतात. म्हणून त्यांच्या शाखेच्या तांत्रिक गरजा समितीपुढे मांडायला त्यांचा कोणीच पाठीराखा नसतो. अर्थात् त्यांना आपल्या समस्या ग्राम-सभेपुढे आणणे शक्य असते, पण त्या तसे क्वचितच करतात. ज्या समाजात " उत्पादक " कामावर महत्त्वाचा भर देण्यात येतो त्यात गरम पाणी, स्नानगृहाच्या सोयी, किंवा नवा रेफ्रिजरेटर असल्या गोष्टी "क्षुल्लक" भासतात, त्याबाबत बोलायला कोणी तयार नसते.

स्त्रियांचा कामाबद्दल असंतोष असण्याचे दुसरे एक कारण तक्त्यावरून दिसून येते. तक्त्याप्रमाणे शेहेचाळीस–४६ टक्के–स्त्रियांना नियमित नेमणूक नाही. याचा अर्थ जवळजवळ निम्म्या स्त्रियांना आपल्या कुवतीला किंवा आवडीला जुळतील अशी कामे मिळत नाहीत; नेमणूक समितीचा अध्यक्ष नेमून देईल ती कामे त्यांना करावी लागतात. ही कामे म्हणजे स्वयंपाकघरातील काम, संडास-स्नानगृहे स्वच्छ करणे, परिचारिकांना आणि बालमंदिरातील शिक्षकांना मदत करणे, इस्त्री करणे, आणि धुलाईकेंद्रातील कपड्यांची वर्गवारी लावणे. ह्या अनियमित कामगारांना एका कामावरून

दुसरीकडे असे एकसारखे बदलले जाते, ज्या शाखेत अधिक कामगाराची जरूरी असेल तेथे जावे लागते. ज्यांना कायम स्वरूपाचे काम नेमून दिलेले नसते व ज्यांचे काम अवघड व कंटाळवाणे असे दोन्ही असते अशा ह्या स्त्रियांचा गट म्हणजे किबुट्झच्या भवितव्याला सर्वात मोठा धोका आहे. अशा अनियमित स्त्रीकामगारांच्या अतिरिक्त प्रमाणावर भाष्य करताना काम-वाटप समितीची सहाध्यक्षा असे लिहिते की याचा परिणाम म्हणून पुष्कळशा स्त्रियांना " आपल्या कामातून जरासुद्धा समाधान लाभत नाही व याचे सामाजिक परिणाम अनिष्ट होतात. "[५]

जरी सगळ्या स्त्रियांना नियमित काम नेमून दिले गेले असते आणि त्यांच्या कामाच्या सोयी सुधारलेल्या असल्या तरीही त्यांचे कामातील असमाधान राहिले असतेच. कारण " स्त्रियांची घरगुती कामाच्या जोखडातून मुक्तता " या गोष्टीचा एक विरोधाभासात्मक परिणाम झाला आहे. किबुट्झच्या समाजरचनेमुळे सामान्य गृहिणीच्या कितीतरी कामातून स्त्रीला सुटका मिळाली आहे हे खरे आहे. परंतु तक्ता पाहिला तर असे दिसते की पारंपरिक घरकामाच्या जागी तिच्या वाट्याला बदल म्हणून जे आले आहे ते म्हणजे जास्तच घरकाम. कियॉत येदिदिमबाहेरची स्त्री स्वयंपाक, शिवण, रोट्या भाजणे, सफाई, धुलाई, बालसंगोपन ह्या सर्व गोष्टी करते तर कियॉत येदिदिममधली स्त्री स्वयंपाक करते *किंवा* शिवण करते *किंवा* धुलाई करते *किंवा* मुलांची दिवसाचे आठ तास काळजी घेते. घरकामाच्या *एकाच* विषयात ती अडकून राहाते.. पण रूढ स्वरूपाच्या घरकामापेक्षा हे नवे घरकाम अधिक कंटाळवाणे आणि कमी आल्हाददायी आहे. कारण नेहमीच्या घरकामात निदान वैविध्य तरी असते. शिवाय रूढ स्वरूपाच्या घरकामात उपक्रमशीलता आणि निर्मिती यांना काही वाव असतो. परंतु किबुट्झच्या पद्धतीत घरकामाचे विशेषीकरण झालेले असल्यामुळे स्त्रीला सबंध दिवसभर तेच ते काम करीत राहावे लागते आणि पुष्कळदा त्याच्या ठराविकपणामुळे कुशलता किंवा स्वयंकर्तृत्व यांना थोडाही वाव नसतो. अशा रीतीने कमी प्रतिष्ठा, कामाच्या सोयींचा अभाव, आणि तोचतोचपणा या सर्व गोष्टी कामात एकवटल्यामुळे बहुतेक स्त्रियांना आपल्या आर्थिक उद्योगात फारसे सुख मिळत नाही यात नवल नाही.

ज्या स्त्रियांना आवडीचे काम मिळालेले असते त्यांनासुद्धा असुरक्षितता वाटते. उदाहरणार्थ, किबुट्झच्या शेतीशाखेत काम करणाऱ्या स्त्रियांना आपण पुरुषांच्या इतक्याच कार्यक्षम आणि समर्थ आहोत हे " सिद्ध " करण्याची सतत गरज भासते. जवळजवळ एक वर्षभर स्त्रिया आणि पुरुष यांच्यासमवेत शेतात काम करताना प्रस्तुत लेखकाला असे दिसून आले की बायका काम संपायची वेळ टळून गेल्यावर

५. कियॉत येदिदिसच्या [illegible]४ ऑगस्ट १९[illegible] च्या साप्ताहिक वर्तमानपत्रातील एक लेख.

सुद्धा शेतात राहून पुरुषांपेक्षा जास्त काळ काम करतात; पुरुषांच्यापेक्षा थोड्या व छोट्या सुट्या मध्ये घेतात; न्याहारीला किंवा जेवणाला कमी वेळ घेतात; आणि एकूणच पुरुषापेक्षा अधिक वेगाने काम करतात. उलट पुरुष मात्र आरामशीरपणे काम करतात. अशा रीतीने, ज्या स्त्रियांना आर्थिक " मुक्तता " प्राप्त झालेली आहे त्या अद्यापही मानसिकदृष्ट्या " मुक्त " झालेल्या आहेत असे म्हणता येत नाही.

ज्यांना आपले " सेवा " शाखेतले काम आवडते अशा स्त्रिया म्हणजे शिक्षण शाखेतल्या जवळजवळ सर्वजणी; तरीही त्यांनासुद्धा आपल्या कामात असुरक्षितता तीन कारणांनी वाटते. एक, सामूहिक शिक्षणाची पद्धत " योग्य " आहे याबद्दलच काही परिचारिकांच्या मनाची खरी खात्री पटलेली नाही आणि त्यामुळे त्यांना आपल्या स्वतःच्या कामाची इष्टता व उपयुक्तता याबद्दल शंका असते. आम्ही निरनिराळ्या मुलांच्या गटांचा अभ्यास करीत असताना परिचारिकांनी आमची मते अजमाविण्यासाठी आम्हाला जे प्रश्न विचारले त्या बहुतेकात त्यांच्या स्वतःच्या शंका आणि प्रश्न लपलेले होते. ही पद्धत खरोखरच चांगली आहे असे तुम्हाला वाटते का ? मुले नॉर्मल आहेत का ? त्यांची वागणूक फार आक्रमक आहे का ? रात्री अंथरूण ओले करण्याचे प्रमाण फार आहे काय ? मुलांच्यात सुरक्षितपणाची भावना दिसून येते की नाही ? – असेच आणखी कित्येक प्रश्न त्या विचारतात व त्यावरून असे वाटते की ते त्यांच्या मनात घर करून राहिलेले आहेत. दुसरे म्हणजे मुलांच्या प्रेमाबद्दल त्यांना खात्री वाटत नाही. आपल्या स्वतःच्या मुलांचे संगोपन करण्याचे काम त्यांच्याकडून काढून घेतलेले असल्यामुळे आपल्या ताब्यातील मुलांनी आपल्यावर प्रेम करावे अशी त्यांना फार गरज वाटते. शिवाय मुलांचे प्रेम ही गोष्ट अशी आहे की जिच्यामुळे आपले काम उत्तम होत आहे याची त्यांना पावती मिळते. पण मुले आपल्यावर प्रेम करीत आहेत याची त्यांना कधीही खात्री वाटत नाही. त्यामुळे पुष्कळजणी आपण आपल्या ताब्यातील मुलांच्या बाबतीत इतर परिचारिकांपेक्षा किती जास्त यश मिळविले आहे; किंवा मुले आपल्या आईबापांपेक्षासुद्धा आपल्यावर कसे अधिक प्रेम करतात; किंवा आपल्यापासून दूर असताना त्यांना आपली किती आठवण येते इत्यादी गोष्टी आग्रहाने सांगतात. शेवटी, मुलांच्या आईबापांशी वागण्यातही परिचारिकांची असुरक्षितता दिसून येते. मुलांच्या आईबापांच्या मतांना त्या फार जपतात—इतक्या की एखादे शैक्षणिक तंत्र एखाद्या परिचारिकेला मानसशास्त्राच्या दृष्टीने अतिशय निर्दोष वाटत असले तरी जर ते आईबापांना पसंत नसेल तर ती ते सोडून देईल. उदाहरणार्थ, एका परिचारिकेने शिशुशिक्षण तंत्राचा पुष्कळ अभ्यास करून काही विशेष ज्ञान मिळविले आणि नव्याने शिकलेल्या या सिद्धान्तांचा आपल्या गटातील मुलांच्यावर प्रयोग करण्याचे ठरविले. जेव्हा मुलांना खायची इच्छा नसेल तेव्हा त्यांच्यावर दबाव आणून त्यांना खायला लावण्याऐवजी त्यांचे उरलेले अन्न ती स्वयंपाकघरात पाठवीत असे. लवकरच सगळीकडे " ती बाई मुलांना आवडत नाही, कारण मुले

खाणं खात नाहीत " असा बभ्रा झाला. या टीकेमुळे ती अतिशय बेचैन झाली आणि आग्रह करून मुलांना खायला घालण्याचे पूर्वीचेच तंत्र तिने पुन्हा चालू केले.[६]

आठ किंवा सोळा मुलांना वाढविणे ही केवढी मोठी जबाबदारी आहे याची जाणीव परिचारिकांना असते आणि अनेकदा आपण ही जबाबदारी नीट पार पाडीत आहोत की नाही अशी त्यांना भीती वाटत असते. जर आपण चुकत आहो किंवा आईबापांना आपले काम पसंत पडत नाही असे परिचारिकेला वाटले तर आपल्या कामाचा राजीनामा देण्यावाचून तिला गत्यंतर नसते. या अभ्यासाच्या काळात तीन परिचारिकांनी ह्या कारणास्तव आपल्या कामाचे राजीनामे दिले.

आर्थिक भूमिकेच्या जोडीनेच दुसऱ्या दोन भूमिकांबाबतही स्त्रीला वैफल्याची आणि असुरक्षितपणाची भावना त्रास देते–मातृत्वाची भूमिका आणि लैंगिक भूमिका. पुष्कळशा मातांनी सामूहिक शिक्षणपद्धतीशी आणि त्यातूनच उद्भवणाऱ्या मुलांच्या ताटातुटीशी अजूनही जुळवून घेतलेले नाही असे म्हणणे आश्चर्याचे होणार नाही. किबुट्झच्या शैक्षणिक नेत्यांनाही याची जाणीव आहे. आपल्या मुलांपासून आपली ताटातूट होणे हा बऱ्याच मातांना अतिशय वैफल्याचा अनुभव वाटतो कारण त्यामुळे स्त्री म्हणून आपला आणखी एक विशेषाधिकार गमावल्यासारखे त्यांना वाटते. रात्र मुलांवाचून काढणे आणि सकाळी उठल्याबरोबर प्रथम ती दृष्टीस पडण्याची इच्छा तृप्त न होणे या गोष्टी तर सहन करायला विशेषच जड जातात. मुलांना आई-वडिलांनी स्वतः झोपविण्यास मनाई करणाऱ्या किबुट्झच्या धोरणाबद्दल चळवळीत काम करणारी आणि स्त्री मुक्तीवादी अशी एक मातासुद्धा तक्रार करीत होती.

किबुट्झमधले जीवन कठीण आहे या म्हणण्याचा प्रत्यय यायला आम्हाला ज्या प्रकारची स्नानगृहे व शौचकूप वापरावे लागतात ती पुरेशी आहेत. पण त्याच्या जोडीला गोंगाट व गर्दीचे जेवणघर, दिवसभराचे काबाडकष्ट, आणि चांगल्या करमणुकीचा अभाव या गोष्टीही आहेत. आम्हाला खरे म्हणजे फारसे काही मिळत तर नाहीच. पण नुसत्या पुस्तकांसाठीसुद्धा आम्हाला रांगेत उभे राहावे लागते. आमचे म्हणून जे काही आमच्यापाशी राहिले पाहिजे ते म्हणजे आमची मुले पण तीसुद्धा आम्हाला मिळत नाहीत कारण ती शिशुगृहात असतात. आणि आता तर त्यांनी हशाकावा ( मुलांना झोपवण्याचे काम ) सुद्धा आमच्याकडून काढून घेतले आहे. का ? तर " तज्ज्ञ " म्हणतात की मुलांना झोपवताना आईबाप त्यांना बिघडवतात. हे खरेही असेल. पण नेहमीच मुलांच्या बाजूने विचार करून कसे चालेल ? आईबापांचाही विचार कधी कधी करायला नको का ?

---

६. एका व्यक्तीवर गट केवढे मोठे दडपण नकळत आणू शकतो याचे व किबुट्झच्या सनातनीपणाचे व परिवर्तनविरोधाचे या उदाहरणावरून प्रत्यंतर येते. लेखकाच्या अभ्यासापूर्वी कितीतरी वर्षे अगोदर ही घटना घडलेली आहे हे मात्र लक्षात घेतले पाहिजे. आता मुलांनी सगळे अन्न खाल्लेच पाहिजे असा दबाव नसतो.

आपली मुले सकाळी जागी होतात तेव्हा त्यांना सर्वात अगोदर आपण दिसत नाही ही गोष्ट पुष्कळ आयांना तितकीच वैफल्याची वाटते आणि पुष्कळजणींना आपल्याऐवजी मुलांच्या परिचारिकेच्या वाट्याला हे सुख यावे याचा रागही येतो. एक आई तर म्हणाली की आपण "काहीही सोसायला तयार आहोत" पण एवढी एक सवलत मिळाली पाहिजे. ही आई म्हणजे किबुट्झमधली एक विचारवंत आहे व तिने या प्रश्नाला एक उत्तर शोधून काढले आहे. जर अशी एखादी पद्धत शोधून काढता आली की जिच्यामुळे प्रत्येक आईला वर्षातून काही दिवस आपल्या मुलांबरोबर राहायला मिळेल--मग सबंध दिवस आयांनी मुलांच्या सहवासात घालवायचा, त्यांना झोपवायचे, आणि उठल्याबरोबर सकाळी त्यांना 'सुप्रभात' करायचे--तर हे वैफल्य अगदी नाहीसे झाले नाही तरी पुष्कळसे कमी होईल, असे तिला वाटते. या वैफल्याची तीव्रता किती जाणवते याचे एक उदाहरण म्हणजे एका संस्थापिकेचा मुलगा व सून सुट्टीवर गेले असता नातवाला सांभाळण्याची जबाबदारी तिला घ्यावी लागली. त्यावेळी तिच्या नातवाच्या गटातील सर्व मुले नेमकी आजारी पडल्याने नातवाला तिच्या खोलीत झोपणे भाग पडले. तेव्हा हा एकमेव अनुभव तिला कसा काय वाटला असे विचारता तिने उत्तर दिले की, "सबंध रात्र मला झोप आली नाही; सकाळी उठताक्षणी नातू आपल्याजवळ आहे हे बघून आपल्याला केवढे आनंदाश्चर्य वाटेल याची नुसती कल्पना करण्यात मी रात्रभर जागी होते". खोलवर रुजलेल्या मातृत्वाच्या भावनांचे वैफल्य हेही आणखी एक कारण "स्त्रीजातीच्या समस्यां"चे[७] आहे.

शेवटी, स्त्रियांना आणि विशेषतः मध्यमवयीन स्त्रियांना त्यांच्या लैंगिक भूमिके-बाबत वाटणाऱ्या धास्तीचा उल्लेख केला पाहिजे. हवामान आणि अतिशय शरीरश्रम यांमुळे मध्यमवर्गातील शहरी अमेरिकन स्त्रीपेक्षा किबुट्झमधल्या स्त्रिया अधिक लवकर वयस्क होतात. स्त्रियांना हे वयस्क होणे फार तीव्रतेने जाणवते. स्त्रियांना आपण आपले लैंगिक आकर्षण गमावत आहो ही घटना कोणत्याही पाश्चात्त्य समाजा-तल्या स्त्रियांप्रमाणेच अत्यंत धोक्याची वाटते. पण किबुट्झमध्ये ती विशेषच धोक्याची आहे, कारण येथे विवाहबंधन हे फक्त प्रेमावरच आधारित असते. आपल्या ( पाश्चात्त्य ) समाजात प्रेम संपल्यानंतर विवाह टिकवून धरायला जे इतर भिन्न घटक कारणीभूत होतात तसे येथे नसल्याने जोडी चालू ठेवलीच पाहिजे असे नाही. सुंदर आणि अद्यापीही आकर्षक दिसणाऱ्या मध्यमवयीन स्त्रियाही निरनिराळ्या मार्गांनी आणि निरनिराळ्या प्रसंगी आपले वय झाल्याचा व सौंदर्य मावळल्याचा उल्लेख करताना

---

७. निदान ज्या माता क्रियात येदिदिममध्ये जन्मलेल्या आणि/किंवा वाढलेल्या नाहीत म्हणजे ज्या स्वतः सामुदायिक शिक्षणपद्धतीतून तयार झालेल्या नाहीत त्यांच्याबद्दलचे हे विधान आहे. कारण बहुसंख्य साब्रा माता अशा वैफल्याच्या भावनात सहभागी नाहीत याचा पुरावा मिळतो.

आढळतात. एका संध्याकाळी जेवणघरात लेखक एका अतिशय आकर्षक आणि तरुण दिसणाऱ्या मध्यमवयीन स्त्रीच्या शेजारी बसला होता व लेखकाची पत्नी त्या स्त्रीच्या नवऱ्याशेजारी बसली होती. तेथे आलेली आणखी एक स्त्री विनोदाने म्हणाली की आम्ही सर्वांनी छान अदलाबदल केली आहे. लेखक सहमत झाला पण त्याच्या बरोबरची स्त्री म्हणाली, चांगली अदलाबदल झाली खरी पण लेखकाशिवाय सर्वांना ! आपल्या नवऱ्याला तरुण स्त्री मिळाली; लेखकाच्या पत्नीला प्रौढ पुरुष मिळाला; आपल्याला तरुण पुरुष मिळाला; पण लेखकाला मात्र " एका म्हातारीबरोबर अडकून पडावं लागलं ! "

वयस्कर स्त्रियांना कपड्यांत नव्याने रस वाटायला लागलेला आहे याचेही कारण बहुधा ही असुरक्षितताच असावी. पूर्वी स्त्रियांना अर्ध्या विजारी, मोठ्या विजारी किंवा झगे व ब्लाऊझ असे कपडे घालणे पुरेसे वाटत असे. खरे म्हणजे त्याबद्दल त्यांचा आग्रह असे. आज मात्र त्यांचा चांगल्या पोशाखाबाबत आग्रह आहे. स्त्रियांचे कपडेभांडार व शिवणाची खोली हे किबुट्झमधल्या मुख्य ताणावांच्या जागांपैकी एक झाले आहे, कारण कपड्यांचा वाटा–संख्येच्या दृष्टीने व प्रतीच्या दृष्टीनेही–योग्य न मिळाल्याच्या तक्रारी स्त्रिया करीत असतात. शिवाय, स्त्रियांना वर्षाकाठी एकच चांगला पोशाख मिळतो त्यामुळे ज्या स्त्रिया भारी व फॅशनचे कपडे घालून मिरवतात, किंवा ज्यांच्यापाशी विविध आणि अनेक कपड्यांचा साठा असतो त्यांचा त्यांना राग येतो. उदाहरणार्थ, एक अमेरिकन पाहुणी दर संध्याकाळी वेगळा पोशाख घालायची. याबद्दल तिच्यावर टीकेचा भडिमार व्हायचा, कारण सर्वसामान्य सदस्येला फक्त दोन किंवा तीन कपड्यांचे बदल करता येत असत. तरुण दिसण्याच्या इच्छेपायी काही स्त्रिया पिकलेले केस लपविण्यासाठी कलप लावतात. काहीजणींना तर सौंदर्यप्रसाधने वापरावी असे सुचविले आहे. तीस वर्षांपूर्वी अशी सूचना कुणाच्या ऐकिवातही नव्हती.

आतापर्यंतच्या चर्चेला पार्श्वभूमी म्हणून शेवटी असे सांगितले पाहिजे की एकूण विचार करता पुरुषांइतकी राजकीय जागरूकता किंवा बौद्धिक व्यवधाने स्त्रियांना नाहीत. अर्थात् स्त्रियांमध्ये बुद्धिमंत स्त्रियाही नक्की आहेत आणि काहीजणी राजकीय-दृष्ट्या अत्यंत जागरूकही आहेत. पण अशा फार थोड्या आणि त्या बहुतकरून '**व्हातिकॉत**' – किबुट्झच्या पहिल्या रहिवासी– आहेत. बहुसंख्य स्त्रियांचे वैफल्य व्यापक बौद्धिक किंवा राजकीय कारणांतून निर्माण झालेले नाही, किंवा बौद्धिक आणि राजकीय व्यवहारात त्यांना विरंगुळाही लाभत नाही. फुरसतीचा वेळ घालवायला त्यांना फक्त गप्पा आणि मुले याच दोन गोष्टी उरतात आणि दोन्हीतून त्यांचे वैफल्यच फक्त वाढते; मुले त्यांच्याजवळ फारच थोडा वेळ असतात म्हणून, आणि गप्पांमुळे आधीचीच टीकाखोर वृत्ती अधिक जोरदार बनते म्हणून.

ह्या सर्व घटकांतून " स्त्रीजातीची समस्या " निर्माण झाली आहे आणि किबुट्झ-मधल्या संकटावस्थेला, निदान तीतील जबाबदारीच्या जागा स्वीकारण्याबद्दलची नाखुषी, सामूहिक अनुभवातून खाजगी अनुभवाकडे कल, खाजगी मालमत्तेची वाढ आणि गटामधले वाढते तणाव या घटकांना, ही समस्या फार जबाबदार आहे. स्त्रियांना आपल्या भूमिकांत असमाधान असल्याने त्यांना सामाजिक जबाबदारी घेण्याची मुळीच इच्छा नाही; परिणामतः त्यांना आपले सुख खाजगी जीवनात शोधावे लागते. त्यामुळे नवऱ्यांनी ह्या ( सामाजिक ) गोष्टींत वेळ घालवावा हेही त्यांना खपत नाही. आपल्या लैंगिक भूमिकांबाबत त्यांना निश्चिती वाटत नसल्याने त्यांना जास्ती आणि अधिक चांगल्या कपड्यांची गरज वाटते; आणि किबुट्झकडून त्यांची ही मागणी पुरविली जाणे शक्य नसल्यामुळे त्या ही गरज आता आपली आपणच भागवू लागल्या आहेत. असे करण्यात त्यांना वाटणारे अपराधीपण आता कमी होत चालले आहे. अशा रीतीने त्यांना मातृत्वाच्या, लैंगिक आणि आर्थिक इत्यादी अनेक भूमिकांबाबत वैफल्य वाटते त्यामुळे किबुट्झमधल्या पुष्कळशा तणावांना त्या जबाबदार बनतात.

## सामाजिक स्वप्ने आणि भ्रमनिरास

किर्यात येदिदिममधल्या पेचप्रसंगाला तिसरे एक अंतर्गत कारण आहे. किबुट्झ जीवनात भ्रमनिरासाची एक वृत्ती निर्माण झाली आहे. आपणाला साध्य करायचे होते ते काही साध्य झाले नाही असे सभासदांना वाटते. त्यांच्याशी केलेल्या संभाषणात याचा प्रतिध्वनी उमटतो; कधीकधी ते ही भावना स्पष्टपणे बोलूनही दाखवतात. काहीजणांना असे वाटते की आपल्या सगळ्या धडपडीचे सार्थक झालेले नाही, आपला त्याग निष्फळ झाला आहे. हा भ्रमनिरास त्यांच्या जीवनदर्शीच्या ज्या तीन केंद्रीय कल्पना– म्हणजे झिऑनवाद, समाजवाद आणि मानव– त्यांबाबत झालेला आहे; आणि त्यांचा उगम त्यांच्या जीवनदृष्टीच्या स्वप्नाळूपणात शोधता येईल.

प्रथम, झिऑनवादाच्या ध्येयाबद्दल म्हणजे ज्यू राष्ट्र आणि ज्यू समाज यांबद्दल जो भ्रमनिरास आहे त्याचा विचार करू. का कोण जाणे, या ध्येयाची प्राप्ती म्हणजे जेवढी दिव्य घटना कल्पनेत वाटत होती तेवढी ती प्रत्यक्षात वाटली नाही आणि झिऑनवादी ध्येयच मोठे वाटले नाही तर त्याचे साधन जे किबुट्झ त्याच्या-बद्दल कुणाला उत्साह राहील हे कसे शक्य आहे ! पुष्कळ संस्थापकांकडून हा भ्रमनिरास अगदी उघडपणे नसला तरी सूचकपणे व्यक्त होतो. पॅलेस्टाइनमधल्या आपल्या स्मृतींना उजाळा देताना एका संस्थापिकेने व्यक्त केलेल्या पुढील भावना बऱ्याचशा प्रातिनिधिक आहेत.

पूर्वीच्या काळी देश वेगळा होता. संस्थापकरूवाची जिद्द सर्व वातावरणात भरून राहिलेली होती. देश आता आहे असा बनेल असं आम्हाला कधी वाटलेच नव्हतं. आमच्या स्वप्नांची पूर्ती ही नव्हे. काही म्हणा पण काहीतरी वेगळ्या गोष्टींची आम्ही अपेक्षा केली होती......आम्ही इथं आलो तेव्हा आम्ही मोठा त्याग केला कारण

आमच्यापुढे मोठी ध्येयं होती, आणि ते सर्व नाहीसं होत आहे असं वाटतं. ह्या स्थलांतरितांना शहरात राहायला हवं आहे. विदेशात जगत होते तसलंच बकाल जीवन त्यांना इथं सुरू करायचं आहे. ज्यू माणसं म्हणजे कठीण, अगदी फारच कठीण......
परवा आमच्या नव्या खोल्यांसाठी फर्निचर आम्हांला मिळाले आणि मी आमच्या मित्रांना सांगितलं की मला ते ध्यायंसं वाटत नाही. उलट, मला अजूनही पूर्वीचे तंबू आणि गवताच्या गाद्या हव्याशा वाटतात. कारण त्या जीवनाला काही हेतू होता. ते मंतरलेले दिवस आता गेले हेच खरं......

सर्वात महत्त्वाची गोष्ट ही की अनेकांना नव्या समाजाबद्दल–किबुट्झबद्दल–भ्रमनिरास झाल्यासारखा वाटतो आहे. किबुट्झने जे काय साध्य करून घेतले आहे त्याबद्दल सभासदांनाच समाधान नसल्यासारखे त्यांच्या बोलण्यावरून दिसून येते व त्यावरून हा तर्क करता येतो. उदाहरणार्थ इस्रायलमध्ये आणि त्यातही विशेषतः किबुट्झमध्ये राहिल्यानंतर आम्हाला अमेरिकेला परत कसे काय जावेसे वाटते, हा एक प्रश्न आम्हाला सतत विचारण्यात येत असे. कोणीही परत चालला याचा अर्थ त्याने किबुट्झला नाकारले असा ते करतात आणि त्यातून त्यांच्या सुरक्षिततेला तडा जातो आणि आपली निर्मिती जी किबुट्झ तिच्याबद्दलचा त्यांचा आत्मविश्वास कमी होतो. किबुट्झमधल्या अमुक बाबतीत तुम्हाला काय वाटते, तमुक बाबतीत काय वाटते असे प्रश्न सभासद अखंड विचारीत असतात, आणि त्यांना तुमचे प्रामाणिक मत नको असून फक्त स्तुती हवी आहे हे लवकरच ध्यानात येते. असुरक्षिततेच्या मनोवस्थेचा हा प्रातिनिधिक प्रकार आहे. आपले जे आहे त्याबद्दल स्वतःचाच कमी झालेला आत्मविश्वास दुसऱ्यांचे गौरवपर मत ऐकून भरून काढण्याचा यात प्रयत्न असतो. सभासद स्वतःच किबुट्झमधल्या शिक्षण पद्धतीचे, मुलांचे, सांस्कृतिक कार्यक्रमांचे आणि समाज व संस्कृतीमधल्या इतर गोष्टींचे मूल्यमापन करतो त्यावेळी नेहमी "आपण जे करतो आहोत त्यात आपल्याला लाज वाटण्यासारखं काही आहे असं मला वाटत नाही" हे वाक्य ध्रुवपदासारखे येते. असुरक्षिततेची भावना सगळ्यात स्पष्ट रीतीने कोठे प्रकट होत असेल तर या वाक्यात.

शेवटी, ज्या प्रकारचा मानव किबुट्झने निर्माण केला आहे––किंवा खरे म्हणजे केला नाही––त्याबाबत झालेला भ्रमनिरास. नव्या मानवाची निर्मिती या साध्याचे साधन म्हणून किबुट्झची मूळ कल्पना अस्तित्वात आली हे वाचकांच्या ध्यानात असेलच. शहरी भांडवलशाहीने निर्माण केलेल्या स्वार्थी, आक्रमक व्यक्तिमत्त्वाऐवजी नव्या समाजरचनेतून एक प्रेमळ, निःस्वार्थी व्यक्तिमत्त्व आकाराला येईल असे वाटले होते. हे ध्येय साध्य झालेले नाही. सभासदांचा गट घेतला तर इतर कोणत्याही समाजात सापडतील तसे व्यक्तिमत्त्वाचे सर्व नमुने त्यात दिसून येतात. परंतु, किबुट्झच्या महत्त्वाकांक्षेच्या दृष्टीने हे पुरेसे नाही. किबुट्झचा पुढारी असलेला एक सभासद म्हणतो :

आम्ही येथे प्रथम आलो ते शहरातून आलो आणि शहरे सोडली ती एक साधा-सरळ समाज स्थापन करून त्यात खराखुरा मानव निर्माण करण्याच्या कल्पनेने. का कोण जाणे, त्या ध्येयापासून आम्ही च्युत झालो आहो. प्रारंभी आम्ही तसा समाज निर्माण केला होता, पण पुढे तो टिकला नाही. आणि मुख्य म्हणजे, आम्हाला नवा मानव सापडलेला नाही. आमची प्रतीक्षा होती ती नव्या मानवासाठी.

पण जर नवा मानव निर्माण करण्यात नव्या समाजाला यश आलेले नाही, जर दुसऱ्या प्रकारच्या समाजातील लोकांपेक्षा किबुट्झमधले लोक फारसे वेगळे नाहीत तर किबुट्झला हवे असलेले कठोर नैतिक जीवन कशासाठी जगत राहायचे? इच्छित साध्य प्राप्त होण्यासाठी जर साधनाचा उपयोग नाही तर साधनाचे सातत्य चालू ठेवण्यात काय अर्थ आहे?

येथे वर्णन केलेल्या भ्रमनिरासाचा प्रकार एका विशेष स्वरूपाचा आहे. आपले अंतिम ध्येय ज्यांना गाठता आले आहे अशी माणसे थोडी असतात आणि समाज तर त्याहूनही थोडे असतात आणि तरीसुद्धा ते भ्रमनिरासाला बळी पडत नाहीत. शिवाय किबुट्झने साध्य केलेल्या नैतिक जीवनाची उच्च पातळी फारच थोड्या समाजांनी गाठली आहे.: बहुधा आकांक्षा आणि सिद्धी यांच्यात फार मोठी तफावत पडली की तीतून भ्रम-निरासाचा उगम होतो. स्वप्नप्राय ध्येयांवरील आसक्ती आणि एका विशिष्ट प्रकारचे तंत्र वापरले की ही ध्येये आपणाला गाठता येतील अशी श्रद्धा यांमधून अशी परिस्थिती उद्भवते. सभासदांच्या भ्रमनिरासाला हीच कारणमीमांसा लागू पडेल असे वाटते, कारण त्यांचा भ्रमनिरास वास्तव किबुट्झ आणि आदर्श किबुट्झ यांमधल्या तफावती-मधून उत्पन्न झालेला आहे. आदर्श किबुट्झमध्ये तीन प्रतिमांचा संयोग आहे. माणसाने शहरी कृत्रिमतेच्या बंधनातून स्वतःची सुटका करून घेतली की आदर्श मानव निर्माण होईल ही युवक चळवळीची स्वप्नरंजनात्मक कल्पना; शोषण नष्ट झाले तर मानवी बंधुभाव प्रत्यक्षात येईल अशी मार्क्सवादी "शास्त्रीय" भविष्यवाणी; आणि ज्यात आदर्श समाजाचे व आदर्श मानवतेचे ध्येय क्षणकाल का होईना वास्तवात उतरले होते, तो लहानसाच पण भारून टाकणारा नेव्हे गिलामधला अनुभव[८] सारांश, ज्यात सामाजिक न्याय, आर्थिक समानता आणि व्यक्तिस्वातंत्र्य ही सर्व एकत्र आल्यामुळे तणावरहित असा मानवसमूह आकारास येतो असा एक "सेंद्रिय समाज" म्हणजे आदर्श किबुट्झ. जे द्वेषाऐवजी प्रेम करतात, स्पर्धा करण्याऐवजी सहकार्य करतात, स्वार्थी असण्याऐवजी निःस्वार्थी असतात अशा माणसांचा बंधुभावनेने भारलेला समाज म्हणजे आदर्श किबुट्झ. ज्यात नवमानव प्रत्यक्षात आला आहे असा नवसमाज म्हणजे आदर्श किबुट्झ.

---

८. वर पृष्ठ ४३–४४ पाहा.

अशा प्रकारचे ध्येय कधीकाळी साध्य होणे शक्य आहे का हेच मुळात शंकास्पद आहे. आणि एका पिढीत ते साध्य होईल असे मानणे तर उघडउघड स्वप्नाळूपणाचे आहे. एके काळी ज्या स्वप्नांनी संस्थापकांच्या किशोरवयातील नैतिक आणि मानसिक ऊर्मींना भारावून टाकले होते ती ही स्वप्ने आहेत. पण-तरीही नवसमाज, नवमानव ही स्वप्नरंजनात्मक कल्पना नामशेष व्हावयाला तयार नाही. उलट, ती किबुट्झच्या आकांक्षेशी एकजीव झाली आहे. किबुट्झची आत्मप्रतिमा त्यात सामावलेली आहे. अशा स्वप्नाशी तुलना करता कोणतीही वास्तवता तिच्यापुढे उणी वाटेल यात संशय नाही.

* * *




प्रकरण : ८ :

# उपसंहार

*कोणत्याही प्रस्थापित समाजरचनेचे प्रतिनिधी त्यांच्या दृष्टीने ज्या तत्त्वतःच प्रत्यक्षात येणे अशक्य अशा सर्व नवसमाजविषयक संकल्पनांना 'युटोपियन' असेच नाव देणार........प्रस्थापित रचनेच्या पलीकडे पाहायचेच नाही असे एकदा ठरविले की जे खरे म्हणजे फक्त एका विशिष्ट समाजरचनेत अप्राप्य आहे ते सर्वच समाजरचनांमध्ये पूर्णपणे अप्राप्य आहे अशी धारणा होऊ लागते. हे भेद [ महत्त्वाचे आहेत आणि ते ] नजरेआड केले की सापेक्ष युटोपियांची संभाव्यताही नाकारण्याची वृत्ती तयार होते. आता अस्तित्वात असलेल्या रचनेच्या बाहेरचे म्हणून जे जे आहे ते ते सर्व युटोपियन आहे अशी समजूत करून घेतली की दुसऱ्या एखाद्या रचनेत संभाव्य असलेल्या सापेक्ष युटोपियांमधून जे डोक्याला त्रास देणारे प्रश्न निर्माण होतात त्यांपासून स्वतःची सुटका करून घेता येते.*

Carl Mannheim, **Ideology and Utopia**

पाश्चिमात्य देशांतील मानवाच्या व्यक्तिमत्त्वाची घडण आणि त्यांतील सामाजिक स्थित्यंतरे ह्या दोहोंमध्ये संघर्ष आणि स्पर्धा यांचा इतका उच्चतम महत्त्वाचा प्रभाव दिसून येतो की ऑगस्तीन आणि फ्रॉयड यांच्यासारख्या अगदी भिन्न मतप्रणालींच्या तत्त्ववेत्त्यांनीसुद्धा आक्रमकपणा ही मानवजातीची जन्मसिद्ध आणि सार्वत्रिक प्रेरणा असल्याचे प्रतिपादन केले आहे. ह्या गृहीतकृत्याची शास्त्रीय कसोटीवर परीक्षा करणे फारच कठीण आहे. तरीही हे लक्षात आणून देणे अवश्य आहे की सामाजिक हेतूंचे मूलस्रोत मानवी जीवनरचनेतच शोधू पाहणाऱ्या किंवा मानवी समाजरचनेत जीवशास्त्रीय घटकाला कारणत्व अर्पित करणाऱ्या—"आक्रमकत्वा" सारख्या—गृहीतकृत्यांना मानववंशशास्त्रज्ञांनी नेहमीच संशयास्पद मानलेले आहे. मानवी वर्तणूक आणि समाजपद्धती ह्यांमध्ये इतके विलक्षण वैविध्य आहे आणि वेगाने वाढणाऱ्या वंशवर्णनशास्त्रीय वाङ्मयात त्याची एवढ्या विपुलतेने नोंद झालेली आहे

की आपला संशय अनाठायी नाही असे समजण्यास पुरेसा पुरावा उपलब्ध झालेला आहे असे मानववंशशास्त्रज्ञांना वाटते. कारण त्यांच्या मते सर्व मानव जात ही एकाच प्राणिशाखेची संतती आहे हे जर खरे तर विविध संस्कृतींच्या अभ्यासातून दृष्टोत्पत्तीस आलेले मानवी वर्तणुकीतील वैविध्य हे निरनिराळ्या संस्कारांमधून निर्माण झाले आहे, निरनिराळ्या जीवशास्त्रीय रचनांमधून नव्हे, असे समजावयास हवे. त्याचप्रमाणे ज्या अर्थी स्पर्धा आणि संघर्ष यांऐवजी सहकार्य व परस्परसाहाय्य यांना महत्त्व देणाऱ्या समाजांचे इतिहास नमूद झालेले आहेत त्या अर्थी आक्रमण ही जन्मसिद्ध ऊर्मी असण्याऐवजी ती एक संस्कारप्राप्त गोष्ट आहे हे स्पष्ट होते. म्हणून आक्रमकत्व हे सार्वत्रिक आहे असे सांगणारी विधाने असत्य होत, कारण एका विशिष्ट संस्कृतीने सीमित अशा जन्मसिद्ध आक्रमकत्वाच्या गृहीतकृत्यावरून ती निष्कर्षित केली गेली आहेत.

इतर काही मानववंशशास्त्रज्ञांना मात्र वर उल्लेखिलेल्या वंशवर्णनात्मक पुराव्यावरून ठामपणे काही सिद्ध होते असे वाटत नाही. हे खरे की इफालुक किंवा प्यूब्लो इंडियन यांच्यासारख्या अनेक समाजांच्या रचनांमध्ये आक्रमक वर्तणूक जवळजवळ मुळीच दृष्टीस पडत नाही. पण ह्याचा अर्थ असा करायचा का की त्यांच्या सांस्कृतिक व्यवहाराच्या धर्म इत्यादी इतर क्षेत्रांत आक्रमणाचा आविष्कार होत नाही? की संस्थारूप न पावलेल्या त्यांच्या आंतर-व्यक्तिसंबंधात तो व्यक्त होत नाही? आणि ह्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर नकारार्थी आहे असे मानले तरी आणखी एका प्रश्नाला तोंड दिले पाहिजे : आक्रमक वर्तणूक उघडपणे दिसत नाही याचा अर्थ ती सुप्त रीतीनेही अस्तित्वात नाही असा समजायचा काय? कारण आक्रमणाची ऊर्मी दडपून टाकली जाणे व नंतर कल्पित आक्रमणात तिचा प्रच्छन्नपणे आविष्कार होणे शक्य आहे. उपलब्ध वाङ्मयावरून असे दिसून येते की शांतताप्रेमी झुनी लोकांच्या लोककथांमधील अनेक विषय आणि त्यांच्या समाजातील आंतर-व्यक्तिसंबंध ह्यांत आक्रमण व्यक्त झालेले दिसून येते; अत्यंत सहकार्यपूर्ण जीवन जगणाऱ्या इफालुक लोकांच्या कल्पनाविश्वात दुष्ट भुतेखेते वावरतात आणि ते त्यांचे शमनही करतात.

ह्या दोन उदाहरणांवरून निष्कर्ष काढायचा तर असा काढता येईल की ज्यांमधून आक्रमणाचा आविष्कार नष्ट करण्यात आला आहे किंवा पुष्कळसा कमी करण्यात आला आहे असे समाजबंध निर्माण करणे समाजगटांना शक्य असते; मात्र आक्रमणाची ऊर्मी ज्यांतून नष्ट झाली आहे असे व्यक्तिमत्त्वबंध निर्माण करणे अशक्य आहे. आक्रमणाचा थोडाफार आविष्कार प्रत्येक समाजात सापडणारच.

ह्या विधानाचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. ज्यात कोणत्याही प्रकारचा अपेक्षाभंग नाही अश्या जीवनाची हमी कोणताच समाज आपल्या सभासदांना देऊ शकणार नाही. एकच उदाहरण घ्यायचे तर असे सांगता येईल की मुले वाढण्याच्या

प्रक्रियेत त्यांच्या काही इच्छा पुऱ्या न होणे अपरिहार्यच असते, मग त्यांच्या ऊर्मींचे नियंत्रण करण्यासाठी कोणतीही सामाजिक संस्करणाची तंत्रे वापरण्यात येवोत. अपेक्षाभंगाचा हा एक जरी उगम घेतला तरी त्यातून प्रत्येक मुलामध्ये काहीना काही प्रमाणात आक्रमणाची प्रेरणा निर्माण होईल. पण असे समाजनियमनासाठी आवश्यक म्हणून लादलेले अपेक्षाभंग एवढे एकच सामाजिक अपेक्षाभंगांचे मूळ नसते. निराशा, दुःख, अपयश, धिक्कार हा सगळीकडच्या मानवी जीवनाचा भागच आहे आणि ह्या किंवा अशा प्रकारच्या अनुभवांतून कोणत्याही समाजात अपेक्षाभंगांचे प्रसंग उद्भवतातच. समाजांसमाजांमध्ये त्यांचे प्रकार आणि प्रमाणे वेगवेगळी असतील एवढेच.

शिवाय केवळ सामाजिक जीवनातच--म्हणजे समाजरचना, व्यक्तींचे परस्पर संबंध, प्रत्येक व्यक्तीच्या नशिबाचे चढउतार यांतच--सर्व अपेक्षाभंगांचे मूळ असते असे नाही. निसर्ग हा तर अपेक्षाभंगांचा सर्वांत मोठा उगम आहे आणि आजार, दुष्काळ, पूर, मरण यांच्यामार्फत तो हे अपेक्षाभंग घडवून आणतो. यावरून असा निष्कर्ष काढायला हरकत नाही की आक्रमणाची ऊर्मी सार्वत्रिक असते---मग समाजबंधांमध्ये त्यांचा होणारा आविष्कार कितीही मर्यादित केलेला असो. आणि ही ऊर्मी सार्वत्रिक आहे असे सिद्ध करण्यासाठी ती जन्मसिद्ध आहे असे गृहीत धरावे लागत नाही.

सामाजिक जीवनातून आक्रमण प्रेरणा काढून टाकता येईल असे केवळ एखादा निखळ स्वप्नवादीच म्हणू शकेल. आणि समाजाचे घटक एकमेकांवर निरपेक्ष प्रेम करू शकतील असे मत ज्याने आपल्या स्वतःच्या आक्रमक व म्हणून अपराधित्वाच्या भावना निर्माण करणाऱ्या ऊर्मींविरुद्ध बळकट बचावयंत्रणा उभी केली आहे असा एखादा माणूसच देऊ शकेल. शक्य आहे ते एवढेच--आणि तेवढेच फक्त होते असे आपल्याला प्रत्यक्षात दिसून येते--की समाजाच्या संस्कृतीची अशी पुनर्रचना करता येईल की तीमुळे आक्रमण प्रवृत्तींना फारसे उत्तेजन मिळणार नाही, सामाजिक यंत्रणेचे व्यवस्थापन अशा रीतीने करता येईल की समाजचालनासाठी अवश्य अशा प्रेरणांमध्ये आक्रमकतेची फारशी जरूर राहणार नाही आणि सांस्कृतिक परंपरांचा अशा रीतीने उपयोग करता येईल की व्यक्तींचे परस्परसंबंध आणि समाजांतर्गत भावनिक ऐक्य यांना तडा न जाऊ देता आक्रमक प्रवृत्तींना समाजसंमत अशा व्यवहारांच्या कामी लावता येईल.

किर्यात येदिदिमने जे शक्य आहे ते आणि, प्रस्तुत लेखकाची ह्यापूर्वीची विधाने खरी असतील तर, जे अशक्य आहे तेही साध्य करण्याचा प्रयत्न केला आहे. युवक आंदोलनाच्या प्रारंभीच्या काळातील " आदिम " आणि स्वप्नमय कल्पना आणि नेव्हे गिलामधील भ्रातृभावाच्या अनुभवाचा छोटासा कालखंड यांमधून संस्थापकांची अशी श्रद्धा बनली की जुन्या जगातले काही विशिष्ट अडसर दूर केले की नवा मानव

निर्माण करता येईल. आणि ते प्रारंभीचे स्वप्न प्रत्यक्षात आणण्याच्या आणि त्या छोट्याशा कालखंडातले अनुभव चिरस्थायी करण्याच्या हेतूनेच त्यांनी आपल्या नव्या संस्कृतीची–किबुट्झची–स्थापना केली. लेखकाने मागे दाखविल्याप्रमाणे हा हेतू साध्य करण्यात किर्यात येदिदिमला पुरेसे यश आलेले नाही आणि त्याच्यातील अंतर्गत तणावांचे ते एक प्रमुख कारण आहे. त्यामुळे असे झाले आहे की किबुट्झ ह्या आपल्या निर्मितीविषयी साथींना एक अस्फुट भ्रमनिरासाची भावना आहे. आपले ध्येय मुळात युटोपियन व म्हणूनच अप्राप्य असल्यामुळे आपण अपेशी झालो आहोत अशी कारणमीमांसा करण्याऐवजी साथी आपल्या अपयशाची जबाबदारी बाह्य घटकां-वर टाकतात आणि परिणामतः आपली बरीच शक्ती राजकारणात वाया घालवितात [1]

किर्यात येदिदिम नवमानवाच्या स्वप्नमय आदर्शाच्या बरेच खाली असले तरी त्याने जी समाजरचना निर्मिली आहे तिच्याबाबत त्याला खरे म्हणजे वैफल्य वाटायला नको आहे. उलट, आदर्श मूल्ये आणि प्रत्यक्ष वर्तन यांच्यामधील सुसंगती हा एखाद्या समाजाच्या यशस्वी कार्यपूर्तीचा योग्य मानदंड आहे असे समजले तर त्याच्या आधारे किर्यात येदिदिमला आपल्या कर्तृत्वाचा रास्त अभिमान वाटावा अशीच स्थिती आहे. कारण या किबुट्झमध्ये समता, स्वातंत्र्य, स्वश्रम, सामूहिक मालकी इत्यादींचे प्रमाण फारच मोठे आहे. भ्रातृभाव हे ध्येय साध्य करणे हे फारच कठीण आहे यात शंका नाही आणि त्याबाबत किबुट्झला मिळालेले यश अत्यल्प आहे. स्पर्धा, मत्सर, ईर्ष्या, चहाडी-चुगली या गोष्टींचे प्रमाण जेवढे इतर समाजांतून सापडते तेवढेच बहुधा किर्यात येदिदिममध्येही आहे. लेखकाच्या मते कोणत्याही समाजातून या प्रवृत्तींचा नष्टांश करणे ही अशक्य गोष्ट आहे. तरीही हे लक्षात घेतले पाहिजे की सहकारावर आधारलेली संस्कृती या प्रवृत्तींचा आविष्कार किती प्रमाणात कमी करू शकते हे जर आपणास ठरवायचे असेल तर ते सिद्ध करण्यासाठी किर्यात येदिदिमचा प्रयोग निर्णायक मानता येणार नाही. किबुट्झच्या सहकारी संस्कृतीशी

---

१. मागे सुचविल्याप्रमाणे किर्यात येदिदिम व त्याचा संघ आणि इतर अनेक किबुट्झ वसाहती यांमध्ये हाच महत्त्वाचा फरक आहे. बाकीच्या कोणत्याही किबुट्झ-संघांची मार्क्सवादावर किंवा राजकीय शिस्तीच्या तत्त्वावर श्रद्धा नाही. गमतीचा विरोधाभास असा की पाश्चात्त्य संस्कृतीच्या "जडवादी" मूल्यांचा तिरस्कार आणि स्वातंत्र्य व बंधुत्व ह्या तत्त्वांवरील निष्ठा यांतूनच ह्या मार्क्सवादी श्रद्धेचा उदय झालेला आहे. पण संघ पाश्चात्त्य उदारमतवादी परंपरेपासून अलग पडल्यामुळे मार्क्सवादी प्रचारातील फसव्या मानवतावादी घोषणांना बळी पडलेला आहे आणि सोव्हिएत यूनियनमधल्या सत्यस्थितीला एक गोड रूप देऊन त्यात मशगूल होऊन राहिला आहे. कारणे काहीही असोत, संघ सोव्हिएत-प्रेमी आहे आणि त्यामुळे इतर किबुट्झसंघांशी त्याचे नाते संघर्षाचे आहे.

ज्यांचा कसलाच संबंध नाही अशा अनेक प्रचंड अडचणींमुळे किर्यात येदिदिममध्ये भ्रातृभावाची आणखी वरची पातळी गाठता आलेली नाही. या अडचणींचा अगोदर उल्लेख झालेलाच आहे पण प्रस्तुत संदर्भात त्यांपैकी काहींचा विशेष परामर्श घेणे युक्त होईल.

पहिली गोष्ट ध्यानात घ्यायची ती ही की किबुट्झचा प्रयोग अत्यंत प्रतिकूल अशा बाह्य परिस्थितीत झालेला आहे. संस्थापकांनी ज्या हिवतापाने पछाडलेल्या दलदलीत वसाहत केली तिची उपयुक्तता झिऑनवादी वसाहतीकरणाच्या व्यूहाच्या दृष्टीने कितीही मोठी असली तरी ग्रामीण जीवन किंवा शेती व्यवसाय यांना ती मुळीच अनुकूल नव्हती. ही जागा वसतीला योग्य करण्यासाठी आणि आर्थिकदृष्ट्या किफायतशीर करण्यासाठी फार कष्ट पडलेले आहेत आणि या कष्टांच्या खोल खुणा साथींची शारीरिक शक्ती आणि त्यांचे आरोग्य यांवर अजूनही दिसून येतात. हिवताप, सांधेदुखी, कामाने होणारी दमछाक या गोष्टी अशा नाहीत की ज्यातून प्रमळ आणि गोड स्वभावाची माणसे तयार व्हावीत. आता साथींनी तेथली जमीन पिकाऊ केली आहे आणि एक नेटके खेडे वसविलेले आहे हे खरे पण अजूनही त्यांना अनेक सुखसोयींची वाण आहेच. हवामानात होणाऱ्या आत्यंतिक चढउतारांना तोंड देण्यासाठी पुरेशी साधने आजही त्यांच्यापाशी नाहीत आणि या चढउतारांबरोबर त्यांच्या मनःस्थितीत आणि स्वभावातही अगदी दृष्टीत भरण्यासारखे बदल होत असतात.

पण केवळ भौतिक परिस्थितीतूनच ह्या कटकटी निर्माण होतात असे नाही. विपुल आणि वैचित्र्यपूर्ण अन्नाचा अभाव, जेवणघरातील खेचाखेच आणि आरडाओरडा, स्नानगृहातील गोंगाट आणि काळोख, उन्हाळ्यात दुर्गंध सोडणारे आणि हिवाळ्यात चिखलाने भरलेले, लांब अंतरावरचे व अनेकदा कामातून जाणारे शौचकूप––ह्या सगळ्यांमुळे मनावर असह्य ताण पडतो. ह्यातच सततची कामगार टंचाई, त्यामुळे लांबवावा लागणारा कामाचा आठवडा आणि सक्तीचे काम यांची भर घाला. मग असे म्हणायला हरकत नाही की भौतिक प्रगती ही जरी किबुट्झमध्ये भ्रातृभाव स्थापन होण्याची शर्त मानता आली नाही तरी ती त्याच्या मार्गात येणारे बरेचसे तणाव नाहीसे करील. या संदर्भात आता अधिक जागा, पाण्याचे नळ व अधिक सुखसोयी यांनी युक्त अशा नवीन घरबांधणीने तणाव कमी होण्यास मदत होईल की काय हे पाहायचे.

भौतिक परिस्थितीइतकाच सामाजिक परिस्थितीनेही किबुट्झच्या यातनांना आणि भ्रातृभावाबाबतच्या अपयशाला हातभार लावला आहे. इतर किबुट्झप्रमाणे आणि खरे म्हणजे सबंध देशाप्रमाणेच, किर्यात येदिदिमलाही अगदी आपल्या जन्मापासून अखंड सामाजिक दडपण आणि ताण सहन करावे लागले आहेत. त्यांचे प्रमाण कळण्यासाठी काही दडपणांची नुसती यादी दिलेली पुरेशी आहे : अरब हल्लेखोरांचे हल्ले, १९२९ आणि १९३७ मधील अरबांच्या दंगली, स्थलांतर व वसाहतीकरण यासाठी

ब्रिटनने अधिक सवलतीचे धोरण आखावे म्हणून त्यांच्याशी दिलेली झुंज, दुसरे महायुद्ध आणि रोमेलची अगदी परसदारापर्यंतची धडक, स्वातंत्र्ययुद्ध, ह्या युद्धापासून सुरू झालेल्या सरहद्दीवरील चकमकी, निरनिराळ्या राजकीय गटांतील अंतर्गत झगडे, युरोपीय ( आणि अलीकडे पौर्वात्य ) युवक गटांचा शिक्षण व पुनर्वसन यांसाठी स्वीकार व त्यामुळे अगोदरच तुटपुंज्या असलेल्या साधनसामग्रीची आणखी टंचाई—— या आणि इतर गोष्टींनी साथी सतत तणावाच्या अवस्थेत राहिलेले आहेत. शांतता आणि विसावा यांचा दीर्घ कालखंड त्यांना कधीच मिळालेला नाही आणि तसा मिळाल्याखेरीज शारीरिक आणि मानसिक स्थैर्य येणे ही अशक्य गोष्ट आहे.

झिऑनवादी निष्ठा आणि संस्थापकांचे खडतर जीवन यांमधून उद्भवलेल्या आणि किबुट्झच्या सहकारी समाजरचनेशी ज्यांचा काही संबंध नाही अशा ह्या तणावांमध्ये भर पडत ती कियात येदिदिमच्या संस्कृतीच्या एका महत्त्वाच्या वैशिष्ट्यामुळे. ते वैशिष्ट्य म्हणजे “ सामूहिक गतिमानता ”. अनेक साथींना एकांताची खोल गरज असते आणि तिच्या मार्गात याचा मोठा अडथळा येतो. सर्वसाधारण साथीला एकांताचे चार क्षण मिळणेसुद्धा कठीण असते. जेवणाच्या वेळी किंवा स्नान-गृहात एकांत मिळावा तर तोही अशक्य. काही साथींनी सांगितल्याप्रमाणे, माणसांवर तुमचे प्रेम नसले तरी त्यांच्याशी सहकार्य करणे मुळीच अशक्य नसते; पण प्रेम नसेल तर त्यांच्या सहवासात सगळा वेळ काढणे मात्र अशक्य आहे. सामूहिक गति-मानता आणि सामूहिक जीवन ह्या मूल्यांवर भर देऊन किबुट्झने आपल्या सदस्यांवर ही अशक्य गोष्ट शक्य करून दाखविण्याची जबाबदारी लादलेली आहे.

लेखकाच्या कियात येदिदिममधील एका वर्षाच्या वास्तव्यात त्याने अशी तक्रार एकाकडूनही ऐकली नाही की आपले घर, आपली उत्पादनसाधने किंवा आपली जमीन ही समूहाच्या मालकीची असल्यामुळे आपल्याला सुख वाटत नाही. आपण दुसऱ्या-पेक्षा जास्त कार्यक्षम आहोत किंवा दुसऱ्या एखाद्यापेक्षा आपल्याला मुले कमी आहेत त्यामुळे आपण ज्या मानाने किबुट्झच्या कल्याणासाठी हातभार लावतो त्या मानाने आपल्या पदरात काही पडत नाही असेही असमाधान कुणी व्यक्त केले नाही. पण किबुट्झच्या सामूहिक संस्थांतील गोंगाट व गर्दी, एकांताची वाण, इतरांच्या नजरेचा पाहारा——या गोष्टींबद्दल मात्र बहुधा तक्रारी ऐकायला मिळाल्या. मालमत्ता आणि कौशल्ये ह्यांचा एकत्रित उपभोग घ्यायला साथींची हरकत नाही, पण एकत्रित अनुभव मात्र अनेकांना नको वाटतो. हा असंतोषच किबुट्झमधल्या तणावाचे एक प्रमुख कारण आहे आणि भ्रातृभावाकडे नेणाऱ्या मार्गावरील अडथळा आहे.

तिसरा अडथळा म्हणजे बाहेरचे जग आणि त्याची मूल्ये यांचा प्रभाव. राष्ट्र-स्थापनेनंतर तर हा अडथळा आणखीच मोठा झाला आहे. साथींचा नेहमीचा संदर्भ-गट म्हणजे जगातले समाजवादी समाज. ( यात इतर किबुट्झवसाहतींचाही समावेश

होतो. ) इतर किबुट्झवसाहतींशी तुलना केली तर साथींना ज्या हालअपेष्टा भोगाव्या लागल्या आहेत त्या अगदी बेप्रमाण आहेत असे म्हणता येणार नाही. तरीही बाह्य जगापासून साथी अगदीच तुटक राहिलेले आहेत किंवा त्याच्या प्रभावापासून अलिप्त आहेत असे मात्र नाही. अधिक वरचे राहणीमान, अधिक एकांत, सामूहिक निर्णयांनी बद्ध नसलेले जीवन–इत्यादी गोष्टी बाहेरच्या जगातल्या लोकांना मिळतात हे त्यांना माहीत असते आणि अशा लोकांशी त्यांचे संबंधही येतात. त्यामुळे त्यांच्या वैयक्तिक जीवनात असमाधान आणि सामाजिक जीवनात ताण उत्पन्न झालेले आहेत. आपल्याला सुद्धा शीतकपाटे, आरामखुर्च्या, छानछोकीचे कपडे आवडतात हे त्यांच्या लक्षात आलेले आहे आणि किबुट्झ जर ह्या "चैनीच्या वस्तू" देणार नसेल तर किबुट्झचे आदेश धुडकावून लावण्याचीही काहीजणांची तयारी आहे. पण समूहाचे संकेत मोडले की मोडणारांच्या मनात अपराधित्वाची भावना निर्माण होते, संकेत मोडणारे आणि इतर यांच्यात संघर्ष सुरु होतो आणि संकेतपालन करणारांना संकेत मोडणारांचा हेवा वाटू लागतो. अशा परिस्थितीत भ्रातृभाव वृद्धिंगत होणे अशक्य आहे.[२]

बाह्य जगाचा हा अस्वास्थ्य उत्पन्न करणारा प्रभाव एरव्ही फारसा महत्त्वाचा ठरला नसता. पण होते काय की किर्यात येदिदिममधल्या आणखी एका अडथळ्याशी त्याची सांगड पडते. तो अडथळा म्हणजे त्यांच्यातील प्रौढ सभासदांची बालपणाची पार्श्वभूमी. किर्यात येदिदिमच्या स्थापनेपासून फारतर एक पिढी उलटलेली आहे. संस्थापकांनी आपले संवेदनाक्षम वय किबुट्झ-बाह्य संस्कृतीत व्यतीत केलेले आहे आणि ह्या गोष्टीला काही फार वर्षे झालेली नाहीत. खाजगी संपत्ती, पारंपारिक पाश्चात्त्य कुटुंबव्यवस्था, आईबापांनी केलेले बालसंगोपन, पांढरपेशे व्यवसाय आणि उद्योगधंदे–ही त्या जुन्या जमान्याची रुळलेली आणि सर्वमान्य मूल्ये होती. संस्थापकांनी या मूल्यांविरुद्ध बंडाचे निशाण उभारले, आपली प्रादेशिक मुळे कापून टाकली, पॅलेस्टाइन-कडे प्रयाण केले आणि आपल्या रुळलेल्या मूल्यांहून बहुतेक बाबतीत––मात्र सर्व बाबतीत नाही––विरोधी मूल्यांनी युक्त अशी संस्कृती निर्माण केली.

मनोविश्लेषणशास्त्राप्रमाणे बालपणीच्या अनुभवांचा प्रभाव फार पक्का असतो आणि अध्ययनशास्त्राप्रमाणे दृढीकरण हे फार महत्त्वाचे तत्त्व आहे; ह्या दोन्ही शास्त्रांच्या ह्या विकल्पना अंशतःच सत्य आहेत असे मानले तरी हे स्पष्ट आहे की

---

२. "भांडवलशाहीच्या समुद्रात समाजवादाचे एक बेट" स्थापन करणे हे अशक्य नसले तरी अवघड खास आहे असे स्पायने म्हटले आहे आणि बाह्य जगाचा प्रभाव हा मोठा अडथळा असल्याची जाणीव या उद्गारावरून दिसून येते. हा अडथळा स्पायच्या मते बाह्य जग किबुट्झविषयी जी शत्रुत्वाची भावना ठेवते त्यावरून निर्माण झाला आहे, उलट प्रस्तुत लेखकाच्या मते साथींना वाटणारा बाहेरच्या जगाविषयीचा मोह हा खरा महत्त्वाचा अडथळा आहे.

साथींना ही जुनी मूल्ये सहजासहजी सोडून देता आली नसली पाहिजेत. खरे म्हणजे तसे झालेलेही आहे. काहीजणांना "सामूहिक शिक्षणा"चा स्वीकार करणे, काहीजणांना "सुखसोयीं"चा त्याग करणे तर काहीजणांना खाजगी मालमत्तेचा अभाव स्वीकारणे सर्वांत जड गेले आहे. काही थोड्याजणांच्या तर या तिन्ही गोष्टी अंगवळणी पडलेल्या नाहीत. ते काहीही असो, साथींची जुनी मूल्ये आणि बाह्य जगाची आजची मूल्ये एकच आहेत आणि ह्यामुळे बाह्य जगाचा प्रभाव हा "परागती"कडे सतत खेचणारा एक प्रेरक बनून राहतो.

साथींनी जुन्या काळी प्राप्त करून घेतलेली मूल्ये आणि पुढच्या आयुष्यात स्वीकारलेली मूल्ये यांच्यामधला संघर्ष हे जर किबुट्झच्या सद्यःकालीन संकटावस्थेचे मूळ असेल तर त्याच्या सहकारी आणि सामुदायिक व्यवहारांचे यशापयश त्यातील प्रौढांच्या वर्तणुकीवरून जोखणे न्याय्य ठरणार नाही. किबुट्झमध्येच ज्यांचा जन्म आणि संगोपन झाले आणि आईबापांना त्यांची जुनी मूल्ये जितकी "स्वाभाविक" तितकीच किबुट्झची मूल्ये ज्यांना स्वाभाविक अशा मुलांच्या वर्तनावरूनच किबुट्झच्या यशाचे मोजमाप केले पाहिजे. आमच्या अभ्यासाचा मुख्य विषय खरे म्हणजे किबुट्झची ही पिढीच होती आणि किर्यात येदिदिमवर जो दुसरा ग्रंथ आम्ही प्रसिद्ध करणार आहोत त्यात तिचे वर्णन येईल. साब्रांवरील माहिती अजून पृथक्करणाच्या अवस्थेत असल्यामुळे या ठिकाणी तिच्या आधारे काही सांगता येण्यासारखे नाही. तथापि काही तार्किक अनुमाने आणि लेखकाच्या मनावर उमटलेले काही ठसे यांच्या आधारे काही विचार मांडणे वावगे ठरणार नाही.

जमेच्या बाजूने असे सांगता येईल की काही प्रौढांच्या कधीही पूर्णपणे अंगवळणी न पडलेली किबुट्झ संस्कृतीची काही अंगे साब्रांना "स्वाभाविक" एवढेच नव्हे तर इष्टही वाटतात. ह्या गोष्टींची नोंद ह्या ग्रंथाच्या अनेक भागांत मागे झालेलीच आहे. उदाहरणार्थ, साब्रांच्या मते सामूहिक शिक्षण हाच बालसंगोपनाचा एकमेव शहाणपणाचा मार्ग आहे. ह्या मताला फक्त एकाचाच आणि तोही काहीसा संशयास्पद अपवाद आहे. आज तीन वर्षांनंतरही संस्थापिकांच्या मनात ह्या विषयासंबंधी शंका घर करून राहिल्या आहेत; उलट, साब्रा मुलींमध्ये याची खूण दिसत नाही. शिवाय आपल्या भोवतालची हवा हे जसे साब्रांना एक वस्तुगत "गृहीत" वाटते तसेच सामूहिक मालकी हे एक सामाजिक "गृहीत" वाटते. खाजगी मालमत्तेचा संग्रह-करण्याची प्रबळ वृत्ती त्यांच्यामध्ये असल्याचे दिसून येत नाही. उलट याच गटाने खाजगी मालमत्तेच्या प्रवेशाला सर्वांत अधिक विरोध केला आहे.

कोणत्याही संस्कृतीचे सातत्य अखेरीस तिच्या सभासदांच्या प्रेरणाव्यवस्थेवर अवलंबून असते; सभासदांनी तिची मूल्ये केवळ बुद्धीने स्वीकारली आहेत हे पुरेसे नसते. समाजाची सांस्कृतिक वैशिष्ट्ये आणि सभासदांचे मनोगुण यांत सुसंगती नसेल

तर संस्कृती टिकून राहील की नाही—निदान लोकतंत्रीय चौकटीत टिकून राहील की नाही—याची शंका आहे. साब्रांच्या व्यक्तिमत्त्वबंधाचे विश्लेषण अजून आम्ही केलेले नाही; तरीसुद्धा किबुट्झ संस्कृती व साब्रांचे काही मनोगुण एकमेकांशी पूर्णपणे सुसंगत आहेत असे म्हणायला हरकत नाही. यामुळे किबुट्झ संस्कृती चिरस्थायी करण्याच्या दृष्टीने त्यांच्या प्रेरणा कार्यान्वित राहतील अशी आशा वाटते.

किबुट्झ संस्कृतीच्या चिरस्थायित्वाच्या दृष्टीने जे अनेक मनोगुण आवश्यक आहेत त्यांपैकी विशेष महत्त्वाचे पुढील म्हणता येतील: समूहाशी ऐकात्म्य, समूहाच्या अंतर्गत सुरक्षिततेची भावना, तीव्र धनासक्तीचा अभाव, तीव्र व्यक्तिगत यशःप्रेरणेचा अभाव, सामाजिक जबाबदारी स्वीकारण्याविषयी उत्साह. साब्रांमध्ये हे गुण मोठ्या प्रमाणावर आहेत असे समजण्यास काही पुरावा आहे.[३]

अकरणात्मक बाजू पुढे आणायची तर दोन प्रश्न या ठिकाणी उपस्थित करणे योग्य होईल—मात्र त्यांची उत्तरे येथे देण्याचा मी प्रयत्न करीत नाही. एक, संस्थापक ज्या भावनिक आणि नैतिक निष्ठांनी प्रेरित झाले होते त्यांच्या अभावी किबुट्झ टिकवून धरणे शक्य होईल काय? ( किबुट्झ असे म्हणताना एक सामुदायिक शेती प्रकल्प एवढा मर्यादित अर्थ माझ्या मनात नाही हे ध्यानात घ्यावे. ) वेबरने जिला "संमोहनाचे नित्यक्रमीकरण" असे नाव दिले आहे ती प्रक्रिया कोणत्याही समूहाच्या इतिहासात अटळ असते. तसे झाले तर किबुट्झची मूलची निष्ठा कितपत तगून राहील? आईबापांना ज्या प्रश्नांशी झगडावे लागले तसले प्रश्न साब्रांना नाहीत आणि त्यांचे आईबाप हे जसे ध्येयवेडे बंडखोर होते तसे ते नाहीत. आई-बापांना एक नवे तत्त्वज्ञान घडवावे लागले आणि असे करताना स्वतःशी व स्वतःच्या आईबापांशी तसेच निसर्गाशी व समाजाशी दीर्घकाल आणि दुःसह झगडा करावा लागला. साब्रांना हे करावे लागलेले नाही. उलट ही मूल्ये त्यांना विनासायास, आप-सुख प्राप्त झाली आहेत. कुठल्याही समाजाची मूल्ये ज्या पद्धतीने त्यातील लहान मुले शिकतात तशीच ते ती शिकलेले आहेत. सारांश, आपण या ठिकाणी एक साधाच पण मूलभूत प्रश्न उपस्थित करीत आहोत : कार्ल मॅनहाईमच्या शब्दांत बोलायचे तर, पित्यांचा जो आदर्शवाद ( युटोपिया ) तो पुत्रांचा ध्येयवाद ( आयडिऑलॉजी ) झाल्यावर क्रियांत येदिदिमच्या एक किबुट्झ म्हणून ज्या निष्ठा आहेत त्या शिल्लक राहतील काय?

दुसरा प्रश्न उपस्थित केला पाहिजे तो हा की व्यावसायिक शिक्षणाऐवजी व्यापक तात्त्विक शिक्षण ज्यांना मिळाले आहे, विज्ञानाचे मूल्य ज्यांना कळले आहे

---

३. हा पुरावा म्हणजे "वाव्हेलस मॉरल आयाडिऑलॉजी टेस्ट" आणि "स्टुअर्ट इमोशनल रिस्पॉन्स टेस्ट" या चाचण्यांना मिळालेली उत्तरे हा होय. Spiro, "Education in a Collective Settlement in Israel" यामध्ये तो संक्षेपाने दिला आहे.

आणि कलांची गोडी ज्यांना लागली आहे असे हे सात्रा एका लहानश्या इस्रायली खेड्यात आपले जीवन व्यतीत करतील काय? सार्वजनिक मालकी, सामाजिक समता, सामूहिक शिक्षण यांच्या इष्टतेबद्दल सात्रांच्या मनात कसलीही शंका नाही हे खरे; पण बाहेरचे जग, त्यातल्या प्रयोगशाळा, व्याख्यानमंदिरे, नाट्यगृहे, कलाप्रदर्शने यांचे त्यांना जबरदस्त आकर्षण वाटून किबुट्झला मोडकळीस येईल असे तर होणार नाही?

आमचा अभ्यास चालू असण्याच्या काळापर्यंत तरी बाहेरच्या जगाचा मोह इतका प्रबळ नव्हता की त्याने किबुट्झचे अस्तित्व धोक्यात यावे. कियांत येदिदिमच्या सबंध इतिहासात अशी एकही घटना नाही की त्यात जन्मलेली व वाढलेली व्यक्ती राजीनामा देऊन निघून गेली आहे. सात्रांना बाहेरच्या जगाचे ज्ञान नाही म्हणून असे होते म्हणावे तर तसेही नाही. पुस्तके, सिनेमा, शहरांना वेळोवेळी दिलेल्या भेटी यांमधून सात्रांना किबुट्झ-बाह्य जीवनाची चांगलीच ओळख होते. काहीजणांनी शाळेत परीक्षेनंतर एक किंवा दोन वर्षे शहरात घालविली आहेत तर काहींनी परदेशाचा प्रवास केलेला आहे. तरीही कियांत येदिदिममधल्या प्रत्येक मुलाने वयात आल्यावर तेथेच राहण्याचा निर्णय घेतला आहे.

उलट हेही खरे की इतके श्रम आणि पैसा खर्च करून आपल्या मुलांच्यात बौद्धिक आणि कलात्मक मूल्ये रुजविण्याचा कियांत येदिदिमने केलेला प्रयत्न जर वाया गेला, किंवा ग्रंथ, संगीताच्या मैफिली आणि कला प्रदर्शने यांचे त्यांना फारसे वेड लागले नाही तर कियांत येदिदिमचे 'किबुट्झ' पण जाईल आणि ते केवळ एक सहकारी शेतकऱ्यांचे खेडे उरेल.

थोडक्यात, किबुट्झची जीवशक्ती सात्रांना सिद्ध करून दाखवायची असेल तर त्यांना कियांत येदिदिमची नैतिक मूल्ये आत्मसात करावी लागतील, ही मूल्ये किबुट्झच्या संस्थात्मक रचनेतून साकार करावी लागतील आणि ग्रामीण जीवनाबद्दलचे असमाधान मनात उत्पन्न होऊ न देता बाह्य जगाच्या बौद्धिक आणि कलात्मक व्यापारात रस घ्यावा लागेल.

हे त्यांच्याप्रमाणेच त्यांच्या आईबापांचेही स्वप्न आहे. एका अर्थी मातापितरांनी आपल्या मुलांच्या भविष्यकाळावर आपल्या भूतकाळाचा जुगार खेळलेला आहे. मानव-वंशशास्त्रज्ञाचे कर्तव्य हे की ह्या स्वप्नाचा त्याने तपशीलवार अभ्यास केला पाहिजे. मानववंशशास्त्र कविकल्पनांचा, स्वप्नांचा अभ्यास करीत नाही, सत्य घटनांचा करते हे खरे. पण कधीकधी असेही होते की एखाद्या समाजाने उराशी बाळगलेले स्वप्न हीच त्या समाजातली सर्वश्रेष्ठ सत्य घटना असते. एक स्वप्न साकार होऊन कियांत येदिदिम जन्मास आले, दुसरे स्वप्न साकार होण्यावर त्याचे भवितव्य अवलंबून आहे.

* * *

प्रकरण : ९ :

# ताजा कलम : १९७० मधील किबुट्झ

लेस्ली वाय्. रॅबकिन आणि मेलफर्ड इ. स्पिरो

किर्यात येदिदिमच्या ज्या अभ्यासावर प्रस्तुत पुस्तक आधारलेले आहे तो अभ्यास १९५०–५१ साली मेलफर्ड आणि ऑड्रे स्पिरो यांनी केलेला होता. तेव्हा-पासून आजपर्यंत किबुट्झमध्ये पुष्कळ बदल झालेले आहेत आणि त्यातले काही १९६३ च्या आवृत्तीला लिहिलेल्या नव्या प्रस्तावनेत नमूद करण्यात आलेले आहेत. पण त्या प्रस्तावनेत किबुट्झमधील बदलांची केलेली नोंद नुसती त्रोटकच होती असे नव्हे तर १९६२ साली किर्यात येदिदिमला दिलेल्या एका फारच अल्प अशा भेटीवर आधारलेली होती. त्या नंतरच्या काळात लेस्ली आणि कारेन रॅबकिन यांनी जानेवारी १९६७ ते जुलै १९६८ ह्या दीड वर्षांच्या काळात ह्याच किबुट्झमध्ये वास्तव्य केलेले असून त्यानंतरही त्यांचा त्याच्याशी सततचा संपर्क राहिलेला आहे. त्यामुळे त्यांच्या निष्कर्षांचा उपयोग करून प्रस्तुत ग्रंथ अद्ययावत करणे इष्ट होईल असे वाटले. मेलफर्ड स्पिरो यांनी तयार केलेल्या प्रश्नावलीला रॅबकिन यांनी जी उत्तरे दिली त्यांचा सामग्री म्हणून या प्रकरणात उपयोग केलेला आहे. फक्त ही माहिती प्रश्नोत्तररूपाने न देता रॅबकिन आणि स्पिरो यांच्या संयुक्त लेखाच्या स्वरूपातच आम्ही खाली सादर करीत आहो.

## प्रस्तावना

सहा दिवसांचे युद्ध ( १९६७ ) हा एकूण इस्रायली समाजाच्या त्याचप्रमाणे किबुट्झच्याहि इतिहासातला एक परिवर्तनबिंदू म्हणून ठरलेला आहे. किबुट्झमध्ये बराच काळ जे बदल रूप घेऊ पाहात होते त्यांना निश्चित वळण देणारी आणि उत्तेजित करणारी ही घटना १९६० नंतरच्या दशकातील वैचारिक दुफळीपेक्षाही अधिक महत्त्वाची आहे. हे युद्ध म्हणजे दुसऱ्या पिढीने लढलेले युद्ध होते. ह्या सहा दिवसांच्या रक्तपातात आणि गदारोळात आपल्या मनाशी प्रिय म्हणून धरलेली सनातन सत्ये आणि रम्य कल्पना धुळीला मिळाल्याचे पाहूनच ही पिढी युद्धातून बाहेर आली. या सबंध पिढीच्या इच्छा-आकांक्षा अजून धूसर व अस्पष्ट आहेत हे खरे तरीही त्यांचे नवे विचार आणि अनुभव किबुट्झ जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात आविष्कृत होण्यासाठी धडपडत आहेत. नव्या निष्ठांचा ही पिढी शोध घेत आहे आणि असे करीत असताना तिची चित्तवृत्ती विलक्षण द्विधा झालेली आहे. ह्या तरुणांना काय वाटते हे व्होल्टेरच्या एका चमकदार वाक्यात चांगल्या रीतीने व्यक्त झालेले आहे.

" जिवंत माणसांना आपण मान द्यायचा असतो; पण मृतांना आपण सत्याखेरीज काहीही देणे लागत नाही. "

किबुट्झच्या संदर्भात " जिवंत " माणसे म्हणजे अर्थातच आईवडिलांची पिढी. याच पिढीने किबुट्झचा ध्येयवाद जोपासला आणि त्याच ध्येयवादाने त्यांचे जीवन आणि विचार सीमित झाले. " मृत " म्हणजे युद्धात धारातीर्थी पडलेले साथी; यातले सुमारे २०० ( म्हणजे एकूण मृतांच्या चौथ्या हिश्शापेक्षाही जास्त ) किबुट्झचे सदस्य होते. कित्येत येदिदिमची पाच जवान पोरे या युद्धात कामास आली आणि त्यानंतर तर अनेक. अशा अवस्थेत तात्त्विक समस्या, दीर्घकालच्या योजना, किबुट्झ शिक्षणपद्धतींची चर्चा इत्यादी गोष्टींवरचे सर्वांचे लक्ष उडून जाऊन युद्धाच्या धक्क्यामुळे त्यांच्यामध्ये जास्त अंतर्मुखता निर्माण झालेली आहे यात काही आश्चर्य नाही. एकवीस वर्षांचा एक तरुण म्हणाला : " अगदी थोड्या दिवसांच्या अवधीत आम्ही खूप वर्षांची मजल मारली. आम्ही फार वेगाने मोठे झालो. ( वयानुरूप ) आमचे व्यवहार चालूच आहेत पण आता काही आम्ही लहान मुले राहिलेलो नाहीत. " त्याच्या या उद्गारांत त्याचप्रमाणे त्याच्या वयाच्या इतर अनेकांच्या विचारांत, एका विदारक क्षणी आपले संपूर्ण बाल्य उध्वस्त झाल्याची जाणीवच पुरेपूर भरलेली आढळली.

या युद्धाच्या क्षणापर्यंत ही धाकटी पिढी थोरल्या पिढीच्या पराक्रमाच्या कथांवर पोसली जात होती. कारण थोरली पिढी संस्थापकांची, १९४८ च्या स्वातंत्र्य-सैनिकांची, सिनाईच्या वीरपुरुषांची अशी होती. आता मात्र एकदम आपण आपली स्वतःची लढाई लढत आहोत आणि जे पराक्रम कालपर्यंत जुन्या पिढीचे म्हणून आपल्याला उदाहरण म्हणून सांगण्यात येत होते ते पराक्रम आज आपणच करीत आहोत असे त्यांच्या ध्यानात आले. या युद्धाचे वीरपुरुष दुसरे तिसरे कोणी नसून ते स्वतःच होते. जेरुसलेमच्या दगडांवर त्यांचे स्वतःचेच रक्त सांडलेले होते आणि योद्धे म्हणून त्यांनी आपली पात्रता सिद्ध केलेली होती. इतके दिवस जुन्या पिढीला त्यांच्याविषयी निराशा वाटत असे आणि त्यामुळे त्यांच्याही मनात ताण निर्माण होत. पण या प्रक्षोभक घटनेने या ताणांतून त्यांची मुक्तता झाली. ( पृष्ठ १९७–२०० पाहा ).

१९६७ जानेवारीमध्ये जो किबुट्झ दृष्टीस पडत असे त्यात एक प्रकारचा निरुत्साह आणि प्रवाहपतितत्व जाणवत असे. अतिरिक्त विस्तार आणि चलनवाढ यांच्या मागोमाग आलेल्या तीव्र आर्थिक घसरणीमुळे एकूण इस्रायली समाजात जी चिंताग्रस्तता पसरलेली होती तिचीच छाया किबुट्झमध्येही पडलेली होती. १९५६ च्या सिनाई मोहिमेनंतरच्या दहा वर्षांचा काळ सापेक्षपणे शांततेचा होता. या काळात संस्थापकीय जिद्द मंदावली होती आणि देशाला आपल्या समोरचा मार्ग स्पष्ट दिसत

नव्हता. संस्थापकांचा बहुतेक असंतोष तरुण पिढीवर केंद्रित झालेला होता. या पिढीला काहीजणांनी " डिस्कोथे पिढी " असे नाव दिले होते. कारण त्यांच्या मते ती सुखप्रवण असून मौजमजेत रमणारी आहे.

किबुट्झमधली स्थिती संपूर्णपणे अशी नसली तरी बरीचशी याच प्रकारची होती. संस्थापकांच्या पिढीत निरुत्साहाची भावना भरलेली असून कालगतीबरोबर ती अधिकच दाट होत चाललेली होती. त्या निरुत्साहाची कारणे पुढीलप्रमाणे सांगता येतील. निसर्गक्रमाने संस्थापक वयस्क होत चालले होते आणि त्यांच्या शारीरिक शक्ती ओसरू लागलेल्या होत्या; आर्थिक पेचप्रसंगामुळे कारखान्यामधले काम कमी झाले होते आणि उत्पादनाला आपला हातभार लागत नाही याची रुखरुख त्यांना सतावीत होती; ध्येयवादात्मक प्रश्नांत त्यांचा स्वतःचाच रस कमी झाला होता आणि त्यामुळे त्यांच्या मनात एक भावनात्मक पोकळी निर्माण झाली होती; खऱ्या (म्हणजे सरकारी) सत्तास्थानांपासून आपण लांबच आहोत या जाणिवेमधून त्यांना एका सततच्या वैफल्याने ग्रासले होते. त्या त्यांच्या वैफल्याची छाया तरुण पिढीविषयीच्या त्यांच्या दृष्टिकोणावरही पडलेली होती. या पिढीविषयी त्यांचे मत असे होते की एका वैभवशाली परंपरेचे वारस असूनही त्यांना तिच्याविषयी कृतज्ञता म्हणून नाही. ते किबुट्झमध्ये राहताहेत याचे कारण एवढेच की, " त्यांचा तिथे जन्मच झालेला आहे, " ध्येयावरची निष्ठा म्हणून काही ते तिथे राहिलेले नाहीत.

सहा दिवसांच्या युद्धाने हे ताण संपुष्टात आले. पण युद्धाने सगळेच काही बदलले असे नाही आणि किबुट्झमध्ये जे जे बदल आले ते सर्व युद्धामुळेच आले असेही नाही. सिनाई मोहिमेसारख्या इतर ऐतिहासिक घटनांनीही आपला प्रभाव किबुट्झ जीवनावर पाडलेला आहे. शिवाय किबुट्झ-अंतर्गत घटनांचेही परिणाम झालेले आहेत. अंतर्गत बदल असे की, आता जीवनाचे अधिक " स्वाभाविकीकरण " झालेले आहे, राहणीमान वाढलेले आहे, नव्या जबाबदाऱ्या आल्या आहेत., तांत्रिक सुधारणांचे धक्के बसले आहेत. वृद्ध माणसांची पिढी " एकाएकी " नजरेस दिसू लागली आहे, किबुट्झचा आकार आणि गुंतागुंत वाढलेली आहे. किबुट्झ-साथींच्या पारंपरिक वीरप्रतिमेचे काहीसे अवमूल्यन झालेले आहे, किबुट्झ समाजाचा बाह्य जगाशी अधिकाधिक संबंध आलेला आहे, शिक्षणाची पातळी वाढली आहे, खाजगी जीवनाला संस्थात्मक स्वरूप देण्यात आले आहे. या सर्व घटनांचा परिणाम किबुट्झवर झालेला आहे.

गेल्या वीस वर्षांत किर्यात येदिदिममध्ये जे बदल घडले त्यांना चेतना देणारी कारणे कोणती ते आपण वर पाहिले. आता प्रत्यक्ष जे बदल झाले आहेत त्यांच्या अभ्यासाकडे आपण वळूया. अर्थात् बदलांचा वेध घेत असताना ज्या गोष्टींत सातत्य राहिले आहे त्यांचेही भान आपणास ठेवावे लागेल.

## विचारप्रणालीतील बदल आणि सातत्य

**ज्यू धर्म :** पारंपरिक ज्यू संस्कृतीबद्दल पूर्वी असलेला दृष्टिकोण बदलल्याची खूण किर्यात येदिदिममध्ये दिसत नाही. खरे म्हणजे वृद्ध माणसांमध्ये आपल्या संस्कृतीच्या मूलस्रोतांकडे नजर वळविण्याची स्वाभाविक ऊर्मी असते, पण त्यांच्यातही ती दिसत नाही; त्यांचे बोलणे ऐकत असताना ज्यूधर्माविषयी बाजूचे किंवा विरोधी असे काहीही कानावर पडत नाही. साब्रांमध्येसुद्धा धर्मजिज्ञासेचे काही चिन्ह दिसत नाही. उलट, वीस वर्षापूर्वीच्याच प्रवृत्ती अजून टिकून आहेत. उदाहरणार्थ, सिनेमाच्या पडद्यावर एखादा दाढीधारी व टगला घालणारा ज्यू दिसला की सिनेमागृहात उपहासाचे उद्गार अजूनही ऐकू येतात. "दुःखी भिंती" जवळ प्रार्थना चालली असताना एक साब्रा म्हणाला, "शीः! काय चाललंय् त्याचं! मूर्तिपूजा म्हणजे रानटीपणाचा कळस आहे! आणि बायकांना यांनी असं एका बाजूला का ठेवलंय? आणि तो ताईत रे कशाला गळ्यात?" हे उद्गार साब्रांचे प्रातिनिधिक म्हणून समजता येतील. एकूण असे म्हणता येईल की सनातन ज्यू धर्माच्या प्रतीकांविषयी औदासीन्यापासून सरळसरळ विरोधापर्यंत अनेक छटा दिसून येतात. मात्र, पूर्वीप्रमाणेच धार्मिक किबुट्झच्या सदस्यांविषयी, कुरकुरत का होईना, कौतुक व्यक्त केले जाते. त्यांचं एक भोळसट धर्मप्रेम सोडले तर ते चांगले आणि एकनिष्ठ कार्यकर्ते आहेत अशी त्यांच्याबद्दल भावना असते. शिवाय साब्रांना त्यांच्या ज्ञाननिष्ठेचाही काहीसा दरारा वाटत असतो, मग ते ज्ञान धार्मिक का असेना. धार्मिक किबुट्झचे सदस्य एक तास अगोदर उठतील पण बायबलचे वाचन चुकवणार नाहीत! – अशी त्यांची या बाबतीतली प्रतिक्रिया असते.

सर्व इस्रायली युवकांमध्ये –– आणि याला किबुट्झचे युवकही अपवाद नाहीत––आपण कोणत्या दिशेला चाललो आहोत याचा प्रखर शोध चालू आहे. पण अजूनही या शोधबुद्धीने धार्मिक वळण घेतलेले नाही. याउलट दुसऱ्या बाजूला असेही दिसते की पारंपरिक प्रतीके आजच्या जीवनात पुन्हा प्रविष्ट करून घ्यावीत अशी इच्छा निदान काही युवकांमध्ये उत्पन्न झालेली आहे. उदाहरणार्थ सबाथची संध्याकाळ बाकीच्या कामाच्या आठवड्यापासून स्पष्टपणे वेगळी भासेल अशा रीतीने साजरी करावी आणि त्यासाठी जरूर तर मेणबत्त्याही लावाव्या असे काहींना वाटते. एकजण म्हणाला, "काही म्हणा, हा एक वेगळा प्रसंग आहे –– नुसता धार्मिकच म्हणू नका त्याला –– आणि तो खास पद्धतीनंच साजरा व्हायला पाहिजे."

**झिऑनवाद :** साब्रांची मने आपल्या देशाशी पूर्णपणे एकरूप झालेली असली तरी ह्या ऐकात्म्याचा झिऑनवादी विचारसरणीशी फारसा संबंध नाही. उलट भूमीविषयीची एक प्रकारची तरल संवेदना, सैन्यातला अनुभव आणि जगातल्या इतर देशांचे क्रौर्य आणि त्यांचे डावपेच यांच्याविरुद्ध उभारलेले एक मानसिक संरक्षक

करून यांमधून हे ऐकात्म्य उत्पन्न झालेले दिसते. संरक्षणाची भावनासुद्धा काहीशी द्विधा वृत्तीची आहे कारण, नाही म्हटले तरी, बाह्य जगाचे त्यांना अजूनही बरेचसे आकर्षण आहे. ह्या बाह्य आकर्षणामुळे निर्माण होणारा मानसिक विसंवाद कमी करायचा तर आपल्याच संस्कृतीचे बडेजाव वाढवण्याखेरीज दुसरा चांगला मार्ग कोणता? अर्थात् साब्रांचा राष्ट्रवाद खूप प्रखर आहे यात शंका नाही, पण ह्या राष्ट्रवादाचा संबंध झिऑनवादाशी असण्यापेक्षा सुरक्षिततेशी जास्त आहे.

विदेशी ज्यू साब्रांना परके वाटतात आणि ते तसे आहेतही. इस्रायली आणि बिगर-इस्रायली ज्यूंना एकच वंशनिदर्शक नाव असल्यामुळे त्या दोघांचा संबंध आहे ही गोष्ट अर्थातच त्यांच्या नजरेतून सुटू शकत नाही. पण जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात इस्रायली आणि बिगर-इस्रायली ज्यूंमध्ये त्यांना इतके फरक दिसून येतात की हा वांशिक एकात्मतेचा बंध त्यांना फारसा जाणवत नाही. साब्रांच्या भाषणात झिऑनवादी विचारांचा उल्लेख फारसा येत नाही आणि आलाच तर अत्यंत स्थूलपणे किंवा अर्धवट चेष्टेच्या सुरात येतो. झिऑनवादाचे दूत म्हणून जे परदेशी जातात तेसुद्धा त्या विचारसरणीने काही विशेष रीतीने प्रभावित झालेले आहेत असे दिसत नाही. आपण परदेशी मुलांना शेतीच्या जीवनासाठी तयार करीत आहोत, (या बिचकलेल्या पोरांना) श्रमनिष्ठा शिकवीत आहोत आणि त्यांच्यावर इस्रायली (ज्यूइश नव्हे) संस्कृतीचा संस्कार करीत आहोत एवढ्याचा त्यांना आनंद असतो. आपण ज्या मुलांना शिकवीत आहोत त्यांनी इस्रायलमध्ये जावे आणि इस्रायली बनून जावे एवढीच त्यांची इच्छा असते, देशाला मनुष्यबळाची जरुरी आहे हे त्यांना ठाऊक असते, आणि बाहेरच्या देशातून आपल्या देशात लोक यावेत असा त्यांचा फारसा कटाक्ष नसला तरी जे कोणी येतात ते शहरात गर्दी करणाऱ्या "वाटेल त्या" लोकांपेक्षा आपण शिकवून तयार केलेले असावेत हे अधिक बरे असेही त्यांना वाटते. इस्रायलला येण्याबाबत आपण कोणाचे मन वळवू शकलो तर त्याबद्दलचे समाधानही काहींना वाटते आणि त्यामुळे आपली जीवनसरणी श्रेष्ठ आहे असा दिलासाही त्यांना मिळतो. वर वर्णन केलेला झिऑनवादाविषयीचा साब्रांचा दृष्टिकोन हा त्यांच्या "स्वाभाविकीकरणाचा" परिणाम आहे. 'झिऑनवाद' म्हटले की त्याचा पर्यायही मनात उभा राहतो. पण स्वाभाविकीकरण झालेल्या साब्रांना असा पर्यायच उपलब्ध नाही कारण झिऑनवादाची ध्येये त्यांच्या आयुष्यात अगोदरच मूर्त झालेली आहेत. त्यामुळे त्यांच्या दृष्टीने झिऑनवाद हा एक मृतप्राय झालेला विषय आहे.

**मार्क्सवाद आणि सोव्हिएत प्रेम :** साम्यवाद, सोव्हिएत यूनियनचे नव्या समाजरचनेतले नेतृत्व, जागतिक क्रांती हेही प्रश्न आता मागे पडल्यातच जमा आहेत, पण याची कारणे मात्र वेगळी आहेत. १९६७ च्या जूनपर्यंत काही संस्थापकांना सोव्हिएत यूनियनविषयी काहीशी जवळीक वाटत असे. या जवळीकीची तीन कारणे

होतो. एक, मार्क्सिस्ट तत्त्वज्ञानाचे त्यांना कायम असलेले आकर्षण; दोन, इस्रायलच्या स्वतंत्र राष्ट्राच्या उभारणीसाठी रशियाने केलेल्या मदतीची आठवण; आणि तीन, रशियन राज्यक्रांतीत सुप्त असलेले नव्या जगाचे आश्वासन.

मध्यपूर्वेबाबतचे आणि रशियातील ज्यूंविषयीचे सोव्हिएत धोरण जेव्हा त्यांच्या खऱ्याखुऱ्या स्वरूपात संस्थापकांच्या ध्यानात आले तेव्हा त्याचे काही सुखदुःखमिश्रित परिणाम झाले. युद्धानंतर भरलेल्या एका किबुट्झ सभेत एका सदस्येने तावातावाने सांगितले की, "या जन्मी पुन्हा म्हणून आपण 'आंतरराष्ट्रीय गीत' (इंटरनॅशनल) गाणार नाही. आणि किबुट्झच्या समारंभातून लाल बावटा कधीही फडकवला जाऊ नये." (१९६८ च्या स्वातंत्र्य दिनाच्या समारंभात आंतरराष्ट्रीय गीत गायिले गेले पण ज्यांनी त्या गायनात भाग घेतला ते लज्जित झालेले दिसले. गायनात भागही फारच थोड्यांनी घेतला.) ग्रंथालयाने सर्व सोव्हिएत नियतकालिकांच्या वर्गण्या रद्द करून टाकल्या. मात्र पुढे त्या पुन्हा चालू करण्यात आल्या आणि त्यावेळी असे कारण देण्यात आले की एवीतेवी ती स्वस्तच असतात आणि सोव्हिएत रशियात काय चालले आहे तेही आपल्याला कळायला पाहिजे.

पण तरुण पिढीला मात्र असल्या कुठल्याही बौद्धिक संस्कारांची जरूरच नव्हती. लढाईच्या सहा दिवसांत त्यांनी 'कालाश्निकॉव्ह' बंदुकींच्या नळ्यांत डोकावून पाहिले होते, 'एम्-१५' रणगाड्यांशी धडक दिलेली होती आणि 'मिग-२१' विमानांशी ते आकाशात झुंजले होते. त्यापूर्वी त्यांच्यात काही सोव्हिएत प्रेम शिल्लक असेलच तर त्याचा संपूर्ण निकाल या घटनेने झाला असे म्हणायला हरकत नाही.

या ग्रंथात असे भाकित केलेले होते की, सोव्हिएत यूनियनने आपल्या ऐतिहासिक कार्याचा विश्वासघात केला तर किबुट्झची स्वतःवरचीच श्रद्धा ढासळेल. (वर पृ. १४८ पाहा.) पण ते भाकित खोटे ठरले आहे. याहून महत्त्वाची गोष्ट अशी की सोव्हिएत यूनियनशी असलेले बंध तुटल्यामुळे ध्येयवादी दृष्टीच्या सात्रांचे मानसिक दास्य संपलेले आहे. आपणापेक्षा काही एका मोठ्या भव्य कर्तृत्वाच्या छायेत आपण वावरत आहोत असे त्यांना आता वाटत नाही. सोव्हिएत यूनियननेच खरा समाजवाद निर्माण केला आणि त्यानंतरचे किबुट्झ धरून सगळे समाजवादी प्रयोग म्हणजे सोव्हिएत समाजवादाच्याच निकृष्ट प्रतिकृती आहेत असे जे आजपर्यंत त्यांना वाटत होते ते आता त्यांना वाटत नाही. कारण सोव्हिएत यूनियनने खरा समाजवाद निर्माण केलेलाच नाही हे त्यांना पटलेले आहे. आता जगातल्या इतर देशांनाही किबुट्झचे महत्त्व वाटू लागल्यामुळे त्याचे अनन्यत्व त्यांच्या ठसठशीतपणे ध्यानात आले आहे. जगातल्या अनेक देशांनी शेतकी वसाहती स्थापन करण्यासाठी किबुट्झ चळवळीची मदत मागितलेली आहे आणि आफ्रिकन नेत्यांनी आपल्या देशबांधवांसमोर आपण किबुट्झचाच आदर्श ठेवला असल्याचे सांगितले आहे. तात्त्विक पद्धतीचे

शिक्कामोर्तब झाले ते सार्त्रे ह्या एक नामवंत विचारवंताकडून. किबुट्झला भेट दिल्यावर सार्त्रेने असे उद्गार काढले की समाजवादी विचारांचा खरा आविष्कार किबुट्झमध्ये झालेला आहे. ( म्हणजेच सोव्हिएत युनियनमध्ये नाही ).

सोव्हिएत साम्यवादापेक्षा आपला किबुट्झ समाजवादच श्रेष्ठ आहे ही भावना पुढे दिलेल्या घटनेने अधिकच दृढ झालेली आहे. एका किबुट्झ भेटीत सोव्हिएत अधिकाऱ्यांनी आम्हाला किबुट्झ मधले एक ' प्रातिनिधिक ' घर पाहायचे आहे असे सांगितले आणि त्यांना एका नव्याने बांधलेल्या दोन खोल्यांच्या घरात नेण्यात आले. ते पाहून त्यांचा विश्वास बसेना; त्यांच्या बोलण्याचा अभिप्राय असा होता की, हे घर कोणातरी किबुट्झ " अधिकाऱ्याचे " असले पाहिजे. किबुट्झमध्ये नोकरशहांचा वेगळा लाडवलेला गट अस्तित्वात नाही असे जेव्हा त्यांना सांगण्यात आले तेव्हा त्यावरही त्यांचा विश्वास बसेना. सर्वात कळस असा की त्यांना दुग्धशाळेत नेण्यात आले आणि सांगण्यात आले की तेथल्या गायी वर्षाकाठी सरासरी सात हजार लिटर दूध देतात; यावरही विश्वास ठेवणे त्यांना कठीण गेले कारण सोव्हिएत गायींची उत्पादनशक्ती याच्या फक्त निम्मी आहे.

## आर्थिक आणि राजकीय क्षेत्रामधील बदल आणि सातत्य

**समाजवाद आणि सामूहिक मालकी :** कियांत येदिदिममध्ये किबुट्झ पद्धतीचा समाजवाद अजून चांगलाच जागृत आहे हे खरे पण १९६३ च्या आवृत्तीला जोडलेल्या प्रस्तावनेत नमूद केलेले बदलही वेगाने होत आहेत. इतर बाबींप्रमाणे या बदलाच्या मागेही सहा दिवसांच्या युद्धाची प्रेरणा आहे. खाजगी मालकीच्या वस्तू आणि खाजगी मालकीविषयीची सहिष्णुता या दोन्हींमध्ये लक्षात येण्यासारखी वाढ झालेली आहे. १९५६ शी तुलना करता हा बदल क्रांतिकारकच म्हणावा लागेल. त्याबद्दल कुरकूर करणारे काही दुराराध्य लोक आहेत पण त्यांची संख्या थोडी आहे. आणि ते सगळे जुन्या पिढीपैकी आहेत. तरुण पिढीत ह्या बाबतीत काही थोडेसे तणाव दिसतात पण त्याचे कारण खाजगी मालकीचे तत्व हे असण्यापेक्षा तीमधून निर्माण होणारी विषमता व अधिक भाग्यवान लोकांविषयीचा मत्सर हे आहे. पण एकूण विचार करता असे दिसते की मिअरला नवा टेपरेकॉर्डर आणि कॅमेरा मिळाला, यिगारला फरच्या कॉलरीचा कोट मिळाला, साराला नवीन रंग मिळाला किंवा याकोव्हला सायकल मिळाली अशा घटनांवर आता फारसे भाष्य होत नाही. प्रशाळेतले काही तीव्र भावनेचे विद्यार्थी अशा खाजगी संग्रह करण्याच्या प्रवृत्तीला ' तत्त्वच्युती ' म्हणतात हे खरे पण त्यांनाही आपल्या वडिलांचा नवा पेंटॅक्स ( कॅमेरा ) वापरायला मिळाला म्हणजे आनंदच होतो.

खाजगी मालमत्तेत ही वाढ होऊनही फारसे संघर्ष निर्माण झाले नाहीत याची निदान चार तरी कारणे आहेत. ( १ ) ज्यांना अशा वस्तू मिळालेल्या आहेत ते

त्यांचे डामडौलाने प्रदर्शन करीत नाहीत, शिवाय एखाद्याने त्या वापरायला मागितल्या तर देतातही. ( २ ) अशा वस्तूंच्या संग्रहामुळे सदस्याचे समाजातले स्थान काही मोठे ठरत नाही. सदस्याचा समुदायाच्या कामाला जो हातभार लागतो तोच महत्त्वाचा गणला जातो. ( ३ ) खाजगी मालकीला आता एकूण तत्त्वप्रणालीतच स्थान मिळाले आहे. " प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणे " ह्या तत्त्वाचाच तो विस्तार आहे असे समजले जाते. उदाहरणार्थ, संगीतज्ञाला टेपरेकॉर्डर पाहिजेच. एवढेच नव्हे तर खाजगी आणि सार्वजनिक क्षेत्रे एकमेकांशी विसंवाद न येता एकदमच वाढू शकतात असेही आता मानले जाते. या विचारात धोके नाहीत असे बहुधा कोणी म्हणणार नाही पण समुदायाच्या विकासाबरोबरच व्यक्तीचाही विकास झाला पाहिजे ह्या विचाराने आता इतके मूळ धरले आहे की तो नष्ट होईल असे वाटत नाही. ( ४ ) अशा वस्तूंचा पुरवठा करण्याइतपत आपले राहणीमान वाढलेले आहे हीसुद्धा किबुट्झच्या दृष्टीने अभिमानाची गोष्ट ठरलेली आहे.[1] ह्या अभिमानाला अर्थातच थोडासा मानसशास्त्रीयदृष्ट्या " संरक्षक " अर्थ आहे. किबुट्झवासींना असे वाटते की शहरातल्यापेक्षा आपले राहणीमान फार मागे पडता कामा नये; कारण तसे झाले तर लोक सोडून जातील अशी भीती त्यांच्या मनात असते.

खाजगी मालमत्तेत वाढ झालेली असली तरी किबुट्झची मूलभूत समाजवादी धारणा पूर्वीप्रमाणेच बळकट आहे, म्हणजे उत्पादन साधनांची मालकी सामाजिकच असली पाहिजे यावर त्यांचा जोर कायम आहे. आईबापांप्रमाणेच मुलांच्या दृष्टीनेही सामूहिक मालकी ही एक सुसंगत, टिकाऊ आणि सन्मान्य अशी जीवनपद्धती आहे. किबुट्झ सदस्यांशी किबुट्झच्या भवितव्याविषयी जेव्हा जेव्हा बोलणे निघते तेव्हा तेव्हा सामूहिक मालकीचे काय होईल याबद्दलची चिंता त्यांच्या भाषणांतून व्यक्त होत नाही. खाजगी *उपभोग* जरी इष्ट म्हणून गणला जात असला तरी खाजगी *उत्पादन* कोणालाही इष्ट वाटत नाही. एखाद्या स्वभावतः किंवा असंतुष्ट सदस्याला असे एखाद्या वेळी वाटेल की आपल्या मालकीचा एक ट्रक असावा. पण त्याबरोबर त्याच्या असेही लक्षात येईल की जर खरोखरच असे झाले तर एकूण हिशोबात काम जास्त आणि मिळकत कमी अशी त्याची स्थिती होईल.

सारांश, समाजवादी जीवनसरणीवरचा विश्वास पूर्णपणे शाबूत आहे. समाजवादाच्या चौकटीत व्यक्तीला आपल्या विकासाची मोकळीक असली म्हणजे झाले. तसे

---

१. वाचकांच्या ध्यानात असेल की वीस वर्षांपूर्वी एकाने रेफ्रिजरेटर आणला म्हणून किबुट्झमध्ये एक छोटासा पेचप्रसंगच निर्माण झाला होता ( वर पृ. १६६ पाहा ). आज तीस वर्षांहून अधिक वय असलेल्या *प्रत्येकाला* एक लहानसा रेफ्रिजरेटर देण्यात आलेला आहे. ही गोष्ट त्या क्षेत्रातील मूलभूत वैचारिक बदलाचीच द्योतक आहे.

असेल तर समाजवाद ही एक श्रेयस्कर आणि न्याय्य जीवनपद्धती आहे अशी त्यांची खात्री आहे. मुख्य बदल दृष्टिकोणात झालेला आहे, वागणुकीत नव्हे. एकूण किबुट्झ मूल्यांबाबतच हे जसे खरे आहे तसेच समाजवादाबद्दलही. ज्या आवेगाने पूर्वी समाजवादाचे समर्थन केले जात असे तो आवेग आता राहिलेला नाही आणि याचे कारण असे की समाजवाद तिथे आहे ही वस्तुस्थितीच आहे आणि म्हातारे असोत किंवा तरुण असोत, सार्थींच्या दृष्टीने तेवढे पुरेसे आहे.

**अपरिग्रही वृत्ती :** खाजगी मालकीमध्ये झालेल्या वाढीत केवळ मालकी-हक्काच्या वस्तूंबद्दलच्या दृष्टिकोणातलाच बदल नव्हे तर एकूण उपभोग्य वस्तूंबद्दलच्या दृष्टिकोणातलाही बदल प्रतिबिंबित झालेला आहे. खाजगी मालकीहक्काच्या रूपाने ज्या वस्तू किबुट्झमध्ये प्रविष्ट झालेल्या आहेत त्या बहुतेक "चैनीच्या" वस्तू आहेत. किबुट्झने आपली पूर्वीची अपरिग्रही वृत्ती जवळ जवळ टाकून दिलेली आहे. अर्थात तिच्या काही खुणा अजून शिल्लक आहेत यात शंका नाही. ह्या ज्या खुणा आहेत. त्यांवरून कधी कधी अपरिग्रही परंपरेची मुळेही ध्यानात येतात. उदाहरणार्थ, प्रशाळेतली काही ध्येयवादी विचारांची मुले किबुट्झमधल्या नव्या उपभोग पद्धतीवर टीका करताना आढळतात. ह्या किशोरवयाच्या मुलांना असे वाटते की किबुट्झ आपल्या जुन्या निष्ठांपासून दूर जात आहे: काबाडकष्ट, ध्येयनिष्ठा, आणि किबुट्झ जीवनातली मूळची सामूहिक वृत्ती, यांना मागे टाकून सार्थी आता अधिक उपभोग-प्रवण झाले आहेत, इत्यादी. पण ह्या बाबतीत एक लक्षात ठेवले पाहिजे की मुलांची ही अपरिग्रही वृत्ती, शालेय शिक्षण संपताच आणि पहिला लैंगिक अनुभव येताच नष्ट होते. ( ह्यावरून असेही ध्यानात येईल की अपरिग्रह हा वैषयिक वासनांच्या विरुद्ध उभारलेला एक मानसिक कोटच आहे. )

याठिकाणी हे स्पष्ट केले पाहिजे की अपरिग्रही परंपरा लुप्त झालेली असली तरी तिची जागा एका वेगळ्या आणि तितक्याच अतिरेकी तत्त्वज्ञानाने घेतलेली नाही. अपरिग्रही वृत्ती संपलेली आहे याचा अर्थ एवढाच की नवीन गरजा व अपेक्षा वाढलेल्या आहेत आणि दैनंदिन जीवनात काही वैचित्र्य असावे, जिवंतपणा असावा असे सार्थींना वाटू लागले आहे. ह्या प्रवृत्तींची काही उदाहरणे देण्यासारखी आहेत. स्त्रियांचे कपडे, दागदागिने, आणि प्रसाधने यांविषयीचा दृष्टिकोण बदललेला आहे. शुक्रवारी संध्याकाळी ही गोष्ट विशेष रीतीने ध्यानात येते कारण त्यावेळी जेवणघरात शिरत असताना त्यांच्याकडे सगळ्यांची नजर असते. त्या कशा दिसतात आणि कसले कपडे त्यांनी घातले आहेत यावर भाष्य सुरू होते. सबाथच्या जेवणाच्या वेळी नवे कपडे, कोट, अंगठ्या, गळसऱ्या, कर्णभूषणे अशी आभरणे स्त्रियांच्या अंगावर दिसतात. ह्या गोष्टी सर्वसंमत झालेल्या आहेत एवढेच नव्हे तर त्या सामूहिक अभिमानाचाही विषय ठरलेल्या आहेत. "बघा, अगदी शहरातल्या बायकांसारखे

कपडे आम्ही घालतो की नाही ? " [२] असे स्त्रिया म्हणतात. हल्ली किबुट्झमध्ये एक केशरचनाकार आहे, स्त्रियांची शरीरसौष्ठव मंडळे आहेत, आणि सौंदर्य प्रसाधनांचा वापर मोठ्या प्रमाणावर होत आहे.

ह्या बदलामागचे बरेचसे कारण युद्ध हेच आहे. युद्धानंतर जी एक महत्त्वपूर्ण प्रतिक्रिया घडून आली तीमुळे पेहेरावामध्येच नव्हे तर माणसांच्या परस्पर संबंधांमध्येही बदल घडून आलेला आहे. ही प्रतिक्रिया अनेक प्रकारांनी वर्णिता येईल. " आज जगून घेऊया, कारण उद्या मरायचेच आहे, " ही भावना याच्यामागे आहे. एवढी मोठी घटना ( युद्ध ) घडलेली असताना कालबाह्य बंधने आणि लहानसहान उपचार हास्यास्पद वाटू लागले आहेत; दैनंदिन जीवन ज्यांनी बराच काळ झाकळून टाकले होते असे ताण संपल्यामुळे जे एक मुक्ततेचे वातावरण निर्माण झाले आहे त्यामधूनही ही वृत्ती निर्माण झालेली आहे.

अपरिग्रही वृत्तात शैथिल्य आल्यामुळे झालेले काही परिणाम किबुट्झच्या दृष्टीने फारसे उपकारक ठरलेले नाहीत. उदाहरणार्थ, मजा मारण्याच्या मोहात वाहावत जाऊन काही सात्रांनी किबुट्झची मूल्ये उल्लंघिलेली आहेत. बरीच तरुण मुले बाहेर पैसे मिळवतात आणि त्यातून आपल्याला हव्या त्या वस्तू विकत घेतात किंवा तेल अवीवला जाऊन रात्र जल्लोषात घालवितात. ( जे किबुट्झच्या बाहेर पूर्णवेळ किंवा अर्धवेळ काम करतात त्यांना हे काहीच अवघड नसते. ) एकजण म्हणाला, " आम्हांला वर्षाकाठी दीडशे पौंडाचा भत्ता मिळतो. तो इतका थोडा आहे की मी ते सगळे पैसे तेल आवीवमध्ये एका रात्रीत उडवून टाकीन. " अशा गोष्टी करणारी मुले बहुधा त्यांची चारचौघात वाच्यता करीत नाहीत. पण बहुतेकांना हे माहीत असते यात शंका नाही. ह्या बदलाचा किबुट्झच्या दृष्टीने दुसरा अपायकारक परिणाम म्हणजे बरेच सदस्य आपल्या घरांची शोभा वाढविण्यासाठी खूप वेळ आणि पैसा खर्च करतात आणि त्यामुळे घरीच जास्त वेळ काढण्याची त्यांची इच्छा अधिक प्रबळ होते.

ह्या बदलाबाबत शेवटची गोष्ट सांगायची ती अशी की किबुट्झचा परिसर जास्त सुंदर करण्यावर पूर्वीपेक्षाही अधिक जोर दिला जात आहे, एवढेच नव्हे तर ह्या कामासाठी कसलीही कमतरता पडू दिली जात नाही. किबुट्झचे सौंदर्य हा सगळ्यांचा अभिमानाचा विषय आहे आणि आज पूर्णवेळचे परिसर-शोभातज्ज्ञ आणि माळी किबुट्झच्या परिसराची देखभाल करीत आहेत. ज्या अर्थव्यवस्थेत मजुरांची टंचाई

---

२. आपण शहरात गेल्यावर कसा दिसतो याबद्दल किबुट्झमधल्या स्त्रिया काहीशा संवेदनाशील असतात. कारण त्यांच्या बोलण्यात पुष्कळदा पुढील गोष्ट येते. चांगले कपडे करून त्या शहरात जातात आणि तरीही दुकानदार त्यांना विचारतो, " कुठल्या किबुट्झमधल्या तुम्ही ? "

हा एक सनातन प्रश्न आहे त्या अर्थव्यवस्थेत हे घडत आहे एवढे लक्षात ठेवले म्हणजे झाले.

**श्रमनिष्ठा :** काम आणि त्याच्याविषयीचे दृष्टिकोण यांमध्ये जसे एक महत्त्वाचे सातत्य राहिलेले आहे तसेच काही लक्षात येण्यासारखे बदलही झालेले आहेत. किबुट्झच्या मूल्यश्रेणीतील इतर गोष्टींप्रमाणेच श्रम या गोष्टीभोवतालचे वलय दुसऱ्या पिढीने नष्ट करून टाकले आहे. इतःपर ते एक 'व्रत' किंवा पवित्र कर्तव्य म्हणून समजले जात नाही. माणसे काम करतात कारण तसे करण्यावाचून गत्यंतरच नाही. समूहाचे जीवन त्यावर अवलंबून असते, प्रत्येकाला कष्टकरी म्हणून लहानपणापासून वाढविलेले असते आणि प्रत्येकाच्या दृष्टीने ती एक अपेक्षितच गोष्ट असते. शिवाय किबुट्झचे वातावरणही त्याला पोषक आहेच. हा शेवटचा मुद्दा विशेष महत्त्वाचा आहे. कामाभोवती असलेले अद्भुततेचे वलय जरी नष्ट झाले असले तरी किबुट्झ जीवनाचे ते अजूनही एक मध्यवर्ती मूल्य आहे.

ज्या निष्ठेने साथी आपापली कामे करतात तीत वर सांगितल्याप्रमाणे एक लक्षणीय सातत्य आहे पण श्रमाभोवतीचे गूढ आध्यात्मिक वलय गळून पडले आहे. एखादे काम यंत्राच्या साहाय्याने करता येण्यासारखे असले तर उगाचच्या उगाच काबाडकष्ट करीत बसावे हे आता त्यांना मान्य नाही. जुनी माणसे जुन्याच पद्धतीने काबाडकष्टाची कामे करतात तेव्हा तरुण माणसांना त्यांची कीवच येत असावी असा संशय येतो. तरुणांचा सगळा जोर उत्पादनवृद्धी, कार्यक्षमता, नव्या पद्धती, सुधारणा, यांवर आहे. याचबरोबर कामाविषयी व्यावसायिक दृष्टिकोणही वाढलेला दिसून येतो.

कामाविषयीच्या दृष्टिकोणाबरोबर निरनिराळ्या कामांची प्रतिष्ठाही बदललेली दिसते. अजूनही मोठ्या ट्रॅक्टरवर ( किंवा कॅटरपिलर अर्थ मूव्हरवर ) काम करणाऱ्या माणसाला प्रतिष्ठा असली तरी प्रतिष्ठेची ती अंतिम मर्यादा मानली जात नाही. बौद्धिक काम करणारांविषयीचा आदर वाढत चाललेला आहे, तरीसुद्धा ते काम 'दृश्य' स्वरूपाचे असले पाहिजे अशी अपेक्षा दिसून येते; याचा अर्थ असा की तुम्ही काही बौद्धिक काम करीत आहात असे नुसते ऐकिवात असून उपयोगी नाही; तुम्ही काम करीत आहात हे किबुट्झला दिसले पाहिजे. आपण काम करीत आहोत याची दुसऱ्यावर "छाप पडली पाहिजे" ही गोष्ट किबुट्झमध्ये अजूनही महत्त्वाची आहे.

केवळ किती काम केले याच्यावरून दृश्यता ठरविली जात नाही. काम करणारा प्रत्यक्षात उपस्थित असला पाहिजे. म्हणूनच किबुट्झच्या बाहेर जे काम करतात त्यांच्याविषयी सदस्यांच्या भावना संमिश्र स्वरूपाच्या असतात. अर्थात् असे असण्याला आणखीही काही कारणे आहेत. बाहेर काम करणारा सदस्य एखाद्या वेळी किबुट्झ सोडून जाईल अशी भीती मनात कायम असते आणि असे खरोखरच झाले तर समूहाच्या एकात्मतेला त्यामुळे मोठा धक्का बसेल अशी काळजी असते. ( अशी घटना

अजून एकदाही झालेली नाही ही गोष्ट अलाहिदा.) बाहेर काम करणाराला जे अधिक स्वातंत्र्य मिळते त्याविषयीची असूयाही इतरांच्या मनात असते, आणि त्यामुळे त्या माणसाला आपण खरोखरीच किबुट्झचे आहोत हे सिद्ध करण्यासाठी किबुट्झमध्ये सुद्धा काही तरी काम करण्याची जरूर वाटत असते. मात्र भावना कुठल्याही प्रकारच्या असोत, अशा प्रकारच्या घटना संख्येने वाढत आहेत हे खरे. पूर्णवेळ किंवा अर्धवेळची बाहेरची कामे वाढलेली आहेत एवढेच नव्हे तर त्यांच्यामुळे बाहेरच्या जगाशी येणारा संपर्कही वाढलेला आहे.

१९५० च्या मानाने सामाजिक बाबतीत जरी नव्हे तरी कामाच्या बाबतीत किबुट्झ आता बाहेरच्या जगाला जास्त खुला झाला आहे. एक साथी इस्रायली विमान कारखान्यात काम करीत आहे, दुसरा इस्रायली आकाशवाणीवर नोकरीला आहे. आणखी एकजण अप्पर गॅलिलीपासून एलादपर्यंत व्याप्ती असलेल्या एका यांत्रिक सहकारी संघटनेचे नेतृत्व करीत आहे. एक तरुण साथी दर आठवड्याचे काही दिवस जेरुसलेममध्ये शास्त्रीय संशोधनात घालवतो आणि दुसरा अग्निशामक साधनांच्या सहकारी संस्थेचे व्यवस्थापन पाहतो. फळबागांच्या व्यवस्थापकांना संस्करण आणि निर्यात या बाबतीत बाहेरच्या जगाशी व्यवहार ठेवावा लागतो, परिचारिकांना आंतर-किबुट्झ शैक्षणिक केंद्रावर जाऊन छोट्या शिक्षणसत्रात शिक्षण घ्यावे लागते, दोन मुली विंगेट इन्स्टिट्यूटमध्ये शरीरमर्दनशास्त्र शिकत आहेत, अनेक साथींना तेल अवीव-मधल्या आंदोलनाच्या कामासाठी अमेरिका आणि इतर देशांना जावे लागते.

शिवाय, १९६३ च्या प्रस्तावनेत उल्लेखिलेला किबुट्झचा कारखाना आहेच. सर्व किबुट्झ चळवळीतच उद्योगधंद्यांचे महत्त्व वाढलेले आहे. अलीकडेच तेल अवीव-मध्ये किबुट्झ औद्योगिक उत्पादनाचे एक प्रदर्शन झाले त्यात विसाहून अधिक किबुट्झनी भाग घेतलेला होता. फर्निचर, अन्नसंरक्षक रसायने, फवाऱ्याच्या नळ्या, प्रसाधनगृहातील वस्तू इत्यादी अनेक प्रकारचे उत्पादन किबुट्झमधून केले जाते. एका बाजूला हे सर्व आहे तर दुसरीकडे ह्या घटनेबद्दल काळजी करणारीही मंडळी आहेत. त्यांना अशी भीती वाटते की उद्योगधंद्यांमधून अनेक किबुट्झना खूप पैसा मिळत असला तरी त्यामधून किबुट्झच्या रचनेवर फारसे हितावह परिणाम होणार नाहीत.

किर्यात येदिदिमच्या कारखान्याने डोळ्यात भरण्यासारखे यश संपादन केलेले नाही हे जसे खरे तसेच हेही खरे की इतर किबुट्झमध्ये भाडोत्री मजुरांचा प्रश्न जसा निर्माण झाला आहे तसा या कारखान्यामुळे किर्यात येदिदिममध्ये झालेला नाही. पण हा प्रश्न मुळी अस्तित्वातच नाही असे नव्हे. कारण इतर आर्थिक शाखांमध्ये तो उपस्थित होतो. किबुट्झला मजुरांची टंचाई नेहमीच भासते. आणि (विशेषतः कापणीच्या हंगामाच्या वेळी) ही टंचाई दूर करण्यासाठी भाडोत्री मजूर लावणे एवढा एकच उपाय उरतो. पण यांतून पूर्वीचेच नैतिक प्रश्न निर्माण होत आहेत आणि पूर्वी-

चीच उत्तरे दिली जात आहेत–" करणार काय ? पिके तर वेळच्या वेळी निघायला पाहिजेत ! " शिवाय असाही युक्तिवाद केला जातो की इतरत्र घेतले जाणारे भाडोत्री मजूर आणि किबुट्झने घेतलेले भाडोत्री मजूर यांत फरक आहे कारण किबुट्झचे सदस्य भाडोत्री मजुरांच्या खांद्याला खांदा लावून काम करीत असतात.

**किबुट्झ प्रशासन आणि वर्गविहीन समाज :** चौथ्या प्रकरणात वर्णिलेली किबुट्झ प्रशासनाची रचना फारच थोडी बदललेली आहे. आता एकाऐवजी दोन चिटणीस निवडतात, एक मोठ्या वयाचा आणि एक तरुण. या नव्या व्यवस्थेत किबुट्झ समाजातील लोकसंख्यात्मक बदल प्रतिबिंबित झालेला आहे. त्याचप्रमाणे सात्रांचे प्रश्न आणि गरज कळणारे कोणीतरी असावयास हवे याचीही दखल घेण्यात आलेली आहे. निरनिराळ्या पदांसाठी माणसांची मने वळविणे पूर्वीइतकेच अजूनही कठीण आहे आणि याचे कारणही पूर्वी होते तेच आहे. ज्या जागांत जबाबदारी जास्त आहे पण तिची भरपाई करणारे लाभ नाहीत अशा जागांचे सर्वसाधारणपणे कुणालाही आकर्षण नाही. तरीही हे खरेच की अखेरीस प्रत्येक पदासाठी कुणी ना कुणी पदाधिकारी मिळतोच.

सचिवालय आणि समित्या यांच्या कार्यामध्ये लोकसंख्यावाढीमुळे एक महत्त्वाचा बदल झालेला आहे. पूर्वी जे प्रश्न ग्रामसभेपुढे आणले जात असत त्यांची आता सचिवालयाकडूनच तपासणी होते आणि तीसुद्धा गुप्तपणे. ह्या नव्या पद्धतीमुळे नुसताच वेळ वाचतो असे नाही तर सामूहिक निर्णयाची मूलभूत पद्धत कायम राहूनही व्यक्तींना आपल्या प्रश्नांचा खाजगीपणा या पद्धतीत सांभाळता येतो. शिवाय प्रश्नांची चर्चा करण्यासाठी सचिवालय ही जागा जास्त योग्य आहे असेही म्हटले पाहिजे. खरी गोष्ट अशी की प्रत्येक प्रश्नावर सर्व किबुट्झने मतदान करण्याच्या पद्धतीवरचा लोकांचा विश्वास अधिकाधिक उडत चाललेला आहे. विशेषतः जे प्रश्न ( मूलतः वैयक्तिक स्वरूपाचे ) अनेकांना कळत नाहीत आणि ज्यांवरची त्यांची प्रतिक्रिया केवळ यांत्रिक असते, अशा प्रश्नांबाबत हे जास्तच खरे आहे. असे असले तरी अजूनही किबुट्झच्या समाजरचनेमध्ये ग्रामसभा ही एक महत्त्वाची आणि कार्यशील अशी संस्था आहे. ग्रामसभा म्हणजे ज्यात अर्थव्यवस्थेच्या निरनिराळ्या शाखांच्या सर्वसाधारण कार्याची निदान मूलभूत माहिती मिळेल आणि ज्या एरवी कळल्या नसत्या अशा अनेक गोष्टींची माहिती होईल असे एकमेव चर्चास्थान आहे असे सदस्यांना वाटते आणि ते तसे आहेही– विशेषतः आज जेव्हा किबुट्झचा व्याप आणि गुंतागुंत वाढली आहे अशा काळात.

समित्यांचे सदस्य आणि पदाधिकारी यांच्या जागा आळीपाळीने भरत असल्यामुळे प्रस्थापित नोकरशाही हद्दमूल होण्याचे टळले आहे. निरनिराळे सामाजिक वर्ग ज्यांमधून निर्माण होतील अशा इतरही घटना घडलेल्या नाहीत. सर्व मूलभूत बाबतीत

किबुट्झ हा एक वर्गविहीन समाज म्हणून टिकून आहे. अर्थात 'विचारवंत', 'कामाला वाघ', 'आळशोबा', 'तऱ्हेवाईक' असे एकमेकांपासून उठून दिसणारे गट अस्तित्वात आहेत पण अवांतर कारणामुळे डोळ्यात खुपेल अशी सामाजिक प्रतिष्ठा कुणालाही मिळत नाही. मालमत्तेची विषमता नाही किंवा तीबरोबर येणारी सत्ताविषमताही नाही. कोणत्याही एका गटाला इतर गटांच्या मानाने विशेषाधिकार नाहीत. कोणताही एक गट दुसऱ्या कोणत्याही गटावर आर्थिक सत्ता किंवा राजकीय नियंत्रण चालवीत नाही. किंबहुना असे म्हणता येईल की संस्थापकांच्या मूळच्या गूढरम्य स्वप्नांपैकी वर्गविहीन समाजाचे स्वप्नच काय ते किबुट्झमध्ये जवळजवळ पूर्णपणे साकार झालेले आहे.

वीस वर्षांपूर्वीच्या दिवसांशी तुलना करता असे दिसते की किबुट्झचे समतेचे तत्त्व जवळजवळ अक्षत रीतीने टिकून आहे. ( अर्थात यातून काही ताण उद्भवतात, नाही असे नाही. ) सर्वांना किबुट्झच्या व्यवहारांमध्ये समान आवाज आहे, कंटाळ-वाण्या किंवा घाणेरड्या कामांमध्ये सर्वांना आळीपाळीने भाग घ्यावा लागतो, अन्न, निवारा, पेशाची व्यवस्था आणि इतर सर्व गोष्टींत समता आहे. याचाच अर्थ असा की औपचारिक सामाजिक रचनेच्या सर्व क्षेत्रांमध्ये समतेचे तत्त्व पाळले जाते. आई-बापांच्या प्रतिष्ठेचा मुलांच्या प्रतिष्ठेवर मुळीच परिणाम होत नाही. प्रतिष्ठा ही अजूनही साध्य करण्याचीच गोष्ट आहे, जन्मजात नाही. अर्थात हे खरे आहे की मुले लहान असताना अमुक अमक्याचा मुलगा आहे किंवा अमकी अमकीची मुलगी आहे असे उल्लेख येतात आणि किबुट्झच्या मुलांकडे पाहण्याच्या नजरेवर या सर्वसाधारण विधानांचा परिणाम होतो. पण मुलांची यातून लवकरच सुटका होते आणि त्यांना आपले किबुट्झमधले स्थान आणि प्रतिष्ठा आपल्या प्रयत्नानेच मिळवावी लागते.

## घरगुती क्षेत्रातील बदल आणि सातत्य

**विवाह व लैंगिक जीवन :** वीस वर्षांपूर्वी गाबांचा गट लहानसा होता तेव्हा त्यांच्यामध्ये नजरेस आलेल्या विवाहविषयक प्रथा अजूनही चालू आहेत. लग्ने बरीच लवकर होतात, बहुधा लष्करातल्या सेवेचा काळ संपल्याबरोबर; पण काही थोडी लग्ने लष्करी सेवा सुरू होण्यापूर्वी किंवा चालू असतानाही होतात. किबुट्झमध्ये लवकर लग्न करण्याला उत्तेजन दिले जाते. लवकर लग्न झाले आणि विशेषतः लवकरच मुले झाली म्हणजे तरुण वयाच्या लोकांचे किबुट्झशी असलेले बंध दृढ होतात असा विचार याच्यामागे दिसतो. ( अर्थात तो शब्दात व्यक्त केला जात नाही. )

पंचविशी संपल्यानंतरही ज्यांची ( विशेषतः मुलींची ) लग्ने व्हायची राहिलेली असतात त्यांच्याविषयी किबुट्झला काळजी वाटते आणि त्यांना जोडीदार भेटावे अशी संधी निर्माण करण्यासाठी खास प्रयत्न केले जातात; एखादी सव्वीस वर्षांची मुलगी कुमारिकाच राहिली तर तिला जोडीदार मिळणे खरोखरच कठिण होते, कारण

किबुट्झमध्ये अशा मुलीला अनुरूप अशी मुले नसतात, आणि बाहेरची मुले भेटण्याची संधी फारच कमी असते. अशा प्रसंगी पुढच्या अभ्यासासाठी किंवा संघाच्या कचेरीत कामाला म्हणून तिला शहरात जाऊ देण्यात येते किंवा मुद्दाम पाठविले जाते; क्वचित् नातेवाईकांबरोबर राहण्यासाठी परदेशी जाण्याचीही मुभा देण्यात येते.

किबुट्झमधले जीवन कुटुंबाभोवती ( म्हणजे विवाहित जोडपे आणि त्यांची मुले यांच्याभोवती ) फिरत असते. इतके की अविवाहित व्यक्ती किबुट्झच्या मुख्य जीवनस्रोतापासून तुटून पडल्यासारखी होते. शिवाय, भावनात्मक दृष्ट्याही विवाह-संबंधांचे महत्त्व अजोड असते. वीस वर्षांपूर्वीप्रमाणेच आजही अशी स्थिती आहे की निदान समवयस्क मित्रांच्या इतकाच विवाहसंबंधही महत्त्वाचा आहे. पण याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे विवाहाने एकत्र आलेल्या व्यक्तींमध्ये समान भावना, इच्छा, महत्त्वाकांक्षा यांमधून जी जवळीक निर्माण झालेली असते ती समवयस्कांच्या गटामध्ये आढळत नाही. किंबहुना असे म्हणणे बरोबर होईल की ज्याच्यामध्ये भावनिक स्निग्धता व्यक्त होते असा किबुट्झमधला एकमेव संबंध म्हणजे लग्नसंबंध होय.

लग्न झालेली जोडपी आपले एकमेकांवरील प्रेम चार लोकांत ज्या पद्धतीने व्यक्त करीत असत तिच्यात आता बराच बदल झाला आहे हे या संदर्भात मुद्दाम ध्यानात आणून दिले पाहिजे. पूर्वी ( पृष्ठ ९० पाहा ) आपले वैवाहिक संबंध चारचौघांत प्रदर्शित करण्याबाबत जी लज्जेची भावना होती तिचेही आता " स्वाभाविकीकरण " झाले आहे. पूर्वी विवाहित जोडप्याने एकत्र जेवणे, प्रवास करणे, किंवा इतर सामा-जिक व्यवहारांमध्ये भाग घेणे ह्या गोष्टींवर पत्नीचा शिक्का बसलेला होता तरी ते आपल्या परस्परप्रेमाचे समाजात शारीरिक प्रदर्शन करीत नसत. लढाईनंतर ही स्थिती बदलली आहे. आता एकमेकांना बिलगून किंवा हातात हात घालून चाललेली जोडपी रस्त्यांमधून जाताना नेहमी पाहायला मिळतात. ह्या बदलांच्या मागे युद्ध हीच महत्त्वाची प्रेरणा होती ही गोष्ट आणखी एका निरीक्षणावरून ध्यानात येते. ते म्हणजे जसजसा काळ जात आहे तसतशी ही पद्धत कमी झालेली दिसत आहे. असे म्हणता येईल की युद्धामुळे निर्माण झालेल्या भावनांना काही काळ मुक्त आविष्कार मिळणे साहजिक होते, मात्र आता तो काळ संपल्यावर अशी वागणूक नेहमीच्या जीवनाशी काहीशी विसंगत वाटू लागली आहे. नुकतेच किबुट्झच्या बाहेर वर्षभर राहून आलेले एक जोडपे एकमेकांचे हात सारखे धरी आणि इतर रीतींनी आपल्या प्रेमाचे प्रदर्शन करी म्हणून किबुट्झमध्ये नापसंती व्यक्त होऊ लागली.

वरच्या विवेचनात विवाहित जोडप्यांच्या भावनिक जवळिकीवर जो जोर दिलेला आहे त्याचा हेतू लैंगिक बाजूचे महत्त्व कमी लेखावे असा नाही. लैंगिक बाजू तर महत्त्वाची आहेच कारण अनेक उदाहरणांमध्ये असे दिसून येते की नवरा आणि बायको यांचा एकमेकांव्यतिरिक्त इतरांशी लैंगिक संबंध आलेला नसतो. लैंगिक

क्षेत्रात गेल्या वीस वर्षांत जवळजवळ काहीच बदल झालेला नाही. अजूनही आंदोलनाने घालून दिलेले निर्बंध आदर्श मानले जातात. अजूनही प्रशाळेत असताना संभोग वर्ज्य मानला जातो आणि पुरुष विद्यार्थ्यांनी प्रशाळेत असण्याच्या काळात संभोगाचा अनुभव जवळजवळ मुळीच घेतलेलाच नसतो असे म्हणता येईल. शेवटच्या वर्षातील मुलींमध्ये मात्र असा अनुभव घेतलेल्यांचे फार मोठे प्रमाण आढळते. असा फरक दिसून येतो यात आश्चर्य नाही कारण मुलींना त्यांच्यापेक्षा वयाने मोठे असे मित्र लष्करात किंवा किबुट्झमध्ये भेटतात.

वीस वर्षांपूर्वीच्या काळाशी तुलना करताना असे दिसते की प्रशालेय मुलामुलींच्या आता बऱ्याच जास्त जोड्या आहेत आणि त्यांची एकमेकांशी मैत्री बरीच लवकर होऊ लागलेली आहे; उदाहरणार्थ, १९६८ साली बऱ्याचशा आठवी इयत्तेतल्या मुलींना बाराव्या इयत्तेतले मित्र होते. आणखी असे की संभोग धरून इतर अनेक कामचेष्टांमध्ये ही युगुले अधिक रममाण होताना दिसतात; अनेक किशोरवयीन मुलींना गर्भ राहिल्याची आणि गर्भपात घडवून आणल्याची उदाहरणे घडलेली आहेत. इतके सगळे असले तरी प्रशाळेतले एकूण वातावरण लैंगिक बाबतीत कडकच आहे असे म्हटले पाहिजे. अलीकडेच प्रशाळेतल्या शेवटच्या वर्गात शिकणारी एक मुलगी काहीशी स्वैर असल्यामुळे बरेच अस्वास्थ्य निर्माण झाले होते.[3]

एकूण किबुट्झचा लैंगिक व्यवहारांबद्दलचा दृष्टिकोण अजून सनातनीपणाचा आहे असे म्हणता येईल; फक्त पूर्वीच्या मानाने त्यात काहीसे मार्दव आलेले आहे. गायी एकमेकांना, सौम्य का होईना, अश्लील विनोद सांगतात; 'प्लेबॉय' मासिकाच्या मधल्या पानावरची चित्रे पाहतात; एखाद्या सुंदर शरीराच्या किंवा चेहऱ्याच्या मुलीकडे धीटपणे पाहतात. पूर्वी असे होत नसे. पण एकूण हे खरे की साब्रा अशा गोष्टींनी फारसे उत्तेजित होत नाहीत. लैंगिक विषयावरचे विनोद आणि संभाषण ह्या गोष्टींत साब्रा नसलेली मुलं किंवा साब्रा असूनही बाहेरच्या जगाशी ज्यांचा बराच संबंध आलेला आहे अशी मुलं रस घेतात.

अजूनही वस्तुस्थिती अशी आहे की लग्नापूर्वी लैंगिक संबंध फारच मर्यादित

---

३. किशोरवयीन मुलांच्या लैंगिक वर्तणुकीचे इतर प्रकार पुढीलप्रमाणे आहेत : हस्तमैथुन चालते पण त्याबद्दल बरीच सहिष्णुता दाखविली जाते. समसंभोग अस्तित्वात नाही पण किशोरवयाच्या पहिल्या अवस्थेत मुलांनी एकमेकांच्या अंगाशी झटणे आणि मुलींनी परस्परांची शरीरे चाचपणे ह्या गोष्टी इतरत्र कुठेही असतात त्या प्रमाणात किबुट्झमध्येही होतात. लैंगिक विकृतीचे ( माहीत असलेले ) एकच उदाहरण आहे. मुलींची नग्न शरीरे पाहण्याची एका मुलाला विकृती होती आणि त्याबद्दल त्याला प्रशाळेतून घालवून देण्यात आले.

प्रमाणात येतो; आणि आला तरी त्याची परिणती बहुधा लग्नातच होते. त्याविरुद्ध वर्तन केलं जात असेल तर त्याला पसंती मिळत नाही. इस्रायलमध्ये असा संकेत दिसून येतो की एका वेळी एका व्यक्तीला एकच मित्र किंवा मैत्रीण असली पाहिजे आणि अशा संबंधात लैंगिक व्यवहार गृहीत धरला जातो. ह्याउलट, अमेरिकेतल्या अर्थाने " पॉप्युलर " असणं, वऱ्याच मुलांबरोबर किंवा मुलींबरोबर ' डेट्स ' घेणे याचा अर्थ स्वैरपणा असा केला जातो. कारण अशा सर्व संबंधांमध्ये लैंगिक संबंधही असणारच अशी कल्पना केली जाते. तरीही किर्यात येदिदिममध्ये प्रत्येक लैंगिक अनुभवाची परिणती लग्नात होते असे नाही. ' प्रकरणं ' मधूनमधून कानावर येतात. सर्वसाधारण प्रकरणामध्ये एखादा वयस्कर पुरुष आणि एखादी लहान वयाची म्हणजे विशीबाविशीची मुलगी असा प्रकार दिसून येतो.

किर्यात येदिदिममधली मुलंमुली एकमेकांशी लग्न करीत असली किंवा लैंगिक संबंध ठेवीत असली तरी हे लक्षात घेणं अगत्याचे आहे की एकाच केवुट्झामधल्या मुलामुलींमध्ये लग्नं ( किंवा प्रेमप्रकरणे ) घडून येत नाहीत. केवुट्झामधल्या मुलांचे एकमेकांशी नाते भावंडांचेच असते,—" नैसर्गिक विधींसाठी एकमेकांशेजारी बसलेल्यांना लग्न करणं शक्य तरी कसे आहे ? " अशी कारणं ह्या वस्तुस्थितीच्या स्पष्टीकरणासाठी सांगितली जातात. आमची अजूनही अशी खात्री आहे की लैंगिक ऊर्मी दडपून टाकल्यामुळेच हा परिणाम आहे. ( स्पिरो यांच्या *चिल्ड्रेन ऑफ दि किबुट्झ* या ग्रंथात पृ. ३४७-३४९ वर याची कारणं स्पष्ट केलेली आहेत. ) खुद्द साब्रांना जर विचारले तर ते असे सांगतात की केवुट्झामधल्या जोडीदारांबद्दल त्यांच्या मनात लैंगिक भावना येत नाहीत. पण याची कारणे " समाजशास्त्रीय " ( म्हणजे एकमेकांबरोबर घालवलेला वेळ, गटाचे दडपण, समवयस्कांमधली सरमिसळ इ. ) आहेत की " मानसशास्त्रीय " ( म्हणजे दडपणामुळे निर्माण झालेली ) आहेत हे ते सांगू शकत नाहीत.

इतर अनेक बिगर-पाश्चात्त्य देशांप्रमाणेच ( पण वेगळ्या कारणांसाठी ) साब्रांच्या वैवाहिक जोडीदार निवडण्याबाबतच्या संधी व पर्याय मर्यादित असतात. विवाहातून तुम्ही काय अपेक्षिता असे त्यांना विचारले तर ( अमेरिकनांप्रमाणेच ) ते बहुधा असे सांगतील की परस्पर-समजूत, आदर, प्रेम इत्यादि गोष्टींची आम्ही अपेक्षा करतो. पण अशा आदर्श प्रतिमा तयार करायला त्यांना संधीच फार थोडी असते. त्याचा परिणाम असा होतो की हे गुण एकदा जोडीदार मिळाला की ते त्याच्यावर लादतात किंवा जाणूनबुजून अथवा अजाणता या गुणात कमी पडणाऱ्या जोडीदाराशी विवाह करतात. ह्या कारणामुळे एखाद्या अपरिचित किंवा ' बेडर ' व्यक्तीशी लग्न करण्याचा धोका पत्करण्यापेक्षा ते ज्या व्यक्तीशी बराच काळ ओळख आहे ( म्हणजेच बहुधा प्रशाळेत जिची मैत्री झालेली आहे ) अशाच व्यक्तीशी लग्न करतात. बाहेरच्या जगातल्या स्वप्नाळू कल्पना ज्यांच्यापर्यंत येऊन पोचलेल्या आहेत ( किंवा कोणत्याही

कारणाने असो ) ज्यांच्या मनात अशा स्वप्नाळू कल्पना आपोआप येतात अशा व्यक्तींना मात्र वैफल्य जाणवते. कारण आपल्यातल्याच एकाशी लग्न केल्याने प्राप्त होणारी सुरक्षिततेची भावना आणि स्वप्निल कल्पनांशी जुळणारे व्यक्तिमत्त्व अशा दोन्ही गोष्टी एकत्र सापडत नाहीत.

तेव्हा सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की किबुट्झची मुलं किबुट्झ चळवळी-मधूनच आपले जोडीदार निवडतात– म्हणजे आपल्याच किबुट्झमधून किंवा आपल्याच संघाशी जोडलेल्या इतर किबुट्झमधून. अशी दुसऱ्या प्रकारची लग्नं घडवून आणण्यात संघाने तर सक्रिय हालचाल केलेली आहे. विवाहेच्छू व्यक्तींची लग्नं घडवून आणण्यात मध्यस्थी करण्यासाठी त्यांनी एका विवाह कचेरीची स्थापना केलेली आहे. तीस वर्षांखालील स्त्रीपुरुषांसाठी एक व तीस वर्षांवरील स्त्रीपुरुषांसाठी एक असे मुद्दातले कार्यक्रम किबुट्झच्या मालकीच्या एका हॉटेलमध्ये भरविले जातात. कियर्यात येदिदिम-मधल्या निदान दोन तरी मुलांनी ह्याच पद्धतीने बायका मिळविल्या आहेत. अर्थात इतर किबुट्झ संघांमधल्या किंवा किबुट्झ चळवळीबाहेरच्या व्यक्तींशी लग्नं होतात, नाही असे नाही, पण त्यांची संख्या फारच अल्प असते.[४]

विवाहसंबंध स्थिर आहेत. घटस्फोट ही अगदीच अपवादात्मक घटना आहे. साब्रांमध्ये घटस्फोटाची फक्त तीन उदाहरणे घडली आहेत. ( यातल्या एका स्त्रीने दोनदा घटस्फोट घेतला आहे. ) या तिन्ही उदाहरणांत किबुट्झ चळवळीबाहेरच्यांशी लग्नं झालेली होती. जो विवाह सुखाचा झालेला नाही तो घटस्फोटाने निकालात काढावा हा मार्ग किबुट्झला इष्ट वाटत नाही म्हणून जोडप्यांचे मतभेद नाहीसे करण्याचा मोठा प्रयत्न केला जातो. वैवाहिक जीवनात ज्यामुळे समस्या निर्माण होईल अशी घटना, विशेषतः 'तिसरी व्यक्ती' या स्वरूपाची घटना उपस्थित होऊ नये याबद्दल किबुट्झ खबरदारी घेतो. एकदा एका विवाहित माणसाचे एका लहान अविवाहित मुलीशी प्रेमप्रकरण झाले आणि त्यातून त्याच्या लग्नाला धोका निर्माण झाला तेव्हा त्या मुलीला तेल अवीवमध्ये संघाच्या कचेरीत काम करण्यासाठी पाठवण्यात आले.

या सामाजिक दडपणाव्यतिरिक्त घटस्फोटाच्या विरोधी अशी आणखीही काही ( मानसिक आणि व्यावहारिक ) दडपणे असतात. ती म्हणजे मुले झालेली

---

४. किबुट्झ-किबुट्झमध्ये जेव्हा विवाहसंबंध घडून येतो तेव्हा रिवाज असा आहे की लग्न झालेले जोडपे दोन्ही किबुट्झमध्ये एकेक वर्ष राहते आणि त्यानंतर दोघांनी मिळून कुठल्या किबुट्झमध्ये कायम राहायचे हे ठरविते. या जोडप्याची व्यक्तिमत्त्वे कशी आहेत आणि त्यांच्याजवळ कोणती विशेष कौशल्ये आहेत हे पाहून ते जोडपे जर पसंतीला आले तर दोन्ही किबुट्झ त्याने आपणातच राहावे यासाठी त्याचे मन वळविण्याची पराकाष्ठा करतात.

असतात, जोडीदारांपैकी एकाला किबुट्झ सोडून बाहेर जाण्याची इच्छा असते किंवा जरुर असते; अविवाहित अवस्थेत ( विशेषतः वय झाले म्हणजे ) किबुट्झमध्ये राहणे हा फारसा सुखाचा अनुभव नसतो. लक्षात ठेवण्यासारखी एक मजेदार गोष्ट अशी की एकमेकांशी कडाडून भांडलेल्या नवराबायकोंनी जणू काही भविष्यकालातील समझोत्याचा करार म्हणून एका नव्या अपत्याला जन्म दिल्याची उदाहरणेही काही थोडीथोडकी नाहीत.

**कुटुंब :** आईबाप या दृष्टीने पाहता साब्रांमध्ये वीस वर्षापूर्वीच्या मानाने जवळ जवळ काहीही बदल झालेला नाही. त्यांना मुले आवडतात आणि ( इस्रायलमधल्या पौर्वात्येतर ज्यूंशी तुलना करता ) ती किती असावीत याचा त्यांना काही धरबंद दिसत नाही. याचे एक कारण मुलांबाबतची स्वाभाविक आवड हे तर आहेच. शिवाय अपत्यहीन किंवा कमी मुले असलेल्या स्त्रीपुरुषांवर गटाचाही दबाव येत असतो. या दबावाची दोन सर्वसाधारण कारणे आहेत. एक म्हणजे देशाला अधिक मुलांची जरुरी आहे आणि दुसरे म्हणजे किबुट्झ चळवळ यापुढे वाढणार असेल तर केवळ अंतर्गत लोकसंख्यावाढीमुळेच. तथापि बायकांच्या बाजूने विचार करताना मोठ्या कुटुंबाची प्रेरणा देणारे दुसरेही काही घटक नजरेस येतात. गरोदरपणाच्या काळात सर्वांचे लक्ष आपल्याकडे लागलेले असल्यामुळे बायका सुखावतात, बहुतेक स्त्रियांना निर्मितीचा आनंद मिळालेला नसतो तो अशा वेळी मिळतो, किबुट्झ आणि नवरा यांच्याशी त्यांचे संबंध अधिक दृढ होतात; कित्येकींना या काळात कामातून विरंगुळा मिळाल्याचे सुख असते; आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी की विवाहसंबंध धरून दुसऱ्या कोणत्याही संबंधात प्राप्त न होणारे आणि अत्यंत उत्कटपणे भासणारे अपत्याविषयीचे जवळिकेचे नाते त्यांच्या मनात निर्माण होते.

त्यांच्या स्वतःच्या आईबापांशी तुलना करता साब्रा आईबाप मुलांविषयीच्या काळजीमधून मुक्त असतात; त्याचबरोबर ( मूल कोणत्याही वयाचे असले तरी ) त्यांची फार मोठी जवळीक असते असे नाही. सर्वसाधारणपणे त्यांचा दृष्टिकोण पुढील शब्दांत व्यक्त करता येईल. " मला मुले झाली आहेत; ती माझी आहेत; मी त्यांच्याशी खेळते आणि अशा रीतीने मला स्वतःला आणि किबुट्झला भासेल अशा रीतीने मी माझे अपत्यप्रेम प्रकट करते; पण इतकेच; आणि इतके पुरे आहे. " लहान कुटुंबात आईबापांच्या मुलांबद्दलच्या ज्या विविध प्रकारच्या आणि व्यापक संवेदना असतात त्या साब्रा आईबापांमध्ये मुळीच दिसून येत नाहीत; याचे कारण असे की त्या संवेदना प्राप्त करून घेण्याचे त्यांना कारणच असत नाही. मुलाला शिस्त कशी लावावी हे त्यांना कळत नाही आणि क्वचित् जेव्हा तसे करण्याचा ते प्रयत्न करतात तेव्हा मूल दाद देत नाही. यातून त्यांना एक असहाय्यपणा येतो व ते भांबावतात. दुपारच्या वेळी मुलांबरोबर खेळण्यासाठी जे ठराविक दोन तास मिळतात त्यापेक्षा अधिक वेळ त्यांच्या संगतीत काढायला मिळाला तर त्याचे काय करायचे हे त्यांना कळत नाही.

आपली भूमिका मुलांचे फक्त लाड करण्याची आहे हे ते समजून असतात आणि त्यांच्यावर सामाजिक संस्करण करण्याची जबाबदारी परिचारिका आणि शिक्षक यांच्यावर टाकून देण्यात त्यांना खुषी असते. एखाद्या पहिलटकरिणीला आपल्या मुलाबरोबर जास्त वेळ घालवावा अशी तळमळ वाटते खरी पण दुसरे मूल झाल्या-बरोबर ही इच्छा बहुधा नाहीशी होते. शिवाय, मोठ्या झालेल्या मुलांबरोबर अधिक संबंध यावेत अशी इच्छा साब्रा आया ( आणि बापसुद्धा ) कधीही दर्शवीत नाहीत.

मुलांच्या बाबतीत साब्रा आयांची मनःस्थिती जेवढी तणावाची असते तेवढी साब्रा बापांची असत नाही. पुरुष म्हणून त्यांची जी भूमिका असते तिच्याबद्दल त्यांची वृत्ती ( आयांप्रमाणे ) द्विधा नसते आणि त्यांच्याकडे बघण्याचा मुलांचा दृष्टिकोणही द्विधा नसतो. आयांच्या तुलनेने विचार करता बापांच्या दृष्टीने मुले म्हणजे एक करमणूक असते आणि रोजच्या कामाच्या दगदगीतून विसावा मिळण्याचे एक सुखद साधन असते. शिवाय मुलांच्या संगतीत राहणे त्यांना मनापासून आवडते असे दिसते. याउलट बऱ्याचशा आयांकडे पाहून असे वाटते की त्या मुलांची संगत केवळ अपरि-हार्य म्हणून सोसतात. किंवा मुले ही त्यांच्या दृष्टीने एक प्रतीकात्मक गोष्ट असते. जेव्हा शिशुगृहात बापांच्याऐवजी आया मुलांना झोपवण्याचा प्रयत्न करतात तेव्हा मुले सहजासहजी झोपी जात नाहीत हा काही योगायोग नाही. कदाचित् असे असेल की नेहमी समजले जाते त्यापेक्षा साब्रा आया भावनात्मकदृष्ट्या आपल्या स्वतःच्या आयांच्या अधिक जवळच्या असाव्यात. त्यांचीसुद्धा वृत्ती द्विधा आणि संभ्रमित असावी अशा अर्थाने की नव्या व्यवस्थेचा त्यांनी स्वीकार तर केलेला आहे पण तिच्यामधून त्यांना फार मोठे मानसिक समाधान मिळालेले नाही.

**सामुदायिक शिक्षण :** किबुट्झ शिक्षणतज्ज्ञांना सामुदायिक शिक्षण पद्धतीची वैगुण्ये पुरेपूर माहीत आहेत. त्याचबरोबर हेही खरे की साब्रांनी मूलतः या पद्धतीचा स्वीकार केलेला आहे. मात्र मुलांच्या प्रशालापूर्व आणि प्रशालेय जीवनात सातत्य आणि सलगपणा जाणवत नाही हे सर्वांच्या ध्यानात आलेले आहे. प्रशालापूर्व काळ म्हणजे शैशवाचा ' स्वर्गीय ' काळ. या काळात मूलपणाचा मोठा गौरव केला जातो, मुलांची काळजी घेतली जाते, त्यांचे लाड केले जातात, त्यांच्यावर प्रेम केले जाते, ती सर्वांना हवीशी असतात, एवढेच नव्हे तर ती बिघडतातसुद्धा. पण प्रशालेत शिरल्याबरोबर या जीवनसरणीत एकदम खंड पडतो: निष्पापपणाचा आणि स्वातंत्र्या-चा लोप होतो; भरपूर काम हा जीवनाचा नियम होतो; इतरांकडून अपेक्षा केल्या जाऊ लागतात; दबलेल्या भावना आणखीच दृढमूल होतात. आता मुले काहीशी गोंधळतात, काहीशी उदासीन होतात, आईबापांपासून आणि स्वतःपासूनही दुरावतात आणि मानसिक समाधानासाठी समवयस्कांच्या गटाशी चिकटून राहतात.

सामुदायिक शिक्षणपद्धतीत गेल्या वीस वर्षांत एकूण पाहता फारच थोडा बदल

झालेला आहे. मुख्य बदल असा की समवयस्कांच्या गटातील मुलांची संख्या कमी करून प्रत्येक मुलाकडे जास्त वैयक्तिक लक्ष देता येईल अशी व्यवस्था केलेली आहे. ( हा बदल अंशतः टीकेला उत्तर म्हणून झालेला आहे आणि अंशतः मुलांची देखभाल अधिक चांगल्या रीतीने व्हावी या इच्छेतून झालेला आहे. ) शिशुगृहात आता सहा शिशूंच्या एका गटाला दोन परिचारिका असतात आणि त्यातली एक प्रशिक्षित असते. सहास दोन हे प्रमाण बालमंदिरापर्यंत कायम राहते. दुसरा बदल असा की आईबापांना ( विशेषतः आयांना ) आपल्या मुलांबरोबर जास्त वेळ घालवण्याची संधी मिळते. आता मूल दीड वर्षाचे किंवा क्वचित् तीन वर्षांचे होईपर्यंत त्याला भेटण्यासाठी म्हणून रोजच्या कामातून थोडीशी सुट्टी अधिकृत रीत्या दिली जाते. वीस वर्षांपूर्वीच्या मानाने शिशुगृहात आणि बालगृहातही मुलांना भेटण्याच्या बाबतीत अधिक मोकळेपणा आलेला आहे.

सारांश असा की सामुदायिक शिक्षणाची पद्धती साब्रांनी कायम ठेवलेली आहे. अर्थात इतर सर्व गोष्टींप्रमाणे तिचे त्रासदायक कानेकोपरे घासले जावेत आणि तिचे शक्य तेवढे " स्वाभाविकीकरण " व्हावे असे त्यांना वाटते. पण त्यांनी या पद्धतीचा मनापासून स्वीकार केला आहे यात शंका नाही. ही पद्धती केवळ मुळात चांगली आहे म्हणूनच नव्हे तर तिच्यामुळे आईबाप म्हणून आपणालाही स्वातंत्र्य मिळते हेही कारण या स्वीकारामागे आहे.

## साब्रा व्यक्तिमत्त्व

**नवा मानव :** किबुट्झ आणि विशेषतः त्याची सामुदायिक शिक्षणाची पद्धती एक ' नवा मानव ' घडवण्याच्या हेतूने अस्तित्वात आली हे वाचकांच्या लक्षात असेलच. पण मजेची गोष्ट अशी की ह्या संकल्पनेला किबुट्झ विचारांमध्ये आता फारसे स्थान नाही. संस्थापक आणि साब्रा या दोघांचाही ह्या कल्पनेबाबत काहीसा भ्रमनिरास झालेला आहे. संस्थापकांच्या मनात त्यांच्या मुलांविषयी असलेली निराशा ( जिची नोंद वीस वर्षांपूर्वी केली होती ) अजूनही सार्वत्रिकच आहे. जी अतिरंजित स्वप्ने संस्थापकांनी आपल्या मनाशी बाळगली होती त्यांचा परिणाम अशा रीतीने होणे अपरिहार्यच होते.

त्याचबरोबर त्यांचे स्वप्न काही बाबतीत इतक्या चांगल्या रीतीने प्रत्यक्षात आले आहे की त्याची फळे त्यांना आवडत नाहीत. आपली मुले स्वतंत्र वृत्तीची असावीत असे त्यांना वाटे; आता त्यांची तक्रार अशी आहे की ती आपणापासून दुरावली आहेत. ती मजबूत आणि शूर असावीत, घेटोतल्याप्रमाणे दुबळी असू नयेत असे त्यांना वाटे; आणि आता हे गुण त्यांच्यात आहेत तर त्यांची तक्रार अशी की त्यांनी आपला मृदुपणा आणि संवेदनाक्षमता गमावली आहे. ती वस्तुनिष्ठ शास्त्रीय दृष्टिकोणातून जगाकडे पाहणारी व बुद्धिवादी अशी असावीत असे त्यांना वाटे;

मुलांमध्ये हे गुण आता निर्माण झालेले आहेत पण आईबापांची रुखरुख अशी की आत्मनिष्ठ, मानवतावादी, क्वचित् अविवेकी असे जे व्यक्तिमत्त्वाचे घटक असतात त्यांचा मुलांच्यात अभाव आहे. आपल्या मुलांना आपण सर्व काही दिले पाहिजे असे त्यांना वाटे, आणि त्यांनी दिलेही; पण आता ते म्हणतात, " मुलं नुसती घेणारीच आहेत, " आणि " आम्हीच सगळं त्यांच्यासाठी करतो. "

' नवा मानव ' हे काही साब्रांचे ध्येय नाही. त्यांचे ध्येय यापेक्षा कमी नाट्यपूर्ण आहे. त्याला जीवनाचे ' स्वभाविकीकरण ' एवढेच नाव देता येईल. कारण आपण इतरांपेक्षा जीवनानुभवाने आणि शैक्षणिकदृष्ट्या वेगळे आहोत हे त्यांना जाणवते आणि हा वेगळेपणा का उद्भवतो हेही काही प्रमाणात त्यांच्या ध्यानात येते. सैन्या-मधल्या काळात ते ' किबुट्झचे ' म्हणून त्यांची चेष्टा व उपहास होतो. यातला काही भाग विनोदाचा म्हटला तरी काही मनात खोलवर जाऊन भिडतो. साब्रा अशा टीकेचे कितीही प्रतिवाद करोत, बहुतेकांना एक असुरक्षिततेची भावना जाणवते यात शंका नाही. त्यांना साथ द्यायला त्यांचा गट तेथे नसल्यामुळे ते उघडे पडतात आणि त्यांच्या मनात चलबिचल होते. किबुट्झ जीवनाविषयी त्यांचे मन शंकित झाले तर ते ह्याच कालावधीत होते. आपण ' नवे मानव ' असल्यामुळेच सर्वसामान्य माणसांच्या स्वाभाविक प्रवृत्ती आपणात नाहीत की काय अशी भीती त्यांना वाटू लागते.

मनात अशा शंका निर्माण होतात याचे एक कारण म्हणजे त्यांच्या वैचारिक शिक्षणाचा अपुरेपणा. दुसरे कारण म्हणजे आपला स्वतःचा गट भोवती नसल्यामुळे येणारी असहायता. अशा अवस्थेत त्यांना असे वाटायला लागते की आपण कोणी ' खास ' असता कामा नये. इतर जसे असतात तसेच आपण असले पाहिजे. त्यांना असेही वाटू लागते की इतरांना काही उद्दिष्टे आहेत, ज्यांच्यासाठी खटपट करावी असे काही तरी डोळ्यांसमोर आहे; याउलट आपण जाणार ते एका अरुंद आणि पूर्वनिश्चित मार्गाने. आपल्याला मिळालेल्या वेगळ्या प्रकारच्या शिक्षणाची किंमत त्यांना अजिबात कळत नाही असे नाही; एवढेच नव्हे तर समुदायाविषयींची चिंता, सामूहिक कार्य, समभाव यांची महती त्यांना माहीत असते. पण तरीसुद्धा आपल्या समवयस्कांपासून आपल्याला वेगळे काढणाऱ्या ह्या गोष्टींवर ध्यान देण्याऐवजी आपल्या जीवनात उणेपणा काय आहे याचाच विचार ते अधिक करतात.

काळ जसजसा जातो तसतशी या शंकांची तीव्रता कमीकमी होत जाते. किबु-ट्झच्या जीवनव्यवहारात निश्चित स्थान मिळणे, लग्न होणे, मुले होणे, जीवनविषयक अनुभव जास्त समृद्ध होणे—या सर्व दीर्घ प्रक्रियेमधून गेल्यावर आपण आणि इतर ह्यांच्यामध्ये काय फरक आहे ह्याची त्यांना नेमकी आणि वस्तुनिष्ठ जाणीव होऊ लागते. पण आपल्या मुलाला ' नवा मानव ' करायचा आहे असे एखादा साब्रा म्हणताना कुणीही ऐकलेले नाही. तो फार तर इतकेच म्हणेल की आपल्या मुलांना चांगले जीवन

जगायला मिळते हा एक किबुट्झमध्ये राहण्याचा फायदा आहे. पण मुलांच्या भवितव्या-विषयी बोलताना किबुट्झच्या शिक्षणपद्धतीतील दोष आणि आपले स्वतःचे सदोष शिक्षण ह्यांचाच उल्लेख तो जास्त करताना दिसतो. ह्या मुद्द्याचा संबंध किबुट्झचा उच्च शिक्षण आणि वैयक्तिक उत्कर्ष यांविषयी जो दृष्टिकोण आहे त्याच्याशी आहे आणि त्याचीच चर्चा आता करायची आहे.

**उच्च शिक्षण आणि व्यावसायिक उत्कर्ष :** किबुट्झमध्ये जो बदल घडत आहे त्याचे सर्वांत नजरेत भरण्यासारखे उदाहरण म्हणजे उच्च शिक्षणाविषयी त्यांचा बदललेला दृष्टिकोण. आपला अभ्यास चालू ठेवावा, आपली क्षितिजे विस्तारीत व्हावीत, आपल्या बौद्धिक कुतूहलाची अधिकाधिक तृप्ती करावी अशी इच्छा साब्रांच्यामध्ये फार मोठ्या प्रमाणावर दिसून येते आणि किबुट्झलाही ह्या इच्छेला प्रतिसाद द्यावा लागला आहे. याचा अर्थ असा नाही की पूर्वी ' करिअरिझम 'बद्दल जी नापसंती होती ती आता पूर्णपणे संपलेली आहे. झाले आहे ते असे की वैयक्तिक महत्त्वाकांक्षा आणि सामूहिक जबाबदारी ह्यांच्यामधील तोल बिघडू नये असा आग्रह अजूनही कायम असला तरी साथींना आपल्या वैयक्तिक विकासासाठी अधिक वाव मिळावा म्हणून पूर्वीच्या दृष्टिकोणात आता सौम्यपणा आणला गेलेला आहे.

साब्रांच्या शिक्षणविषयक ऊर्मी म्हणजे अनेक घटकांचा समुच्चित परिणाम आहे. एक म्हणजे आपले पूर्वीचे शिक्षण ' सक्तीने भरविण्याच्या ' पद्धतीचे होते, त्याऐवजी ती एक वैयक्तिक आणि स्वयंस्फूर्तीने करण्याची गोष्ट आहे, आपण काही तरी करू शकतो असा आत्मविश्वास स्वतःमध्ये उत्पन्न करण्याचे साधन आहे, असे त्यांना वाटू लागले आहे. ह्या विषयावर ते इतक्या तळमळीने बोलतात की त्यांना अधिक शिकायची तीव्र इच्छा आहे, त्यांना जे शिकायचे आहे ते स्वतःसाठीच आणि स्वतःच्या प्रयत्नांनीच आणि त्यांना अधिक शिकावेसे वाटते याचे कारण केवळ ज्ञानार्जनाची हौस हेच आहे ह्या गोष्टी पटायला वेळ लागत नाही. आपल्याला पारखून घेण्याची ती एक ' कसोटी ' आहे अशीही त्यांची ज्ञानार्जनाविषयीची धारणा असते. शिक्षणाविषयीच्या या कल्पनांनी किबुट्झ वर्तुळात खळबळ उडालेली आहे. वाचकांच्या ध्यानात असेल की ज्याचा प्रत्यक्षपणे आर्थिक जीवनाला उपयोग आहे असे विषय ( म्हणजे स्थापत्य, कृषिउत्पादन, यंत्रशास्त्र, लेखाशास्त्र इत्यादी ) सोडून दुसऱ्या कोणत्याही विषयाचा अभ्यास करायला किबुट्झमध्ये उत्तेजन दिले जात नसे. अपवाद फक्त एकच आणि तो म्हणजे तो विषय प्रशालेत शिकवण्याची एखाद्याची इच्छा असेल तरच. मात्र अलीकडे हे बदलले आहे. १९६८ साली एका बत्तीस वर्षांच्या तरुणाने दीर्घकाळ झगडा करून समाजशास्त्र शिकण्यासाठी एक वर्षाची रजा मिळवलेली आहे आणि शिक्षकाचे काम करायला तो बांधलेला नाही. मात्र अशा रीतीने अभ्यास पुढे चालू करण्याची परवानगी मिळवलेला तो पहिलाच साब्रा असला तरी पहिलाच साथी नाही. साठी पुरी झालेल्या संस्थापकांपैकी एकाला तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याची फार

काळ इच्छा होती आणि त्यालाही शहरात जाऊन एक वर्षभर अभ्यास करण्यासाठी सुट्टी देण्यात आली. आज जवळजवळ पंधरा तरुण माणसे किबुट्झ बाहेर पूर्णवेळ किंवा अर्धवेळ शिक्षण घेत आहेत.

उच्च शिक्षणाची साथींना ही जी ओढ आहे तिचे दुसरे कारण पुढीलप्रमाणे आहे. आपण बौद्धिकदृष्ट्या अपुरे आहोत असे काहीजणांना वाटते आणि हा दोष आपल्या प्रशालेय शिक्षणामधून आपणात आला आहे अशी त्यांची धारणा असते. बाहेरच्या जगाशी आता त्यांचा अधिक संबंध येतो आणि ह्या विशाल जगाची गुंतागुंत जसजशी त्यांच्या ध्यानात येते तसतसे ते जग आपल्याला कळले पाहिजे अशी त्यांची इच्छा बळावत जाते.

शेवटचे कारण असे की शिक्षणासाठी बाहेर कुठे गेले म्हणजे किबुट्झच्या सीमित जीवनातून काही काळापुरती तरी सुटका मिळते आणि ह्या गोष्टीचेही आकर्षण काहीजणांना वाटते. किबुट्झ जीवनाविषयीच्या कंटाळ्यामधून ही इच्छा निर्माण होते असे नाही तर नेहमीच्या जीवनातला तोचतोचपणा आणि जबाबदाऱ्या यांमधून काही काळ तरी सुट्टी घ्यावी असे आपणा सर्वांनाच कधीकधी वाटते तसाच हा प्रकार आहे. अशी सुटका करून घेण्याचे प्रवास, बदली, वसतिस्थानाचा बदल इत्यादी मार्ग किबुट्झमध्ये उपलब्ध नसल्यामुळे उच्च शिक्षणासाठी बाहेर जाणे हाच जवळजवळ एकमेव उपाय उरतो. मात्र हे लक्षात ठेवले पाहिजे की किबुट्झमधून कायमचे निघून जाण्याच्या उद्देशाने हा मार्ग कुणीही पत्करीत नाही.

शैक्षणिक गरजा ओळखून भागविण्याची तयारी काही समजदार साथींच्या-मध्ये दिसून येते. एका साथीने तर किबुट्झ विद्यापीठाची स्थापना व्हावी यासाठी प्रयत्न केला होता. त्याने असे सांगितले की किबुट्झच्या भविष्यकालीन गरजांचा कसाही अंदाज केला तरी येत्या काळात अधिक तांत्रिक ज्ञानाची आणि व्यापक प्रमाणा-वरच्या बौद्धिक क्षमतेची जरूर स्पष्ट दिसून येते. या गरजा भागवायच्या असतील तर तरुण स्त्रीपुरुषांना उच्च शिक्षण घ्यावेच लागेल आणि ते घ्यायचे तर ते त्यांना किबुट्झच्या वैचारिक चौकटीतच मिळालेले किबुट्झच्या दृष्टीने फायद्याचे ठरेल.

वर विचार झाला तो आपल्या बौद्धिक विकासासाठी प्रयत्न करणारी जी माणसे आहेत त्यांचा झाला, पण वैयक्तिक उत्कर्ष ( करिअरिझम ) हा प्रश्न अधिक अवघड आहे. किबुट्झला अनेक वेळा ह्या प्रश्नाला तोंड द्यावे लागले आहे पण तो त्याला केव्हाही सोडविता आलेला नाही. ‘ उत्कर्षवाद ’ ह्या शब्दाला अजूनही नापसंतीची छटा आहे कारण उत्कर्षवादी असणे म्हणजे समुदायाच्या चौकटीच्या बाहेर असणे आणि सामूहिक ध्येयांऐवजी स्वार्थी उद्दिष्टांचा पाठपुरावा करणे होय असे समजले जाते. काहीजणांचे मत असे आहे की ज्याअर्थी किबुट्झ हा एक समवाय आहे त्याअर्थी उत्कर्षविषयक वैयक्तिक आकांक्षा किबुट्झच्या समुदायवादाच्या मूल-

तत्त्वांच्या तुलनेने दुय्यमच समजल्या पाहिजेत. ह्याउलट काहींच्या मते काही व्यवसाय आणि कामे किबुट्झसारख्या शेतीवर आधारलेल्या अर्थव्यवस्थेत चालविणे अशक्य आहे.

**समूहाचे गतितत्त्व आणि एकांत :** वाचकांच्या स्मरणात असेल की सामुदायिक शिक्षणाचा एक हेतू व्यक्तिमत्त्व आत्मप्रवण न बनता समूहप्रवण बनावे असा होता. मूळच्या अर्थापैकी एका अर्थाने साब्रा अजूनही गटप्रवण आहेतच. याचा अर्थ असा की समूहाविषयीचे ऐकात्म्य त्यांना भासते आणि त्याविषयी जबाबदारीची जाणीवही त्यांच्या मनात असते. पण दुसऱ्या अर्थाने पाहिले तर साब्रा हे समूहप्रवण आहेत असे म्हणता येणार नाही. हा दुसरा अर्थ म्हणजे समूहच्या सदस्यांनी सतत एकमेकांच्या संपर्कात येणे. कारण साब्रांना एकांत हवासा वाटतो आणि तो मिळविण्याचा ते यत्न करतात. या बाबतीत किबुट्झच्या इतर सदस्यांहून ते फारसे वेगळे नाहीत. वीस वर्षांपूर्वी अधिक एकांताची साथींना वाटणारी गरज आज मोठ्या प्रमाणावर ओळखली जात आहे, मान्यही केली जात आहे. ( नवे रेफ्रिजरेटर हे या खाजगीपणाचा स्वीकार केल्याचे आणि प्रत्येकाच्या स्वतःच्या वसतिस्थानाचे महत्त्व वाढल्याचे लक्षण आहे. ) पण ह्यासाठी झगडे करावे लागले आहेत आणि टीकेला तोंड द्यावे लागले आहे. शिवाय लोकमताच्या दडपणाविरुद्धचा असंतोष आता पूर्णपणे शमलेला आहे असेही नाही. एक साथी असे म्हणाला की जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात हे ' लोकमत ' डोके वर काढते आणि त्याला तोंड द्यायचे तर तुमचे कातडे हत्तीचेच असले पाहिजे. दुसरा एकजण म्हणाला, " तुम्ही 'मध्यममार्गी असाल, किबुट्झची तत्त्वे आणि जीवनपद्धती मान्य करून सरळ रेषेत जात असाल तर तुम्हाला काही त्रास नाही. पण तुम्हाला काही वेगळं हवं असेल किंवा ठराविक नियमांच्या बाहेरचं काही करायचं असेल तर ते कठीण आहे हे समजून असा. "

तरीही हे खरेच की सुरुवातीच्या काळात समूहाच्या गतितत्त्वावर जो जोर देण्यात येई तो आता खूपच कमी झाला आहे. ' अधिकृत ' विचारसरणीतसुद्धा व्यक्ती आणि समूह यांच्या परस्परविकासावर जोर दिला जातो. समूहाच्या व्यक्तिविषयीच्या अपेक्षा आणि मागण्या यांचे दडपण पूर्णपणे उचलले गेले आहे असे नाही पण दैनंदिन जीवन आता वैयक्तिक आवडीनिवडी आणि इच्छा ह्यांच्या अनुरोधाने अधिकाधिक व्यतीत केले जाते आणि ह्या इच्छेत एकटे राहण्याचे स्वातंत्र्य गृहीत धरलेले असते. ( ऐकात्म्यभावनेचे आणि मानसिक सुरक्षिततेचे स्थान म्हणून गटाचे– विशेषतः समवयस्कांच्या समूहाचे– जे पूर्वापार चालत आलेले महत्त्व आहे त्याच्याशी हा बदल विसंगत नाही. )

## संकटावस्था चालूच

संकटावस्था अजून चालूच आहे. किबुट्झ जीवनच संकटमालिकावर उभारलेले

आहे. एक संकट संपले की दुसरे उभे राहातेच. वीस वर्षांपूर्वी ( प्रकरण सातमध्ये ) उल्लेखिलेले म्हणजे काम, स्त्री, विचारसरणी, वार्धक्य यांविषयींचे प्रश्न हे तर सनातनच आहेत आणि त्यांची कधीकाळी समाधानकारक सोडवणूक होईल की नाही याचीही शंका आहे. मात्र ते सोडविण्याचा सतत प्रयत्न केला जातो. वीस वर्षांपूर्वी जे विशेष महत्त्वाचे वाटत असत अशा दोन त्रासदायक प्रश्नांची आपण येथे चर्चा करू या. ते म्हणजे स्त्रियांचा प्रश्न आणि वृद्धांचा प्रश्न

**लैंगिक समता आणि स्त्रियांचा प्रश्न** : प्रशालेतून नुकत्याच उत्तीर्ण झालेल्या एका हुशार विद्यार्थ्याने जे सांगितले त्याच्यापासूनच या विषयाची सुरुवात करणे योग्य होईल. तो म्हणाला, मुला-मुलींना सारख्याच पद्धतीने शिकवून तयार करावे असा प्रशालेचा प्रयत्न असतो आणि बाह्यतः तरी ती सारखीच निपजतात. पण एखाद्या मुलीने एखादे अवजड काम अंगावर घेतले आणि चांगल्या रीतीने करून दाखविले तर तिला तुच्छतेने ' पुरुष ' असे म्हटले जाते. उलट तिने ते नीट केले नाही तर " काही झाले तरी मुलगीच ती ! तिला काय येणार ? " असे उद्गार निघतात. एखाद्या मुलीत सुंदर दिसण्याची स्त्रीसुलभ आवड जास्त असली आणि प्रसाधन वगैरे करून आपल्या स्त्रीत्वाला ती जास्त खुलवू लागली तर तिला ' वेश्या ' असे संबोधले जाते.

प्रत्यक्ष किबुट्झमध्ये मात्र परिस्थिती इतकी वाईट नाही. नेतृत्वाच्या सगळ्या भूमिका स्त्रिया पार पाडतात आणि असे असूनही त्यांच्या ' पुरुषीपणा 'चा उल्लेख कधीही कानावर येत नाही. एखादी जहांबाज, स्वतःचाच वरचष्मा चालवणारी बाई असेल तर तिच्याविषयी ( आपल्या समाजाप्रमाणेच ) द्विधा वृत्ती दिसून येते; पण स्त्रियांच्या दुबळेपणाबद्दल ती तर काय बाईच आहे अशा प्रकारचे तुच्छतेने उद्गार काढले जात नाहीत. शिवाय स्त्रियांनी आपले ' स्त्रीत्व ' जपले पाहिजे असे किबुट्झ-मधील प्रौढांना अधिकाधिक वाटू लागले आहे.

सामाजिक संरचनेच्या पातळीवर स्त्रियांना निर्णयाच्या प्रक्रियेत भाग घेता यावा आणि सामूहिक जीवन चालू ठेवता यावे यासाठी व्यवस्था करण्यात किबुट्झने यश मिळविले आहे. तथापि ( योनिना तामन-गार्बेर ह्यांनी सूचित केल्याप्रमाणे ) " कुटुंबांतर्गत व्यवहारांमध्ये त्याचप्रमाणे कामाचे वाटप, समित्यांवरील सभासदत्व, आणि केंद्रीय पदाधिकार यांमध्येही काहीशी लवचिक पण तरीही बरीचशी स्पष्ट अशी लैंगिक श्रमविभागणी झालेली आहे. "[५] वीस वर्षांपूर्वी कामाच्या वाटपाबाबत जो कल

---

५ " Sex-Role Diferentiation in an Equalitarian Society, " in T. E. Lasswell, J. H. Burma and J. H. Aronson ( eds. ), Life in Society ( Chicago : Scott, Foresman and Co. 1965 ), P. 145.

दिसून येत होता तो अजूनही चालू आहे आणि त्याला संस्थात्मक स्वरूप आले आहे. शेतीसारख्या उत्पादक श्रमात स्त्रीपुरुषांना समान भाग मिळावा असा जो पूर्वी वैचारिक आग्रह होता तो बाजूला पडून आता त्यांच्या कामांची रेखीवपणे विभागणी झालेली आहे. आता शेतातली पिके, मत्स्यपालन, फळबागा, भाजीमळे, अवजड यंत्रसामग्री, यंत्रदुरुस्ती इत्यादी विभागात स्त्रिया कामे करीत नाहीत, पण द्राक्षमळे, दुग्धोत्पादन, कुक्कुटपालन या विभागात करतात. देखभाल ( म्हणजे सुतारकाम, विजेचे काम, नळकाम, ) स्त्रिया करीत नाहीत, पण त्या कचेरीतले काम ( म्हणजे हिशेब ठेवणे, हिशेबाची पुस्तके लिहिणे, चिटणीशी काम ) करतात. स्वयंपाकघर, कपडेशिलाई, धुलाई, शिक्षण ह्या कामात तर त्यांचा प्रामुख्याने भाग आहे. अर्थात् जेव्हा एखाद्या विशेष कामासाठी जास्त माणूसबळ गुंतवावे लागते त्यावेळी हा भेद फारसा राहात नाही आणि स्वयंपाकघरातही काही पुरुष काम करतात. पण त्यांचे हे काम करणे ' प्रतीकात्मकच ' म्हटले पाहिजे. एरवी स्त्रीपुरुषांच्या भूमिकांची पारंपरिक विभागणीच बऱ्याच स्पष्टपणे संस्थारूप पावल्याचे ध्यानात येते.

किबुट्झच्या प्रशासन व्यवस्थेलाही वरचाच निष्कर्ष लागू पडतो हे समित्यांवरील जागांची ( १९६९ सालची ) पुढे जी यादी दिलेली आहे तीवरून ध्यानात येईल.

| | | | |
|---|---|---|---|
| | | सुरक्षा : | स्त्रिया नाहीत |
| सचिवालय : | ४ स्त्रिया ( चिटणीसांपैकी एकजण धरून ), ९ पुरुष | संस्कृति : | ६ स्त्रिया ( प्रमुख-धरून ), ७ पुरुष |
| शिक्षण : | ९ स्त्रिया, २ पुरुष | प्रशाळा : | ४ स्त्रिया, १ पुरुष |
| समाजकल्याण : | ६ स्त्रिया, ५ पुरुष | देखभाल : | स्त्रिया नाहीत. |
| राजकारण : | १ स्त्री, ५ पुरुष | यंत्रशाळा : | ,, ,, |
| अर्थखाते : | १ स्त्री, ८ पुरुष | बास्केटबॉल : | ,, ,, |
| कामवाटप : | स्त्रिया नाहीत | सभागृह : | २ स्त्रिया, ३ पुरुष |
| सैनिक : | ३ स्त्रिया, २ पुरुष | आरोग्य : | ३ स्त्रिया, १ पुरुष |
| संगीत : | १ स्त्री, ३ पुरुष | वस्त्रआवरण : | ६ स्त्रिया, २ पुरुष |
| ग्रंथालय : | २ स्त्रिया, १ पुरुष | | |

स्त्रीपुरुष भेदावर आधारलेल्या या श्रमविभागणीमुळे विचारचर्चांना बरीच चालना मिळालेली आहे. किबुट्झ संघटनेच्या प्रत्येक पातळीवर या प्रश्नाबाबत सभा, चर्चा, परिसंवाद झालेले आहेत आणि लेखही लिहिले गेले आहेत. स्त्रीचे जीवन अधिक सुखावह आणि अधिक समाधानाचे कसे करता येईल ह्या प्रश्नावरच या चर्चेचे लक्ष्य केंद्रित झालेले होते. स्त्रियांच्या असमाधानामधूनच वाढती कुटुंबप्रवण प्रवृत्ती निर्माण

झालेली आहे आणि किबुट्झच्या ऐकात्म्याला तिच्यापासून ( पूर्वीप्रमाणेच ) कायमचा धोका आहे. ( " माझ्या घरी काम करायचं तेच मी बाहेर करते आहे, फरक इतकाच की ते मी आता चारशे लोकांच्यासाठी करते आहे, मग निदान माझं घर आणि कुटुंब यांचं सुख तरी मी का घेऊ नये? "– असा विचार स्त्रियांच्या मनात येणे साहजिकच आहे. )

सात्रा स्त्रियांच्या आयांना पुरुषांची कामे करण्याची जशी हौस वाटत असे तशी सात्रा स्त्रियांना वाटत नसल्यामुळे ( आणि किबुट्झच्या प्रगतिशाली आणि कार्यक्षम शेतीव्यवसायाच्या गरजांशी असे करणे सुसंगतही नसल्यामुळे ) स्त्रियांच्या मागण्या इतर प्रकारांनी पुरविण्याचा किबुट्झने प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, पूर्वी सेवाविषयक कामांवर फारच थोडा पैसा खर्च करण्यात येत असे, आता हे काम हलके करण्यासाठी आणि ( अधिक सुखावह जरी नव्हे तरी ) अधिक ' आधुनिक ' करण्यासाठी नवीन आणि कार्यक्षम यंत्रसामग्री वापरली जात आहे. कार्यक्षमता वाढल्यामुळे स्त्रियांना सारख्याच प्रकारच्या पण निरनिराळ्या कामांतून पाळीपाळीने गुंतविणे शक्य झाले आहे. याहून महत्त्वाची गोष्ट अशी की बऱ्याच सेवाशास्त्रांना किबुट्झने वरचा व्यावसायिक दर्जा दिलेला आहे. त्यामुळे ह्या ' स्त्रीविशिष्ट ' भूमिकांमध्येही स्त्रियांना आता अभिमान वाटू लागलेला आहे. गृहअर्थशास्त्राचे प्रशिक्षण, आहारशास्त्रविषयक अभ्यासक्रम, आणि विशेषतः शैक्षणिक चर्चासत्रे, अभ्यासक्रम, आणि विद्यापीठीय अभ्यास यासाठी स्त्रियांना पाठविले जाते. त्याचबरोबर लष्करी सेवा पूर्ण केलेल्या प्रत्येक मुलीला कुठल्यातरी क्षेत्रात एका वर्षाचे प्रशिक्षण दिले पाहिजे असा नियम झाल्यामुळे स्त्रीकामगारांना उपलब्ध असलेल्या कामाच्या प्रकारांमध्येही वैविध्य आलेले आहे. याचा परिणाम असा की ( वर उल्लेखिल्याप्रमाणे ) काही मुलींनी शरीरचिकित्साशास्त्राचा अभ्यास केला आहे, काही मुलींनी कलाकौशल्याचा अभ्यास केला आहे आणि एक तर प्रशिक्षित सौंदर्यप्रसाधिका बनलेली आहे.

असे असूनही ' स्त्रीचा प्रश्न ' कायम आहे. किबुट्झ जीवनात स्त्रियांपेक्षा पुरुषांना समाधान वाटणाऱ्या गोष्टी अधिक असतात हे सर्वांना समजले आहे; आणि ' स्त्रियांचा प्रश्न ' म्हणजे ' समतेचा प्रश्न ' राहिलेला नसून स्त्रिया वठवीत असलेल्या भूमिकांमध्येच त्यांना अधिक समाधान कसे मिळेल असा झालेला आहे. तरीही ह्या अर्थाने का होईना प्रश्न शिल्लकच असल्यामुळे आपण आपले सुख लग्न, मुलेबाळे आणि काम या सनातन मार्गांनीच मिळविले पाहिजे असे ' असमाधानी ' स्त्रीला प्रकर्षाने वाटत राहाते. आपल्या जीवनाला काही उच्च ध्येय असावे, त्यात काही साहस असावे अशी इच्छा असणारी एक हुशार अविवाहित तरुणी काहीशा कडवटपणाने म्हणाली, " मला तर कधीकधी वाटते की किबुट्झमध्ये आपण फक्त लग्न करावं, मुलं जन्माला घालावी आणि इतर कशाचा ( कला, राजकारण, संस्कृति इ. चा ) विचार करू नये. "

कदाचित् आपणाला असे म्हणता येईल की पूर्वीचा प्रश्न ' सुटला ' आहे. पण त्यातून एक नवा व सार्वत्रिक ( त्याचप्रमाणे अधिक किबुट्झविशिष्ट ) प्रश्न निर्माण झालेला आहे. हेही एक प्रकारचे स्वाभाविकीकरण आहे असे म्हणण्याचा येथे मोह होतो.

**पिढ्यांमधील संघर्ष आणि वृद्धांचा प्रश्न :** बाहेरच्या समाजापेक्षा किबुट्झमध्ये पिढ्यांचा एकमेकांशी अधिक संपर्क येतो यात शंका नाही. पण तो औपचारिक आणि कामाच्या निमित्ताने आलेला असतो. एरवी दोन पिढ्यांमधली परस्पर प्रक्रिया आणि मैत्री यांचा अभावच दिसून येतो. याचे एक कारण असे की एकत्र वाढल्यामुळे साब्रांची एकमेकांशी बोलण्याची भाषा एकमेकांना समजण्यासारखी असते आणि त्यांचे अनुभवही एकाच प्रकारचे असतात; शिवाय ज्ञात व्यक्तींमध्ये वावरण्याने मनाला एक समाधान असते. याचा परिणाम असा होतो की समवयस्कांच्या गटांच्या पलीकडे संबंध जोडण्याची त्यांना फारशी गरज उरत नाही. दुसरे असे की किबुट्झ-मधले आणि एकूण इस्रायली समाजामधलेही वास्तव अशा रीतीने बदलत आहे की दोन पिढ्यांमध्ये संबंध प्रस्थापित होण्याला त्यामुळे बाधा येत आहे.

कुटुंबाच्या गटापासून सुरवात केली तर असे म्हणता येईल की प्रौढ साब्रा आणि त्यांचे आईबाप ह्यांचे संबंध " मैत्रीचे पण घनिष्ठ नाहीत " अशा प्रकारचे असतात. मात्र ह्यात लग्नापूर्वी आणि लग्नानंतर असा भेद केला तर झपाट्याने झालेला बदल दिसून येतो. लग्नापूर्वी प्रौढ साब्रा आपल्या आईवडिलांकडे क्वचितच भेटायला जातात आणि त्यांच्यात जवळीकही फारच थोडी दिसून येते. इतकी की नात्याचे संबंध ओळखण्यात कधीकधी संशोधकालाही अडचण पडते. पण एक गोष्ट खरी की अविवाहित साब्रा एरवी आपल्या आईवडिलांना भेटोत वा न भेटोत, शनिवारी दुपारी ते त्यांच्याबरोबर नियमाने चहा घेतात. ही एक आता प्रस्थापित अशी संस्था झाली आहे आणि ही एकच वेळ अशी आहे की ह्यावेळी सर्व कुटुंबे त्यातल्या सर्व माणसांसह एकत्र येतात.

लग्न झाल्यानंतर आणि विशेषतः मुले झाल्यानंतर परस्पर भेटींची ही पद्धत लक्षणीय रीतीने बदलते. भेटी अधिक वेळा होतात आणि त्यात नियमितपणा येतो. आणि कौटुंबिक मेळाव्यांच्या भेटींचा केंद्रबिंदू जास्तकरून मुले हाच असतो. मुलांमुळे कधीकधी आया आणि आज्या यांमध्ये प्रश्नही निर्माण होतात. उदाहरणार्थ, आज्या आपल्या नातवांशी जेव्हा वागतात तेव्हा त्यांच्या आविर्भावात एक प्रकारचा ताण आणि घसमुसळेपणा दिसून येतो आणि ह्यामुळे आया त्रस्त होतात. यात खरी गोष्ट अशी की वृद्ध स्त्रिया जिने प्रथम आपली मुले शिशुगृहाला सुपूर्द केली त्या पिढीच्या असल्यामुळे मुलांशी नेमके कसे वागावे हे त्यांना कळत नाही. त्या जे काही करतात त्यात अवघडलेपणा, गोंधळ आणि बावरलेपणा यांचे चमत्कारिक मिश्रण दिसून येते. अर्थात् त्या मुलांचे अतिशय लाडही करतात आणि आईबाप जेव्हा सुट्टीवर किंवा इतर

काही कारणांनी बाहेर जातात तेव्हा मुले सांभाळण्याचे महत्त्वाचे काम त्यांनाच करावे लागते.

असे असले तरी साब्रा आणि संस्थापक यांच्यामधले पिढ्यांचे अंतर कायम राहतेच. आणि संस्थापकांना साब्रांविषयी जे 'वैफल्य' वाटते त्यामुळे हे अंतर अधिकच दुणावते. हे वैफल्य शारीरिक शक्तीचा ऱ्हास, आपल्या तारुण्याच्या आणि 'त्या सुवर्णयुगा'च्या आठवणी, तरुण पिढीच्या बदलत्या गरजा समजून घेण्याची आणि त्यांच्याशी जुळते घेण्याची अपात्रता आणि ज्या ध्येयनिष्ठेने त्यांना पूर्वी सावरून धरले होते तिच्यातच वास्तवाच्या दर्शनाने आलेली क्षीणता अशा विविध घटकांमुळे निर्माण झालेले असते. त्यामुळे असेही म्हणावेसे वाटते की हे पिढ्यामधील अंतर अल्पकालीन ठरेल आणि साब्रा स्वतः जसजसे वयस्क होतील तसतसे वृद्ध साब्रा आणि तरुण साब्रा यांच्यामधील अंतर कमीकमी होत जाईल. याचे एक कारण म्हणजे वर उल्लेखिलेली स्वाभाविकीकरणाची प्रक्रिया चालू राहील आणि दुसरे कारण म्हणजे आताच्या वृद्धांच्या पिढीत जी द्विधा वृत्ती आढळते ती पुढेपुढे कमी होईल. साब्रा जसजसे म्हातारे होतील तसतशी वार्धक्याची सार्वत्रिक वैशिष्ट्ये--स्वमतप्रस्थापन, नकार आणि अपावर्तन--त्यांच्यातही दिसून येतील आणि त्यांच्याही इतरांशी असलेल्या संबंधात विक्षेप आणतील; पण त्यांची वार्धक्यप्रक्रिया त्यांच्या आईबापां-पेक्षा कमी प्रक्षोभक आणि अधिक सातत्यपूर्ण असेल.

'पिढ्यातील अंतर' हा वृद्धांच्या प्रश्नाचा फक्त एक भाग आहे आणि एकूण वृद्धांचा प्रश्न वीस वर्षांपूर्वीच्या मानाने अधिक तीव्र झालेला आहे. तारुण्यातली आपली स्वप्ने सफल झालेली नाहीत असे त्यांना वाटते. आपण जे केले ते खरोखरच तेवढ्या मोलाचे होते की काय अशा शंका त्यांना येतात. त्यांचा प्रश्न मुख्यतः अशा विचारां-मधूनच निर्माण झाला आहे. पण त्यात आणखीही घटक आहेत. आपण किबुट्झला जेवढे देतो त्या मानाने घेतो अधिक अशी नाउमेद करणारी भावना त्यांच्या मनात येते. तेच ते चेहरे आणि त्याच त्या जागा सारख्या पाहात राहण्याचा कंटाळाही त्यात आहे. शिवाय वार्धक्याचा सनातन प्रश्नही आहेच. तो प्रश्न म्हणजे (एरिक-सनचे शब्द वापरायचे तर) 'जीवनक्रमातल्या शेवटच्या आणीबाणी'ला तोंड देण्याचा. ही शेवटची आणीबाणी म्हणजे वार्धक्यातील निराशेमुळे व्यक्तिमत्त्वाच्या एकसंधपणाला निर्माण होणारा धोका. त्यातच पुन्हा वर चर्चिलेल्या प्रश्नाची भर पडते तो म्हणजे मुलांशी घनिष्ठ संबंधांचा अभाव.

शेवटी कामाचा प्रश्न. ज्या पिढीने आपल्या मूल्यश्रेणीत श्रमाला सर्वांत महत्त्वाचे स्थान दिले तिच्या दृष्टीने या प्रश्नाची तीव्रता विशेष आहे हे सांगायला नकोच. कारखान्यामधून या प्रश्नाला समाधानकारक उत्तर मिळालेले नाही. कामवाटपाच्या वेळी म्हातारी माणसे कधीकधी अत्यंत प्रक्षुब्ध आणि अविवेकी बनतात. एका संस्थापिकेचे

उदाहरण घ्या. ही खरी म्हणजे प्रेमळ आणि उदार स्वभावाची. तिच्याकडे एकदा स्वयंपाकघरात काम करण्याची पाळी आली तेव्हा त्याविरुद्ध तिने जवळजवळ थयथयाट केला आणि ऑलिव्ह तोडण्याच्या कामावर परत जाण्याचा हेका धरला. शेवटी तिच्या म्हणण्याप्रमाणे झाले आणि अर्थातच तिने कामही खूप आणि चांगले केले. पण तिच्या या वागण्यात असा काही हट्टवादीपणा होता की तिच्या भवितव्याबद्दल कुणालाही काळजी वाटावी. दुसऱ्या एका संस्थापिकेला ( तिच्या वयामुळे ) तिच्या आवडत्या बागेत फक्त चार तास काम करण्याची परवानगी मिळालेली होती. एक दिवस भयंकर ऊन तापत होते म्हणून तिच्या बरोबरच्या सगळ्या कामगारांनी थोडीशी सुट्टी घेतली आणि थंड पेय पिण्यासाठी तिलाही आपल्यात बोलावले. पण " मला फक्त चार तास काम करू देतात आणि त्यातला एकही क्षण मला बसून वाया घालवायचा नाही, " असे म्हणून तिने त्यांना नकार दिला.

पण वृद्धांचा प्रश्न केवळ ' मानसिक ' नाही. आज दीडशेहून अधिक व्यक्ती साठीच्या जवळपासच्या किंवा साठी पार केलेल्या आहेत. त्यामुळे त्यांची काळजी घेण्याबाबचे अनंत नवे प्रश्न निर्माण झालेले आहेत. या वृद्धांना अधिक सुखावह अशी वसतिस्थाने देणे आणि त्यांना अधिक सोयी पुरविणे या दोन गोष्टींच्या पलीकडे किबुट्झ या प्रश्नाबाबत काहीही करू शकलेला नाही. ( खरे म्हणजे या प्रश्नाला धार्मिक उत्तरे सोडता दुसरी कोणती उत्तरे आहेत ? )

हे आणि इतर अनेक प्रश्न जागते असूनही किबुट्झ कायमच आहे; एवढेच नव्हे तर त्याची भरभराटही होत आहे. प्रारंभीच्या काळात कदाचित आवश्यक असणारा आग्रहीपणा जाऊन आता त्याच्या जागी अधिक लवचिक, व्यवहारवादी, आणि रोख-ठोक दृष्टिकोण आलेला आहे. नव्या प्रश्नांशी जुळते घेताना किबुट्झ बदलत आहे हे तर खरेच पण हा बदल मूळ सनदेच्या चौकटीतच घडून येत आहे. याचा अर्थ असा की कितीही बदल झालेले असोत, किबुट्झने आपले किबुट्झपण गमावलेले नाही.

इतका दीर्घकाळ टिकून किबुट्झने हे सिद्ध केलेले आहे की बाहेरून आणि आतून केवढीही प्रचंड दडपणे आली तरी पराकोटीचे सहकारीकरण ज्यात अंतर्भूत आहे असा एक प्रयोग यशस्वी होऊ शकतो आणि भरभराटही पावू शकतो. अशाच रीतीने त्याची भरभराट होत गेली तर वैयक्तिक आणि सामूहिक गरजांचा तोल उत्पादनप्रवण, समाधानकारक आणि मानसिक दृष्ट्या ' निरोगी ' अशा पद्धतीने साधणाऱ्या समाजाचा एक नमुना म्हणून किबुट्झचा आदर्श प्रस्थापित होईल. किबुट्झची मुले बाहेरच्या जगाला संमुख राहूनही त्यातले वेगवेगळे घटक आपली विशिष्ट मानसिक-सांस्कृतिक चाळणी लावून निवडून घेतील आणि त्यांचा स्वीकार करतील तर त्यांनी एक महत्त्वाची कामगिरी केली असे होईल. अर्थात धोके आहेतच आणि ते दोन प्रकारचे आहेत. एक, किबुट्झच्या पलीकडे ( किंवा किबुट्झच्या तत्त्व-

प्रणालीच्या पलीकडे ) खेचणाऱ्या स्वातंत्र्याच्या केंद्रापसारी प्रेरणा आणि दोन, आपल्यातच गुंतून जाणाऱ्या पंथीय स्वरूपाच्या केंद्रानुगामी प्रेरणा. या दोन्हींचा मेळ साधणे ही एक अवघड अशी तारेवरची कसरत आहे आणि तिचे निरीक्षण करीत राहणे नेहमीच उद्बोधक ठरणार आहे.

* * *

# संदर्भसाहित्य

Becker, Howard. *German Youth : Bond or Free.* New York, Oxford University, 1946.

Dayan, Shmuel. *Moshav Ovdim.* Palestine Pioneer Library, n.d.

Dubnow, Simon. *The History of the Jews in Russia and Poland.* Philadelphia : Jewish Publication Society, 1920.

Gide, Charles. *Communist and Co-operative Colonies.* London : G. G. Harrap, 1930.

Holloway, Mark. *Heavens on Earth.* New York : Library Publishers, 1951

Infield, Henrick F. *Co-operative Living in Palestine.* New York : Dryden, 1944.

Joffe, Natalie F. "The Dynamics of Benefice among East European Jews," *Social Forces*, 27 : 238–247 ( 1949 ).

Kaufman, Yehezkel. "Anti-Semitic Stereotypes in Zionism," *Commentary*, 7 : 239–245 ( 1949 ).

Kurland, Samuel. *Co-operative Palestine.* New York : Sharon Books, 1947.

Levensohn, Lotta. *Outline of Zionist History.* New York : Scopus, 1941.

Lovejoy, Arthur O. and Boas, George. *A Documentary History of Primitivism and Related Ideas.* Baltimore: Johns Hopkins, 1935.

Maletz, David. *Young Hearts.* New York : Shocken, 1950.

Mannheim, Karl. *Ideology and Utopia.* New York : Harcourt, Brace, 1936.

Mosensohn, Yigal. *Derech Gever.* Tel Aviv : N. Tversky, 1953.

Muenzer, Gerhard. *Labour Enterprise in Palestine.* New York : Sharon, 1947.

Murdock, George Peter. *Social Structure.* New York : Macmilan, 1949.

Nordhoff, Charles. *The Communist Societies of the United States.* New York : Harpers, 1875.

Nottingham, Elizabeth K. *Religion and Society.* Garden City : Doubleday, 1954.

Noyes, Pierepont. *My Father's House.* New York : Farrar and Rinehart, 1937.

Parker, Robert. *A Yankee Saint.* New York : G. P. Putnam, 1935.

Rosenfeld, Eva. " Social Stratification in a Classless Society," *American Sociological Review,* 16 : 766–774 ( 1951 ).

Schauss, Hayyim. *The Jewish Festivals.* Cincinnati : Union of American Hebrew Congregations, 1938.

Spiro, Melford E. " Is the Family Universal," *American Anthropologist,* 56 : 839-846 ( 1954 ).

—" Education in a Collective Settelment in Israel." *American Journal of Orthopsychiatry,* 25 : 283–292 ( 1955 ).

*Statistical Pamphlets.* Tel Aviv : Brith Pikuach, 1951.

Troeltsch, Ernst. *The Social Teachings of the Christian Churches.* New York : Macmillan, 1931.

Weingarten, Murray. *Life in a Kibbutz.* New York : The Reconstructionist Press, 1955.

Wilson, Edmund. " The Scrolls from the Dead Sea," *The New Yorker* ( May 14, 1955 ), PP. 45-121.

Zborowski, Mark and Herzog, Elizabeth. *Life is with People.* New York : International Universities Press, 1952.


टीप : हे पुस्तक छापावयास गेल्यानंतर डेगानिया या पहिल्या किबुट्झच्या एका संस्थापकाने आपल्या आत्मवृत्ताच्या स्वरूपात डेगानियाचा इतिहास अत्यंत उत्कृष्टपणे कथन केलेला प्रसिद्ध झाला आहे. पाहा; Joseph Baratz, *A Village by the Jordan : the Story of Degania.* New York : Roy Publishers, 1955. ( बाराट्झ यांचे पुस्तक कुसुम पटवर्धन यांनी **जॉर्डन नदीच्या तीरावर** या नावाने मराठीत अनुवादित केले आहे. साधना प्रकाशन, पुणे, ३०. — अनुवादक)

# स्पष्टीकरणात्मक टीपा

ग्रंथात ज्यांचा उल्लेख आलेला आहे अशा काही महत्त्वाच्या व्यक्ती, घटना, विषय इत्यादींवर येथे प्रकरणवार स्पष्टीकरणात्मक टीपा दिल्या आहेत.––अनुवादक.

**प्रकरण १**

१. *इनफील्ड* : हेन्रिक एफ्. इन्फील्ड [ Henrik F. Infield ] ह्या समाजशास्त्रज्ञाने आपल्या अनेक ग्रंथांतून सामूहिक पद्धतीच्या समाजांचा अभ्यास केला आहे. त्याच्या काही ग्रंथांची नावे : ( १ ) *Co-operative Living in Palestine*, Kegan Paul, Trench Trubner and Co., London, 1946. ( २ ) *Co-operative Communities at Work*, Kegan Paul, Trench Trubner and Co., London, 1947. (३) *Utopia and Experiment: Essays in the Sociology of Co-operation*, Frederick A. Praeger, New York, 1955. ह्याशिवाय इन्फील्डने संपादित केलेला लेखसंग्रह, *Co-operative Group Living: An International Symposium on Group Farming and Sociology of Co-operation*, Henry Koosis and Co, New York, 1950.

२. *सामाजिक संस्करण* : ' Socialization ' ह्या समाजशास्त्रीय संज्ञेचा अनुवाद ' सामाजिकीकरण ' किंवा ' सामाजिक संस्करण ' ह्या संज्ञांनी केला आहे. अर्थशास्त्रात ' Socialization ' ( ' सामाजिकीकरण ' ) ही संज्ञा ' सामाजिक मालकीत आणणे ' ह्या अर्थाने वापरली जाते. उलट मुले वाढत असताना ती पुढे समाजाचे घटक व्हावीत ह्या दृष्टीने त्यांच्यावर काही संस्कार केले जातात किंवा आपाततः घडतात, ही जी प्रक्रिया तिला समाजशास्त्रात ' Socialization ' असे म्हणतात. प्रौढांकडून मुलांकडे संस्कृतीचा वारसा ज्या प्रक्रियेने पोचविला जातो ती प्रक्रिया म्हणजे ' Socialization ' असे वेगळ्या शब्दात सांगता येईल.

३. *सहभागी निरीक्षक* : ' Participant Observer ' ह्या संज्ञेला पर्याय म्हणून ही संज्ञा योजिली आहे. प्रश्नपत्रिका [ Questionnare ] पाठवून अभ्यासविषयाची माहिती मिळविणे ही संशोधनाची एक पद्धत. अभ्यासविषयाशी संबंधित असलेल्या व्यक्तींना जरूर तितक्या वेळी भेटी देऊन त्यांच्या मुलाखती घेणे किंवा माहितीपत्रिका [ Schedule ] भरणे ही दुसरी पद्धत. संबंधित व्यक्ती किंवा समाज यांच्यामध्ये दीर्घकाळ राहून, त्यांच्या जीवनात समरस व सहभागी होऊन, जणू काही त्या समाजाचा एक घटक म्हणून राहून निरीक्षण करणे व माहिती मिळविणे ही तिसरी व अधिक अवघड पण अर्थातच अधिक उपयुक्त पद्धत. ह्या पद्धतीला 'Participant

Observation' ('सहभागी निरीक्षण') असे नाव आहे. मानववंशशास्त्रीय संशोधनात ह्या पद्धतीचा प्रामुख्याने उपयोग केला जातो. किंबहुना ही संशोधनपद्धती रूढ करण्याचे श्रेय मानववंशशास्त्रज्ञांनाच आहे. प्रस्तुतचा मानववंशशास्त्रीय ग्रंथही ह्याच संशोधनपद्धतीवर आधारलेला आहे (लेखक आणि त्याची पत्नी ह्यांनी अकरा महिने किबुट्झमध्ये राहूनच हा अभ्यास केला असे प्रस्तावनेत म्हटलेले आहे.)

**प्रकरण २**

१. *झिऑनवाद* [*Zionism*]: 'त्सीऑन [Tsiyon] ह्या हिब्रू शब्दाचा अर्थ 'टेकडी' असा आहे. येथे अभिप्रेत असलेली टेकडी म्हणजे जीवर 'डेव्हिडचे नगर' वसविण्यात आले होते ती जेरुसलेममधील टेकडी. ही टेकडी हे ज्यू धर्माचे पवित्र स्थळ मानले जाते. झिऑनला म्हणजे जेरुसलेमला, पॅलेस्टाइनला परत जाण्यासाठी (म्हणजे पॅलेस्टाईनमध्ये ज्यूंचे राष्ट्र उभे करण्यासाठी) निर्माण झालेली चळवळ म्हणजे झिऑनिझम. १८८२ सालापासून विदेशातील ज्यू तरुण पॅलेस्टाईनमध्ये प्रवेश करू लागले होते; पण ज्यूंच्या राष्ट्रीय आकांक्षेला राजकीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर उच्चार देण्याचे काम थिओडोर हर्झल ह्याने १८९७ साली स्वित्सर्लंडमधील बासल या शहरी बोलाविलेल्या पहिल्या आंतरराष्ट्रीय झिऑनवादी परिषदेने केले.

२. *श्टेटल* [*Shtetl*]: पूर्व युरोपातील ज्यूंच्या ग्रामीण भागातील वसाहती. ह्यात ज्यूंची बहुसंख्या असल्यामुळे त्यांच्या जीवनाला एक विशिष्ट आकार प्राप्त झाला होता–ज्याचा उल्लेख ग्रंथात आहे. एकोणिसाव्या व विसाव्या शतकातील ज्यूंची हत्याकांडे व विशेषतः नाझींनी केलेला विध्वंस ह्यांमुळे या वसाहती नाहीशा झाल्या.

३. *मायक्रोनेशिया* : वायव्य पॅसिफिक महासागरातील छोट्या बेटांचा एक समूह. मेलानेशिया, पॉलिनेशिया हे इतर समूह. या बेटांतून आदिम जमातींची वस्ती असल्यामुळे मानववंशशास्त्रज्ञांच्या दृष्टीने ती महत्त्वाची अभ्यासाची ठिकाणे आहेत.

४. *हगाल, मार्क* [*Marc Chagall*] : एक नामवंत फ्रेंच–ज्यू चित्रकार. जन्म १८८७, रशिया. बायबल हे ह्याच्या चित्रांचे स्फूर्तिस्थान आहे. पश्चिम जेरुसलेममधील हाडासा—हिब्रू विद्यापीठाच्या वैद्यकीय केंद्राचे जे धर्ममंदिर (सिनेगॉग) बांधण्यात आले आहे त्याच्या कळसाच्या बारा खिडक्या रंगीत काचचित्रांनी हगालने सजविल्या आहेत. ज्यू धर्म, ज्यू लोक व इस्रायल हे हगालच्या नितांत प्रेमाचे विषय आहेत व ही बहुरंगी चित्रे केवळ सामग्री व कारागिरांचे काम ह्याचा खर्च घेऊन त्याने इस्रायलला भेट म्हणून दिली आहेत.

५. *मॅंडेटरी पॅलेस्टाईन* : पहिल्या महायुद्धापूर्वी पॅलेस्टाइन हा तुर्कस्तानच्या सम्राटाच्या आधिपत्याखालचा एक प्रदेश होता. महायुद्धात तुर्कस्तान जर्मनीच्या बाजूला असल्याने ब्रिटिश व फ्रेंच फौजांनी पॅलेस्टाइन व्यापले. युद्ध संपल्यावर सुमारे दहा हजार चौरस मैलांचा पॅलेस्टाइनचा प्रदेश ब्रिटिशांच्या मॅंडेटखाली (देखरेखीखाली

किंवा विश्वस्ततेखाली ) देण्यात आला; त्याला मँडेटरी पॅलेस्टाइन असे म्हणतात.

६. *विदेश* : ' Diaspora ' ह्याला समानार्थी म्हणून हा शब्द वापरला आहे. रोमन आक्रमणानंतर ज्यू लोक पॅलेस्टाइमधून निर्वासित होऊन देशोदेशी पांगले ह्या घटनेला ' दिआस्पोरा ' असे म्हणतात. शिवाय पॅलेस्टाइनच्या बाहेर ज्या ज्या देशांतून ज्यू वस्ती होती, किंवा आता इस्रायलच्या बाहेर आहे, अशा देशांनाही दिआस्पोरा म्हणतात. ह्या उत्तरोक्त अर्थानेच ' विदेश ' हा शब्द वापरला आहे.

**प्रकरण ३**

१. *ज्यूंचे हत्याकांड* : ' Pogrom ' ह्या शब्दासाठी प्रतिशब्द. ' Grom ' ह्या रशियन शब्दाचा अर्थ मेघगर्जना [ Thunder ] असून ' पोग्रोम'ला रशियन भाषेत ' विनाश ' [ Destruction ] असा मूळ अर्थ आहे. अलीकडे त्याला प्राप्त झालेला अर्थ ' कोणत्याही समाजगटाची संघटित रितीने केलेली हत्त्या ' असा आहे. इंग्रजीत तो ' ज्यूंचे हत्त्याकांड ( किंवा शिरकाण ) ' ह्या अर्थाने वापरला जातो. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपासून ही हत्त्याकांडे रशियात व पूर्व युरोपात वारंवार घडू लागली. झारच्या आमदानीतील रशियात १८८१ साली ३० शहरांत ज्यूंवर मोठ्या प्रमाणात अत्याचार झाले. १९०१ ते १९०६ च्या दरम्यान आणखी शेकडो हत्त्याकांडे झाली. ज्यू राष्ट्रवादाचा व पॅलेस्टाइन-प्रयाणाच्या प्रयत्नांचा उदयही ह्याच कालखंडाशी समांतर आहे.

२. *गेटो [ Ghetto ]* : नागरी भागातील ज्यूंची वस्ती.

३. *युगांडाऐवजी पॅलेस्टाइन* : ज्यूंची राष्ट्रभूमीची चळवळ जोर धरू लागल्यावर इंग्लंडचा वसाहतमंत्री जोसेफ चेंबरलेन (१८३६–१९१४) ह्याने पूर्व आफ्रिकेतील युगांडा ह्या ब्रिटिश वसाहतीचा सुमारे सहा हजार चौरस मैलांचा डोंगराळ प्रदेश ज्यूंना देण्याची योजना थिओडर हर्झल, हाइम वाइझमन इत्यादी ज्यू नेत्यांसमोर मांडली. अंतिम उद्दिष्ट पॅलेस्टाइनच, पण ते मिळविण्याच्या मार्गात एक टप्पा म्हणून युगांडाचा प्रदेश स्वीकारण्याची हर्झलची तयारी होती. पण १९०६ च्या झिऑनवादी परिषदेला जमलेल्या प्रतिनिधींनी ही योजना फेटाळली.

४. *बुंड-एरलेब्निस [ Bunderlebnis ]* : जर्मन शब्द Bund = ऐकात्म्य; erlebnis = भावना, अनुभव. तीव्र ऐकात्म्याची भावना.

५. *प्रॉमीथिअस [ Prometheus ]* : ग्रीक पुराणातील एक वीरपुरुष. ह्याने मातीपासून मानवजातीची उत्पत्ती केली. तिला वेगवेगळ्या कला शिकविल्या व तिच्यासाठी स्वर्गातून अग्नी चोरून आणला. प्रॉमीथिअसला शिक्षा करण्यासाठी झीअस [ Zeus ] ह्या देवांच्या सम्राटाने त्याला कॉकेशस पर्वतावरील एका शिळेला साखळदंडांनी बांधून टाकले. एक गिधाड रोज येऊन जेरबंद झालेल्या प्रॉमीथिअसच्या यकृताचा लचका काढून जाई. ह्या कथेवरून प्रॉमीथिअस हा धैर्य, पराक्रम, सहनशीलता

इत्यादी गुणांचा प्रतीक ठरला.

**प्रकरण ४**

१. *कोशेर* [ *Kosher* ] : ज्यूंच्या धार्मिक पद्धतीने तयार केलेले अन्न.

२. *स्पार्टन* : स्पार्टा [ *Sparta* ] ह्या प्राचीन ग्रीक नगरराज्यातील रहिवासी. सदैव युद्धसज्जता ही स्पार्टाची जीवनरीती होती; तिच्या अनुषंगाने शिस्त, साधी राहणी व धैर्य ह्या गुणांची जोपासना स्पार्टामध्ये नियोजित पद्धतीने करण्यात येत असे. म्हणून डामडौल न करता, केवळ शरीररक्षणाच्या हेतूने किमान शारीरिक गरजा भागवीत जीवन कंठण्याच्या पद्धतीस ' स्पार्टन साधेपणा ' किंवा ' स्पार्टन राहणी ' असे म्हणतात.

३. *' डेथ ऑफ ए सेल्समन '* [ *Death of A Salesman* ] : आर्थर मिलर ( ज० १९१६ ) ह्या अमेरिकन नाटककाराचे सुप्रसिद्ध नाटक ( १९४८ ). १९४५ साली ज्यू-द्वेषाच्या विषयावर लिहिलेल्या ' फोकस ' ( Focus ) ह्या कादंबरीने तो प्रसिद्धीस आला. ' दि मॅन हू हॅड ऑल दि लक ' ( १९४४ ), ' ऑल माय सन्स ' ( १९४७ ), ' दि क्रूसिबल ' ( १९५३ ), ' ए मेमरी ऑफ टू मंडेज ' ( १९५५ ) आणि ' ए व्ह्यू फ्रॉम दि ब्रिज ' ( १९५५ )—ही त्याची इतर नाटके.

४. *व्हेब्लेन* : थॉर्स्टीन बुंड व्हेब्लेन [ Thorstein Bunde Veblen ] १८५७–१९२९. अमेरिकन अर्थशास्त्रज्ञ. समकालीन अर्थशास्त्राचा प्रखर टीकाकार. अर्थशास्त्राच्या रूढ चौकटीबाहेरच्या खोल सामाजिक प्रवाहांचा वेध घेणारे त्याचे लेखन आहे. आर्थिक व्यवहारांवर ' संस्थांचा ' [ Institutions ] मोठा प्रभाव असतो म्हणून त्यांच्या संदर्भात आर्थिक व्यवहारांचा अभ्यास अवश्य आहे असे मत मांडणाऱ्या ' संस्थावादी ' [ Institutionalist ] अर्थशास्त्रज्ञांत त्याची गणना केली जाते. ' दि थिअरी ऑफ दि लीजर क्लास ' ( १८९९ ) हे त्याचे सर्वांत प्रसिद्ध व खळबळ उडवून देणारे पुस्तक. व्हेब्लेन त्याच्या विदारक आणि विलक्षण उपहासगर्भ शैलीविषयीही प्रसिद्ध आहे. ' दि थिअरी ऑफ बिझिनेस एंटरप्राइज ' ( १९०४ ) ' दि इन्स्टिंक्ट ऑफ वर्कमनशिप ' ( १९१४ ), ' इंपीरियल जर्मनी अँड दि इंडस्ट्रियल रेव्होल्यूशन ' ( १९१४ ) हे त्याचे आणखी काही ग्रंथ.

**प्रकरण ५**

१. *मकाबी* [ *Maccabee* ] : मताथिअस आणि त्याचे पाच पुत्र—जोहानान, सायमन, ज्युडास, एलिआझार आणि जोनाथन—ह्यांच्या कुटुंबाला ' मकाबी ' असे नाव आहे. सीरियाचा राजा अँटिओकस एपिफॅनिस ( इ. स. पू. १७५–१६४ ) ह्यांच्या जुलमी राजवटीविरुद्ध मकाबींनी इ. स. पू. १६७ मध्ये बंड करून ' हासमोन ' राजवटीची स्थापना केली व मंदिराची ( पुढे टीप ७ पाहा ) मुक्तता करून ते शुद्ध केले. ह्या घटनेच्या स्मरणार्थ ' हानुका ' हा सण साजरा केला जातो.

२. *एस्थर* [ *Esther* ] : पार्शियाचा राजा पहिला झर्गिस ह्याची लावण्यवती ज्यू राणी. पर्शियन साम्राज्यातील ज्यूंची सार्वत्रिक कत्तल करण्याचा आदेश परत घेण्यासाठी हिने राजाचे मन वळविले. ज्या दिवशी कत्तल होणार होती त्याच दिवशी ज्यूंनी उठाव करून राजाचा वजीर हामान ह्याच्या सैन्याचा पराभव केला. पुरीमचा सण ह्या घटनेच्या स्मृतिप्रीत्यर्थ साजरा केला जातो. जुन्या कराराच्या ' बुक ऑफ एस्थर ' ह्या प्रकरणात ही कथा सांगितली आहे.

३. *मॉर्डेकाय* [ *Mordecai* ] : वरच्या टीपेत दिलेल्या एस्थरचा नातेवाईक आणि सहकारी.

४. *एक्झोडस* [ *Exodus* ] : इ. स. पू. १९०० च्या सुमारास कनान ( पॅलेस्टाइनमध्ये ) दुष्काळ पडल्यामुळे ज्यू लोक ईजिप्तमध्ये गेले. तेथे त्यांची शक्ती वाढू लागल्यामुळे इजिप्शियनांना त्यांची भीती वाटू लागली व त्यांनी ज्यूंना गुलाम केले. ( इ. स. पू. १३ वे शतक. ) मोझेसच्या नेतृत्वाखाली ज्यूंनी दास्यमुक्तीची चळवळ केली. ' इस्रायलच्या मुलांना मायदेशी परत घेऊन जा ' अशी परमेश्वराने मोझेसला आज्ञा केली व मोझेसने ती फॅराहोला सांगितली. पण फॅराहोने दाद दिली नाही. ह्याचा परिणाम म्हणून ईजिप्तमध्ये दहा वेळा भयानक प्लेगची लागण झाली. शेवटी फॅराहोने ज्यूंची मुक्तता केली. ही दास्यमुक्ती म्हणजेच ' एक्झोडस '-निर्गमन. पुढे मोझेस ईजिप्तमधून आपल्या अनुयायांबरोबर कनानकडे येत असताना सिनाई पर्वतावर त्याला साक्षात्कार झाला. प्रत्यक्ष परमेश्वराने त्याला ' दहा आदेश ' ( टेन कमांडमेंट्स ) दिले व बायबलचे पहिले पाच भाग ( तोरा–Torah—नावाचा ग्रंथ ) त्याच्या हवाली केले. मोझेस व त्याचे अनुयायी पुढे चाळीस वर्षे रानावनात भटकत होते. कनानमध्ये परत जाण्याची त्यांना भीती वाटत होती. ह्या अश्रद्धेपायी ते सर्वजण वाळवंटात मरून गेले. मात्र त्या सर्वांची स्वातंत्र्यात जन्मलेली मुले जिवंत राहिली व जोशुआच्या नेतृत्वाखाली त्यांनी कनानमध्ये प्रवेश केला. अशा रितीने निर्गमन ( व पॅलेस्टाइनमध्ये पुनःप्रवेश ) ही घटना ज्यूंच्या दृष्टीने स्वतंत्रतेचे प्रतीक ठरली. पासोव्हरचा सण म्हणजे या घटनेची स्मृती साजरी करण्याचा समारंभ.

५. *टेबरनॅकल्स* [ *Tabernacles* ] : रानावनातील भ्रमंतीच्या काळात ( वरची टीप पाहा ) ज्यू लोक झोपड्यांमधून वास्तव्य करीत होते. ह्या अवस्थेची स्मृती म्हणून ' फीस्ट ऑफ टेबरनॅकल्स ' हा सण साजरा केला जातो. ' टेबरनॅकल ' म्हणजे लहानशी झोपडी किंवा तंबू.

६. *तालमुद* [ *Talmud* ] : ज्यूंच्या आचार-नियमांचा ग्रंथ. ह्यात ( १ ) ' मिश्ना ' म्हणजे ज्यूंच्या धर्मगुरुंनी घालून दिलेले व इ. स. २०० च्या सुमारास एकत्रित केलेले नियम व ( २ ) त्यांवरील टीपा व भाष्ये, ह्यांचा समावेश होतो.

७. *मंदिर* [ *Temple* ] : डेव्हिड ह्या पराक्रमी राजाचा मुलगा सॉलोमन

( इ. स. पू. ९६५–९२८ ) ह्याने जेरुसलेम ही आपल्या राज्याची राजधानी केली आणि तेथे परमेश्वराचे एक मंदिर बांधले. हे मंदिर पुढे ज्यूंचे यात्रास्थान झाले आणि त्यांच्यातील वेगवेगळ्या गटांची एकी घडून येण्यास त्याचा हातभार लागला. इ. स. पू. ५७६ मध्ये बॅबिलोनियाचा सम्राट नेबुखड्नेझार ह्याने ह्या मंदिराचा विध्वंस केला व जेरुसलेमच्या नागरिकांना बॅबिलोनियात हद्दपार केले. बॅबिलोनियावर पर्शियाचा राजा सायरस ह्याची सत्ता प्रस्थापित झाल्यावर त्याने ज्यूंना मुक्त केले व मंदिर पुन्हा बांधण्याची परवानगी दिली. इ. स. पू. ५१५ साली मंदिर पुन्हा उभारले गेले. पुढे शिकंदराचा सेनापती सेल्युकस निकेटर याच्या सेल्युसिड राजवंशाची सत्ता पॅलेस्टाइनवर स्थापन झाली. ज्यूंचा एकेश्वरी धर्म दडपण्यात आला, मंदिर लुटले गेले व त्याला ' ऑलिंपिअन झीअस ' असे ग्रीक देवाचे नाव देण्यात आले. ग्रीकांविरुद्ध मकाबींनी बंड करून मंदिराची मुक्तता केली ( इ. स. पू. १६४ ) व ते शुद्ध करून घेतले. खि. पू. ६३ मध्ये रोमन सेनापती पॉम्पी ह्याने ज्यूडिआ काबीज केला व हेरॉड ह्या ज्यूला प्रांताचा सुभेदार नेमले. हेरॉडने मंदिराचा विस्तार वाढविला. पुन्हा ज्यूंची बंडे सुरू झाली ती मोडताना रोमनांनी खि. पू. ७० मध्ये जेरुसलेमला वेढा देऊन ते लुटले व मंदिराचा विध्वंस केला. अशा रितीने मंदिराच्या भोवती व त्याच्या साक्षीने ज्यूंच्या स्वातंत्र्ययुद्धाचा इतिहास घडलेला आहे.

८. *थिओडोर हर्झल* [ *Theodor Herzl* ] : १८६०–१९०४. नाटककार व पत्रकार. व्हिएन्नाचा रहिवासी. ज्यूंनी इतर समाजांशी समरस होऊन जावे असे मत मांडणारा हर्झल अनेक घटनांमुळे प्रखर राष्ट्रवादी बनला व १८९६ साली त्याने ' डेर ज्युडेनस्टाट ' हे ज्यूंसाठी स्वतंत्र राष्ट्रभूमीची आवश्यकता प्रतिपादन करणारे पुस्तक लिहिले. ज्यूंच्या प्रश्नावर एकमेव तोडगा म्हणजे इस्रायलमध्येच ज्यूंचे वेगळे राष्ट्र निर्माण करणे हा विचार स्पष्ट रितीने प्रथम हर्झल यानेच मांडला. १८९७ साली बासल येथे त्याने पहिली आंतरराष्ट्रीय झिऑनवादी परिषद बोलावली. हर्झल हा झिऑनवादाचा उद्गाता व जनक समजला जातो.

९. *यिडिश* [ *Yiddish* ] : हिब्रू, ' मिडल हाय ' जर्मन व स्लाव्हिक भाषा यांच्या मिश्रणाने बनलेली पूर्व युरोपातील ज्यूंची भाषा. तिला स्वतंत्र वाङ्मयीन भाषा म्हणून दर्जा प्राप्त झाला होता. एकोणिसाव्या व विसाव्या शतकात यिडिश वाङ्मयाला बहर आला.

१०. *फ्रॉइड* : सिगमंड फ्रॉइड [ Sigmund Freud ] १८५६–१९३९. ऑस्ट्रेलियन डॉक्टर व आधुनिक मनोविश्लेषणशास्त्राचा जनक.

११. *शिलर* : जोहान ख्रिस्तोफ शिलर ( Johann Christoph Schiller ) १७५९–१८०५. जर्मन नाटककार, भावकवी व इतिहास पंडित.

१२. *गटे* : योहान वुल्फगँग व्हॉन गटे [ Johann Wolfgang von

Goethe ] १७४९–१८३२. जर्मन महाकवी, वैज्ञानिक आणि मुत्सद्दी.

१३. *स्टाइनबेक* : जॉन-स्टाइनबेक [ John Steinbeck ]. अमेरिकन लेखक. ' ग्रेप्स ऑफ राथ ' ही त्याची प्रसिद्ध कादंबरी.

१४. *ट्वेन* : मार्क ट्वेन [Mark Twain] : १८३५–१९१०. सॅम्युएल लँगहॉर्न क्लेमन्स [ Samuel Langhorne Clemens ] हे त्याचे खरे नाव. अमेरिकन लेखक व विनोदकार. ' टॉम सॉयर ' ( १८७६ ), ' हकलबरी फिन ' ( १८८४ ), ' अ कनेक्टिकट यांकी ॲट दि कोर्ट ऑफ किंग आर्थर ' (१८८९) – इत्यादी पुस्तकांचा कर्ता.

१५. *मिलर* : आर्थर मिलर. प्रकरण ४, ' डेथ ऑफ अ सेल्समन ' वरील टीप पाहा.

१६ . *फास्ट* : होवार्ड फास्ट [Howard Fast]. एके काळी साम्यवादी विचारसरणीचा असलेला अमेरिकन लेखक, कादंबरीकार. ' स्पार्टाकस ' ही त्याची रोमन काळातल्या शेतकरी बंडखोरांवरची सुप्रसिद्ध कादंबरी. ' दि नेकेड गॉड ' हे त्याचे पुस्तक म्हणजे साम्यवादाबद्दलच्या भ्रमनिरासाची कहाणी आहे. साम्यवादाचा संन्यास घेईपर्यंत तो रशियात फार लोकप्रिय होता.

## प्रकरण ६

१. *ओनीडा* ( *Oneida* ) : जॉन हंफ्रे नोयेज [ John Hmphrey Noyes ] ह्याने अमेरिकेत पुटनी [ Putney ] येथे १८४४ साली स्थापन केलेली साम्यवादी वसाहत. नोयेजच्या पंथाचे नाव ' परफेक्शनिस्ट '. ' व्यामिश्र ' किंवा ' सांघिक ' विवाह [ ' Complex ', ' Group ' marrriage ] ही ह्या वसाहतीची एक वैशिष्ट्यपूर्ण संस्था. समष्टीला विरोधी प्रवृत्ती मुख्यतः कुटुंब-स्वार्थामधून निर्माण होतात आणि कुटुंबस्वार्थाचे प्रभावी नियमन न केल्यामुळेच पूर्वीच्या साम्यवादी वसाहती मोडकळीस आल्या असे नोयेजचे मत होते म्हणून ही व्यवस्था त्याने निर्माण केली. इच्छेप्रमाणे कोणीही कोणाशी लैंगिक संबंध जोडावा; मात्र जोडीदाराची अनुमती घ्यावी. पण प्रेम, अनुनय ह्या गोष्टी वर्ज्य होत्या म्हणून अनुमती तिन्हाइतामार्फत मिळविणे अवश्य असे. ओनीडाचा साम्यवाद १८८१ पर्यंत टिकून राहिला. पुढे तिचे संयुक्त भांडवली कंपनीत रूपांतर झाले.

२. *जॉन हंफ्रे नोयेज* ; १८११–१८८६. वरची टीप पाहा.

३. *शेकर* [ *Shaker* ] : क्वेकर पंथामधून फुटून निघालेल्या सभासदांनी इंग्लंडमध्ये स्थापन केलेला पंथ. ॲन ली ह्या मँचेस्टर येथे १७३६ साली जन्म पावलेल्या स्त्रीने ह्या पंथाचा स्वीकार केला व त्याचे पुढारीपण तिला प्राप्त झाले. इंग्लंडमधील छळाला कंटाळून शेकर लोक ॲनसह १७७४ साली अमेरिकेत गेले व त्यांनी तेथे वसाहती स्थापन केल्या. स्त्री-पुरुष सभासद ब्रह्मचर्य व्रत पाळीत. शरीरातून ' सैताना 'ला

झाकळून देण्यासाठी शेकर लोक शरीराला भयानक कंप देत ( --म्हणून ' शेकिंग क्वेकर ' किंवा ' शेकर ' हे नाव ), नाचत, घुमत, ओरडत, उड्या मारीत. अंतर्गत राहणी साम्यवादी पद्धतीची. शेकर वसाहती साम्यवादी स्वरूपात १९२५ पर्यंत टिकल्या.

७. *लायसेंको* : Trofim Denisovich Lysenko, ज. १८९८. १९४० पासून १९६४ पर्यंत रशियन सायन्स ॲकॅडमीच्या ' इन्स्टिट्यूट ऑफ जेनेटिक्स ' चा संचालक. पाश्चात्त्य जीवशास्त्रातील प्रमेये असिद्ध आहेत व अनुवंशाऐवजी 'परिस्थिती'ने [ Environment ] प्राणिजगत् व वनस्पतिजगत् घडते असा दावा ह्याने केला. ही विचारसरणी मार्क्सवादाला सुसंगत असल्यामुळे स्टालिनने त्याच्यावर वरदहस्त ठेवला व १९३० नंतरच्या काळात सोव्हिएत जीवशास्त्र, कृषिविज्ञान व कृषिधोरण यांवर त्याचा विलक्षण पगडा बसला. संकरित वनस्पतींद्वारा उत्पादनात क्रांतिकारक बदल घडवून आणण्याचे आश्वासन त्याने दिले. स्टालिनच्या मृत्यूनंतर लायसेंकोचे स्थान डळमळू लागले व १९६४ साली त्याला अधिकारावरून दूर करण्यात आले.

८. *मेंडेलवाद* [ *Mendelianism* ] : ग्रेगरी योहान मेंडेल [ Gregory Johann Mendel ], १८२२–१८८४. ब्रन, मोराव्हिया येथील एक धर्माधिकारी. ह्याने आनुवंशाचा नियम शोधून काढला. व्यक्तीची काही वैशिष्ट्ये आनुवंशिक तर काही परिस्थितिजन्य असतात आणि संपादित केलेली [ Acquired ] वैशिष्ट्ये आनुवंशिकतेने संक्रांत होत नाहीत असे ह्याने प्रतिपादन केले. प्रायोगिक जीवशास्त्रीय संशोधनाचा पाया मेंडेलने घातला.

९. *पाव्हलॉव्ह* : आयव्हान पेट्रोव्हिच पाव्हलॉव्ह [ Ivan Petrovich Pavlov ], १८४९–१९३६. सुप्रसिद्ध रशियन शरीरशास्त्रज्ञ व १९०४ च्या नोबेल पारितोषिकाचा विजेता.

१०. *लाल सेना* [ *Red Army* ] : सोव्हिएत रशियाची सेना.

११. *टर्टुलियन* : Quintus Septimius Florens Tertullianus. सु. १५५ ते सु. २२२. ख्रिश्चन धर्मपंडित व लेखक; मॉंटॅनिस्ट नावाच्या पंथाचा नेता.

१२. *स्लान्स्की खटले* [ *Slansky Trials* ] : रुडॉल्फ स्लान्स्की [ Rudolf Slansky ] १९०१–१९५२, हा झेक कम्युनिस्ट चळवळीचा ज्यू पुढारी. १९२१ सालापासून कम्युनिस्ट पक्षाचा सभासद. १९४८ च्या कम्युनिस्ट क्रांतीत ह्याचा मोठा भाग होता व त्यामुळे तो झेकोस्लोव्हाकियाचा उपपंतप्रधान झाला. १९५१ साली त्याच्यावर झिऑनवादी व पश्चिमेचा हेर असे आरोप ठेवून त्याला गिरफदार करण्यात आले व इतर तेरा जणांसह त्याच्यावर खटला भरण्यात आला. स्लान्स्कीने आरोपांची ' कबुली ' दिली, व तो धरून अकरांना वधाची शिक्षा देण्यात आली. अकरांपैकी दहा ज्यू होते. ह्या संपूर्ण खटल्याला ज्यू द्वेषाचा दर्प येत होता. १९६३ साली ( म्हणजे स्लान्स्कीच्या मरणोत्तर बारा वर्षांनी ) त्याच्यावरील आरोपांचा पुनर्विचार करण्यात

येऊन त्याला दोषमुक्त करण्यात आले आणि १९६८ साली ( मरणोत्तर ) त्याला पुन्हा पक्षसभासदत्वाचा मान देण्यात आला.

१४. *सोव्हिएत डॉक्टरांचा कट* : क्रेमलिनमधील राजकीय नेत्यांसाठी खास नेमलेल्या नऊ वैद्यक विशारदांनी काही नेत्यांचा वध करण्याचा केलेला कट उघडकीस आला आहे असे स्टालिनने ३ जानेवारी १९५३ ह्या दिवशी जाहीर केले. बहुतेक डॉक्टर ज्यू होते. अमेरिकन आणि ब्रिटीश हेरखाते व ' जॉइंट ' नावाची आंतरराष्ट्रीय ज्यू संघटना यांचे ते हस्तक आहेत व मार्शल व्हॅसिलेवस्की, मा. गोव्होरॉव, मा. कोनीएव, मा. श्टेमेंटो इत्यादी सेनाधिकाऱ्यांना ठार मारण्याचा त्यांचा बेत होता असे सांगण्यात आले. ह्या डॉक्टरांवर खटला भरण्याच्या आतच स्टालिनचा मृत्यू झाला. त्यानंतर एका महिन्याच्या आत या प्रकरणावर पडदा टाकण्यात आला. नव्या राजवटीने ह्या डॉक्टरांचे सन्मानित पुनर्वसन केले.

१५. *संश्लिष्ट पितृप्रतिमा* : लहानपणी पित्याकडून आपणांवर झालेल्या परिणामांची व संस्कारांची छाया कमी-अधिक प्रमाणात पुढच्या आयुष्यावरही राहाते. उदाहरणार्थ, पित्यामुळे सुरक्षितता मिळालेली असते आणि तीतून निर्माण झालेल्या परावलंबीपणामुळे एखादा माणूस प्रौढ वयातही एखादी व्यक्ती, एखादी संस्था, एखादे तत्त्वज्ञान इत्यादींवर मानसिक भार टाकतो. मनोविश्लेषण शास्त्राच्या भाषेत तो माणूस त्या विशिष्ट व्यक्तीवर किंवा संस्थेवर आपली पितृप्रतिमा आरोपित करतो. पिता-अपत्य संबंध, विशेषतः पिता-पुत्र संबंध संमिश्र असतात; बहुधा त्यात पित्याविषयी प्रेम व नावड किंवा द्वेष ह्या गोष्टी एकाच वेळी नांदत असतात. ( फ्रॉइडच्या मताप्रमाणे मुलग्याचे आईवर लैंगिक प्रेम असते; त्यात पिता वाटेकरी असल्यामुळे त्याच्याविषयी मत्सर व त्यातून द्वेष निर्माण होतो. ) म्हणजेच पितृप्रतिमा ' संमिश्र ' किंवा ' संश्लिष्ट ' [ Synthetic ] असते. किर्यात येदिदिमच्या सदस्यांनी तिचे तुकडे पाडून प्रेम तेवढे सोव्हिएत रशियाला व द्वेष अमेरिकेला अशी तिची विभागणी केली आहे असे लेखकाला म्हणावयाचे आहे.

१६. *मार्शल योजना* [ *Marshall Plan* ] : दुसऱ्या जागतिक युद्धात ज्यांची अर्थव्यवस्था मोडकळीस आलेली होती अशा सतरा युरोपीय देशांना आर्थिक मदत करण्याची अमेरिकन योजना. सेक्रेटरी ऑफ स्टेट जॉर्ज मार्शल ह्याने ही योजना पुढे मांडली. १९४८ ते १९५२ या कालावधीत अमेरिकेने ह्या योजनेखालील देशांना बाराशे कोटी डॉलर्सची मदत केली.

**प्रकरण ७**

*मॅडोना* ( *Madonna* ) : येशू ख्रिस्ताची आई, कुमारी मेरी.

**प्रकरण ८**

१. *ऑगस्तीन* : St. Augustine. इ. स. ३५४ ते ४३०. ख्रिश्चन धर्मशास्त्री.

इ. स. ३८७ मध्ये ह्याने ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली व ३९१ साली ह्या उत्तर आफ्रिकेतील हिप्पो या ठिकाणचा धर्मगुरू ( बिशप ) झाला. आपल्या विपुल लिखाणात पाखंडी मतांचे निराकरण करून ह्याने ख्रिस्ती धर्माला तात्त्विक अधिष्ठान प्राप्त करून दिले. ' देवाची नगरी ' [ City of God ] व ' कबुलीजबाब ' [ Confessions ] नावाचे आत्मकथन हे ह्याच्या अनेक ग्रंथांपैकी दोन प्रसिद्ध ग्रंथ.

२. *इफालुक* ( —*लिक* ) [ *Ifaluk* ( —*lik* ) ] : पॅसिफिक समुद्रातील प्रवाळ बेटांपैकी एक बेट व त्यातील आदिम जमात.

३. *प्युबलो इंडियन* [ *Pueblo Indian* ] : ईशान्य आरायझोना व वायव्य न्यू मेक्सिको ह्या प्रांतांतील अमेरिकन आदिम जमाती. प्रागैतिहसिक अनासाझी संस्कृतीचे वारस.

४. *झुनी* : Zuni. प्यूबलो इंडियनांमधील एका जमातीचे नाव.

५. *अध्ययनशास्त्र* [ *Learning Theory* ] : मानसशास्त्राची एक शाखा. मानवी वर्तणुकीतला [ Behaviour ] काही भाग उपजत असतो तर काही ' संपादित ' [ Acquired ] किंवा ' शिकलेला ' असतो. शिकण्याची प्रक्रिया ' प्रेरणा ' [ Stimulus ] व प्रतिक्रिया [ Response ] ह्या स्वरूपाची असते. अशा प्रक्रियांचा शास्त्रशुद्ध अभ्यास हा अध्ययनशास्त्राचा विषय आहे. 'अभ्यासामुळे' ( Practice ) जेव्हा वर्तणुकीत किंवा क्रियेत [ Performance ] सापेक्षपणे कायमचा बदल होतो तेव्हा एखादी गोष्ट ' शिकली ' गेली असे म्हणावयाचे. औपचारिक विषयांबरोबरच आपले हर्षामर्ष, भीती, इत्यादी गोष्टीही आपण शिकतो; किंबहुना आपले एकूण व्यक्तिमत्त्व हा काही अंशी शिकण्याचा परिपाक असतो. माणसे ह्या गोष्टी कशा शिकतात हे कळले म्हणजे त्यांच्या वर्तणुकीत बदल घडवून आणण्याच्या उपाययोजना सुचणे शक्य होते. औपचारिक शिक्षण, मानसिक व्यथांवरील उपचार इत्यादी क्षेत्रांत अध्ययनशास्त्रातील सिद्धांताचा वापर होऊ लागला आहे.

६. *दृढीकरण* [ *Reinforcement* ] : अध्ययनशास्त्रातील एक महत्त्वाची संकल्पना. हव्याशा वाटणाऱ्या गोष्टीचे आमिष [ Reward ] दाखवून एखादी क्रिया पक्की करणे.

४. *एसेन* [ *Essene* ] : एक प्राचीन ज्यू पंथ. येशू ख्रिस्तापूर्वी शंभर वर्षांपासून हा अस्तित्वात होता. हा साम्यवादी राहणी आचरीत असे. एसेन हा जगाच्या व्यवहारातून अंग काढून घेणारा [ withdrawing ] पंथ होता असे स्पिरो ह्यांनी ग्रंथात सूचित केले आहे. पण एसेनांनी रोमनांच्या विरोधी लढा दिला असाही उलेख काही ठिकाणी आढळतो. उदा. Haim Darin–Drabkin, *The Other Society*, Victor Gollancz, London, 1962, पृ. २२–२५. तसे असेल तर स्पिरो ह्यांनी किर्यात येदिदिमच्या प्रारंभीच्या स्वरूपाची एसेनांशी केलेली तुलना चुकीची ठरेल. अलेक्झँडर

ग्रे ह्यांनी *The Socialist Tradition from Moses to Lenin* ह्या पुस्तकात समाजवादी विचाराच्या विकासाचे टप्पे दाखविताना एसेनांचा उल्लेख केलेला आहे.

५. *जोसेफ कारो* : Joseph ben Ephrahim Karo. १४८८ ते १५७५. कारोचा जन्म स्पेनमध्ये झाला. तेथून ज्यूंची हकालपट्टी झाल्यावर तो तुर्कस्थान व नंतर पॅलेस्टाइनमध्ये आला. ह्याने 'बेत योसेफ' [ Bet Yoseph ] ही ज्यू कायद्याची प्रमाणित संहिता व तिचे संक्षिप्त रूप 'शुल्हन आरुख' [ Shulhan Arukh ] हे तयार केले. ज्यू ग्रंथांचा भाष्यकार म्हणून कारोचा अधिकार अनेक शतके मानला गेला.

६. *तालमुदिक पिलपुलिस्ट* [ Talmudic Pilpulist ] : बदलत्या कालमाना-प्रमाणे बायबलचा अर्थ लावण्यासाठी ज्या काही पद्धती निर्माण झाल्या त्यातील एक पद्धत म्हणजे पिलपुल. तर्क आणि युक्तिवाद ह्यांच्या साह्याने वादग्रस्त विषयाचे स्पष्टीकरण करणे वा त्यावर भाष्य करणे असा पिलपुलिस्ट पद्धतीचा अर्थ.

## प्रकरण ९

१. *सिनाईचे वीरपुरुष* : १९५६ च्या अरब-इस्रायल युद्धात ज्यूंनी अरबांचे आक्रमण रोखण्यासाठी केवळ सात दिवसांत सिनाई वाळवंट व गाझा पट्टी आपल्या ताब्यात आणली व अरबांचा मोठा पराभव केला. ह्या युद्धात मर्दुमकी गाजविलेल्या पिढीला उद्देशून 'Heroes of Sinai' सिनाईचे वीरपुरुष, असा शब्दप्रयोग वापरला आहे.

२. *सार्त्र* : ज्यँ-पॉल सार्त्र ( Jean-Paul Sartre). जन्म १९०५, पॅरिस. फ्रेंच अस्तित्ववादी ( Existentialist )तत्त्वज्ञ व लेखक. नव्या संदर्भातील 'डाव्या' विचारसरणीचा एक प्रभावी उद्गाता.

३. *सहा दिवसांचे युद्ध* : सोमवार ता. ५ जून ते शनिवार ता. १० जून १९६७ ह्या सहा दिवसांच्या अवधीत इस्रायलने आणखी एकदा अरबांचा प्रचंड पराभव केला.

# मराठी शब्दांचे इंग्रजी पर्याय

| | |
|---|---|
| अंतर्विवाह | Endogamy |
| अतिदेश | Extension |
| अध्ययनशास्त्र | Learning Theory |
| अनर्जित | Unearned |
| अन्यत्रवासी | Absentee |
| अपरिग्रह | Asceticism |
| अपावर्तन | Withdrawal |
| अभियोग | Trial |
| अमदानी | Tenure |
| अर्भकगृह | Infants' House |
| अव्हेर | Rejection |
| अशिव | Evil, the |
| आक्रमक | Aggressive |
| आक्रमण | Aggression |
| आत्मच्छल | Masochism |
| आत्मजाणीव | Self-consciousness |
| आत्मपर ( कार्य ) | Ego (function) |
| आत्मातीत ( कार्य ) | Super-ego (function) |
| आदर्श समाज | Utopia |
| आदर्शवादी | Utopian |
| आदिम | Primitive |
| आधार ( वाक्य ) | Major (Premise) |
| आंशिक | Segmental |
| आस्था | Interest |
| उत्कर्ष | Careerism |
| उपक्रम ( पद्धती ) | Project (method) |
| ऊर्मी | Drive |
| एकपति-पत्नी-पद्धती | Monogamy |
| एकसंध | Synthetic |
| कंपू | Clique |
| कळकळ | Interest |
| कामगार | Worker |
| कारकीर्द | Tenure |
| कुटुंबांतर्गत समागम | Incest |
| केंद्राभिसारी | Centrifugal |
| केंद्रानुगामी | Centripetal |
| कैवल्य | Absolute, the |
| काँटिनेंट (युरोपातील) | Continent (European) |
| गतिक्रिया, गतितत्त्व गतिशास्त्र | Dynamics |
| गोषपथक | Band |
| जननशास्त्र | Genetics |
| जन्मसिद्ध | Ascriptive |
| जागृती | Enlightenment |
| ज्यूद्वेष | Antisemitism |
| झिऑनवाद | Zionism |
| झिऑनवादी | Zionist |
| डामडौलाचा (उपभोग) | Conspicuous (consumption) |
| तलरेषा | Baseline |
| दृढमूल | Entrenched |
| द्विधावृत्ती | Ambivalent; ambivalence |
| ध्येयवाद | Ideology |
| नकार | Denial |
| नित्यक्रम | Routine |
| नित्यक्रमीकरण | Routinization |
| निर्वाणी | Crisis |
| निःसोव्हिएतीकरण | De--sovietization |

| | |
|---|---|
| निःस्तालिनीकरण | De--Staliniza-tion |
| पंथ | Sect |
| पदभ्रमण | Hike |
| परावृत्त ( पंथ ) | Withdrawing ( sect ) |
| परिचर्यागृह | Clinic |
| पालनपोषण | Rearing |
| पुनर्वलन | Reinforcement |
| पेचप्रसंग | Crisis |
| प्रकरणाभ्यास | Case-study |
| प्रतिक्षिप्त क्रिया | Reflexes |
| प्रबोधन | Enlightenment |
| प्रयोगशालेय | Clinical |
| प्रवर्तक | Pioneer |
| प्राकृतिक | Physical |
| प्राथमिक समाज | *Gemeinschaft*; Primary community |
| प्रेरणा | Impulse; motive; motivation. |
| मंजुरी | Sanction |
| महामंत्री | General Manager |
| मानववंशशास्त्र | Anthropology |
| मानववंशशास्त्रज्ञ | Anthropologist |
| मानसगतिक्रिया | Psychodynamics |
| मानसमितिशास्त्र | Psychometry |
| मूलपेशी | Foundation cell |
| रचना | Structure |
| रस | Interest |
| रहिवासी | Settler |
| लोकसमाज | Folk society |
| लोकसमूह | Community |
| लोकसमूहाभ्यास | Community study |
| लौकिकातीत | Transcendental |
| वंशवर्णन | Ethnography |
| वंशशास्त्र | Ethnology |
| वंशेतिहास | Ethnohistory |
| वयोवृद्धी | Aging |
| वर्ग | Category; Clas |
| वस्तुगत | Physical |
| वार्द्धक्यनिर्वाह | Pension |
| विकल्पना, विचारकल्प | Hypothesis |
| विचारप्रणाली | Ideology |
| विदेश | *Diaspora* |
| विरंगुळा, विसावा | Leisure |
| व्यक्तिमत्त्व | Personality |
| शिशुगृह | Toddlers' House |
| श्रमिक | Worker |
| श्रेणी | Category, Class |
| संकट, संकटावस्था | Crisis |
| संक्रामण | Transmission |
| संगोपन | Rearing |
| संभवसूचक | Projective |
| संमोहन | Charisma |
| संरचना | Structure |
| संस्कृति इतिहास | Ethnohistory |
| संस्थापक | Pioneer, Founder |
| संज्ञापन | Communication |
| सत्ता | Authority |
| सदस्या | *Chavera* |
| सभासद | Member |
| समतोल | Equilibrium |

| | |
|---|---|
| समन्वित | Synthetic |
| समवाय | Commune |
| समाज | Community; Society |
| समाजमितिशास्त्र | Sociometry |
| समूह | Community |
| समूहवाद | Collectivism |
| समूहसंस्कृतिवर्णन | Ethnography |
| सर्वग्रासवाद | Totalitarianism |
| सर्वग्रासी | Totalitarian |
| सर्वसाधारण (सचिव) | General ( secretary ) |
| सहभागी (निरीक्षक) | Participant ( observer ) |
| साथी | *Chaver* |
| सामाजिक संस्करण | Socialization |
| सामाजिकीकरण | Socialization |
| सामूहिक | Collective; Communal |
| सिद्धी | Achievement |
| सुविधा | Facility |
| सेंद्रिय | Organic |
| सेवा | Service |
| स्तरीकृत | Stratified |
| स्त्रीमुक्तिवाद | Feminism |
| स्थैर्य | Homeostasis |
| स्वप्नरंजनवादी | Romantic |
| स्वमतप्रस्थापन | Projection |
| स्वाभाविक | Normal |
| स्वाभाविकीकरण | Normatization |
| स्वारस्य | Interest |

# इंग्रजी शब्दांचे मराठी पर्याय

| | |
|---|---|
| *Absentee* | अन्यत्रवासी |
| Absolute, the | कैवल्य |
| Achievement | सिद्धी |
| Aggression | आक्रमण |
| Aggressive | आक्रमक |
| Aging | वयोवृद्धी |
| Ambivalence | द्विधावृत्ती [ नाम ] |
| Ambivalent | द्विधावृत्ती [ विशेषण ] |
| Asceticism | अपरिग्रह |
| Ascriptive | जन्मसिद्ध |
| Authority | सत्ता |
| *Band* | घोषपथक |
| Baseline | तलरेषा |
| *Careerism* | उत्कर्षवाद |
| Case-study | प्रकरणाभ्यास |
| Category | वर्ग, श्रेणी |
| Centrifugal | केंद्रापसारी |
| Centripetal | केंद्रानुगामी |
| Charisma | संमोहन |
| Chaver | सभासद, साथी |
| Chavera | सदस्या |
| Clinic | परिचर्यागृह |
| Clinical | प्रयोगशालेय |
| Clique | कंपू |
| Collective | सामुदायिक, सामूहिक |
| Collectivism | समूहवाद |
| Communal | सामूहिक |

| | |
|---|---|
| Commune | समवाय |
| Communication | संज्ञापन |
| Community | समाज; समूह; लोकसमूह |
| Community study | लोकसमूहाभ्यास |
| Conspicuous (consumption) | डामडौलाचा, दिखाऊ ( उपभोग ) |
| Continent (European) | कॉंटिनेंट ( युरोपातील ) |
| Crisis | आणीबाणी; निर्वाणी; पेचप्रसंग; संकटावस्था |
| *De-Sovietization* | निःसोव्हिएतीकरण |
| De-Stalinization | निःस्तालिनीकरण |
| Diaspora | विदेश |
| Drive | ऊर्मी |
| Dynamics | गतिक्रिया; गतितत्त्व गतिशास्त्र |
| *Ego function* | आत्मपर कार्य |
| Ego gratification | आत्मसमाधान |
| Endogamy | अंतर्विवाह |
| Enlightenment | जागृती; प्रबोधन |
| Entrenched | दृढमूल |
| Equilibrium | समतोल |
| Ethnography | समूहसंस्कृतिवर्णन |
| Ethnohistory | संस्कृति इतिहास |
| Ethnology | वंशशास्त्र |
| Evil, the | अशिव |
| Exogamy | बहिर्विवाह |
| Extension | अतिदेश |
| *Facility* | सुविधा |
| Feminism | स्त्रीमुक्तिवाद |
| Folk society | लोकसमाज |
| Foundation cell | मूलपेशी |
| Founder | संस्थापक |
| *Gemeinschaft* | प्राथमिक समाज |
| General Manager | महामंत्री |
| General Secretary | सर्वसाधारण सचिव |
| Genetics | जननशास्त्र |
| *Hike* | पदभ्रमण |
| Homeostasis | स्थैर्य |
| Hypothesis | विकल्पना; विचारकल्प |
| *Ideology* | ध्येयवाद; विचारप्रणाली |
| Impulse | प्रेरणा |
| Incest | कुटुंबांतर्गत समागम |
| Infants' House | अर्भकगृह |
| Intellectual | बुद्धिजीवी; बुद्धिमंत; विचारवंत |
| Interest | आस्था; कळकळ; रस; स्वारस्य |
| *Leisure* | विरंगुळा; विसावा |
| *Major Premise* | आधारवाक्य |
| Masochism | आत्मच्छल |
| Monogamy | एकपति-पत्नी-पद्धती |
| Motivation | प्रेरणा |
| *Normal* | स्वाभाविक |
| Normalization | स्वाभाविकीकरण |
| *Old age pension* | वार्द्धक्यनिर्वाह |
| Organic | सेंद्रिय |
| *Participant* (observer) | सहभागी (निरीक्षक) |
| Personality | व्यक्तिमत्त्व |
| Physical | प्राकृतिक; वस्तुगत |
| Pioneer | प्रवर्तक; संस्थापक |
| Primary (community) | प्राथमिक ( समाज ) |

Primitive आदिम
Project (method) उपक्रम ( पद्धती )
Projective संभवसूचक
Psychodynamics मानसगतिक्रिया
Psychometry मानसमितिशास्त्र
*Rearing* पालनपोषण; संगोपन
Reflexes प्रतिक्षिप्त क्रिया
Reinforcement पुनर्बलन
Rejection अव्हेर
Romantic स्वप्नरंजनवादी
Routinization नित्यकर्मीकरण
Routine नित्यक्रम
*Sanction* मंजुरी
Sect पंथ
Segmental आंशिक
Self-consciousness आत्मजाणीव
Settler रहिवासी; वसाहत करणारा
Service सेवा
Socialization सामाजिक संस्करण; सामाजिकीकरण
Sociometry समाजमितिशास्त्र
Stratified स्तरीकृत
Structure रचना, संरचना
Super-ego (function) आत्मातीत ( कार्य )
Synthetic एकसंध; समन्वित
*Tenure* असदानी; कारकीर्द
Toddlers' House शिशुगृह
Totalitarian सर्वग्रासी
Totalitarianism सर्वग्रासवाद
Transcendental लौकिकातीत
Transmission संक्रामण
Trial अभियोग
*Unearned* अनर्जित
Utopia आदर्श समाज
Utopian आदर्शवादी
*Withdrawal* अपावर्तन
Withdrawing (sect) परावृत्त ( पंथ )
Worker कामगार; श्रमिक
*Zionism* झिऑनवाद
Zionist झिऑनवादी

# सूची






इस्रायली किबुट्झ हा समाजवादाचा एक वेगळ्या धर्तीचा आणि अधिक उन्नत प्रयोग आहे. तथाकथित ' समाजवादी ' देशांतील समाजवादापेक्षा किबुट्झच्या समाजवादाचा आशय अधिक समृद्ध असून त्याचे तंत्रही अधिक प्रभावी आहे. इस्रायल राष्ट्राच्या उभारणीत तर किबुट्झचा ऐतिहासिक वाटा एवढा मोठा आहे की किबुट्झशिवाय इस्रायलचा विचार करणेही अशक्य आहे. शिवाय किबुट्झने आर्थिक व्यवहार, सामाजिक रचना, शिक्षण इत्यादि क्षेत्रांमध्ये इतके नवीन प्रयोग केलेले आहेत की समाजशास्त्रज्ञ, मानवशास्त्रज्ञ, अर्थशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ, शिक्षणशास्त्रज्ञ, संस्कृतिशास्त्रज्ञ ह्यांनी त्याचा हरतऱ्हांनी अभ्यास केला आहे.



मराठी वाचकांना ह्या प्रयोगाची ओळख व्हावी म्हणून किबुट्झविषयक एका महत्त्वाच्या पुस्तकाचा अनुवाद विवेचक प्रस्तावनेसह या ग्रंथात सादर करण्यात आला आहे.